# संस्थानांतील लोकशाहीचा लढा

संपादक :

विश्वनाथ अनंत पटवर्धन, बी एस्सी.

१९४०

मूल्य साडे तीन रुपये

[illegible]

[illegible]

कै. श्री. वामनराव पटवर्धन

यांच्या

पवित्र चरणीं समर्पण

वि. अ. पटवर्धन

# प्रस्तावना



प्रस्तुतसारखें एकादें पुस्तक प्रसिद्ध व्हावें अशी फारा दिवसाची इच्छा होती. संस्थानी चळवळींच्या प्रवर्तकात माझे पूज्य वडील कै. ती. अनंत विनायक ऊर्फ वामनराव पटवर्धन हे असल्यामुळें व त्याच्याच हाताखालीं आर्यभूषण छापखान्यात आणि त्यांच्या 'संस्थानी स्वराज्या'च्या वृत्तपत्रीय कार्यात काम करण्याचा सुयोग आल्यामुळें संस्थानी चळवळीत ज्यांनीं हाल आणि कष्ट सोसले त्याची मला बरीच माहिती झाली होती. ही मंडळी प्रसिद्धिविन्मुख असल्यामुळें त्यांच्या कामाचा गाजावाजा कधींच झाला नाही या निरलस आणि स्वार्थत्यागी कार्यकर्त्यांच्या खटपटीमुळें दक्षिण महाराष्ट्रातील संस्थानात विलक्षण चळवळ झाली.अखिल हिंदुस्थानच्या संस्थानी चळवळींचा इतिहास लिहिला गेल्यास त्यांत नमूद होणारी दक्षिणेंतील महाराष्ट्रीय वा कर्नाटकस्थ संस्थानी कार्यकर्त्यांनीं बजावलेली कामगिरी निःसंशय अभिमानास्पद व परप्रांतीयांना सुद्धां आदरणीय वाटण्यासारखी झालेली आहे, हे मजप्रमाणेंच इतरानाहि आढळून येईल. संस्थानी चळवळीच्या माहितीच्या अभावीं खालसांतील पुढारी संस्थानी प्रजाजनांच्या एकंदर निरुत्साहाबद्दलची जी हेटाळणी करीत असतात, त्यामुळें या भागातील संस्थानी चळवळीचा आढावा घ्यावा अशी उत्कट इच्छा मला होऊं लागली. त्याबद्दल वडिलांच्या बरोबर चर्चा करतांना त्यानी मला उत्तेजनहि दिलें. पण सर्वच गोष्टी आपल्या इच्छेप्रमाणें होत्या तर काय पाहिजे होतें ! माझे वडील ता. १४-२-१९३९ रोजीं देवाधीन झाले. नंतर सांगलीतील एक निस्सीम कार्यकर्ते आणि माझे स्नेही कै. गोविंदरावजी चिंनिवाले यानी वामनरावाचा स्मारक ग्रंथ म्हणून कांहीं प्रकाशन करावें असें सुचविलें. त्यामुळें माझ्या सुप्त आकांक्षेस परत स्फूर्ति मिळाली.

'संस्थानी स्वराज्या'च्या संपादनकार्यांतील माझ्या स्नेह्यांना आणि इतर कार्यकर्त्यांना मीं माझी सूचना कळविल्यावर, त्या सर्वांना ही कल्पना पटली आणि सर्वांच्या इच्छेचें आणि मदतीचें फळ म्हणजे प्रस्तुतचें पुस्तक होय.

या पुस्तकाच्या लेखनांत माझा व्यक्तिशः भाग फारच थोडा आहे. बहुतेक सर्व लेख त्या त्या संस्थानांतील प्रमुख कार्यकर्त्यांनीं अगर अभ्यासूंनीं लिहिलेले आहेत. हे सर्व लेख त्या त्या संस्थानांतील चळवळीचा आढावा घेण्याच्या दृष्टीनें लिहिलेले असून त्यांत तारीखवार इतिहास सांपडणार नाहीं; त्याचप्रमाणें एखाद्या संस्थानांतील चळवळीचें जें वैशिष्ट्य असेल, त्या वैशिष्ट्याच्या आधारानेंच लेख लिहिले गेले आहेत. उदाहरणार्थ, भोर व सांगली संस्थानांतील चळवळी या कार्यकर्त्यांच्या तपश्चर्येच्या जोरावर चाललेल्या आहेत. त्या संस्थानांतील विधि-मंडळांतून विशेष प्रभावी काम झालें नाहीं अगर तसें होऊनहि त्याची कसोशीनें अंमलबजावणी झाली नाहीं. तेव्हां त्यांत विधिमंडळाच्या कार्याची माहिती विशेष नसल्यास आश्चर्य नाहीं. उलट, फलटण संस्था-नांत विधिमंडळाचेंच वैशिष्ट्य आहे आणि त्याचीच माहिती विशेषत्वानें आहे. अशा प्रकारें एकंदर लेखांचें धोरण ठेवण्याचा शक्य तों प्रयत्न केलेला आहे. कोल्हापूर व तेथील मांडलिक संस्थानें हा लेख, थोडा लांबट जरी वाटला, तरी त्याचें विशेष महत्त्व आहे हें विशद करण्याची आवश्य-कता आहे असें वाटत नाहीं. दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेच्या कार्य-क्षेत्राखालील हैद्राबाद संस्थानांतील लढ्याची हकिकत या पुस्तकांत आलेली नाहीं. या लढ्याच्या माहितीचा ३००।४०० पानांचा ग्रंथ तयार होत आहे असें मला कळल्यावरून या लढ्याची माहिती दिलेली नाहीं; तरी या-बद्दल हैद्राबाद संस्थानचे प्रजाजन व कार्यकर्ते गैरसमज करून घेणार नाहींत अशी आशा आहे. या पुस्तकानें संस्थानी प्रजाजनांना चळवळीच्या माहितीची लागलेली भूक भागली असें जर दिसून आलें, तर मला साह-जिकच समाधान वाटेल आणि अशा प्रकारें संस्थानी प्रजाजनांची सेवा करीत राहण्यास उत्तेजन मिळेल.

सदर पुस्तक कै. ती. वामनराव पटवर्धन यांच्या प्रथम पुण्यतिथीच्या दिवशीं म्हणजे ता. ४ मार्च १९४० रोजीं प्रकाशित करावें असा मनोदय होता. पण अनपेक्षित अडचणींमुळें ती गोष्ट साध्य झाली नाहीं. आतां दाक्षिणी संस्थानांतील कार्यकर्त्यांच्या संमेलनप्रसंगीं ता. २८–४–१९४० रोजीं हें पुस्तक प्रसिद्ध करण्याचा योग येत आहे ही व्यक्तिशः आनंदाची व समाधानाची गोष्ट आहे. निरनिराळ्या संस्थानांतील कार्यकर्त्यांनीं माझ्या वडिलांच्याबद्दल असणाऱ्या प्रेमादरानें प्रेरित होऊन माझी विनंति मान्य करून लेख लिहून दिले याबद्दल त्यांचे किती आभार मानावे तेंच कळत नाहीं. कित्येक लेख निनांवी आहेत, याचें कारण संस्थानांतील विचित्र परिस्थितिच होय. मी या ठिकाणीं या सर्व लेखकांचे अंतःकरणपूर्वक आभार मानतो. त्याचप्रमाणें कै. ती. वामनराव पटवर्धन यांचे संस्थानी चळवळींतील सहकारी श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं आयत्या वेळीं विनंति केल्यावर सुद्धां ती मान्य करून सदर पुस्तकाबद्दल जें पत्र पाठविलें, त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. हें पुस्तक प्रसिद्ध करण्याचे कामीं ज्या एका व्यक्तीनें अंतःकरणपूर्वक आणि मजवरील प्रेमानें सहानुभूतिपूर्वक पाठिंबा दिला, त्याचा या ठिकाणीं उल्लेख करणें कोणास अप्रयोजक वाटलें, तरी तसा तो करणें हें मला कर्तव्य वाटतें. हे गृहस्थ म्हणजे आर्यभूषण छापखान्याचे मुख्य व्यवस्थापक श्री. विठ्ठलराव बर्वे हे होत. त्यांनीं जर सहानुभूति दाखविली नसती, तर हा प्रकाशनयोग आला असता असें मला वाटत नाहीं. तसेंच आर्यभूषण छापखान्यांतील माझ्या सहकाऱ्यांनीं हें पुस्तक जलदीनें छापून देण्याची जी त्वरा केली, याबद्दल मी त्या सर्वांचा अत्यंत ऋणी आहें.

संस्थानी स्वराज्य कचेरी, पुणें.<br>ता. २६-४-१९४०.

वि. अ. पटवर्धन

# संस्थानी चळवळीस बाहेरील मार्गदर्शनाची अनावश्यकता.

## श्री. तात्यासाहेब केळकर यांचा अभिप्राय.

॥ श्री ॥ देवगड, २४।४।४०.

रा. रा. विश्वनाथराव पटवर्धन यांस कृ. सा. न. वि. वि.—

" संस्थानांतील लोकशाहीचा लढा " या पुस्तकाचीं छापील २५० पानें तुम्हीं पाठविलीं तीं आजरोजीं हातीं आलीं. पण सोबतच्या पत्रांत असें लिहिलें आहे कीं, या ग्रंथाचा प्रकाशन-समारंभ ता. २८ रोजीं व्हावयाचा आहे. यावरून उघडच होईल कीं, हा ग्रंथ सर्व नीट वाचून ह्यासंबंधीं विस्तृत अभिप्राय मी पाठवून तो वेळेवर तुम्हांला मिळून छापला जाऊन ग्रंथांत संग्रहित होणें हें दुर्घट काम होय. तथापि, मीं आपल्या-कडून एक क्षणाचाहि विलंब न करतां या ग्रंथासंबंधानें सहज सुचणारे चार शब्द आनंदानें लिहून पाठवितों, त्यांचा होईल तो उपयोग तुम्हीं करावा.

एका अर्थानें या ग्रंथांत संस्थानी प्रजेच्या चळवळीचा इतिहास अद्य-यावत् लिहिला गेलेला आहे. तथापि ही चळवळ मूलतः कांहीं नवीन नाहीं. तिला आज जवळ जवळ वीस वर्षें झालीं आहेत. आणि १८८५ सालीं स्थापित झालेल्या राष्ट्रीय सभेला पहिल्या वीस वर्षांत जितकें यश आलें तितकें यश नवीन निघालेल्या या चळवळीला तिच्या पहिल्या वीस वर्षांत आलें असें निःशंकपणें म्हणतां येईल. पण अशी गोष्ट होणें अप-रिहार्यच होतें. कारण मुख्य समुद्राला भरती आली म्हणजे त्याच्याशीं संबंध येणाऱ्या नद्या, खाड्या, नाले व मोऱ्या यांनाही भरती येते. राष्ट्रीय सभेची चळवळ ही अखिल भारतीय होती आणि संस्थानिक हे आपल्या संस्थानांच्या स्वातंत्र्याचा हक्क कितीहि सांगोत, त्यांना संस्थानें हीं भरतखंडांतून उचलून बाहेर नेतां येणें शक्य नाहीं. हद्दीचे दगड लावल्यानें हवेला प्रतिबंध होत नाहीं. आणि राष्ट्रीय चळवळ ही एक

प्रकारची निसर्गांतून उत्पन्न होणारी सर्वव्यापी अशी हवाच आहे. राष्ट्रीय सभेशीं संबंध येणाऱ्या संस्थानी चळवळीचीं स्थित्यंतरें उलट सुलट कशीं होत गेलीं यांत मी येथें शिरत नाहीं. कारण त्यांत महात्मा गांधीसारख्यांच्या लहरीपणाला मला दूषण द्यावें लागेल. परंतु संस्थानी चळवळीला जें आज रूप प्राप्त झालें आहे तिची स्फूर्ति राष्ट्रीय सभेपासूनच आहे ही गोष्ट कोणालाही नाकबूल करतां येणार नाहीं व त्याकरितां आपणां संस्थानप्रेमी व संस्थानहितैषी लोकांनीं तिचें अवश्य ऋणी राहिलें पाहिजे.

कोणतीहि गोष्ट लहान प्रमाणांत किंवा क्षेत्रांत घडून यावयाची तर ती लवकर घडून येऊं शकते. उलट प्रमाण व क्षेत्र हीं मोठीं असलीं म्हणजे तीच गोष्ट घडून येण्याला विलंब लागतो. या सिद्धान्ताचा आधार संस्थानाविषयीं बोलतांना मी घेत असतों. ह्याचा अनुभव महाराष्ट्रांतील औंध संस्थानानें आणून दिला आहे. तो असा कीं, त्या चिमुकल्या संस्थानांत अवघ्या अठरा वर्षांत ग्रामपंचायतीवर अधिष्ठित झालेल्या स्वराज्याची घटना अमलांतहि आली. श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधि हे मूळपासूनच उदारमतवादी होते. त्यांना श्रीमंत अप्पासाहेब यांच्या अत्युच्च कोटीच्या ध्येयवादाची व समाजसत्तावादाची जोड मिळाली व श्रीमंत बाळासाहेब यांनीं स्वार्थत्यागाची तयारी दाखविली; यामुळें औंध संस्थानांतील राज्यक्रांतीला अद्भुत हें वर्णन लावतां येण्याजोगें असून उलट आज नवीन घटनेंत प्रगट झालेलें लोकशाही तत्त्व अतिरेकाला पोहोंचलें कीं काय, त्याची अतिशयोक्ति झाली कीं काय, अशा तऱ्हेचे प्रवाद संस्थानी प्रजेच्या हितचिंतकांच्या तोंडूनच ऐकूं येतात व त्याच्या सुपरिणामाविषयीं त्यांचीं मनें साशंक दिसतात. म्हणजे Extremes meet ( उलट बाजूच्या टोकांची गांठ पडते ) ही म्हण खरी ठरूं पहात आहे. अशी गोष्ट मोठ्या प्रमाणांतील संस्थानांची झालेली नाहीं. महाराष्ट्रांतील सर्वांत मोठें संस्थान कोल्हापूर, पण तेथील हालहवाल या ग्रंथाच्या पहिल्या पन्नास पानांत वाचकांस वाचावयास मिळेल. पण मला असा विश्वास वाटतो कीं, कोल्हापुरांत

सुरू झालेली प्रजापरिषदेची चळवळ आतां बहुसंख्य सजातीय ब्राह्मणेतरांच्या हातीं गेल्यामुळें तीं लवकरच फलप्रद झाल्याशिवाय राहणार नाहीं व अशा रीतीनें सर्व संस्थानी क्षेत्र राजकीय सुधारणेनें व्यापलेलें आढळून येईल.

या संस्थानी प्रजेच्या चळवळींत पडल्यापासून परवां ता. १० एप्रिलपर्यंत मी निश्चयानें असें प्रतिपादन करीत आलों आहें कीं, देशी संस्थानें हीं रहावीं. तीं नष्ट होऊन ब्रिटिश राज्याच्या तांबड्या समुद्रांत तीं बुडून जाऊं नयेत आणि या माझ्या मताबद्दल ता. २१ एप्रिलपर्यंत मी प्रतिकूल टीका सोशीत आलों आहें. पण मला हें पक्कें माहीत आहे कीं, ही टीका होते ती माझें सांगोपांग मत, त्यांतील मर्यादा व त्यांतील मर्म लक्षांत न घेऊनच होते. यामुळें मला अशा टीकाकारांचें हसूं येतें. पण त्याहि मुद्याची विशेष चर्चा करण्याला मला या ठिकाणीं सवड नाहीं. मी इतकेंच सांगतों कीं,संस्थानें राहावीं असें मीं म्हटलें तरी त्यांत संस्थानिक म्हणून कोणी असतील तर त्यांचा दर्जा, अधिकार काय असावे, त्यांचीं कर्तव्यें काय असावीं, त्यांनीं स्वार्थत्यागाची तयारी कशी ठेवावी, लोकमताला मान किती व कसा द्यावा, हेंहि मीं वेळोवेळीं अगदीं स्पष्ट करून सांगितलें आहे आणि राष्ट्रांत प्रांत, प्रांतांत जिल्हे, जिल्ह्यांत तालुके व सर्वसाधारणपणें स्थानिक स्वराज्याच्या अधिकारी संस्था ही रचना व व्यवस्था जोंपर्यंत अवश्य आहे तोंपर्यंत त्याबरोबरच पण देशी लोकांच्या पराक्रमांतून निर्माण झालेलीं, ब्रिटिश सरकाराविरुद्ध स्वातंत्र्याचा दावा सांगणारीं व एकाच मनुष्यखाणींतून निघालेले राज्यकर्ते व प्रजापुढारी यांच्या खेळीमेळीनें चालणारीं एका नव्या प्रकारच्या लोकशाहीचीं राज्यें हिंदुस्थानांत राहावीं या मताचा आग्रह मी कधींहि सोडणार नाहीं. मग कोणी मला कितीहि नांवें ठेवो.

प्रस्तुत ग्रंथांत दक्षिण महाराष्ट्रांतील प्रमुख संस्थानांतील चळवळीचा इतिहास एकत्र छापून तुम्हीं पितृभक्तीचें एक कार्य फार चांगलें केलें असें

मी म्हणतों. तुम्ही सनातनी धार्मिक वृत्तीचे असल्यानें पितृश्राद्ध यथा-विधि करीत असतां हें मला माहीत आहे. ती बाब खाजगी झाली. पण रा. वामनराव पटवर्धन यांनीं जन्मभर प्रिय मानलेलें असें एकच विशेष कार्य सार्वजनिक स्वरूपाचें होतें. त्या दृष्टीनेंहि तुम्ही या ग्रंथरूपानें त्यांचें श्राद्धच करीत आहां, म्हणून तुमच्या श्रद्धायुक्त पितृभक्तीला मी धन्यवाद देतों. रा. वामनराव यांच्या पश्चात् तुम्ही 'संस्थानी स्वराज्य' हें पत्र बंद पडूं दिलें नाहीं, सुरू ठेविलें आहे व तीच कर्तव्यनिष्ठा प्रस्तुत पुस्तक प्रसिद्ध करण्यांत दिसून येतें. खुद्द संस्थानी प्रजा तिच्याकरितां होणाऱ्या चळवळीला कितपत द्रव्यसहाय्य देते हें 'संस्थानी–स्वराज्य' पत्राच्या हिशेबी व्यवहारावरून मला माहीत आहे. आणि त्या गोष्टीचा उल्लेख अशाकरितां करितों कीं, प्रस्तुतचें हें कार्य देखील तुम्हांला स्वार्थत्यागपूर्वकच बहुधा करावें लागलेलें असेल.

संस्थानांतून झालेल्या चळवळीचा परामर्ष घेऊन तिचा इतिहास या ग्रंथांत अद्ययावत् आणून ठेविला आहे. अर्थात् यापुढील आणखी एक पुस्तक असेंच लिहितां येण्याइतकी चळवळ करण्याचें काम संस्थानी प्रजेच्या खातीं नांवें लिहिलें जाईल. त्याची भरपाई करणें हें संस्थानी प्रजेकडे आहे. त्याला आतां बाहेरील मार्गदर्शकत्वाची गरज उरलेली नाहीं. स्थानिक बुद्धिमत्ता, स्वार्थत्याग व धैर्य यांच्या बळावर तें कार्य आतां सिद्ध व्हावें व होण्यासारखें आहे असें मला वाटतें. कळावें.

न. चिं. केळकर

# उपोद्‌घात



संस्थानांत लोकशाहीचा लढा सुरू व्हावा याबद्दल पुष्कळ पुरातन वृत्तीच्या लोकांना आश्चर्य वाटतें. संस्थानांत स्वराज्य असतांना संस्थानांतून लोकशाहीची आवश्यकता तरी कां असावी अशी पुष्कळांना शंका येते. संस्थानांचे अधिपति अगर संस्थानी दरबारें आणि प्रजा एकाच हाडामांसाची आणि समान संस्कृतीची असल्यामुळें राजपक्ष आणि प्रजापक्ष, अगर सरकारपक्ष व लोकपक्ष असे भेद उद्भवूं शकत नाहींत असें त्यांचें मत आहे. कित्येकदा संस्थानांच्या अभिमान्यांनाही ही विचारसरणी पटत असल्यासारखें दिसतें. 'राजा हा देवाचा अंश आहे' अशी भावना पुढारलेल्या राजधान्यांच्या गांवीं जरी नसली, तरी ती भावना संस्थानांच्या आडवळणी मुलुखांत, रानावनांत, कडेकपारीं अजून फार मोठ्या प्रमाणावर वसत आहे, हें संस्थानांतून भटकणाऱ्या इसमाच्या ध्यानीं आल्याशिवाय रहात नाहीं. राजा आपल्या घरीं आला, तर भक्तिभावानें त्याची पूजाअर्चा करण्याची पद्धतही त्याच कारणामुळें पडली असल्यास नवल नाहीं. मोठमोठे धर्मसंस्थापक, मान्यवर आणि पूज्य पुढारी आणि आपल्या कर्तृत्वानें दुसऱ्यावर छाप पाडणारे महापुरुष यांच्यावर श्रद्धा बसल्यानें जसे त्यांचे हजारों पूजक असतात, तद्वत्‌च आपला राजा हा मान्यवर आणि पूजनीय अशी व्यक्ति आहे अशी सर्वसाधारण समजूत आहे. या समजुतींत केवळ जन्मजात मोठेपण हेंच गृहीत धरलेलें असतें. उत्तम राजा कोण तर रामराजा आणि त्या राजाचे सर्व वंशज पिढ्यान्‌पिढ्या त्याच्या प्रजेस पूज्यच वाटत असतात. पुण्यशाली श्री शिवछत्रपति महाराज, देवी अहिल्याबाई, रणझुंझार महादजी शिंदे आदि ज्या कर्तबगार पुरुषांनीं आपल्या हातावर शिर घेऊन स्वराज्य संपादन केलें, अगर कीर्ति संपादली, त्यांचे उतराई होण्यासाठीं म्हणून परंपरागत चालत आलेला राजांच्याबद्दलचा अभिमान

हिंदी लोकांच्या हाडीमासीं खिळलेला आहे. पण कोणत्याही गोष्टीला मर्यादा ही ठरलेली असते. जेव्हां दुसरा आपल्या चांगुलपणाचा फायदा स्वतःच्या स्वार्थासाठीं घेतो आणि पूर्वजांच्या नांवावर तो स्वतःची चैन चालवितो, असें जेव्हां दिसतें, तेव्हां त्या व्यक्तीबद्दलच्या अभिमानास ओहोटी लागते आणि स्वाभिमानाची व स्वसामर्थ्याची जाणीव होऊं लागते. 'पूर्वजांची सांगे कीर्ति। तो एक पढतमूर्ख' असें श्रीरामदास स्वामींनीं उपदेशिलें आहे. अशीच स्थिति आजच्या संस्थानाधिपतींची झालेली आहे.

संस्थानाधिपतींनीं आपल्या पूर्वजांच्या पुण्याईच्या बळावर आपला स्वार्थ साधण्याचा जेव्हां शक्य तितका ज्यास्त प्रयत्न केलेला आहे असें दिसून येऊं लागलें, तेव्हां संस्थानी प्रजेचे डोळे उघडले. आपण ज्याची पूजा करतों, तो पूजनीय नाहीं असें त्यांना वाटूं लागलें. आणि संस्थानी स्वराज्यांत खऱ्या स्वराज्यासाठीं लोकांची धडपड सुरू झाली असल्यास नवल नाहीं. स्वराज्य हा शब्द दादाभाई नवरोजी या महापुरुषानें प्रथम खालसा मुलुखांत उच्चारला आणि 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे आणि मी तो मिळविणारच' असा मंत्र लोकमान्य टिळकांनीं सबंध हिंदी राष्ट्राला दिला. टिळकांनीं स्वराज्य म्हणतांना गोरे राज्यकर्ते यांना उद्देशून तो वापरलेला आहे. गोऱ्या राज्यकर्त्यांच्या ठिकाणीं हिंदुस्थानांतील लोक राज्यकर्ते झाले पाहिजेत अशी त्यांची कल्पना होती. आपले लोक सत्ताधारी झाल्यावर लोकांच्या इच्छेप्रमाणें कारभार चालविला जाणार हेंहि इतकेंच उघड आहे. पण संस्थानांत हिंदी राज्यकर्ते कारभार चालवित असतांना हा प्रश्न कसा उद्भवतो अशी कोणासही शंका येणें साहजिक आणि स्वाभाविक आहे. संस्थानांत आपल्याच हाडामांसाचे लोक राजयंत्रांत असले, तरी तें राजयंत्र कलंकित झालेलें आहे, त्याची किल्ली दुसऱ्याच्या ताब्यांत आहे आणि त्यामुळें संस्थानांतील स्वराज्य हें संस्थानांतील जनतेच्या इच्छेवर

आधारलेलें नसून परकीय सत्तेच्या कृपाछत्राखालीं अस्तित्वांत आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. याशिवाय दुसराही एक मुद्दा विचारांत घेणें इष्ट आणि आवश्यक आहे. खरोखरींचें आपलें राज्य असेल आणि राजदंडधारी आपलें कर्तव्य योग्य रितीनें पार पाडीत नसेल, तर त्याला समजाविण्याचा अधिकार त्याच्या भाईबंदांस जर नसेल, तर कोणास असणार आहे? इंग्लंडांत स्वराज्य असूनही पहिल्या चार्लसला देहदंड झाला, तो कां झाला? फ्रान्समध्यें राज्यक्रांति कां झाली असती? तुर्कस्थानांतील खलीफास परागंदा कां व्हावें लागलें असतें? आणि रशियाच्या झारला आपल्या राजधानीला रामराम कां ठोकावा लागला असता? इंग्लंड, फ्रान्स, तुर्कस्थान, रशिया या देशांत जी भयंकर घडामोड घडून आली ती राज्यकर्त्यांच्या जुलमी, अरेरावी आणि एकतंत्री राज्ययंत्रामुळें झाली. ज्या ठिकाणीं व ज्यावेळीं राजा आपल्या प्रजेच्या हक्कांवर आक्रमण करील, त्या ठिकाणीं व त्यावेळीं राजपक्ष आणि प्रजापक्ष यांच्यांत सामना होऊन जो बलवान् असेल, तो यशस्वी होणार हें उघड नाहीं काय? पण वरील उदाहरणें हिंसामय क्रांतीचीं झालीं. अलीकडील अगदीं ताजें उदाहरण घ्यावयाचें झालें तर अष्टम एडवर्ड यांचें घेतां येईल. त्यांनीं स्वतःसाठीं पसंत केलेली आपली वधू ही राजासिंहासनावर बसणें योग्य नाहीं असें जेव्हां इंग्लंडचे प्रजापुढारी, म्हणजे मुख्य प्रधान बाल्डविन यांनीं सांगितलें, तेव्हां त्यांना—खुद्द बादशहांना—राजपदाचा त्याग करावा लागला. रामानें जनतेच्या इच्छेसाठीं सीतेचा—आपल्या पत्नीचा—त्याग केला, तर अष्टम एडवर्ड यांनीं पत्नीसाठीं राज्याचा मोह सोडला. या दोन्ही प्रकारांचा शेवट परस्परविरोधी भासत असला, तरी दोन्हींमधील मध्यवर्ती भावना एकच आहे आणि ती म्हणजे प्रजेच्या इच्छेसाठीं आपल्या एकाद्या इच्छेचा राजानें मुकाट्यानें बळी देणें ही होय. या दृष्टीनें विचार केल्यास संस्थानांचा कारभार चालविणारे हल्लींचे संस्थानाधिपती आपल्या प्रजेच्या हितासाठीं स्वार्थत्याग कितपत करीत आहेत हें पाहिलें तर तीव्र निराशा पदरीं पडते. इतकेंच नव्हे तर, संस्थानिक आपल्या प्रजेच्या साध्या हिताच्या गोष्टींकडे देखील

दुर्लक्ष्य करतात आणि त्यामुळें प्रजाजनांत जी अस्वस्थता, अशांतता आणि असमाधानता पसरत चालली आहे, तीच संस्थानांत सुरू झालेल्या लढ्याचें मूळ बीज होय.

संस्थानांतील कारभार जर सुराज्याचा असता, तर संस्थानी प्रजेंत स्वतःच्या हातीं कारभार यावा, संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति स्थापन व्हावी अशी भावना कदाचित् उत्पन्न झाली नसती. पण संस्थानांत सुराज्य नाहीं; आणि सुराज्य पाहिजे असेल तर संस्थानांत लोकांचें स्व-राज्य झालें पाहिजे, लोकराज्य अस्तित्वांत आलें पाहिजे. असें झालें तरच संस्थानी प्रजेच्या उन्नतीचा, अभ्युदयाचा व दारिद्र्यविमोचनाचा प्रश्न सुटण्याचा संभव आहे. पण लोकराज्य स्थापन व्हावयाचें म्हणजे संस्थानाधिपती आज भोगीत असलेल्या हक्कांवर व अधिकारांवर नियंत्रण बसणार हें उघड आहे. कोणतीही गोष्ट तपश्चर्येशिवाय मिळत नसते. 'असेल माझा हरी तरी देईल खाटल्यावरी' असें व्यवहारांत कधीं घडत नाहीं. त्याला कष्ट करावे लागतात. आपल्या पुराणांतरीं मोक्ष साधण्यासाठीं अगर इच्छित ध्येय संपादण्यासाठीं आपल्या शरिरास कष्ट देववून कित्येकांनीं आपल्या आकांक्षा सिद्धीस नेल्याच्या कथा आहेत. या कथा खऱ्या असोत अगर खोट्या असोत, पण त्यांतील मुख्य कल्पना जी कष्टसायासांची, ती लक्ष्यांत घेऊन संस्थानांतील आठ कोटी प्रजाजनांनीं लोकशाही स्थापन करण्यासाठीं निरनिराळ्या ठिकाणीं आणि निरनिराळ्या प्रकारचा जो लढा सुरू केला आहे, तो हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळींत एक अत्यंत हृदयंगम भाग म्हणून खास नमूद केला जाईल यांत शंका नाहीं.

संस्थानी प्रजेला हा लोकशाहीचा लढा फक्त संस्थानाधिपतींशीं लढावयाचा नसून या संस्थानांचे जे अधिराज म्हणजे ब्रिटिश सरकार त्यांच्याशींही लढणें कित्येक प्रसंगीं भाग पडत आहे. कारण, संस्थानिकांचा आजचा जो वरचष्मा चालू आहे, तो स्वतांच्या सामर्थ्याचा नसून ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या

लष्करी सामर्थ्यावर अवलंबून आहे. संस्थानी प्रजा ही दुहेरी गुलामगिरी-खालीं आहे. संस्थानिकांच्याबद्दल आज जें वरिष्ठ सरकारला प्रेम दिसतें, तें सन १९२० सालापूर्वीं विशेषसें नव्हतें. संस्थानिकांना त्यावेळीं आपल्या संस्थानिकबंधूंशीं पत्रव्यवहार करण्याची सुद्धां परवानगी नसे. पण १९१४ च्या महायुद्धांत संस्थानिकांनीं वरिष्ठ सरकारला जी मदत केली, त्याचें पारितोषिक म्हणून संस्थानी कारभाराच्या अंतर्गत कारभारांत दुर्लक्ष्य करण्याचें अधिराज सत्तेनें ठरविलें आणि त्याचा परिणाम संस्थानी कारभारांत जास्त बेबंदशाही माजण्यांत होऊं लागला. ब्रिटिश सरकारनें आपलें अधिराजसत्ता म्हणून आवश्यक असलेलें कर्तव्य सोडल्यामुळें, प्रजेची स्थिति ‘ आई जेऊं घालीना आणि बाप भीक मागूं देईना ’ अशी झाली असल्यास नवल नाहीं. मॉंटफर्ड सुधारणा खालसांत सुरू झाल्या-वेळीं सन १९२१ मध्यें नरेंद्रमंडळाची स्थापना झाली आणि तेव्हांपासून या नरेंद्रांना आपण फार मोठे आहों असें वाटूं लागलें.ब्रिटिश सरकारच्या मोहबती-मुळें राष्ट्रसंघ वगैरेसारख्या आंतरराष्ट्रीय परिषदांतून हिंदुस्थानचे प्रतिनिधी म्हणून मिरवण्याची जेव्हां त्यांना संधि मिळूं लागली, तेव्हां संस्थानिकांच्या भराऱ्या अधिकच वाढत चालल्या. ते परदेशीं गेले,आणि येतांना संस्थानला न झेपणारीं परदेशी व्यसनें घेऊन आले. संस्थानचा पैसा प्रजेला उपयोगी न पडणाऱ्या गोष्टींत खर्च होऊं लागला. संस्थानिकांचा दर्जा वाढल्यामुळें त्यांच्या रहाणीचा खर्च वाढला आणि या खर्चाची सर्व धोंड संस्थानी प्रजेवर निरनिराळ्या करांच्या रूपानें बसूं लागली. संस्थानिकांच्या छोटे व वडे लाट यांच्याशीं गांठी-भेटी फार होऊं लागल्यानें व्हाईसरॉय आणि गव्हर्नर यांच्या संस्थानांच्या भेटीच्या वेळीं लाखों रुपयांचा चुराडा होऊं लागला. प्रजेच्या सुखसोयीसाठीं पैशाची अडचण सांगणारे आपले अधिपति, व्हाईसरॉय अगर गव्हर्नर यांच्या भेटीसाठीं इतका खर्च कां करतात अशी शंका लोकांना येऊं लागली. या खर्चाबाबत निरनिराळ्या संस्थानी प्रजापरिषदांतून अगर सभांतून संस्थानिकांच्या उधळपट्टीवर

टीका होऊं लागली. इतका वडा खर्च करण्याचें कारण वड्या पाहुण्यांच्या डोळयांत धूळफेक करून, त्यांनीं संस्थानचीं स्तुतिस्तोत्रें गावून जावें अशी इच्छा होती हें होय. संस्थानिकांच्या बेबंद कारभारावर पडदा टाकण्याचें एक साधन म्हणजे लाटसाहेबांना बोलावून त्यांची सरबराई उत्तमपणें करणें हें होय असें दिसूं लागलें. संस्थानिकांच्या अवाढव्य खासगी खर्चामुळें संस्थानांची आर्थिक परिस्थिति विकट झाली आणि लोकोपयोगी कामें कांहींच होईनाशीं झालीं. बेसुमार सारावाढीमुळें शेतकरी संत्रस्त झाला आणि हिंदुस्थानांतील निरनिराळया भागांतील संस्थानांत संस्थानी शेतकऱ्यांचे झगडे सुरू झाले.

कोणत्या संस्थानांत कसकसा लढा झाला, हें येथें सविस्तरपणें सांगणें जरी शक्य नसलें, तरी कांहीं ठिकाणांच्या लढ्यांचा नामनिर्देश करणें आवश्यक आहे. काश्मीर संस्थानांतील मुसलमान प्रजेनें जो लढा सुरू केला, तो आर्थिक कारणासाठीं होता आणि त्यांत शेवटीं महाराजांना युरोपियन दिवाण नेमणें भाग पडलें. अलवारच्या राज्यांत महाराजांच्या जुलमाचा कळस झाला, व शेवटीं मेयो लोकांनीं बंड केल्यावर महाराजांना राजसंन्यास घेणें भाग झालें.पतियाळाच्या माजी महाराजांनीं इतके अनन्वित अत्याचार केले कीं, त्याला तोड सांपडणार नाहीं. स्त्रिया पळविणें, खून करणें यांसारखे आरोप त्यांच्यावर जाहीरपणें करण्यांत येऊन सुद्धां सरकारनें त्यांना शासन केलें नाहीं. याचें कारण त्यांनीं पोलिटिकल खातें आत्मसात् करून ठेवलें होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. या अत्याचाराची माहिती देणारीं दोन पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत. माजी जामसाहेब यांनीं नित्योपयोगी जिन्नसांचे मक्ते दिल्यानें लोकांना हैराण करून सोडलें. जोधपूर संस्थानांत तर अतोनात दडपशाही झाली आणि नागरिक-स्वातंत्र्याच्या हक्कावर गदा घालण्यांत आली. बिजोलिया संस्थानांतील शेतकऱ्यांवर व सत्याग्रहींवर जो भयंकर जुलूम झाला त्याची

शेठ, बळवंतराय मेथा, अभ्यंकर, व पुस्तुके यांची कमिटी नेमली. कच्छच्या महारावांनीं नाण्याच्या बाबतींत जें धोरण ठेवलें व नाणें बाजारांत कच्छच्या नाण्याचा जो चढउतार होत राहिला, त्यामुळें तेथील प्रजेंत अस्वस्थता माजली. बिकानेर येथील राजद्रोहाच्या खटल्यांत आरोपींना संस्थानाबाहेरील वकील मिळूं नये म्हणून दरबारनें केलेल्या कारवाईवर अ. भा. सं. लोकपरिषदेनें स्वच्छ प्रकाश पाडून बिकानेर महाराजांच्या दर्पोक्तीचा खरपूस समाचार घेतला.कै. प्रो. गणपतराव अभ्यंकर यांनीं बिकानेर महाराजांच्या जुलमी कारभारावर व मायावी भाषणांवर असा जोरदार हल्ला चढविलेला आहे कीं, तो संस्थानी चळवळीच्या इतिहासांत खास नमूद होऊन राहील. रामपूर, भोपाळ, जुनागड, हैद्राबाद, भावलपूर या संस्थानांतील बहुसंख्य हिंदु प्रजेवर जो अन्याय झालेला आहे, त्याच्यीं चोंपडींच प्रसिद्ध करण्यांत आलीं आहेत. लोहारू, मालेरकोटला, जिंद, ध्रागंध्रा, देवास, भरतपूर, बुंदी, ईदर, शिरोही, टोंक, वगैरे संस्थानांतील प्रजेच्या दुःखाची कर्मकहाणी ही कोणच्याही सहृदय अंतःकरणास पाझर फोडील. झाबुआच्या अधिपतींना तर दोनदां राजसंन्यास घेण्याची पाळी आली. इंदूर संस्थानच्या माजी अधिपतींना एका स्त्रीला मुंबईतून पळविण्याचा कट केल्याच्या आरोपावरून राजसंन्यास घ्यावा लागला. देवास ( थोरली पाती ) च्या अधिपतींनीं आपलें संस्थान भिकेस लावलें, एवढेंच नव्हे तर, त्यांच्या युवराजांस सुद्धां आपल्या मातुलगृहाचा आश्रय घेणें भाग पडलें. अशा अधिपतींनीं आपल्या प्रजेस सुख कसें दिलें असेल बरें! आणखी अशा किती तरी संस्थानांचा उल्लेख करतां येणें शक्य आहे! संस्थानी मुलुखांतील प्रजेची ही जी हीनदशा झालेली आहे, त्यास जबाबदार कोण ? खरोखरच त्याची जबाबदारी वरिष्ठ सरकारवर मुख्यतः पडते. संस्थानांत सुराज्य नांदतें कीं दुराज्याचा कारभार चालतो, हें पहाण्याचें कर्तव्य वरिष्ठ सरकारनें तहनाम्याप्रमाणें केलें नाहीं, हेंच याचें मुख्य कारण होय. प्रजेनें आपल्या दुःखनिवारणार्थ चळवळीचा झेंडा उभारल्यावर 'सामर्थ्य आहे चळवळीचें' या उक्ती-

प्रमाणें कांहीं ठिकाणीं प्रजेला कांहीं विजय संपादन करतां आला आहे. दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानांतील प्रजेच्या लढ्याचें पुढील पानांतून जें वर्णन करण्यांत आलें आहे, त्यावरून चळवळीला यश कितपत येऊं शकतें याची थोडीबहुत कल्पना येईल. जी गोष्ट दक्षिणेंतील संस्थानांची तीच उत्तरेंतील संस्थानी चळवळींची होय. पण जें अल्प यश मिळालें, त्याचाही घुस्सा संस्थानिकांना येऊन त्यांनीं आपण संस्थानांतर्गत कारभारांत सार्वभौम आहों, पोलिटिकल खात्याला आपल्या राज्यकारभारांत हात घालण्याचा अधिकार नाहीं, अशी तक्रार करण्यास सुरवात केली. म्हणून ( १ ) संस्थानिक आणि वरिष्ठ राजसत्ता यांच्यामध्यें झालेल्या तहांचा विचार करून व ( २ ) आर्थिक बाबतींत वरिष्ठ राजसत्ता आणि संस्थानिक यांचे संबंध कसे आहेत, या दोन प्रश्नांबद्दल चौकशी करून रिपोर्ट करण्याकरितां सर हारकोर्ट बटलर, अर्थशास्त्रज्ञ मि. सिडने पील व प्रसिद्ध कायदेपंडित मि. होल्डस्वर्थ यांची कमिटी सर हारकोर्ट यांच्या अध्यक्षतेखालीं सन १९२७ मध्यें वरिष्ठ सरकारकडून नेमली गेली. पोलिटिकल अधिकाऱ्यांचा सासुरवास चुकावा आणि युरोपिअन अधिकाऱ्यांना सक्तीच्या खुषीनें संस्थानी नोकरींत घ्यावें लागे, तें टळावें, म्हणून संस्थानिकांनीं ही कमिटी मागण्याचा उपद्व्याप केला, पण बटलर कमिटीनें जो रिपोर्ट केला तो पाहता, संस्थानिकांच्या सर्व आशा धुळीस मिळाल्या असल्याचें दिसून येतें. संस्थानिकांचें म्हणणें असें होतें कीं, ( १ ) संस्थानिक हे स्वतंत्र सार्वभौम राजे असून त्यांना आंतरराष्ट्रीय, निदान निम आंतरराष्ट्रीय दर्जा तरी खास आहे. ( २ ) त्यांचे हिंदुस्थान सरकारशीं संबंध नसून ते थेट बादशहांशीं आहेत. ( ३ ) बादशहांचे अधिराजत्व हें तह, करार आणि सनदा यांनीं निश्चित केलेलें आहे. ( ४ ) आणि संस्थानिकांच्या कारभारांत आज जो हस्तक्षेप अधिराजसत्तेकडून केला जात आहे, तो तहकरारानें नसून पद्धत, परंपरा आणि वहिवाट यांच्या जोरावर केला जात आहे, आणि हीं पद्धत अन्यायाची आहे.

संस्थानिकांच्या वरील आक्षेपांबाबत बटलर कमिटीनें आपल्या रिपोर्टांत निःसंदिग्ध शब्दांत पुढीलप्रमाणें अभिप्राय व्यक्त केला आहेः—( १ ) ऐतिहासिक दृष्ट्या विचार केल्यास ब्रिटिशांचा संबंध येण्यापूर्वी संस्थानें स्वतंत्र नव्हतीं. कोणत्याही संस्थानास आंतरराष्ट्रीय दर्जा नव्हता. बहुतेक सर्व संस्थानें मोंगल, मराठा, अगर शीख राजांचीं मांडलिक व त्यांच्यावर अवलंबून होतीं. यांपैकीं कांहीं ब्रिटिशांनीं राखलीं, तर कांहीं उत्पन्न केलीं. अधिराजत्व हें विभाज्य असेल, पण स्वातंत्र्य हें अविभाज्य आहे, असें अलिकडील राजशास्त्र सांगतें. 'अंशतः स्वातंत्र्य' असलेलीं संस्थानें असें कदाचित् वर्णन करतां येईल, व अधिराजत्वाचे निरनिराळे नमुने आणि मासले हिंदुस्थानांत पहावयास मिळतील. पण स्वतंत्र अधिराज म्हणजे ब्रिटिश सरकार हे एकच आहे. ( २ ) संस्थानिकांचे बादशहाशीं तहकरार झालेले आहेत हें खरें. पण ही बादशाही सत्ता म्हणजे भारतमंत्रि आणि गव्हर्नर-जनरल-इन्-कौन्सिल यांची आणि हे उभयतांही ब्रिटिश पार्लमेंटास जबाबदार आहेत. ( ३ ) संस्थानांतर्गत अस्वस्थता उत्पन्न होईल, अगर तींत हस्तक्षेप करण्याची मागणी केली जाईल, त्यावेळीं तो करणें हें वरिष्ठ सरकारचें कर्तव्य आहे. संस्थानांत बंड उत्पन्न झाल्यास, त्यापासून संस्थानिकांचें संरक्षण करण्याची जशी जबाबदारी अधिराजसत्तेवर आहे, त्याप्रमाणें या बंडाची कारणमीमांसा शोधून लोकांचीं गाऱ्हाणीं दूर करण्याबद्दल संस्थानिकांस सांगण्याचा हक्क अधिराजसत्तेचा आहे. संस्थानिकाला वाईट राज्यकारभारामुळें अधिकारच्युत करावयाचें असेल, तर त्या राजास काढून टाकण्याचा अधिकार आहे. पण तीच मागणी जर केवळ राजयंत्रांत बदल होण्यासाठीं असेल, तर मात्र संस्थानिकांचे हक्क, अधिकार व दर्जा संरक्षिण्यास अधिराजसत्ता तहकरारानें बांधली गेली आहे. संस्थानिकास कायम ठेवून राज्ययंत्रांत योग्य तो बदल करण्याबद्दलच्या सूचना देण्याचा अधिकार अधिराजसत्तेस आहे. लॉर्ड आयर्विन यांनीं सुचविल्याप्रमाणें खाजगी खर्च निश्चित करणें,नोकरीची

शाश्वति उत्पन्न करणें, आणि स्वतंत्र न्यायदानपद्धति अंमलांत आणणें या जर सुधारणा करण्यांत आल्या, तर संस्थानांत अशांतता उत्पन्न होण्याचें कारणच पडणार नाहीं.

बटलर कमिटीनें संस्थानिकांच्या महत्त्वाच्या मागणीबद्दल जो वरील प्रकारचा निर्णय दिला, त्यानें संस्थानिकांच्या भ्रमाचा भोपळा फुटला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. बटलर कमिटीनें संस्थानिकांच्या इच्छेप्रमाणें निकाल दिला असता तर संस्थानांत यत्किंचितही सनदशीर चळवळ करणें दुरापास्त झालें असतें. या बटलर कमिटीकडून प्रजेचें हित संरक्षिलें जावें म्हणून निरनिराळया संस्थानी प्रजापरिषदांनीं बटलर कमिटीकडे आपलें म्हणणें पाठवून दिलें. अ. भा. सं. लोकपरिषदेनें या बाबतींत महत्त्वाची कामगिरी करून कै. दि. ब. रामचंद्रराव, कै. प्रो. ग. र. अभ्यंकर व बॅ. पी. एल्.चुडगर यांचें शिष्टमंडळ विलायतेस पाठवून त्यांनीं तेथें कमिटीच्या सभासदांच्या आणि इतर राजकारणी मुत्सद्यांच्या भेटी घेऊन संस्थानी प्रजेचें म्हणणें काय आहे तें त्यांच्यापुढें मांडलें. संस्थानिकांच्या मागण्या कशा बावग्या आणि अवास्तव आहे, तें त्यासंबंधींचें वाङ्मय प्रसिद्ध करून त्यांच्या निदर्शनास आणलें गेलें. या सर्व खटपटीला संस्थानांतील लोकशाहीच्या लढ्यांत अपूर्व महत्त्व आहे यांत शंका नाहीं. संस्थानांतील लोकशाहीच्या लढ्यांत जे जे अडथळे येतील, ते ते दूर करणें हें महत्त्वाचें कार्य होतें आणि तें बटलर कमिटीच्या वेळीं उत्तम रितीनें पार पाडलें गेलें यांत शंका नाहीं. पुढें डेव्हिडसन कमिटीच्या वेळींही अशीच कामगिरी संस्थानी कार्यकर्त्यांनीं केली आहे. गोलमेज परिषदेच्या वेळीं संस्थानी प्रजाप्रतिनिधींना आमंत्रण दिलें नव्हतें, त्याबद्दल सरकारकडे जोराची तक्रार करण्यांत आली. गोलमेज परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनाचे वेळीं हिंदुस्थानचे एकमेव पुढारी म्हणून महात्मा गांधी जेव्हां विलायतेस गेले तेव्हां संस्थानी प्रजेचें म्हणणें त्यांना मांडणें सुलभ व्हावें म्हणून मदत करण्याकरतां अ. भा. सं. लोकपरिषदेनें श्री. अमृतलाल शेट आणि कै. प्रो. गणपतराव अभ्यंकर यांचें शिष्टमंडळ पाठविलें होतें.

'संस्थानी स्वराज्या'चे

आद्य संपादक

कै. ती. वामनराव पटवर्धन

यांच्या

**पवित्र चरणीं समर्पण**

वि. अ. पटवर्धन

(४) ज्या संस्थानांचा राज्यकारभार खालसांतील प्रांतांतील राज्यकारभारासारखा जवळ जवळ आहे, त्या संस्थानांना संघटनेंत सामील करून घ्यावें.

(५) वरील अटींमुळें संस्थानांचा राज्यकारभार सुधारला जाऊन हिंदुस्थानचें एकीकरण करण्याचें कार्य सुलभ होईल. वरील अटींप्रमाणें संस्थानांतील राज्यकारभार सुधारला गेला तर संघटनात्मक स्वरूपाच्या राजसत्तेकडे सोंपवावयाच्या खात्यांची संख्या व तदितर खात्यांची संख्या कमी होईल व यामुळें अखिल भारतीय संघटना पूर्णत्वास पोंचेल.

(६) संघटनात्मक स्वरूपाच्या राज्यसत्तेच्या मध्यवर्ति कायदेमंडळांत संस्थानी घटकांचे प्रतिनिधी निवडणुकीचे तत्त्वानुसार पाठविण्यांत यावेत व या कायदेमंडळाच्या कोणत्याही विभागांत संस्थानिकांच्या नेमणुकीच्या सभासदांना स्थान मिळूं नये.

(७) संघटनात्मक स्वरूपाच्या सरकारच्या अंमलाखालीं असणाऱ्या खात्याबाबतचे जे कायदे मध्यवर्ति कायदेमंडळांत पास होतील, त्यांची अंमलबजावणी संस्थानी घटकांच्या क्षेत्रांत आपोआपच व्हावी व या खात्यांचा कारभार मध्यवर्ती सरकारच्या अधिकाऱ्यांमार्फत चालावा. मध्यवर्ति कायदेमंडळामध्यें पास झालेल्या कायद्यांचें अतिक्रमण करण्यांत आल्यास अगर संघटनात्मक स्वरूपाच्या सरकारच्या हातीं सुपूर्त केलेल्या खात्यांच्या कारभारांत, संस्थानी मुलखांत जर कांहीं कमजास्त घडून येईल, तर त्याबाबतचा निर्णय करण्याच अधिकार संघटनेच्या वरिष्ठ न्यायपीठास असावा.

(८) संस्थानी घटकांत जबाबदार पद्धतीचें राजयंत्र अस्तित्वांत येईपर्यंत व तेथें न्यायखातें स्वतंत्र स्वरूपाचें होऊन कायद्याचें राज्य प्रस्थापित होईपर्यंत संस्थानांतील न्यायखात्यावर संघटनात्मक सरकारच्या वरिष्ठ कोर्टाची हुकमत चालावी.

(९) संघटनेची घटना तयार करणाऱ्या कायद्यांत जनतेच्या जन्मसिद्ध हक्काच्या संरक्षणाबद्दलचीं कलमें असावींत, व या हक्कांचें अतिक्रमण झाल्यास त्याबद्दलची दाद संघटनात्मक सरकारच्या वरिष्ठ कोर्टांत मागतां यावी.

(१०) यापुढें अखिल भारतीय स्वरूपाची घटना तयार करण्याकरितां ज्या ज्या परिषदा यापुढें बोलावण्यांत येतील, त्यांमध्यें संस्थानी प्रजाजनांच्या प्रतिनिधींना स्थान मिळणें जरूर आहे.

वरील मागण्या मान्य झाल्यास संस्थानी प्रजा संघटनेंत सामील होऊं शकेल.

संस्थानांतील लोकशाहीच्या प्रसारास आळा घालण्यासाठीं ब्रिटिश सरकारनें संस्थानिक संरक्षणाचा कायदा हिंदी मध्यवर्ति विधिमंडळांत पास करून घेतला आणि भारत संरक्षण कायदाही नुकताच पास झालेला आहे. संस्थानिक संरक्षण कायद्याखालीं दिल्लीच्या ‘ रियासत ’ पत्राचे संपादक सरदार दिवाणसिंग यांचेवर भोपाळ दरबारनें भरलेला खटला हा चिरस्मरणीय आहे. संस्थानांतून वृत्तपत्रें चालविणें अवघड असतें आणि त्या वृत्तपत्रांतून संस्थानी राज्यकारभाराविषयीं टीकात्मक मजकूर येणें त्याहूनही अवघड आहे. तथापि संस्थानी प्रजेसाठीं झटणाऱ्या वृत्तपत्रांना संस्थानी प्रजेच्या लोकशाहीच्या लढ्यांत महत्त्वाचें स्थान आहे यांत शंका नाहीं. संस्थानांतील अन्यायाची, जुलुमांची व करुण कहाणीची दाद मागण्याचें बलिष्ठ

साधन म्हणजे वृत्तपत्रें हीं होत. दोनतीन वर्षांपूर्वींपावेतों, खालसांतील कित्येक वृत्तपत्रें संस्थानिकांशीं असलेल्या घनिष्ठ संबंधामुळें असो, भीतीनें असो अगर इतर कांहीं कारणाकरतां असो, पण संस्थानी अन्यायांना प्रसिद्धि देत नसत. संस्थानी प्रजेच्या मागण्या चव्हाट्यावर मांडण्यासाठीं श्री. अमृतलाल शेट यांनीं 'दी सन' नांवाचें इंग्रजी वृत्तपत्र पांचसहा वर्षांपूर्वी प्रसिद्ध करण्यास सुरवात केली होती, पण तें लोकाश्रयाभावीं लवकरच बंद पडलें. 'सौराष्ट्र' व 'प्रिन्स्ली इंडिया' यांनीं एकदां मोठी कामगिरी केली आहे. 'राजस्थान,' 'यंग राजस्थान,' 'रियासत' या उत्तर हिंदुस्थानांतील प्रमुख पत्रांचा उल्लेख करणें या ठिकाणीं इष्ट वाटतें. अखिल भारतीय संस्थान लोकपरिषदेमार्फत 'स्टेटस् पीपल' नांवाचें जें पत्र निघत आहे, त्याच्या हातून उत्तम कामगिरी घडत आहे. दिल्ली येथील 'युनायटेड इंडिया आणि इंडियन स्टेटस्' हें पत्र संस्थानांसाठीं म्हणजे संस्थानिकांसाठीं वाहिलेलें आहे असें त्याच्या लिखाणावरून दिसतें. दक्षिण महाराष्ट्रासाठीं कै. वामनराव पटवर्धन यांनीं काढलेलें 'संस्थानी स्वराज्य' पत्र गेलीं १४ वर्षें चालू आहे. या पत्राच्या इंग्रजी विभागाचें संपादकत्व कै. प्रो. गणपतराव अभ्यंकर यांच्याकडे होतें. दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानी मुलुखांत प्रसिद्ध होणाऱ्या 'दक्षिण महाराष्ट्र' सांगली, 'विजय' सांगली, 'वैनतेय' सावंतवाडी या तीन पत्रांची कामगिरी उल्लेखनीय आहे. 'विश्वास' व 'प्रगति आणि जिनविजय' हीं प्रसंगोपात या विषयावर लिहित असतात. कोल्हापुरांतील वृत्तपत्रीय चळवळ 'विद्या-विलास' नें राखली. तेथें आणखी 'पुढारी,' 'सत्यवादी' वगैरे बरींच पत्रें प्रसिद्ध होतात, पण कोल्हापुरांतील विशिष्ट राजकीय आणि जातीय परिस्थितीमुळें त्यांच्या हातून संस्थानी प्रजेचें गाऱ्हाणें वेशीवर टांगण्याचें काम विशेषसें होत नाहीं हें दुःखानें नमूद करणें भाग पडत आहे. त्रावणकोरांत दशकांनीं असणाऱ्या वर्तमानपत्रांत संस्थानांतील राजकीय चळवळीचा मजकूर येऊं शकत नाहीं असें तेथील स्टेट काँग्रेसच्या अध्यक्षांनीं नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे. सर सी. पी. रामस्वामी अय्यर

यांच्यासारखे स्वतःला प्रागतिक पक्षाचे अध्वर्यु समजणारे संस्थानचे दिवाण असतांना त्यांचे कारकीर्दींत जर ही परिस्थिति, तर इतर संस्थानांत काय दुर्दशा असेल, याची कल्पनाच केलेली बरी.

संस्थानांतील लोकशाहीच्या चळवळीस जर काँग्रेसनें सक्रिय हातभार लावला असता, तर संस्थानी चळवळीचें तारूं जास्त जोरानें पुढें गेलें असतें. पण काँग्रेसचे सर्वाधिकारी महात्मा गांधी यांना संस्थानिकांबद्दल प्रेम वाटत असल्यानें त्यांनीं संस्थानी प्रजेच्या लक्ष्यास शाब्दिक सहानुभूति दाखविण्यापलिकडे कांहीं केलें नाहीं. काँग्रेसच्या गेल्या कित्येक अधिवेशनांतून ह्या प्रश्नास विशेष महत्त्व येऊन त्यावर रणकंदनें माजलेलीं आहेत. या प्रश्नाचा इतिहास जरी मनोरंजक, उद्बोधक आणि चिंतनीय असला, तरी त्याचें विवेचन येथें करण्याची आवश्यकता नाहीं. कारण अलिकडे महात्माजींचा मतपालट झाला असल्याचें दिसत आहे. पूर्वीं महात्माजी संस्थानिकांशीं मित्रत्वाचें नातें जोडण्याचा प्रयत्न करीत होते, आणि काँग्रेस आपल्या नैतिक बळावर (Moral Pressure) संस्थानिकांवर दडपण आणून संस्थानी प्रजा इच्छित असलेले अधिकार मिळवून देईल असें म्हणत असत. पण सन १९३८ सालीं अखिल भरतखंडांतील संस्थानी भूभाग जेव्हां संस्थानी चळवळीनें पेटला, तेव्हां काँग्रेसच्या श्री. जमनालाल बजाज, सरदार वल्लभभाई पटेल, श्री. शंकरराव देव, गंगाधरराव देशपांडे प्रभृति पुढाऱ्यांनीं संस्थानी चळवळीचें धुरीणत्व पतकरलें. ज्या पुढाऱ्यांनीं संस्थानी चळवळीला अस्पृश्य मानलें, त्यांनींच या चळवळींत भाग घेतला हा काळाचा महिमा आहे. सन १९३७ मध्यें काँग्रेसनें सात प्रांतांतील मंत्रिमंडळें स्वीकारलीं आणि प्रांतिक स्वायत्तता खालसांत नांदूं लागली. याचा परिणाम शेजारील संस्थानी मुलखांत होऊन तेथेंहि चळवळीची भयंकर लाट उसळली. जयपूर संस्थानांत शेठ जमनालाल बजाज यांना कारागृहवास घडला आणि राजकोटच्या लढ्यांत सरदार वल्लभभाई पटेल हे किंकर्तव्यमूढ झाले.

या घटनेचा परिणाम महात्माजींच्यावर झाला असल्यास नवल नाहीं. त्यांनीं राजकोटचें धुरीणत्व स्वीकारलें आणि त्यांना पुत्रवत् वाटणाऱ्या ठाकोरसाहेबांच्यावर नैतिक व आत्मिक वजन टाकण्याचा प्रयत्न केला. त्यांनीं शेवटीं प्राणान्तिक उपवासही सुरू केला. पण त्यावेळीं ठाकोरसाहेबांनीं त्यांचे सल्लागार दरबार वीरवाला यांच्या सल्ल्यानें जी महात्माजींच्यावर मात केली, त्यामुळें महात्माजींच्या डोळ्यांत अंजन पडलें असल्यास नवल नाहीं. कॉंग्रेसचें नैतिक वजन संस्थानिकांच्या अंतः-करणांत पालट करण्यास उपयोगीं पडणार नाहीं असें त्यांना दिसून आलें असल्यास नवल नाहीं. स्वार्थासाठीं आणि स्वतःच्या मानीव हक्कांसाठीं संस्थानिक महात्माजींच्यासारख्या थोर विभूतीच्या 'प्राणांचीहि पर्वा करण्यास तयार नाहींत हें त्यांना कळून चुकलें. राष्ट्रीय सभेचें संस्थानविषयक धोरण काय असावें, हा प्रश्न प्रामुख्यानें सन १९३४ मध्यें कै. प्रो. अभ्यंकर, पटवर्धन, श्री. केळकर आदि पुढाऱ्यांनीं उपस्थित केला आणि तो इतर कार्यकर्त्यांना शेवटीं पटून त्यास राष्ट्रीय सभेंत महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें. या संस्थानी चळवळीच्या प्रवर्तकांचें म्हणणेंच शेवटीं खरें ठरलें आणि संस्थानिक कॉंग्रेसच्या अगर मोठ्या पुढाऱ्यांच्या विनंतीस भीक घालणार नाहींत हें महात्माजींना शेवटीं दिसून आलें असलें पाहिजे. त्याचप्रमाणें संस्थानिक हे भावी हिंदी स्वातंत्र्याच्या मार्गांतील कंटक आहेत असें जें केळकर–पटवर्धन–अभ्यं-करांना वाटत होतें, तें सुद्धां महात्माजींना आज पटलें आहे असें म्हणा-वयास हरकत नाहीं. ता. १७-२-१९४० च्या 'हरिजन'च्या अंकांत महात्माजींनीं हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्यशाहीचे जे चार आधारस्तंभ अगर घटक आहेत असें म्हटलें आहे, त्यांत संस्थानिकांचा समावेश केलेला आहे. आणि ता. २३–३–१९४० च्या 'हरिजन'च्या अंकांत महात्माजींनीं संस्थानिकांच्यावर सरकारच्या मध्यस्थीनेंच वजन घालावें असें म्हटलें आहे. अलिकडे 'हरिजन' पत्रांत संस्थानविषयक लेख पुष्कळच येत असून संस्थानिक ज्या आपल्या अधिकाराच्या आणि हक्काच्या गप्पा

सांगतात, त्या कशा फोल आहेत, तें निरनिराळे लेख लिहून पटवून दिलें जात आहे. असाही एक दिवस कदाचित् उगवेल कीं, ज्या दिवशीं स्वातंत्र्याच्या मार्गांतील ही संस्थानांची—एकतंत्री संस्थानी राज्ययंत्राची अडगळ दूर करण्यासाठीं महात्माजी संस्थानिकांविरुद्ध हत्यार उपसतील! भविष्यकाळाच्या पोटांत काय आहे तें कोणीं सांगावें !!!

सन १९३८ हें वर्ष संस्थानी चळवळींत अत्यंत धामधुमीचें आणि खळबळीचें गेलें. अवर्षण आणि जागतिक मंदी यांमुळें उपासमार होऊन निराश झालेल्या शेतकरी वर्गानें आपल्या हलाखीस कारणीभूत असलेल्या एकतंत्री संस्थानी राज्यपद्धतीविरुद्ध चळवळींचें निशाण उभारलें. ओरिसा प्रांतांतील तल्चर, गंगपूर, रणपूर, अथगड, निलगिरी वगैरे संस्थानांतून उग्र स्वरूपांत चळवळी झाल्या आणि कित्येक ठिकाणीं गोळीबार करण्यांत आले. रेसिडेंट मेजर बझलगेट यांचा खून झाला. संस्थानी चळवळींत पडलेला हा पहिला बळी होय. लिमडी व धामी येथेंही गोळीबाराचे प्रसंग आले. ओरिसा संस्थानें आणि लिमडी येथील प्रजाजनांनीं संस्थानत्याग केला. मणिपूर, त्रावणकोर, म्हैसूर या ठिकाणींही मोठमोठ्या चळवळी झाल्या. त्रावणकोर येथील चळवळ अत्याचारानें कलंकित झालेली असल्यामुळें तेथें महात्माजीच्या सल्ल्यानें स्टेट काँग्रेसनें माघार घेतली. म्हैसूरांत तिरंगी झेंडा फडकाविण्याचा प्रश्न धसास लागून संस्थानचा आणि काँग्रेसचा असा दोन्ही झेंड्यांचा सन्मान करावा असा निर्णय सरदार वल्लभभाई पटेल यांनीं दिला. म्हैसूरांत समेट झाला, पण संस्थानांतील अस्वस्थतेचें निर्मूलन झालें नाहीं. गेल्या वर्षीं पुन्हां सत्याग्रहाची चळवळ होऊन शेवटीं महात्माजींच्या इच्छेप्रमाणें ती तहकूब करण्यांत आली.

सन १९३८ सालीं जी चळवळ झाली व जिचे पडसाद सन १९३९ मध्यें उठत होते; त्याचा परिणाम संस्थानी दरबारें आणि हिंदुस्थान सरकार यांच्यावर होऊन बऱ्याच संस्थानिकांनीं आपल्या राज्यकारभाराच्या

धोरणास कलाटणी देऊन संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति स्थापन करण्याचें आणि कांहीं सुधारणा करण्याचें आश्वासन दिलें. कांहीं ठिकाणीं शेतसारा कमी करण्यांत आला. नरेंद्रमंडळाच्या बैठकीच्या वेळीं गेल्या वर्षीं व यंदाहि नरेंद्रमंडळाचे चॅन्सेलर लॉर्ड लिन्लिथगो यांनीं संस्थानिकांना राज्यपद्धति सुधारण्याचा सल्ला दिला आणि छोट्या संस्थानांचा कारभार आधुनिक पद्धतीचा, संस्थानांच्या तुटपुंज्या उत्पन्नामुळें चालवणें शक्य नसल्यामुळें, तो समाईकीच्या तत्त्वावर चालविला जावा अशी सूचना केली. छोटीं संस्थानें ज्या भूभागांत विशेषत्वानें आहेत, त्या ठिकाणीं समाईक पोलीस दलाची योजना निश्चित करण्यांत आली. हीच योजना सर्वांअगोदर अंमलांत येण्याचें कारण म्हणजे रामदुर्ग, रणपूर, गंगपूर वगैरे संस्थानांत अत्याचार होऊन वरिष्ठ सरकारास आपलें सैन्य पाठवावें लागलें हें होय. वरिष्ठ सरकारनें बटलर कमिटीच्या शिफारसीप्रमाणें जर संस्थानांत अशांतता दिसल्यावर त्या संस्थानाधिपतींना योग्य समज देऊन आपलें कर्तव्य योग्य रितीनें बजावलें असतें, तर संस्थानांत अशांततेची परिस्थिति निर्माण झाली नसती. पण जर संस्थानिकांचा जुलूम सहन करण्यास कबूल असल्याचें आपल्या मनोवृत्तीनें संस्थानी प्रजा दाखवीत असेल, तर वरिष्ठ सरकारनें तरी आपलें कर्तव्य कां पार पाडावें हा विचारार्ह प्रश्न नाहीं काय ?

संस्थानांतील प्रजेचा लढा हा जितक्या मोठ्या प्रमाणांत आणि आत्मत्यागानें चालविला गेला पाहिजे, तितका तो चालविला जात नाहीं अशी खालसांतील मोठमोठ्या पुढाऱ्यांची तक्रार आहे. ही तक्रार करतांना कॉंग्रेसचे व इतर पक्षांचे पुढारी खालसा मुलुखांत हक्क मिळविण्यास ५० वर्षें लागलीं, हें विसरतात ही खेदाची गोष्ट आहे. संस्थानांतील लढा हा खालसापेक्षां जास्त विकट परिस्थितींत लढवावा लागत आहे असे पं. जवाहरलाल नेहरू यांनीं सुद्धां उद्गार काढले आहेत. खालसांतील लढा संस्थानी लढ्याचे मानानें

फार सुलभ ! खालसांत चळवळ्या माणसाचें वैयक्तिक नुकसान आणि हानि होते, तर संस्थानी कार्यकर्त्यांमुळें त्याच्या सबंध कुटुंबाचें आणि आप्तेष्टांचें नुकसान होतें. याचमुळें संस्थानी स्वराज्यांतील लोकराज्य-स्थापनेचा लढा अतिशय खडतर आणि अवघड झालेला आहे.

संस्थानिकांच्या इच्छेप्रमाणें जर खरोखरच संस्थानांतर्गत सार्वभौमत्व सरकारनें दिलें, आणि अंतर्गत बंडाळीच्या वेळीं जर सरकार तटस्थ राहिलें, तर संस्थानिकांना आपल्या प्रजेविरुद्ध जाणें आणि त्यांना असंतुष्ट ठेवणें शक्य होईल काय? संस्थानी भूमि लोकशाहीस अनुकूल नाहीं असाही कोटिक्रम केला जातो. एकतंत्री राज्यकारभार आणि लोकशाही यांची तुलना करतांना एकतंत्री कारभार जास्त फलदायी असतो असें मत प्रदर्शित केलें जातें. मुसोलिनी, हिटलर, केमालपाशा वगैरे सर्वाधिकाऱ्यांनीं आपापल्या राष्ट्रांस जें महत्त्वपूर्ण स्थान प्राप्त करून दिलें, तें लोकशाहीमुळें नसून एकतंत्री राज्यकारभारामुळें होय असेंही प्रतिपादन केलें जातें आणि म्हणून संस्थानिकांचा एकतंत्री कारभार हाच अभ्युदयाचा आहे असा कोटिक्रम लढविला जातो. पण तो भ्रामक आहे असें थोड्या विचाराअंतीं दिसून येणार आहे. या सर्वाधिकाऱ्यांनीं ज्या गोष्टी केल्या त्या स्वतःच्या फायद्यासाठीं अगर चैनीसाठीं अथवा स्वार्थासाठीं केल्या नाहींत, तर त्या आपल्या राष्ट्राच्या अभ्युदयासाठीं केल्या. आपला अमुक पुढारी हा मूर्तिमंत देशाभिमानानें भारलेला आहे आणि तो जें जें करील, तें तें तो राष्ट्राच्या उन्नतीसाठीं करील, अशी त्याच्या देशबांधवांची खात्री असते म्हणूनच त्यांनीं त्या इसमास सर्वाधिकारी नेमलेलें असतें. या दृष्टीनें पाहिल्यास तो लोकराज्याचा राजाच अगर लोकशाहीचा अध्यक्षच असतो. सर्वाधिकारी केमालपाशा हे तुर्कस्थानच्या पहिल्या लोकनियुक्त विधिमंडळाचे अध्यक्षच निवडले गेले होते. संस्थानिक व त्यांचे वंशज आपल्या उदात्त वर्तनानें असे एकनिष्ठ प्रजासेवक आणि राष्ट्रसेवक बनले, तर त्यांच्या प्रजाजनांस ते नको का आहेत ? संस्थानां-

तील चळवळ ही संस्थानाधिपतीच्या आस्तित्वावरच अधिष्ठित झालेली आहे. प्रजाजनांना आपल्या प्रभूंबद्दल अजूनही प्रेम आणि आदर वाटत असल्यामुळेंच संस्थानाधिपतींच्या आधिपत्याखालीं संस्थानांतून जबाबदार राज्यपद्धति स्थापन करण्याचें ध्येय प्रजेनें ठेविलेलें असून आपल्या राजाचा 'योग्य' तो इतमाम व दर्जा ठेवण्याची त्यांची इच्छा आहे. याच ध्येयानें प्रेरित होऊन संस्थानांतील प्रजेनें सुरू केलेल्या लढ्याचें मर्म राजेरजवाडे समजावून घेऊन आपल्या प्रिय प्रजाजनांना विश्वासांत घेऊन राज्यकारभार चालवितील, तर लढ्याचें कारणच उरणार नाहीं.

पण दुर्दैवानें तशी परिस्थिति नाहीं आणि तसा सुविचार सुचण्याचें चिन्हही दिसत नाहीं. आजवर झालेल्या लढ्याचें अल्प यश रयतसभांच्या स्थापनेनें मिळालेलें असलें, तरी खरें लोकराज्य मूर्त स्वरूपांत येण्यास किती काळ लागणार, तें भविष्यकाळाच्या पोटांत जरी असलें तरी हा लोकशाहीसाठीं सुरूं झालेला लढा यशस्वी झाल्याशिवाय रहाणार नाहीं हें संस्थानिकांनीं लक्ष्यांत ठेवणें जरूर आहे.

संस्थानांतील लोकशाहीच्या लढ्यास सुरवात होऊन सुमारें वीस वर्षें झालीं आणि दक्षिण महाराष्ट्रांतील निरनिराळ्या संस्थानांत जे लढे लढले गेले, त्यांची माहिती प्रस्तुत पुस्तकांत देण्यात आलेली आहे. गेल्या २० वर्षांत संस्थानी चळवळीचें स्वरूप कसकसें पालटत गेलें, त्याची भूमिका कसकशी बदलत गेली आणि आज त्याचें स्वरूप काय आहे याची कल्पना या पुस्तकानें भावी कार्यकर्त्यांना येईल अशी उमेद वाटत आहे. या संस्थानांतील लढ्याचें वाचन केल्यावर या भागांतील संस्थानांत झालेले लढे हे खालसांतील चळवळीपेक्षां खास मागें नाहींत, असें दिसून येईल. जंजिरा, मिरज, भोर, आजरें वगैरे ठिकाणचे लढे आणि

प्रजेनें सोसलेले कष्ट-सायास हे केव्हांही अभिमानार्ह असून कौतुकास्पद आहेत. भोर संस्थानांतील लढा हा तर फार तेजस्वी आणि रोमांचकारी आहे असें दिसून येईल.

शेवटीं, संस्थानांतील लोकशाहीच्या यशस्वी लढ्यासाठीं ज्यांनीं अतिशय कष्ट सोसले, त्या आजी आणि माजी संस्थानी कार्यकर्त्यांना वंदन करून व त्यांची तपश्चर्या लवकरच फलदायी होवो, अशी ईशचरणीं प्रार्थना करून हा लांबलेला उपोद्घात पुरा करतों.

विश्वनाथ अनंत पटवर्धन

---

# अनुक्रमणिका



| विषय | पृष्ठ |
|---|---|

भाग २ रा

# संस्थानांतील लोकशाहीचा लढा

## कोल्हापूर संस्थानांतील चळवळ

लेखक : निरीक्षक

दक्षिण महाराष्ट्रांत कोल्हापूर हें सर्वांत मोठें व सर्वांहून श्रेष्ठ असें मराठ्यांचें संस्थान आहे. त्याच्या उत्तरेस सातारा जिल्हा असून सरहद्दीवर वारणा नदी आहे. ईशान्य बाजू कृष्णा नदीनें वेढली असून, पूर्व व दक्षिण या दिशांच्या सरहद्दी बेळगांव जिल्ह्यास चिकटल्या आहेत. नैऋत्येस सावंतवाडी संस्थान व पश्चिमेस रत्नागिरी जिल्हा असून, कोल्हापूर व हे दोन भाग यांच्यामध्यें विशाल सह्याद्रि पर्वताची उंच भिंत निसर्गानें उभारलेली आहे. या संस्थानचा भूभाग बराचसा उंच सखल असून त्याची समुद्रसपाटीपासून सर्वसाधारण उंची २००० फूट आहे. कृष्णा, वारणा, हिरण्यकेशी, पंचगंगा, दुधगंगा व वेदगंगा या मुख्य सहा नद्या व त्यांच्या पुष्कळ उपनद्या या सर्व करवीर संस्थानभर वाहून बहुतेक प्रदेश सुपीक व गारेगार करीत असल्यानें या संस्थानांत दुष्काळ व अवर्षण या आपत्तींचा ताप लोकांना अगदीं क्वचित् प्रसंगींच व अल्प प्रमाणांतच होत असतो. कोल्हापूरच्या पश्चिम सरहद्दीवर दक्षिणोत्तर सुमारें शंभर मैल लांब गिरिराज सह्याद्रीनें आपले हातपाय पसरलेले असल्यानें, लहान-मोठ्या टेंकड्या व घनदाट अरण्यांनीं भरलेले डोंगराळ प्रदेश हें या संस्थानचें एक वैशिष्ट्य होऊन बसलेलें आहे. कोल्हापूर संस्थानच्या पश्चिम सरहद्दीवर दक्षिणोत्तर शंभर मैल लांब पसरलेली सह्याद्रि पर्वताची एक भव्य रांग आहे. संस्थान हद्दींतील कांहीं डोंगर टेकड्यांची उंची

समुद्रसपाटीपासून दोन ते साडेतीन हजार फुटांवर आहे. त्यांपैकीं कित्येकां-वर अत्यंत मजबूत असे किल्ले बांधण्यांत आलेले असून त्यांनीं ऐतिहासिक कालांत मोठी संस्मरणीय कामगिरी बजावलेली आहे. सह्याद्रीचें सृष्टिसौंदर्य व त्यावरील विविध प्रकारच्या वनचरांचें वैपुल्य अत्यंत असामान्य प्रकारचें आहेच, पण त्याच्या पोटांत 'बॉक्साइट'ची मौल्यवान् खनिज संपत्ति इतकी विपुल आणि प्रचंड आहे कीं, तिची बरोबरी जगांतील अन्य भूभागास क्वचितच करतां येईल! सुदैवानें या ईश्वरदत्त खनिज संपत्तीचा व्यावहारिक उपयोग सुलभपणें व अतिशय फायदेशीरपणें करून घेण्यास अवश्यक असलेली विद्युत्शक्तिही विपुल प्रमाणांत तयार करण्याची चांगली सोय सह्याद्रीच्या गिरिशिखरांवरून खालीं कडेकपाऱ्यांवर धों धों वाहत जाणाऱ्या शेंकडों जलप्रवाह नि जलप्रपातांनीं करून ठेवलेली आहे. परंतु कोठेंहि नुसती साधनसामुग्री वाटेल तेवढी पडलेली असली, तरी तिचा योग्य उपयोग करून घेणाऱ्या शहाण्या नि कर्तबगार माणसांचा अभाव असल्यास ती सर्व सोन्यासारखी साधनें नि संपत्ति फुकट जाते. दुर्दैवानें कोल्हापूर संस्थानची स्थिति "योजकस्तत्र दुर्लभः" अशीच अद्यापपर्यंत तरी चालूं राहिल्यानें, संस्थानांतील कोट्यवधि रुपयांची खनिज संपत्ति सह्याद्रीच्या सखोल उदरांतच कोंडून पडलेली आहे. आणि हैड्रो-इलेक्ट्रिक पॉवरस्कीम वगैरे तयार करण्याच्या देशी विदेशी कागदी योजना किंवा फाजील महत्त्वाकांक्षेनें सुरूं केलेलें अर्धवट काम याप्रीत्यर्थ गरीब संस्थानी प्रजेच्या सार्वजनिक खजिन्यांतून सुमारें २५।३० लक्ष रुपये व्यर्थ उधळण्यांत आले आहेत. पण प्रत्यक्ष फलप्राप्तीच्या नांवानें मात्र भोपळयाएवढें शून्य आहे!!

करवीर इलाख्याचें एकंदर क्षेत्रफळ ३२१७·१ चौरस मैल आहे. खास कोल्हापूर संस्थानचें क्षेत्र २१२४·३ चौ. मैल असून बाकीचें क्षेत्र संस्थानांतर्गत नऊ जहागिरींचें आहे. सन १९३१ च्या खानेसुमारीप्रमाणें एकंदर करवीर इलाख्याची लोकसंख्या ९५७१३७ असून त्यांत ४९०३३६ पुरुष व ४६६८०१ स्त्रिया आहेत. धार्मिक विभागणीप्रमाणें पाहतां, एकंदर

लोकसंख्येंत ८६६६४८ हिंदु, ४३८५७ जैन, ४१८६५ मुसलमान, ४७५९ खिस्ती व फक्त ८ पारशी आहेत. जहागिरी सोडून संस्थानचें नेव्वळ उत्पन्न ५४ लक्ष रुपयांचें आहे.

## करवीर राज्याचा प्रारंभ

मराठी साम्राज्याचे पुण्यश्लोक संस्थापक, श्रीशिवछत्रपति महाराज यांच्या वंशजांचें राज्यच आज दोनशें वर्षांहून अधिक काल कोल्हापूर संस्थानांत चालू आहे. म्हणून या करवीर राज्याचा प्रारंभ कसा नि केव्हां झाला याची संक्षिप्त माहिती प्रथम देऊन नंतरच या राज्यांतील चळवळी-विषयीं लिहिणें योग्य वाटतें.

स्वतंत्र मराठी साम्राज्याचा पाया घालून श्रीशिवछत्रपति महाराज इ. स. १६८० मध्यें कालवश झाल्यावर, धर्मवीर संभाजीमहाराजांनीं नऊ वर्षें बलाढ्य मोंगल बादशहा अवरंगजेब याच्याशीं स्वधर्म, स्वदेश नि स्वातंत्र्य यांच्या रक्षणार्थ झुंजत झुंजत राज्य चालविलें व अखेर शत्रूच्या जाळ्यांत अडकून त्यांचा अत्यंत क्रूरपणें व भयंकर रीतीनें अवरंग-जेबाच्या हातून इ. स. १६८९ मध्यें अंत झाला. आणि त्यांची पत्नी व मुलगा शाहू मोंगलांच्या बंदींत पडले. संभाजीनंतर त्याचा धाकटा भाऊ राजाराम छत्रपतिपदावर अधिष्ठित झाला. यावेळीं अवरंग-जेबानें दाक्षिणेंतील सर्व स्वतंत्र राज्यें नष्ट करून उत्तरेप्रमाणें दक्षिणेंतहि एकछत्री मुसलमानी साम्राज्य स्थापण्याची शिकस्त करून मोठाच धुमा-कूळ माजविला होता. त्याचा प्रतिकार करणें ही गोष्ट राजाराम छत्र-पतींच्या शक्तीबाहेरचीच होती. तथापि मराठ्यांच्या सुदैवानें त्यावेळीं रामचंद्रपंत अमात्यासारखा मोठा राजकार्यधुरंधर नि स्वामिनिष्ठ मंत्री राजारामाला लाभल्यानें मराठ्यांच्या राज्याचें, राजाचें नि राजकुटुंबाचें चांगलें संरक्षण झालें; व कोल्हापुरांत शिवछत्रपतींच्या एका वंशजाचें स्वतंत्र मराठी राज्य स्थापन करण्याचा पराक्रम महाराणी ताराबाईला गाजविणें शक्य झालें. इ. स. १७०० मध्यें राजाराम छत्रपति वारल्यावर

त्यांच्या दोन बायका ताराबाई नि राजसबाई, यांचेपैकीं पहिलीनें आपला मुलगा शिवाजी याला गादीवर बसवून त्याच्या नांवें आपणच पन्हाळ-गडावरून राज्यकारभार चालविला. इतक्यांत अवरंगजेबाच्या मृत्यूनंतर शाहू बंधमुक्त होऊन आला व त्यानें छत्रपतिपदाचा खरा कायदेशीर वारस म्हणून ताराबाईकडे राज्याची मागणी केली. परंतु ती फार मानी नि महत्त्वाकांक्षी असल्यानें तिनें शाहूला साफ नकार दिला. पुढें ताराबाईचा पराभव करून शाहूनें सातारचा 'अजिंक्यतारा' किल्ला घेतला व इ. स. १७०८ मध्यें राज्याभिषेकपूर्वक साताऱ्यास छत्रपति महाराज म्हणून स्वतंत्र राज्यकारभार चालू केला. तेव्हांपासून मराठी राज्याचीं दोन शकलें झालीं. साताऱ्यास शाहूछत्रपतींचें राज्य व कोल्हापुरास ताराबाईचें राज्य अशा दोन भाऊबंदकीच्या वांटण्या झाल्या. या स्वार्थमूलक राज्यलोभानें उत्पन्न केलेला करवीरकर नि सातारकर छत्रपतींचा प्रत्यक्ष लढा उभयतांमध्यें सन १७३० मध्यें तह होईपर्यंत चालूंच होता. त्यावर्षींच सर्व हिंदुमात्रास पूज्य वाटणाऱ्या व वस्तुतः अविभाज्य असलेल्या छत्रपतिपदाच्या दोन कायदेशीर स्वतंत्र वांटण्या झाल्या व त्याक्षणींच स्वतंत्र नि वैभवशाली हिंदुपदपादशाहीला कौटुंबिक दुहीनें पोखरण्यास सुरवात केली.

ताराबाईनीं रामचंद्रपंत अमात्य यांच्या सहाय्यानें कोल्हापुरास आपलें वेगळें राज्य स्थापन केलें खरें, पण दुर्दैवानें ताराबाईचें अनुकरण तिच्या सवतीनें म्हणजे राजारामाची दुसरी बायको राजसबाई या महत्त्वाकांक्षी राजस्त्रीनें फारच लौकर केलें व रामचंद्रपंत अमात्याच्या मसलतीनें आपला सुपुत्र संभाजी यास करवीरच्या छत्रपतिपदावर रीतसर अधिष्ठित करून आपली सवत ताराबाई व तिची सून भवानीबाई यांना नजरकैदेंत ठेवलें! ताराबाईचा एकुलताएक अर्धवट मुलगा व कोल्हापूरचा पहिला शिवाजी राजा इ. स. १७१२ मध्यें कालवश झाल्यावर, करवीर राज्य-संस्थापक ताराबाईला अत्यंत अपमानास्पद अशी अवनति आली व या

पराक्रमी मराठ्यांच्या महाराणीचा शोचनीय अंत राजकीय कारावासाच्या घोर अंधारांत कोल्हापुराबाहेर कोठें तरी झाला!!

## इ. स. १७३१ ते १९३९

या दोनशें आठ वर्षांच्या काळांत कोल्हापुरच्या छत्रपतिपदावर एकंदर नऊ राज्यकर्ते अधिष्ठित झालेले आहेत; ते म्हणजे १ संभाजी, २ शिवाजी, ३ संभाजी ऊर्फ आबासाहेब, ४ शहाजी ऊर्फ बुवासाहेब, ५ शिवाजी ऊर्फ बाबासाहेब, ६ राजाराम, ७ शिवाजी, ८ शाहू महाराज, व ९ राजाराम छत्रपति महाराज. या नऊ करवीरकर छत्रपतींपैकीं फक्त पहिले चार-संभाजी, शिवाजी, संभाजी व शहाजी या चौघांनींच सन १८३८ पावेतों स्वतंत्र मराठ्यांचे राजे म्हणून राज्य केलें. बाकीच्यांनीं परकीयांचें दास्य पत्करून, आंग्ल सम्राटांचे राजनिष्ठ सेवक व मांडलीक म्हणूनच ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या कमीजास्त देखरेखीखालीं राज्यकारभार पाहिला व पहात आहेत. वरील नऊ छत्रपतींपैकीं नं. २ व ७ हे दोघे 'शिवाजी' हे मूळ पुरुष मालोजी भोसले यांच्या खानवटकर घराण्यांतून कोल्हापूरच्या राण्यांनीं दत्तक घेतले असून, नं. ६ राजाराम हे पाटणकर सरदार कुळां-तले, व नं. ८ चे शाहू महाराज हे कागलच्या घाटगे घराण्यांतून दत्तक होऊनच छत्रपतिपदावर अधिष्ठित झाले.

## कोल्हापुरांतील स्त्रीराज्य !

कोल्हापूरच्या भूतकाळांतील आतां फक्त दोनच गोष्टींचा उल्लेख करून हें ऐतिहासिक वर्णन संपवितों. करवीर राज्याच्या स्थापनेपासून आज घटकेपर्यंत या संस्थानांत राजस्त्रियांनीं आपल्या मताची नि इच्छेची छाप पुष्कळ वेळां जगाला चकित करण्यासारख्या पद्धतीनें संस्थानच्या कार-भारावर पाडलेली आहे. पण त्या बाबतींत संभाजीची पत्नी जिजाबाई ( तोरगळकर शिंदे यांची कन्या ) हिची बरोबरी दुसऱ्या कोणत्याहि कोल्हापूरच्या राजस्त्रीनें अद्याप केलेली नाहीं. कारण या महत्त्वाकांक्षी बाईनें भगवंतराव पंत अमात्यांनीं "स्त्रीबुद्धि अशाश्वत असल्यानें कोल्हा-

पुरी कारभार चालविण्याचें काम आपल्या हातून व्हावयाचें नाहीं" असें निस्पृह उत्तर दिल्यावर, "कोल्हापुरांत छत्रपतीच्या पंतप्रधानाचें काम राजवाड्यांतल्या कुळंबिणीहि करूं शकतात!" असे उद्गार काढून, संस्थानांत मुख्य राजकीय सल्लागार म्हणून आपल्या माहेरच्या येसाजी शिंदे नामक लेकावळ्यास नेमून घेतलें व राजवाड्यांतल्या पांच दासींना पांच महत्त्वाच्या मामलतींचा कारभार करण्यास पाठविलें!! या गोष्टीचा व्हावयाचा तोच स्वाभाविक परिणाम झाला व राज्यांत सर्वत्र अव्यवस्था व बेबंदशाही माजली. अशा प्रकारें अकरा वर्षें कोल्हापुरांत स्त्रीराज्य चालवून व असह्य त्रास देऊन ही राणी इ. स. १७७३ मध्यें कालवश झाली.

## मोहित्यानें केलेला छत्रपतिवध!

त्यानंतर कोल्हापुरास खुद्द छत्रपतींच्या राजवाड्यांत (जुन्या राजवाड्यांत) सन १८२१ सालीं संभाजी ऊर्फ आबासाहेब महाराज छत्रपति यांचा एका मर्जीतल्या मराठ्यानें केलेला राक्षसी वध ही अभूतपूर्व ऐतिहासिक घटना नमूद करण्यासारखी आहे! बेफाम स्वार्थांधता नि अमानुष कृतघ्नता यांचें हिडिस प्रदर्शन करून आपल्या जातीस नि कुळास कायमचा काळिमा फासणाऱ्या, त्या तरुण मराठा सरदाराचें नांव सयाजी मोहिते असें होतें. ज्या आपल्या धन्याचा, छत्रपति संभाजीचा खून त्यानें केला, त्यांनींच त्यास मोठें जमिनीचें उत्पन्न देऊन 'सरदार'हि बनविलें होतें. पण नंतर त्याच्या उत्पन्नांपैकीं थोडीशी जमीन काढून घेऊन ती दुसऱ्या एका मर्जीतल्या मराठ्याला संभाजीनें बक्षिस दिली, एवढ्या गोष्टीनेंच चिडून जाऊन सयाजी मोहित्यानें आपल्या मर्दुमकीचें पाणी छत्रपतीला पाजलें व कोल्हापुरच्या इतिहासांत आपलें नांव अजरामर करून ठेविलें!!

संभाजी ऊर्फ आबासाहेब यांच्या वयाच्या विसाव्या वर्षींच त्यांचा अनपेक्षित वध होऊन त्या कारकीर्दीचा शोचनीय शेवट झाल्यापासून

सन १८९४ मध्यें कोल्हापुरचे पहिले क्रांतिकारक छत्रपति, श्रीमंत कागलकर घाटगे जहागिरदारांचे ज्येष्ठ पुत्र, श्रीमंत यशवंतराव ऊर्फ शाहूमहाराज हे राज्यसूत्रें हातीं घेईपर्यंत, सुमारें पाऊण शतकाच्या काळांत या संस्थानच्या गादीवर जे राजे बसून गेले, त्यांच्यासंबंधीं आज येथें आपल्यास थोडा सुद्धां अधिक विचार कर्तव्य नाहीं. म्हणून आतां कोल्हापुरच्या सार्वत्रिक लोकजागृतीचा व धार्मिक, सामाजिक नि राजकीय क्षेत्रांतील चळवळीचा उगम नि वाढ कसकशी झाली याचा त्रोटक वृत्तान्त दरबारी व लोकपक्षीय अशा उभयपक्षीय विश्वसनीय माहितीच्या आधारें देण्याकडे वळतों.

तारीख २।४।१८९४ या दिवशीं श्रीशाहूमहाराजांना ब्रिटिश सरकारकडून राज्याधिकार मिळाल्याबद्दल कोल्हापुरास जो महोत्सव झाला, तो पाहण्यास अखिल महाराष्ट्रांतील सर्व जातींचे लोक महाराजांवरील निरतिशय प्रेमानें लोटले होते. त्यावेळचे मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड हॅरिस हे शाहू छत्रपतींना अधिकार देतांना म्हणाले, “ अमरकीर्ति शिवरायापासून आपल्यास व आपल्या पूर्वजांना प्राप्त झालेल्या गादीवर बसण्यास जेव्हां सार्वभौम सरकारनें आपणांस पसंत केलें, त्यावेळीं करवीर प्रजाजनांस जें आश्वासन दिलें होतें त्याची परिपूर्तता करण्याचा मान मला लाभला हें माझें मी भाग्य समजतों. ” ते आणखी पुढें म्हणाले, “ महाराज, आपल्या भाषणाचा बाणेदारपणा व त्यांतील सहानुभूतिपूर्ण गर्भितार्थ पाहून समाधान वाटतें. आपल्या प्रजाजनांशीं यथायोग्य रीतीनें वागून आपण त्यांच्या हरएक हिताच्या गोष्टीकडे लक्ष द्याल असा विश्वास वाटतो. आपली मोठी मानसिक शक्ति व सार्वजनिक कामाची आस्था यामुळें आपण लोकहिताचे प्रश्न सोडवतांना त्यांचा विचार समतोल न्यायबुद्धीनेंच कराल असें भाकीत करण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. ” राज्यसूत्रें हातीं आल्यावर छत्रपति शाहूमहाराजांनीं पुढील जाहिरनामा काढला होता:—“ आमचे प्रजाजन सदासुखी व संतुष्ट असावे, त्यांच्या हितसंबंधांची एकसारखी अभिवृद्धि होत जावी व आमच्या संस्थानचा सर्व बाजूंनीं अभ्युदय

व्हावा, अशी आमची उत्कट इच्छा आहे. हा उद्देश सफल होण्याचे कामीं आमचे जहागिरदार, आप्त, सरदार, मानकरी, इनामदार, कामदार, सर्व दर्जाचे शेट-सावकार व इतर प्रजाजन यांच्या उज्वल राजनिष्ठेची आणि सहकार्यांची आम्हांस अवश्यकता आहे. ” ही अपेक्षित राजनिष्ठा व्यक्त करून महाराजांना योग्य सहकार्याचें सहाय्य देण्यास केवळ करवीरस्थच नव्हे तर अखिल महाराष्ट्रीय लोक प्रारंभीं तरी किती उत्सुक झालेले होते हे लठ्ठेकृत शाहू चरित्रांतील खालील उताऱ्यावरून कळेल.

## पुणेकर व शाहूमहाराज

कै. शाहू महाराजांचें कोल्हापुरास दत्तविधान झालें, तेव्हां महाराजांचें अभिनंदन करण्यास पुणें सार्वजनिकसभा या प्रसिद्ध संस्थेचें एक शिष्टमंडळ कोल्हापुरास आलें होतें. त्याचें वर्णन करतांना श्री. लठ्ठे म्हणतात, “ एका अधिकारारूढ ब्राह्मण संस्थानिकाच्या नेतृत्वाखालीं पुण्याच्या सार्वजनिक सभेचें शिष्टमंडळ कोल्हापूरला आलें व त्यानें असे उद्गार काढले: ‘ हल्लींच्या काळीं कोल्हापूरचें राजघराणें मराठा–राज्य–संस्थापक थोरले शिवाजी महाराजांचे खास वंशज आहे. कोल्हापूरचें क्षेत्रफळ एकाद्या लहानशा जिल्ह्याइतकें परिमित आहे; तथापि कोल्हापूरच्या गादीच्या ऐतिहासिक महत्त्वामुळें जेथें जेथें मराठी सत्ता नांदत आहे, तेथें तेथें कोल्हापूरच्या गादीविषयीं अखिल जनतेंत पराकाष्ठेचा आदर वसत आहे. स्वामिनिष्ठेच्या व प्रेमाच्या या राष्ट्रीय बंधनामुळें आज आम्ही येथें आलों आहोंत. ’ कै. नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांनींही याच आशयाचे उद्गार एके प्रसंगीं बोलतांना काढले होते. ते म्हणतात, “ मराठ्यांनीं जी थोर कामगिरी बजावली, त्याचें मूर्तिमंत चिन्ह म्हणजे कोल्हापूरची गादी होय. या गादीवर ज्या ज्या विभूती आरुढ होतील, त्यांच्याविषयीं अखिल महाराष्ट्रांतच नव्हे, तर त्यांच्या राज्याच्या कक्षेबाहेरील लोकांच्या मनांत देखील सदा प्रेमाच्या व आदराच्याच भावना वसत राहतील. ”

## कोल्हापूरचा थोर वारसा

जी गादी कै. शाहू महाराजांनीं ता. ६।५।१९२२ पर्यंत भूषविली, तिचें ऐतिहासिक महत्त्व वर्णितांना श्री. लट्ठे लिहितात, " छत्रपति घराण्याचें हल्लीं जरी अखिल मराठा राष्ट्रांतील राजकीय नेतृत्व नष्ट झालें आहे, तरी हें घराणें मराठ्यांच्या राष्ट्रीय जीविताचें उगमस्थान गणलें जावें आणि याच गोष्टींत कोल्हापूरच्या राज्याचें विशिष्ट महत्त्व समाविष्ट झालेलें आहे. मराठा राष्ट्राच्या राजकीय जीवनाचा खरा खुरा-पाया शिवाजी महाराजांनीं सतराव्या शतकांत घातला. ब्राह्मण, मराठे, प्रभू आणि कुणबी या सर्वांचें एक मराठा राष्ट्र बनविण्याचा त्यांनीं स्तुत्य प्रयत्न केला. शिवाजी महाराजांच्या राष्ट्रघटनेंतून कोणत्याहि जातीला वगळण्यांत आलें नव्हतें. कोणत्याहि विविक्षित जातीला महत्त्व न देतां, क्षत्रिय बाण्याच्या सर्व लोकांना शिवाजीच्या लष्करांत व सर्व जातींच्या लायक माणसांना राज्यकारभा-रांतहि प्रवेश मिळूं शकत असे. शिवाजी महाराजांचे सैनिक व मुत्सद्दी सर्व जातींचे होते. अशा उदार धोरणानेंच त्यांनीं हिंदुपदपादशाहीची स्थापना केली. तीच इतिहासांत ' मराठा साम्राज्य ' या नांवानें प्रसिद्ध आहे. या मराठी साम्राज्यांच्या वैभवाचा व परंपरेचा वारसा कोल्हापूरच्या गादीला प्राप्त झाला आहे."

शाहू महाराजांचा मोठेपणा कशांत आहे, असा जर कोणीं प्रश्न केला तर त्याचें थोडक्यांत उत्तर असें देतां येईल कीं, ' श्री. शाहू छत्रपतींचा खरा मोठेपणा त्यांच्या क्रांतिकारक विचारांत, आचारांत नि नेतृत्वांत आहे.' सर्व भरतखंड परकीयांच्या पारतंत्र्यांत आपादमस्तक बुडून गेल्या-नंतर त्यांतील संस्थानिक तरी नामधारी राजेपणा मिरविण्यापलीकडे अधिक कसलीहि ' स्वतंत्र हालचाल ' करण्यास अजूनहि मोकळे झालेले नसले तर त्यांत आश्चर्य कसलें ? पण असल्या पारतंत्र्याच्या परिस्थितींतहि जीं माणसें क्रांतिकारक विचारांनीं भारलेलीं असतात, तीं ते विचार आपल्या कृतींत आणून नंतर दुसऱ्यांनाहि ते पटविण्याची शिकस्त केल्यावांचून

स्वस्थ रहात नाहींत. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस हिंदुस्थानांत निरनिराळ्या ठिकाणीं लोकजागृति करणारे जे अनेक लहानथोर क्रांतिकारक नेते धार्मिक, सामाजिक नि राजकीय सुधारणा घडवून आणण्यास पुढें सरसावले होते, त्यांच्या शिकवणीचा शाहू महाराजांच्या मनावर बराच खोल परिणाम झालेला होता असें स्पष्ट दिसून येतें; कारण एक संस्थानिक या नात्यानें शाहू छत्रपतींचें सर्व आयुष्य क्रान्ति-विरोधी व स्वातंत्र्य-विरोधी वातावरणांत आणि गुलामी वृत्तीच्या, पोटार्थी व जात्यंध सल्लागारांच्या संगतींत गेलें असतांहि, त्यांनीं आपलें स्वातंत्र्यप्रेम अखंड जिवंत ठेवलें व बहुजनसमाजासाठीं सत्यसमाजी मताच्या बोल्शेव्हिक स्वरूपाच्या क्रांतिकारक चळवळींचा जोराचा पुरस्कार कोल्हापूर संस्थानांत आणि संस्थानाबाहेरील ब्रिटिश मुलखांतहि मोठ्या धडाडीनें केला. पतित व पांगळ्या झालेल्या, मागासलेल्या समाजास माणुसकीचें जीवन देऊन शाहू महाराजांनीं त्यांना जें आपल्या पायावर उभे राहण्याचें सामर्थ्य दिलें, त्या एकाच मोठ्या कामगिरीबद्दल त्यांस कोल्हापुरांतील मागासलेल्या जनतेमधील जागृतीचे जनक ही पदवी देणें योग्य वाटतें.

## आठव्या हेन्रीची धर्म-सुधारणा.

इतिहासाचे एक विद्वान् अध्यापक इंग्लंड देशाच्या इतिहासांतील ट्यूडर काळ शिकवितांना आठव्या हेन्रीनें केलेली धर्म-सुधारणा व शाहूमहाराजांनीं ‘ वेदोक्तप्रकरण ’ वगैरे चळवळींनीं केलेली धार्मिक सुधारणा यांची मार्मिक तुलना करून या दोन इंग्लिश व मराठी राजपुरुषांच्या खासगी व राजकीय जीवनांत आणि शारीरिक साहश्यांत सुद्धां कितीं विलक्षण साम्य होतें, हें ते मोठ्या वक्तृत्वपूर्ण भाषेंत अत्यंत निस्पृहपणानें व निःपक्षपातीपणें समजाऊन देत असत. आश्चर्यकारक उलाढाली व भयंकर खळबळ उडवून देणाऱ्या घटना यांनीं भरून गेलेल्या, कै. शाहूमहाराजांच्या आयुष्याचा विचार प्रत्यक्ष माहितीच्या आधारें

केल्यास, वरील इतिहासाभ्यासी गृहस्थाच्या मतासच कोणाहि विचारी माणसाला मान्यता देणें भाग आहे.

आठवा हेन्री व शाहू छत्रपति या दोघांच्या चारित्रांमधील ढोबळ साम्याचा येथें जातां जातां उल्लेख करण्याचें एक कारण असें आहे कीं, शाहूमहाराजांचे अंधभक्त, पोटार्थी अनुयायी व पगारी चरित्रकार वगैरे लोक भासवितात, तसे कांहीं शाहूमहाराज हे निःस्वार्थी, निष्कपटी, महात्मा नव्हते. नुसते सनदशीर राजमार्गानें जाऊन आपल्या समाजाची व संस्थानची सुधारणा गोडीगुलाबीनें करूं पाहणारे, सुसंस्कृत संस्थानिकहि नव्हते. आपल्या धिप्पाड शरीराला साजेशीच त्यांची बुद्धिमत्ता, बेफाम मनोविकार व उदार अंतःकरण होतें. अत्यंत साधेपणाबरोबरच रंगेलपणा नि ग्राम्यपणा यांचा सर्व आयुष्यभर कडेलोट होऊं देण्यांतच त्यांना आनंद होई. जन्मानें जहागिरदार, नशिबानें छत्रपति! वृत्तीनें क्रांतिकारक लढवय्या, पण पेशानें परकीयांच्या गुलामगिरींत गटंगळ्या खाणारा, एक बडा सरंजामदार संस्थानिक!! सत्यसमाजी मतापासून तहत थिऑसफी व तर्कनिष्ठुर नास्तिक वादापर्यंत सर्व सुधारकी मतांचा जोरानें पाठपुरावा करणारा, पण आपल्या खासगी जीवनांत व कौटुंबिक व्यवहारांत वडिलार्जित सनातनी परंपरा पाळून, भाविक निष्ठेनें लिंगार्चनासारखी अखंड मूर्तिपूजा करणारा हाडाचा खरा मराठा! जगांतलीं सर्व माणसें जन्मतः फक्त एका मानव जातीचींच असल्यानें सारखीं आहेत व नंतर त्यांच्यांत उत्पन्न झालेले उच्चनीचतेचे कृत्रिम जातिभेद, वर्गभेद नि धर्मभेद हे मतलबी वर्णगुरु वगैरेंनीं केले असल्यानें ते सर्व नष्ट करून टाकून, सार्वत्रिक रोटीबेटी व्यवहाराच्या सबगोलंकारी रूढीनें सर्वांमध्यें धार्मिक व सामाजिक समता प्रस्थापिली पाहिजे, या आत्यंतिक समाजसुधारणेचा कै. शाहू छत्रपति महाराज मोठ्या जोरानें पुरस्कार करीत असत; परंतु ही समाजसुधारणा त्यांनीं आपल्या राजकुटुंबांतील कन्यापुत्रांचे विवाह खानदानी पद्धतीनें घडवून आणतांना राजवाड्याच्या

फाटकाबाहेर फार दूर अंतरावर अस्पृश्य स्त्रीप्रमाणेंच अगदीं एकीकडच्या कोपऱ्यांतच उभी करून ठेविली होती! देव आणि भक्त, या दोघां-मध्यें भटजी, गुरव वा गुरु किंवा जगद्गुरु यांच्यासारखे मध्यस्थ वा दलाल मुळींच असूं नयेत, असें प. वा. जोतिबा फुले यांचें आग्रहाचें सांगणें होतें व त्या सत्यसमाजी मताचा अत्यंत आवेशपूर्ण प्रचार कै. शाहू महाराजांनीं साऱ्या कोल्हापूर संस्थानभरच नव्हे, तर अखिल महाराष्ट्रांतील खेड्यां-पाड्यांतूनहि पुष्कळ संस्थानी संपत्ति उधळून केला! आणि स्वतः मात्र शेवटपर्यंत ब्राह्मण भटजींची धार्मिक मध्यस्थी चालवून घेत असत, एवढेंच नव्हे, तर मग त्यांनीं ब्राह्मणांच्या जोडीस मराठे भटभिक्षुक व क्षात्रजग-द्गुरुहि तयार केले व त्यांच्या धार्मिक दलालीस राजमान्यता दिली!! अशा परिस्थितींत राजोपाध्यासारखे एकनिष्ठ सनातनी व रा. भास्कर विठोजी जाधवांसारखा कट्टर सत्यसमाजी या दोन विरुद्ध टोकांवरील मतांच्या माणसांचा, अनुक्रमें वेदोक्तप्रकरणीं व क्षात्रजगद्गुरूच्या भानगडींत, शाहू-महाराजांशीं खटका उडाला असला तर नवल काय? त्या खटक्याचें प्रायश्चित्त एकाला आर्थिक सत्यानाशानें व दुसऱ्यास फक्त 'क्षमस्वा'च्या अपमानानें घ्यावें लागलें म्हणे! दोघांच्या शिक्षेमधील हा फरक अर्थातच त्यांच्यामधील जातिभेदानें पाडला होता. इंग्लंडच्या आठव्या हेन्रींत परस्परविरोधी मतें व कृति यांची गमतीदार गल्लत कशी उडालेली होती याचें वर्णनहि मनोरंजक होईल. पण स्थलाभावीं तें काम येथेंच थांबविणें अवश्य आहे.

कोल्हापूर संस्थानचीं सर्व सूत्रें कै. शाहू छत्रपति महाराजांच्या हातीं आलीं, तेव्हां संस्थानाबाहेर इंग्रजी शिक्षणामुळें व कै. न्यायमूर्ति रानडे, टिळक, आगरकर व जोतिबा फुले इत्यादि थोर, थोर पुढाऱ्यांनीं केलेल्या धार्मिक, सामाजिक व राजकीय चळवळींमुळें देशांतील सुशिक्षित वर्गांत स्वदेश, स्वधर्म नि स्वातंत्र्य यांच्याविषयीं उत्कट प्रेमाची मोठी लाट उठ-लेली होती. मागासलेल्या वर्गांतील अशिक्षित व अर्धशिक्षित जातींच्या

लोकांतहि स्वाभिमान जागा होऊन आपल्या हीन व पतितावस्थेविषयीं चीड उत्पन्न झाल्याचीं चिन्हें स्पष्ट दिसावयास लागलीं होतीं. महाराष्ट्रा-पुरतेंच बोलावयाचें म्हणजे इकडे दोन पक्ष निर्माण झाले होते. एक टिळ-कांचा पुरोगामी राजकीय पक्ष व दुसरा रानडे–आगरकरांचा सामाजिक सुधारणावादी पक्ष. पहिला पक्ष प्रचंड लोकप्रियता पावलेला असा अत्यंत प्रबल, पण सरकार दरबारच्या कडक रोषास पात्र झालेला असा होता ! तर दुसरा पक्ष लहान, पण सरकार, संस्थानिक नि काळे गोरे अधिकारी यांच्या वजनदार पाठिंब्यानें जोरांत असलेला होता. पहिल्यांत ब्राह्मण नि स्वातंत्र्य-प्रेमी तरुण यांचा भरणा मोठा होता, तर दुसऱ्यांत ब्राह्मणेतर सुशिक्षित नि सरकारी व संस्थानी अधिकारी हेच बहुसंख्य होते. टिळकांच्या पक्षाची सर्व चळवळ व त्या चळवळीचा सर्व रोख देशांत राष्ट्राभिमान व स्वातंत्र्य-प्रेम उत्पन्न करून इंग्रजांच्याकडून स्वराज्य आपल्या हातीं आणण्याकडे होता, तर रानडे, आगरकर नि फुले यांची सर्व चळवळ हिंदुसमाजांतील स्त्रीपुरुष व निरनिराळ्या जाती यांच्यामधील सामाजिक नि धार्मिक विषमता प्रथम नाहींशी करून पाश्चात्य पद्धतीची सामाजिक समता इकडे आण-ण्यासाठीं होती. त्यामुळें लोकमान्यतेचा मान टिळक व त्यांचे अनुयायी यांना लाभला होता व राजमान्यता विशेष प्रमाणांत रानडे पक्षाला मिळाली होती. देशांतील सर्व जातींच्या नि धर्मांच्या लोकांचे किरकोळ मतभेद कांहींहि असले, तरी टिळकांची उत्कट देशभक्ति, प्रचंड स्वार्थ-त्याग नि धैर्य, असामान्य बुद्धिमत्ता, पवित्र आचरण नि लढाऊ वृत्ति इत्यादि तेजस्वी गुणांमुळें राजापासून रंकापर्यंत व गरिबापासून श्रीमंतां-पर्यंत सर्वजण लोकमान्यावरून आपले पंचप्राण ओवाळून टाकण्यास एका पायावर तयार होते ! तसेंच पुष्कळ हिंदी अधिकारी व शाहूछत्रपति महाराजांसारखे थोर, लहान संस्थानिकहि टिळकांचे उत्कट पण गुप्त चाहते होते. उघड राजकीय व्यवहारांत वा खासगी सामाजिक विषयांत टिळकांचें नि त्यांच्या राजकीय चळवळीचें भयंकर शत्रुत्व आपल्या शब्दांनीं वा कृतींनीं व्यक्त करणारे किती तरी लोक गुप्तपणानें व प्रेमानें

लोकमान्यांना आर्थिक वगैरे मार्गांनीं स्वयंस्फूर्तीनें सहाय्य देत असत, अशी आख्यायिका आहे.

कै. शाहू महाराजांना आपले पुण्यश्लोक पूर्वज, थोरले शिवाजीमहाराज यांचेविषयीं यथार्थ अभिमान व पूज्य बुद्धि होती म्हणूनच त्याकाळीं, टिळकांनीं महाराष्ट्रांत पहिल्यानें सुरू केलेल्या शिवाजी उत्सवाच्या स्फूर्तिदायक चळवळीस उघड सहानुभूति दाखविणें भयंकर धोक्याचें असतांनाहि, पुण्याप्रमाणें कोल्हापुरांत, छत्रपतींच्या राजधानींतहि शिवाजीउत्सव मोठ्या प्रमाणांत सार्वजनिक रीतीनें सुरूं व्हावा म्हणून महाराजांना भेटावयास आलेल्या टिळकांच्या नेतृत्वाखालील शिष्टमंडळास शाहू छत्रपतींनीं प्रेमानें भेट दिली व त्यांचें म्हणणें ऐकून घेऊन शिवाजीउत्सव चळवळीला आपला उदार आश्रय देण्याचें अभिवचन दिलें. त्यामुळें कोल्हापुरांत हा उत्सव लोकांनीं मोठ्या धडाडीनें कांहीं काळ साजरा केला; पण पुढें लवकरच इंग्रज सरकारची रोषपूर्ण वक्रदृष्टि टिळक व त्यांच्या सर्व राष्ट्रीय भावनोद्दीपक चळवळीवर वळतांच शाहू महाराजांना, व्यक्तिशः त्यांना कांहींहि वाटत असलें तरी, टिळकप्रणीत शिवाजी उत्सवाशीं आपला जडलेला सर्व संबंध एकदम तोडून टाकावा लागला. एवढेंच नव्हे तर, टिळक आणि त्यांच्या सर्व राष्ट्रहितसंवर्धक चळवळी यांच्या निःपाताचें कंकण बांधून त्यांच्याशीं उभा दावेदारीचा सामना देणें त्यांना भाग पडलें!! लोकमान्य टिळकांनीं पुण्यश्लोक शिवछत्रपती पासून तों तहत कोल्हापूरच्या वेडे ठरविले गेलेल्या शिवाजी महाराजापर्यंत, मराठ्यांच्या राजांचा खरा अभिमान अत्यंत स्वार्थत्यागपूर्वक व जाज्वल्यपणें व्यक्त केला असतां व त्यासाठीं इंग्रज अधिकारी नि बर्वे दिवाण यांचेवर कडक टीकास्त्र सोडून कोल्हापूरच्या महाराजासाठीं अत्यंत कठोर कारावासाची शिक्षा निःस्वार्थीपणानें भोगली असतां, छत्रपतिमहाराजासारख्या थोर संस्थानिकानें त्या उपकाराची फेड अत्यंत निषेधार्ह अशा दुष्ट शत्रुत्वाच्या घोर अपकारानें करावी याचा अर्थ काय? वरवर पाहून व वाचून विचार करणाऱ्यांना शाहूमहाराजांचें हें

र्वतन अत्यंत निंद्य वाटून ते त्यांना दोष देऊन मोकळे होतील; पण सर्व-सामान्य संस्थानिकांची गुलामी परिस्थिति, शिक्षण, आपमतलबी सल्लागार, संस्थानी स्वार्थ व खासगी आयुष्यक्रम इत्यादि गोष्टींची ज्यांना सुदैवानें वा दुर्दैवानें प्रत्यक्ष माहिती मिळालेली आहे, ते लोक शाहूमहाराजांच्या त्या अस्वाभाविक वर्तनावर फार निष्ठुरपणाची टीका न करतां त्याविषयीं सहानुभूतीनेंच विचार करतील असा विश्वास वाटतो. ता. १५।४।१८९९ मध्यें आपल्या तिसऱ्या व शेवटच्या अपत्याचा जन्म झाल्यानंतर पुढें वीस बावीस वर्षें शाहूमहाराजांनीं नव्या जुन्या राजवाड्यांत व रजपूतवाडी, सोनतळी नि पंचगंगा महाल इत्यादि ठिकाणीं ज्या असामान्य क्रीडा नि खेळ केले, व त्यामुळें जीं अनेक प्रकरणें पोलिटिकल एजंटामार्फत वरिष्ठ इंग्रज अधिकाऱ्यांकडे धांव घेत गेलीं, त्यांचा बंदोबस्त नीट करून आपलें व आपल्या संस्थानचें अस्तित्व सुरक्षित ठेवण्यासाठीं व होईल तेवढा राजकीय फायदा मिळविण्यासाठीं शाहू महाराजांना तसें करण्या-वांचून गत्यंतरच नव्हतें! पण त्या विकट परिस्थितींतहि भांबाऊन जाऊन, केवळ स्वतःचें स्वार्थसाधन करण्यांतच समाधान मानून स्वस्थ न बसतां, शाहूमहाराजांनीं मराठे, मुसलमान, जैन, लिंगायत, तेली, कोष्टी, अस्पृश्य, व ख्रिस्ती यांच्यांत नव चैतन्याची जागृति उत्पन्न करून त्यांना स्वतःची सामाजिक उन्नति घडवून आणण्यास जें अत्यंत उदार-पणानें उत्तेजन दिलें, त्यांतच त्यांचा खरा मोठेपणा, खरें छत्रपतित्व व खरी कर्तबगारी दिसून येते. करवीर इलाख्यांतील सामाजिक क्रांतीची व बहुजन समाजाच्या उद्धाराची ती प्रचंड चळवळ धूमधडाक्यानें चालवितांना संस्थानांतील हजारों ब्राह्मणांना नानाप्रकारचा छळ, अपमान, घरादारांवरील संक्रान्त नि कारावास वगैरे शेंकडों अन्याय्य आपत्तींस तोंड द्यावें लागून पुष्कळांस परागंदाहि व्हावें लागलें! त्यामुळें सहाजिकच शाहूमहाराज म्हणजे ब्राह्मणांचे कर्दनकाळ असा समज अजूनहि पुष्कळांचा झालेला कायम आहे. ते ब्राह्मणांच्या धार्मिक व सामाजिक वर्चस्वाचे कट्टे शत्रु होते, ब्राह्मणांचे नव्हे. वर्णश्रेष्ठपणाच्या मानाचे पहिले मानकरी म्हणून त्या सामा-

जिक क्रांतीच्या आगींत प्रथम भट भिक्षुक नि ब्राह्मण सद्गृहस्थ भयंकर प्रकारें होरपळून जाणें क्रमप्राप्तच होतें. ब्राह्मणांमागून दुसरा मान क्षत्रियांचा असल्यानें, आतां राजे महाराजे वगैरे अनियंत्रित राजकीय वर्चस्व व सामाजिक विषमतेचे विषारी गड्डे होऊन राहिलेल्या व सर्व श्रमजीवी प्रजेच्या श्रमावर वाडिलार्जित परंपरेच्या सनातनी हक्कानें ऐदीपणाचा ऐषआराम करणाऱ्या सर्व संस्थानिकांची व सरंजामदारांची पाळी अगदीं जवळ आलेली दिसून येत आहे. असो.

कै. शाहूमहाराजांच्या प्रेरणेनें कोल्हापुरांत वेदोक्ताची चळवळ, सत्यसमाजाचे तमाशे, कुळकर्णी वर्गाविरुद्ध मोहीम, ब्राह्मणेतरांचें उच्च शिक्षण, संस्थानी नोकरींतून ब्राह्मणांची हकालपट्टी, अस्पृश्योद्धार व मराठा जातीची संघटना करणें अशा बऱ्याच चळवळी निर्माण झाल्या व त्या सर्वांचा कटाक्ष ब्राह्मणवर्गाविरुद्ध विशेष होता हेंहि खरें आहे; पण त्या सर्वांचा संकलित परिणाम अखेर संस्थानी प्रजेच्या सामाजिक व राजकीय उन्नतीस पोषक असाच होणार असल्यानें त्या सर्व चळवळींबद्दल शाहूमहाराजांना हार्दिक धन्यवाद दिले पाहिजेत असें मला वाटतें.

## कोल्हापूर लोकप्रतिनिधि सभा

कोल्हापुरांतील धार्मिक, सामाजिक नि शैक्षणिक चळवळी वगळून, आपण स्थानिक स्वराज्य किंवा संस्थानांतर्गत जबाबदार राज्यकारभार यांच्या हक्कप्राप्तीसाठीं सुरूं झालेली करवीरस्थ प्रजेची अत्यंत नेमस्त स्वरूपाची सनदशीर राजकीय चळवळ विचारांत घेऊं लागलों, तर मात्र, शाहूमहाराजांच्या प्रतिगामी धोरणांत व सध्यांच्या सुधारलेल्या काळांतील श्रीमंत सर राजाराम छत्रपति महाराजांच्या प्रजास्वातंत्र्यविरोधी धोरणांत काडीइतकाहि फेरफार झालेला नाहीं, असेंच म्हणणें आपल्याला भाग पडत आहे ! सध्यां शिक्षणप्रसार, वर्तमानपत्रें व ब्रिटिश हिंदुस्थानांतील जनतेची प्रचंड राजकीय प्रगति इत्यादि साधनांमुळें संस्थानी मुलखांतली मेलेली प्रजाहि जिवंत होऊन, आपल्या हिरावून घेतलेल्या राजकीय व

नागरिक स्वातंत्र्याचे मूलभूत हक्क मोठमोठ्या अरेराव संस्थानिकांकडेहि दरडावणीच्या धाकानें ओरडून मागूं लागली आहे ! शाहूमहाराजांच्या काळीं लोक बरेच मागासलेले व अज्ञानांधकारांत घोरत पडलेले होते; पण ब्राह्मण नि ब्राह्मणेतर यांचेमधील कांहीं थोडे लोक तरी योग्य कर्तव्य-जागृति ठेऊन, राजनिष्ठपणें छत्रपतिमहाराजांच्याकडे त्यावेळींहि प्रजाप्रति-निधीकडून दरबारनें गरीब बहुसंख्य प्रजेचीं केविलवाणीं गाऱ्हाणीं दयाळु-पणें ऐकून घ्यावींत व चौकशी करून महाराजांनीं प्रजेवरील अन्याय दूर करण्याची कृपा करावी, असें सांगण्यास पुढें आले होते. शाहूमहाराजांनीं त्या लोकप्रतिनिधींना आपल्या जवळील तोंडपुज्या, जात्यंध व स्वार्थ-परायण अशा बदसल्लागारांच्या सल्ल्यानें अत्यंत धिक्कारपूर्वक वागविलें व त्यांचा राक्षसी छळहि केला ! कित्येकांच्या घरादारांवरून सुलतानी सत्तेच्या जुलमाचा नांगर फिरवून त्यांना हद्दपार केलें ! व कित्येक लोकप्रतिनिधींवर फौजदारी खटले भरून त्यांच्या उमद्या आयुष्याचा अन्यायी तुरुंगाच्या अंधारांत सत्यानाश करून टाकला !! कै. शाहू-महाराजांच्या पोटार्थी भाटांनीं व श्री. अण्णा बाबाजी लठ्ठे यांच्यासारख्या विद्वान् पण ब्राह्मणेतरी रंगीत चष्मा लावून पाहणाऱ्या शाहू-चरित्र-लेखकानेंहि तेहतीस वर्षांपूर्वींच्या त्या ‘ कोल्हापूर लोकप्रतिनिधिसभे ’ विषयीं तिरस्करणीय गैरसमज पसरविण्याचें कृत्य केलेलें आहे हें नमूद करण्यास फार खेद होतो. इ. स. १९०६ सालीं, मंगळवार तारीख २ आक्टोबर, आश्विन शु. १५ शके १८२८ या दिवशीं, शाहूपुरींत, रा. लक्ष्मणराव दिगवडेकर यांचे जागेंत, कोल्हापूर लोकप्रतिनिधि सभेचें पहिलें अधिवेशन कै. डॉ. रुईकर यांचे अध्यक्षतेखालीं मोठ्या यशस्वीपणें भरून पार पडलें. त्याचा संक्षिप्त वृत्तान्त वाचून जर कोणी त्या मवाळ कोल्हा-पूर लोकप्रतिनिधींच्या मागणीस ‘ फाज़ील ’ किंवा ‘ अयोग्य ’ हें विशेषण लावण्यास धजेल असें वाटत नाहीं.

कोल्हापूर लोकप्रतिनिधि सभेच्या पहिल्या अधिवेशनास सर्व करवीर इलाख्यांतून ( जहागिरींसुद्धां ) एकंदर १०१ प्रतिनिधि निवडून आले होते. जातवारीप्रमाणें त्यांत ब्राह्मण, मराठे, मुसलमान, जैन, लिंगायत नि सोनार या सहा जातींचे पुढारी उपस्थित होते. स्वागताध्यक्षाचें काम कोल्हापूरचे नामांकित वकील व राजमान्य नागरिक, कै. श्री. विष्णु कृष्ण राशिंगकर यांनीं केलें. खुद्द कोल्हापूर राजधानींतून एकतीस व बाहेरील खेड्यांपाड्यांतून सत्तर प्रतिनिधि अडीअडचणी व दरबारी विरोध धाब्यावर बसवून अधिवेशन यशस्वी करण्यास आले होते ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. कोल्हापूर लोकप्रतिनिधि सभेची मूळ कल्पना काढण्यापासून तों तिचा सर्व संस्थानभर उत्साही प्रचार करून सर्व जातींच्या रयतांचे निर्भय प्रतिनिधि तयार करण्यापर्यंत येथील एक थोर, स्वार्थत्यागी वकिल कै. सदाशिव खंडो आळतेकर, बी. ए., एलएल. बी., यांनीं अतिशय उत्साहानें सर्व खटपट केली होती. दुपारीं दोन वाजतां प्रतिनिधि व रा. अण्णा बाबाजी लठ्ठे, रा. गोविंद विठोबा जाधव, राव. पेंढारकर चीफ पोलीस, रा. शेणोलीकर स्पेशल पोलीस व रा. बळवंत वामन म्हैसकर शहर फौजदार ही मंडळी सभागृहांत आली व नंतर स्वागताध्यक्षांच्या भाषणानें अधिवेशनास आरंभ झाला. स्वागताध्यक्ष कै. राशिंगकर म्हणाले, आजचा दिवस कोल्हापूरच्या इतिहासांत महत्त्वाचा आहे. लोकसभेची ही तिसरी आवृत्ति आहे. त्या प्रत्येकीशीं माझा कांहींना कांहींतरी संबंध आहे याचा मला अभिमान वाटतो. इ. स. १८८५।८६ सालीं प्रथम ही कोल्हापूर लोकसभा जन्मास आली. करवीर दरबारनें कळंबे तलाव बांधल्यावर असा प्रश्न निघाला कीं, त्या तलावावर खर्च झालेली रक्कम दरबारनें कोल्हापूर म्युनिसिपालिटीवर लादून तिला पाणीपट्टीच्या रूपानें नागरिकांकडून वसूल करण्यास सांगावें. तेव्हां या महत्त्वाच्या प्रश्नावरील लोकमत योग्य रीतीनें व्यक्त करण्यासाठीं या लोकसभेचा जन्म

झाला. त्या कामीं येथील वकील मंडळींनींच या संस्थेचा पुढाकार घेतला व त्यांनीं कोल्हापूरवासीयांचें म्हणणें सरकारापुढें मांडून या प्रश्नाचा निकाल शहरवासीयांना अनुकूल असा करून घेतला. त्यानंतर दहा वर्षें ती सभा विश्रांति घेत होती. सन १८९४ च्या एप्रिलांत आपले दैवशाली महाराज शाहू छत्रपति यांनीं संस्थानचीं राज्यसूत्रें हातीं घेतलीं म्हणून त्यांना करवीर प्रजाजनांतर्फें मानपत्र देण्यासाठीं या कोल्हापूर लोकसभेची दुसरी आवृत्ति निघाली. मुद्दाम तयार केलेल्या भव्य मंडपांत सरकारांस मानपत्र अर्पून लोकांनीं आपली राजभक्ति व्यक्त केली. तेव्हांहि आजच्याप्रमाणें त्या लोकसभेचें नेतृत्त्वहि वकिलांच्याकडेच प्रामुख्यानें होतें. मित्रहो, आपल्या या लोकसभेचे दोन हेतू आहेत. पहिला, प्रजेच्या हिताहिताच्या गोष्टी सरकारपुढें सविनय मांडणें; व दुसरा प्रजेच्या कल्याणाचे उपाय प्रसंगोपात सरकारला सुचविणें. लोकसभेचे हेतू अगदीं मर्यादित, व नेमस्त असून, त्यांत कोणालाहि आक्षेप घेण्यासारखें कांहीं नाहीं.

“ राजा हा विष्णूचा अंश आहे व त्याच्या सुखासाठीं प्रजेचें अस्तित्व आहे ! ” अशी जी एक पुरातन कल्पना आहे ती अलीकडील इतिहासशास्त्रास व राजनीतीस मुळींच मान्य नाहीं. सुधारलेल्या राज्यपद्धतीचें तत्त्व असें आहे कीं, प्रजेचें सुख हीच प्रधान गोष्ट असून, ती उत्तम प्रकारें साधण्यासाठींच लोकांनीं आपले कांहीं हक्क देऊन राजा ही संस्था उत्पन्न केलेली आहे. चांगला शहाणा राजा व त्याचे सल्लागारहि चांगले विद्वान् व शहाणे असले, तरीहि त्याच्या राज्यांत प्रजेला कांहींच दुःखदायक नसतें असें नाहीं. आपलीं दुःखें प्रजेनें स्पष्टपणें राजापुढें मांडलीं नाहींत तर तीं त्याला कळतीलच असें नाहीं. शिवाय, राजा नशिबानें कल्पक निपजला, तरीहि प्रजेनें त्याला कांहींच सुचवावयास नकोच असें कसें म्हणतां येईल ? म्हणून या आपल्या लोकसभेसारखी प्रातिनिधिक संस्था असणें व तिला दरबारनें मान्यता देणें अवश्य आहे. या लोकप्रतिनिधि सभेविरुद्ध ज्यांनीं कांगावा चालविलेला आहे, त्यांचें खरें स्वरूप

कोणालाहि स्पष्ट दिसतच आहे! आजचा दिवस महत्त्वाचा व पर्व आहे. जी श्रीजगदंबा आज आपल्या भक्तांस अन्नप्रसाद देते, ती जगदंबा या लोकसभेच्या बालकांस 'प्रसाद' देऊन चिरस्थायी करो अशी आशा मी बाळगतों."

### अध्यक्ष कै. डॉ. वामन बाजी रुईकर यांचें भाषण.

वरील आशयाचें स्वागताध्यक्ष, कै. वि. कृ. राशिंगकर यांचें भाषण संपल्यावर, डॉ. दामोदर काशिनाथ काळे व श्री. आदिराज देवेंद्र उपाध्ये यांच्या सूचनानुमोदनानें, कोल्हापूरचे एक प्रसिद्ध नेमस्त नागरिक डॉ. वा. बा. रुईकर कुलकर्णी यांनीं सभेचें अध्यक्षस्थान मंडित केलें व संस्थानिक नि संस्थानी प्रजा यांच्या हितसंवर्धनार्थ त्यांनीं आपले विचार व्यक्त केले. ते म्हणाले, "या पहिल्या करवीर लोकप्रतिनिधि सभेच्या अध्यक्षाचा मोठा मान घेण्यास मी पात्र नाहीं असें मीं काल माझे मित्र रा. राशिंगकर यांना सांगितलें होतें. तरीहि आपण सर्वांनीं तो मान मला दिलात याबद्दल मी आपला फार फार आभारी आहें. आजच्या प्रसंगीं हें सन्मान्य स्थान नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांनीं स्वीकारलें असतें तर फार चांगलें झालें असतें. कारण नामदार गोखले हे हल्लीं राजयोगी (Political Yogi) बनून, जवळ जवळ देव पदवीप्रत पोंचले आहेत. God helps those who help themselves या न्यायानें, आपण स्वतः एक दोन वर्षें अशीच खटपट चालविल्यास नामदार गोखलेहि आम्हांस प्रत्यक्ष मदत देण्यास तयार होतील यांत शंका नाहीं. हल्लीं मनानें ते येथें असून आमच्या या सभेच्या उद्देशास त्यांची पूर्ण सहानुभूति आहे हें नामदार गोखले यांनीं माझे मित्र रा. सदाशिव खंडो आळतेकर यांना लिहिलेल्या पत्रावरून स्पष्ट होतें. नामदारसाहेब त्या पत्रांत म्हणतात, 'ही नवीन संस्था चिरायु होवो व तिचें दिवसेंदिवस राज्यकारभारांत वजन वाढून, आपल्या श्रमांचें उत्तरोत्तर अधिकाधिक चीज होवो असें चिंतून मी आपली रजा घेतों.' फिरून अध्यक्षस्थान स्वीकारण्याविषयीं विनंतिपत्र गेल्या-

वर ना. गोखले आपल्या उत्तरांत लिहितात, ‘ आपली इच्छा असेल व इतर गोष्टी अनुकूल असतील, तर मी पुढील वर्षी या समारंभास करविरीं येईन; परंतु अनेक कारणांस्तव यंदा येणें शक्य नाहीं याबद्दल आपण क्षमा करावी. ’

## राजाचें कर्तव्य

“माझी पहिल्यापासून अशी समजूत आहे कीं, समाजांतील कायदेपंडित, वैद्यपंडित व धर्मपंडित या त्रयींनें मनुष्यमात्रास मुक्ति देण्याचा रोख धरला पाहिजे. तिन्ही वर्गांनीं समाजांतील प्रत्येक मनुष्याचें स्वातंत्र्य वाढवीत गेलें पाहिजे. नैसर्गिक रोगनाशक शक्ति वाढली पाहिजे. धर्मसंबंधीं विचार होऊन, बहुजनसमाजाच्या मतानें धर्मगुरूंनीं धर्मव्यवस्था केली पाहिजे. आणि प्रजेची राजप्रीति वाढवून, त्यांस राजकीय विचार करण्याची संवय लावून राजानें राज्य चालविलें पाहिजे. राजा म्हणजे एक व्यक्ति. तेव्हां राजाजवळ सर्व सत्ता केंद्रित होणें हें समाजाला आणि राष्ट्राला हितावह होत नाहीं असें इतिहास स्पष्ट बजावतो आहे. म्हणून ही सत्ता राजा व प्रजाप्रतिनिधि यांच्यांत वांटून जाणें हें इष्ट व आवश्यक आहे. जनतेस राजकीय शिक्षण देणें हें एक राजाचें पवित्र कर्तव्य आहे. श्रीमंत शाहू छत्रपतींनीं आपल्या राज्यारोहणाचे वेळीं जें भाषण केलें, त्यावरून इंग्लंडांतील राज्यपद्धति महाराजांनीं प्रत्यक्ष पाहिल्यावरून, मला अशी खात्री वाटते कीं, या आमच्या लोकप्रतिनिधि सभेला करवीर दरबारकडून पूर्ण सहानुभूति मिळेल व तिच्या कामास उत्तम यश येईल यांत शंका नाहीं. लोकप्रतिनिधि सभेसारख्या संस्थांपासून कोणते फायदे आहेत हें सांगण्यांत आपला वेळ घ्यावा असें मला वाटत नाहीं. ही संस्था महाराष्ट्रांत प्रथम दोनशें पंचवीस वर्षांपूर्वीं जन्मास आली. महाराष्ट्र साम्राज्याचे संस्थापक, शककर्ते शिवछत्रपति महाराज यांची राज्यपद्धति जवळ जवळ लोकसत्तात्मकच होती, असें सप्रमाण सिद्ध झालेलें आहे. त्या काळच्या महाराष्ट्राशीं इतर राष्ट्रांची तुलना केल्यास त्यावेळीं

आपल्या या महाराष्ट्रांत लोकमताचा मान राजाकडून फार चांगल्या प्रकारें ठेवला जाऊन, लोकशाहीचें घोडें बरेंच पुढें गेलें होतें असें दिसून येईल. ब्रिटिश राजवटींत देशमूख, देशपांडे यांचे अधिकार कमी झाले; पण लॉर्ड रिपनसारख्यांनीं उदारपणानें म्युनिसिपालिट्या नि लोकलबोर्ड यांची स्थापना करून थोडीशी भरपाई केली. या तऱ्हेचें कांहीं तरी राजकीय शिक्षण आम्हांस श्री. शाहू छत्रपतींच्याकडून मिळेल अशी आशा आहे.

## लोकप्रतिनिधींपुढील कामें

"आमच्या या संस्थेची एकदां व्यवस्थित मांडणी झाल्यावर लोकप्रतिनिधींपुढें किती तरी कामें दत्त म्हणून उभीं राहणार आहेत—(१) आपल्या संस्थानची सांपत्तिक स्थिति कशी सुधारावी. (२) संस्थानांत कोणते नवे उद्योगधंदे काढणें फायदेशीर होईल, (३) संस्थानांतील शेती व शेतकरी यांची स्थिति कशी लवकर सुधारेल, (४) करवीर प्रजेच्या शिक्षणासाठीं व प्रचलित शिक्षणाची सुधारणा करण्यासाठीं कोणकोणते उपाय योजावेत, (५) करवीर दरबारकडून लोकांवर झालेल्या व होणाऱ्या अन्यायांची दाद लावून घेण्याचा एक कायदेशीर मार्ग म्हणून, करवीर दरबाराविरुद्ध दिवाणी दावे लावण्याचा रास्त हक्क करवीर प्रजाजनांस मिळवून देणें, (६) कोल्हापूर म्युनिसिपालिटीच्या बाबतींत दरबारनें नागरिकांच्या हक्कांस जो गैरशिस्त धक्का दिला आहे, त्याबद्दल रीतसर दाद मागून आपले हिरावून घेतलेले अधिकार दरबारकडून परत मिळविणें. (७) दरबारी अधिकारी व लहान नोकर वगैरेकडून रयतेवर जे जुलूम होतात व डुकरें नि हरणें वगैरे शिकारी जनावरांकडून प्रजेच्या पिकांची नासधूस होऊन जीवित आणि मालमत्ता यांना धोका पोंचतो, त्याचें महाराजांनीं सत्वर निवारण करावें म्हणून जोराचे प्रयत्न करणें, (८) दुष्काळासारख्या आपत्तीचे वेळीं सारासूट व तहकुबी वगैरे प्रकारें रयतांना चांगली सवलत मिळावी म्हणून दरबारला विनंति करणें, या व अशा कामांकडे पाहिल्यास त्यांत अमुक एका जातीचा व पक्षाचा स्वार्थ

साधण्याचा उद्देश आहे असा खोटा आरोप करण्याचें साहस कोणाहि सरळ व प्रामाणिक मनुष्यास करवणार नाहीं. कित्येकांनीं या लोकसभेविरुद्ध उगीचच कोल्हेकुई चालविलेली आहे. त्यांनीं सभेविरुद्ध अडाणी लोकांचा गैरसमज करण्याचें महापातक केलें आहे; पण त्याचें प्रायश्चित्त आज ना उद्यां त्यांना मिळाल्यावांचून रहावयाचें नाहीं ! सर्व प्रतिनिधींस माझें सांगणें आहे कीं, या ठिकाणीं कांहीं तास वादविवाद करून आपलें काम आटपणार नाहीं. संस्थेची स्थापना करणें फारसें अवघड नाहीं; पण ती चांगल्या प्रकारें चालवून ऊर्जितावस्थेस व महत्त्वास आणणें हें काम फार कठीण आहे. या लोकप्रतिनिधि सभेसंबंधींचें तें कर्तव्य तुम्ही कायावाचामनें करण्यास झटलें पाहिजे. श्रीशाहू छत्रपतींच्या राज्यारोहणाचें वेळीं या सभेचा जन्म झाला व आज त्यांच्याच नांवानें वसलेल्या या उपनगरांत ( शाहूपुरींत ) या सभेचें पहिलें अधिवेशन यशस्वीपणें भरलें आहे. म्हणून उत्तरोत्तर या लोकप्रतिनिधिसभेची भरभराट होवो व श्री. शाहू छत्रपति महाराज यांस चिरायुरारोग्य लाभो अशी प्रार्थना करून मी आपली रजा घेतों. ”

## तेहेतीस वर्षांपूर्वींचे ठराव

वरील सभेंत एकंदर सात आठ ठरावच संमत करण्यांत आले व त्यांतील करवीर प्रजेचीं गाऱ्हाणीं छत्रपति महाराज व त्यांचे जबाबदार अधिकारी यांच्या कानांवर रीतसर घालण्यांतहि आलीं होतीं; परंतु त्या गोष्टीस तेहेतीस वर्षें लोटून गेलीं, तरी अद्याप प्रजेचीं गाऱ्हाणीं तशींच रडत पडलेलीं आहेत हें थोड्या दिवसांपूर्वीं कुपवाडच्या माळावर जो करवीर प्रजेनें संस्थानांतील जुलूमजबरदस्तीच्या नांवानें टाहो फोडला, त्यावरून सर्वांस स्पष्ट कळून चुकलें आहेच. सन १९०६ मध्यें शाहूपुरींत भरलेल्या कोल्हापूर लोकप्रतिनिधि सभेंत जे ठराव पास झाले त्यांतील महत्त्वाचे पुढें दिले आहेत:—( १ ) करवीर इलाखा व त्यांतील छोट संस्थानें यांमधील शेती व उद्योगधंदे यांची सुधारणा करून रयतांना

खतें व यंत्रें वगैरेंची माहिती द्यावी व त्यांच्या उदरनिर्वाहाचीं साधनें वाढवावींत; ( २ ) करवीर इलाख्यांतील सर्व लोकांस शिक्षण देण्याची तजवीज सरकारनें रात्रींच्या शाळा सुरू करूनहि करावी; ( ३ ) करवीर इलाख्यांत चालू असलेल्या कायद्याप्रमाणें सरकारनें दावा करणें अगर सरकारवर दावा करणें याबाबत कोणताहि प्रतिबंध नाहीं. सदरहू बाबतींत चालत असलेली वहिवाट सरकारच्या व प्रजेच्या हितास विघातक आहे, म्हणून ती वहिवाट बंद करून, यापुढें ब्रिटिश अंमलांत चालू असलेल्या नियमांप्रमाणें येथेंहि एकसहा वहिवाट चालू रहावी, असा एक वटहुकूम किंवा सर्क्युलर दरबारनें काढावें; ( ४ ) कोल्हापूरासारख्या सुशिक्षित ठिकाणच्या लोकांच्या ताब्यांतून म्युनिसिपालिटीची व्यवस्था लोकांचें म्हणणें ऐकून न घेतां व आपल्या मुखत्यारी समारंभाचे वेळीं सरकारनें लोकांस पूर्वी मिळालेले हक्क कायम ठेवण्याचें आश्वासन स्पष्ट शब्दांत दिलें असतांहि, वचनभंग करून महाराजांनीं कोल्हापूर म्युनिसिपालिटीचे हक्क हिरावून घेतले व प्रजेस स्वतःच्या हिताच्या गोष्टी आपल्या आपण करण्याचें शिक्षण देण्याचें जें पवित्र कर्तव्य राजानें करणें भाग होतें, तिकडे निंद्य दुर्लक्ष करण्यांत आलें, याबद्दल या सभेस फार दिलगिरी वाटते. म्हणून आमची सरकारला अशी विनंति आहे कीं, त्यांनीं सदर स्थानिक स्वराज्य संस्था पूर्वींप्रमाणें लोकांच्या स्वाधीन करावी व लोकांना तिचे अध्यक्ष व सभासद निवडण्याचा अधिकार असावा; (५) करवीर प्रजाजनांचीं सुखदुःखें, गैरसोयी, गाऱ्हाणीं व अडचणी वगैरे सरकारसमोर स्पष्टपणें व व्यवस्थित रीतीनें मांडून त्यांची दाद सरकारकडून वेळच्या वेळीं लावून घेण्यासाठीं या करवीर लोकसभेचें एक कार्यकारी मंडळ असावें. त्यांत चालू सालासाठीं पुढील गृहस्थ असावेत व जरूर लागल्यास अधिक सभासद करून घेण्याचा अधिकार त्या मंडळास असावा.

**कार्यकारी मंडळाचे सभासदः**—डॉ. वामन बाजी रुईकर, रा. विष्णु कृष्ण राशिंगकर, रामचंद्र नारायण पंगु, बळवंत सखाराम मुळे,

प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर, रा. दत्तो सखाराम सोनटक्के, डॉ. दामोदर काशिनाथ काळे, रा. रामचंद्र मोरेश्वर आपटे, रामचंद्र नारायण गोखले माधव गोविंद देवल, लक्ष्मण सदाशिव दिगवडेकर, त्र्यंबक बळवंत दातार, भिकाजी लक्ष्मण लिमये, डॉ. आत्माराम गोपाळ परांडेकर, डॉ. अनंत कृष्ण गुणे, रा. श्रीपाद यशवंत अभ्यंकर व सदाशिव खंडो अळतेकर. ( हे सर्व कोल्हापूरचे प्रतिनिधि होते. ) शिरोळचे प्रतिनिधिः— रा. राघवेंद्रराव दत्तवाडकर व दत्तात्रय धोंडदेव गोखले. अळतेः— रा.अंताजीपंत यळगुडकर आणि रामचंद्र घनःशाम देशपांडे. पन्हाळाः— रा.सीताराम बळवंत गोलिवडेकर. रायबागः—रा. आदिराज देवेंद्र उपाध्ये. कागलः—रा. कृष्णाजी दादाजी कुलकर्णी. गडहिंग्लज, भुदरगड वगैरे भागांचे प्रतिनिधि मागाहून घेण्याचा अधिकार वरील मंडळीस आहे. करवीर लोकसभेच्या या कार्यकारी मंडळानें तूर्त रिव्हिजन सर्व्हें, लँड कॉंपेन्सेशन, डुकरांचा पिकांना होणारा उपद्रव व टोलनाकीं वगैरे संबंधीं सविस्तर व विश्वसनीय माहिती मिळवून सरकारला कळवावी व पुढील वर्षाच्या बैठकीपर्यंत दरम्यानच्या काळांत लोकमत जागें करून करवीर लोकसभेच्या कार्याची सर्वांस माहिती करून द्यावी. छत्रपति सरकारला अर्जद्वारें अगर समक्ष भेटून प्रजाजनांची दाद लावणें व पेट्यानिहाय आणि पोट संस्थानांत करवीर लोकसभेची एक एक शाखा स्थापून, पुढील सालची सभा कोठें नि केव्हां भरवावी वगैरे कामें करावीं.

कोल्हापूर लोकप्रतिनिधि सभेच्या पहिल्या बैठकीचा समारोप करतांना सन्मान्य अध्यक्ष, डॉ. रुईकर म्हणाले, "आज आपण सर्वांनीं एका महत्कृत्यास आरंभ केला आहे. आज नुसतें बीं पेरलें आहे. त्यास दरवर्षी पाणी घालून वाढविण्याचें आपलें सर्वांचें कर्तव्य आहे. त्या कर्तव्याला स्मरून आपण या प्रतिनिधिसभेच्या अभिवृद्धीविषयीं सदोदित प्रयत्न कराल अशी मला पूर्ण उमेद आहे. ही प्रतिनिधिसभा राजा आणि प्रजा ह्या उभयतांनाहि सुखकर करण्याचें सर्वस्वी आपल्या कर्तब-

गारीवर आहे. श्री. शाहू छत्रपति महाराज यांच्या गादीविषयीं पूर्ण राजनिष्ठा व गरीब रयतेविषयीं पूर्ण कळकळ मनांत बाळगून आपण सर्व मनापासून प्रयत्न करूं या, म्हणजे आमच्या प्रयत्नांस यश देणारा जगन्नियंता समर्थ आहे."

## पस्तीस वर्षांपूर्वीं

येथील परिस्थिति ३३ वर्षांपूर्वीं राजकीयदृष्ट्या कशी होती याची यथार्थ कल्पना आजच्या करवीरस्थांस व्हावी म्हणून त्या परिस्थितीवर सत्याचा प्रकाश पाडणारीं जीं अनेक उद्‌बोधक भाषणें पहिल्या प्रतिनिधि-सभेच्या अधिवेशनांत दरबारी अधिकाऱ्यांच्या ( रा. अण्णा बाबाजी लठ्ठे यांच्यासारख्या ) देखत झालीं, त्यांपैकीं कांहीं निवडक भाषणांचा सारांश पुढें देत आहें.

## प्रो. विजापूरकर यांचें भाषण

करवीर इलाख्यांतील बहुजनसमाजाला सरकारनें शिक्षण देण्याचें कर्तव्य करावें म्हणून लोकप्रतिनिधि सभेंत ठराव मांडतांना कै. प्रो. विष्णु गोविंद ऊर्फ अण्णासाहेब विजापूरकर म्हणाले, " लोकशिक्षण हा फार महत्त्वाचा विषय आहे. सर्व प्रकारच्या राजकीय चळवळी कोणीहि जनतेच्या खऱ्या कल्याणासाठीं व उद्धारासाठीं सुरू केल्या असल्या, तरीहि त्या, पुढाऱ्यांनीं आपमतलबानें केलेल्या आहेत, त्यांत लोकांचा संबंध नाहीं असें सरकार आणि त्यांचे पाठीराखे म्हणत असतात ! याचें कारण लोकांना आपल्या गाऱ्हाण्यांची तक्रार बोलून वा लिहून दाखवितां येत नाहीं. म्हणून सरकार व चळवळे लोक या सर्वांच्या हितार्थ बहुजनसमाजाला शक्य तितक्या लवकर शिक्षण देऊन बोलकें करणें हें सरकारचें पहिलें कर्तव्य आहे. इंग्रज सरकारचा पुष्कळ पैसा देशाच्या लष्करी बंदोबस्तावर खर्च होतो. ती जबाबदारी आमच्या छत्रपतींवर नाहीं. म्हणून त्यांनीं संस्थानांतील गरीब रयतेस शिक्षण देऊन शहाणे करण्याकडे लक्ष देणें जरूर आहे. शाहूमहाराजांची कारकीर्द सुरू

होण्यापूर्वी रात्रींच्या शाळा पुष्कळ होत्या. दिवसभर कामांत खपून रात्रीं तास दोन तास शिक्षण मोफत घेण्याची सोय संस्थानांत ठायीं ठायीं केलेली होती. ही सोय करतांना फार कडक नियम केले, तर सामान्य लोक भिऊन जातात. मोफत शिक्षणाची म्हणजे लिहिणें, वाचणें व साधे हिशेब करणें, एवढें अवश्यक ज्ञान देण्याची केलेली सोय आतां नाहींशी केली हें वाईट झालें. तसल्या मोफत शिक्षणाच्या शाळा पुनः निघाल्या पाहिजेत. प्रौढ मनुष्याला एका महिन्यांत हें ज्ञान देतां येईल व घेतां येईल. इतकी सोपी गोष्ट सरकारनीं करण्याची हयगय करणें अगदीं अनुचित आहे. पंचवीस वर्षांखालील सर्व संस्थानी नोकरांनीं वाचावयास व सहीपुरतें तरी लिहावयास शिकलें पाहिजे व त्यासाठीं त्या सर्वांनीं रात्रींच्या मोफत शाळांतून साक्षरतेचें शिक्षण घेतलें पाहिजे; असा एक सक्तीचा नियम महाराजांनीं कृपाळुपणें करावा अशी मीं सरकाराकडे चार वर्षांपूर्वीं मागणी केली होती; पण ती मान्य झाली नाहीं ! आतां सरकारनें निदान पूर्वींच्या बंद केलेल्या रात्रीच्या मोफत शिक्षणाच्या शाळा तरी फिरून चालूं कराव्या व गरीब कामकऱ्यांची सोय करावी."

## तेजस्वी महाराष्ट्रीय शिक्षणाची आवश्यकता

वरील सूचनेस पुष्टि देतांना रा. अप्पाजी विष्णु कुलकर्णी ( रुई ) हे म्हणाले, "खेड्यांपाड्यांतून लिहितां वाचतां न येणारे लोकच जास्त असल्यामुळें खोट्या साक्षीचे, बनावट दस्तऐवजाचे वगैरे गुन्हे वरचेवर चढतात. म्हणून प्राथमिक शिक्षणाचा प्रसार सार्वत्रिक करा, असें आपण सरकारला सांगितलें पाहिजे. बडोद्याप्रमाणें इकडे प्राथमिक शिक्षण सक्तीचें झालें पाहिजे. दिवसा उद्योगधंद्यांत गुंतलेल्या लोकांकरतां रात्रींच्या शाळा काढणें जरूर आहे. लिहिण्यावाचण्याबरोबर औद्योगिक शिक्षण देण्याचीहि सोय झाली पाहिजे. सध्यां लोकांना येथें बाहेर उद्योगधंद्यांचें शिक्षण मिळत नसलें तरी संस्थानीं मुख्य तुरुंगांत मिळतें ! विणकामा-

सारखें काम तुरुंगांत चांगलें शिकवितात. त्यामुळें मोठी शिक्षा झालेला इसम तुरुंगाबाहेर आल्यावर त्या धंद्यांत प्रवीण झालेला आढळतो. म्हणून कित्येकांस तुरुंगांत जाणेंच श्रेयस्कर वाटल्यास आश्चर्य नाहीं ! वास्तविक लोकशिक्षणाचे कामीं आमच्या संस्थानिकांनीं ब्रिटिश सरकारासहि कित्ता घालून द्यावा असा त्यांचा अधिकार आणि सत्ता आहे व त्यांना विशेष अनकूलताही आहे. पण दुर्दैवानें वस्तुस्थिति मात्र उलटी आहे ! संस्थानांतील प्रजेच्या शरीराची, मनाची व बुद्धीची वाढ सारखी खुंटत चालली आहे ! जन्मभूमीचा व धर्माचा अभिमान उत्पन्न करील अशा प्रकारचें तेजस्वी महाराष्ट्रीय शिक्षण देण्याची व्यवस्था सरकारनीं केली पाहिजे. हें पूर्णपणें करणें सरकारला अशक्य झाल्यास, राष्ट्रीय शिक्षणाच्या खासगी शाळांना उदारपणें मदत देणें, हें सरकारचें कर्तव्य आहे.”

## दरबारवर दावा लावण्याचा हक्क

छत्रपति सरकारच्या बेकायदेशीर अंमलबजावणीमुळें आजपर्यंत हजारों प्रजाजनांची अगदीं धूळधाण उडून गेलेली आहे हें सर्वविश्रुत आहेच ! ब्रिटिश राज्यांत मुळींच अन्याय होत नाहींत असें नाहीं; पण तिकडे अगदीं गरिबांतल्या गरीब रयतेलाहि ब्रिटिश सरकारच्या विशिष्ट प्रतिनिधि-अधिकाऱ्यावर दावा लावून अन्याय दूर करून घेण्याचा मार्ग न्यायी इंग्रजांनीं मोकळा ठेवलेला आहे. उलट हिंदुपदपादशाहीचा बडा किताब धारण करणाऱ्या छत्रपती महाराजांच्या करवीर इलाख्यांत ब्रिटिश सरकारसारखा प्रजेच्या हक्काविषयीं आदर अझूनहि दाखविला जात नाहीं, हीं अत्यंत लाजिरवाणी गोष्ट नाहीं काय ? याबद्दलच्या ठरावांवर बोलतांना, रायबागचे रा. आदिराज देवेंद्र उपाध्ये म्हणाले, “सरकारवर दावा लावण्याबद्दल जे नियम खालसांतील कायद्यांत नमूद आहेत ते पाहिले असतां प्रस्तुत ठरावाचें महत्त्व लक्षांत येईल. खालसा मुलखांत जो कायदा पास होतो तो मोठमोठ्या विद्वानांनीं योग्य वाटाघाट केल्यावरच होतो हें आपणांस ठाऊक आहे. सरकारवर दावा लाऊन आपल्यावरील अन्याय दूर करून

घेण्यांचा हक्क ब्रिटिश प्रजाजनांस फार वर्षांपासून प्राप्त झालेला आहे. सन १८२७ त बॉंबे कोड ऑफ रेग्युलेशन्स पास होऊन सिव्हिल, रेव्हेन्यु व क्रिमिनल कामें चालविण्याबद्दल, कायदेशीर व्यवस्था झाली. सन १८२७ चा ॲक्ट ४ हा दिवाणी कोर्टासंबंधीं आहे. त्यांत सरकारवर दावे करण्यासंबंधीं नियम दिले आहेत. तसेंच सन १८२७ ॲक्ट १७ हा जमीनमहसुलाचा कायदा असून त्यांत कलम ९-१२, मध्यें कलेक्टरवर दावा करण्याचा रयतांना अधिकार दिलेला आहे. त्यानंतर जे कायदे ब्रिटिश हिंदुस्थानांत जारी केले गेले त्यांतहि याबद्दल व्यवस्था केलेली आहे म्हणून अधिक सांगणें नको. सरकार म्हणजे सार्वजनिक हितार्थ कारभार करणारी संस्था. आपलें काम करतांना ती संस्था कांहीं गोष्टी एखाद्या व्यक्तीस अपायकारक अशा करील, तर त्या अन्यायाविरुद्ध न्यायमंदिरांत जाऊन दाद मागण्यास त्या व्यक्तीस मार्ग मोकळा ठेवला पाहिजे; पण दुर्दैवानें आमच्या कोल्हापूर इलाख्यांत अशी दाद मागण्याचा रयतेला हक्कच ठेवलेला नाहीं! दिवाणी कोर्टांत व रेव्हेन्यू कोर्टांत ज्या ज्या वेळीं अशा प्रकारच्या बाबतींत छत्रपतिमहाराजांच्या दरबारविरुद्ध दावा लावण्याचे प्रसंग उत्पन्न झाले होते, त्या त्या वेळीं अधिकाऱ्यांनीं 'या संस्थानांत सरकारवर दावे लावतां येत नाहींत. कारण अशी वहिवाट करवीर इलाख्यांत नाहीं,' असेंच ठणठणीत नकाराचें उत्तर आपल्या ठरावांत दिलेलें आहे! ही पद्धत बेकायदेशीर असून, सरकार व प्रजा या दोघांनाहि अपायकारक आहे. छत्रपति सरकारनीं एखादी इनाम जमीन काढून घेऊन ती खाजगी शेरींत अगर सरकारी दौलतींत दाखल केली, तर ज्याची इनाम जमीन सुलतानी सत्तेकडून अपहार करण्यांत आली त्या बिचाऱ्यास दरबारावर दावा लावण्याचा मार्ग बंद केल्यामुळें मूग गिळून स्वस्थ बसणेंच भाग पडतें. इनामाची चोरी झाल्यावर, निदान जमिनीचें खातें तरी आपल्या नांवानें कायम ठेवावें, म्हणजे पुढेंमागें कायद्याचें राज्य संस्थानांत सुरू झाल्यास तें चोरीस

गेलेलें इनाम आपणांस नाहीं तर निदान आपल्या एखाद्या भाग्यवान् वंशजास परत मिळवितां येईल, अशी त्या दुर्दैवी इनामदारानें केविलवाणी भीक मागितली तरी ती उन्मत्तपणानें झिडकारली गेलेली आहे ! आमच्या या कोल्हापूर इलाख्यांत खासगीखातें व दौलतखातें हीं दोन खातीं मुख्य आहेत. खासगी खात्यासंबंधीं सरकारचे हक्क काय आहेत आणि दौलतीसंबंधीं कोणते हक्क आहेत, त्यांची कांहीं फोड करण्यांत आलेली नाहीं ! या दोन्हींपैकीं कोणत्याहि निमित्तानें सरकारनीं रयतेची जमीन लुबाडली,तरी त्या चोरीची दाद लागत नाहीं व त्याबद्दल फिर्यादहि चालत नाहीं !! पुष्कळ जमिनी रयतेकडे फार प्राचीन काळापासून चालत आल्या असल्या, तरी " सदरहू जमिनी सरकारी शेरींपैकीं आहेत, सबब हुजुरून काढून घेणेंत आल्या आहेत ! " या संस्थानी दरोड्याविरुद्ध रयतेला दाद ना फिर्याद होऊन, तोंडांतून एक ब्रहि काढतां येत नाहीं !

"आम्ही मागत असलेल्या कायद्यानें सरकारचाहि फायदा आहे. कारण अशीं बरींच उदाहरणें घडतात कीं, कोणी मनुष्य बेवारस मेला म्हणजे तिसराच इसम मिळकतीच्या लोभानें ठराविक सरकारी नोकरांस ठराविक साधनांनीं वश करून घेऊन वारसा सर्टिफिकेट मिळवितो व त्याच्या आधारें सरकारला मिळावयाची असलेली मोठी वा लहान इस्टेट आपण खुशाल पटकावतो ! हीं कामें एकतर्फी चालतात म्हणून असें होतें; परंतु जर छत्रपतिसरकारनीं विरुद्ध पक्षकार म्हणून हजर होऊन काम चालविलें, तर ही लबाडी उघडकीस येईल व सरकारच्या हक्कास बाध न येतां उलट पुष्कळ फायदा होईल. तसेंच कित्येकदां दोन खोटे वारस उठून मयताच्या मिळकतीवर हक्क सांगूं लागले म्हणजे, त्यांना मुलकींतून दिवाणींत जाण्यास हुकूम होतो. मग त्या दोघांनीं संगनमत करून आपल्यापैकीं एकाला वारसदार ठरविणारा हुकूमनामा मिळविला, तर त्यामुळें सरकारचें मोठेंच नुकसान होतें. अशा प्रसंगीं दरबारनें दावा लावून अगर प्रतिवादी म्हणून काम चालवून आपला हक्क सिद्ध करून

घेणें इष्ट व आवश्यकच आहे. या बाबतींत सांगलीसारख्या कोल्हापूर शेजारच्या संस्थानचें उदाहरण करवीर दरबारनें घेण्यासारखें आहे. म्हैसूरमध्येंहि खालसाप्रमाणेंच कायदा आणि वहिवाट चालू आहे.”

## कोल्हापूर म्युनिसिपालिटी व दरबार.

कै. शाहूछत्रपतींनीं मुखत्यारीचे वेळीं दिलेल्या वचनाचा भंग करून, अत्यंत अन्यायानें कोल्हापूर म्युनिसिपालिटीचा कारभार लोकप्रतिनिधींच्या हातून काढून घेऊन, आपल्या एका दरबारी इसमाकडे दिला ! असल्या सुलतानी कृत्याचा नेमस्त निषेध करतांना, कै. रामचंद्र मोरेश्वर आपटे वकील म्हणाले, “छत्रपति सरकारला नागरिकांचे नैसर्गिक हक्क कोणत्याहि कारणानें काढून घेतां येणार नाहींत. मुलांनीं आपल्या पायावर उभें रहावें हीं जशी आईबापांची स्वाभाविक इच्छा असते, तशीच माबाप छत्रपति-सरकारचीही आपल्या प्रजेसंबंधीं असली पाहिजे. सार्वजानिक संस्था चाल-विण्याचे आमचे हक्क आजचे नसून पूर्वापारचे आहेत, हें ग्रामसंस्थेचा इतिहास स्वच्छ सांगतो. सन १८८९ सालीं कायदा करून म्युनिसिपालिटीचे हक्क सरकारनें येथील नागरिकांस दिले. त्यावेळीं सत्तावीस लोकांच्या हातीं या म्युनिसिपालिटी चा कारभार होता. श्री. शाहूमहाराजांनीं सन १८९४मध्यें असें जाहीर आश्वासन दिलें होतें कीं, ‘माझ्या अज्ञानपणांत जे हक्क तुम्हांस मिळालेले आहेत, ते मी कमी न करतां तसेच यापुढें चालवीन.’’पण सन १९०४ मध्यें, राज्यारोहणप्रसंगीं दिलेल्या आपल्या पवित्र वचनाचा भंग करून, छत्रपतीसरकारनीं कोल्हापूर म्युनिसिपालिटी आपल्या ताब्यांत घेतली ! लोकप्रतिनिधींची चूक काय झाली ती न दाखवितां व लोकांचें म्हणणें मुळींच ऐकून न घेतां, राजधानींतल्या या स्थानिक स्वराज्य संस्थेच्या स्वातंत्र्यावर शाहू महाराजांनीं एकदम कुऱ्हाड घातली !! सन १९०१ सालीं निवडलेले कोल्हापूरचे सत्तावीस नगरापिते खरोखरी चुकले होते असें जरी वादाकरितां गृहीत धरलें, तरी बाकीचे ६०,००० करवीरस्थ नागरिक नालायख ठरले नव्हते ना ? मग ‘चुकलेल्या’ २७ सभा-

सदांना हाकून देऊन त्यांच्या जागीं 'शहाण्या' अशा दुसऱ्या २७ सभासदांना निवडून देण्यास लोकांना कां सांगितलें नाहीं ? छत्रपति महाराजांना वचनभंगाचें पाप न करतां व राजधानींतल्या स्थानिक स्वराज्याचा निर्दयपणें खून न पाडतां, आपल्या मनासारखी सुधारणा येथील म्यु. कारभारांत करतां आली असती; परंतु शाहू महाराजांच्या वद-सल्लागारांनीं त्यांना अयोग्य सल्ला दिल्यामुळें वरील सुलतानी दडप-शाहीचा हुकूम सोडण्यांत आला. छत्रपतींनीं लोकांच्या हातून म्युनिसि-पल कारभार हिसकावून घेतला व आपल्या एका अधिकाऱ्याकडे दिला खरा; पण त्यामुळें या संस्थेची स्थिति सुधारली काय ? मुळींच नाहीं. कोल्हापूर म्युनिसिपालिटी सत्वर नागरिकांच्या हातीं सोंपवून झालेला अन्याय दूर करावा असें आमचें मागणें आहे." या ठरावास अनुमोदन देतांना, रा. रामचंद्र नारायण गोखले म्हणाले, "म्युनिसिपालिटीची स्थापना होऊन तिचा कारभार राजनियुक्त नागरिकांकडून सन १९०४ पर्यंत अगदीं सुव्यवस्थित व बिनबोभाट चालला असतां, लोकांचे अधिकार काढून घेण्यास काय कारण झालें तें समजूं न देतां व लोकांचें म्हणणें मुळींच ऐकून न घेतां, शाहू छत्रपतींनीं आकस्मिकपणें नागरिकांच्या हक्कांवर जो हल्ला केला, त्याला काय म्हणावें ? म्युनिसिपालिटीचें काम सुव्यवस्थित नि बिनबोभाट चाललें होतें असें मीच म्हणतों असें नाहीं, तर वेळोवेळीं म्युनिसिपालिटीचें काम तपासून करवीर दरबारनेंच 'म्युनिसिपालिटीचें काम समाधानकारक व सुव्यवस्थित होत आहे.' अशीं शिफारसपत्रें दिलेलीं आहेत ! म्हणून खालसाप्रमाणें येथेंहि लवकरच स्थानिक स्वराज्याचे सर्व अधिकार आपणांस छत्र-पति सरकारकडून मिळतील, अशी आशा बाळगून, लोक वाट पहात बसले असतां, नवीन हक्क देण्याऐवजीं छत्रपतिमहाराजांनीं लोकांना पूर्वीं प्राप्त झालेले हक्कच हिरावून घेतले ही अत्यंत खेदाची गोष्ट होय."

रुईचे रा. कृष्णाजी दादाजी कुलकर्णी हे करवीर इलाख्यांतील राजनिष्ठ प्रजेच्या अडचणी सभेपुढें मांडतांना कळवळून म्हणाले,

## खरी राजनिष्ठा कोणची ?

" करवीर राज्यांतील लोकांचीं हजारों गाऱ्हाणीं बेदाद पडून राहिलीं आहेत, म्हणूनच या लोकसभेचा जन्म झाला आहे. ज्याच्या पोटांत दुखतें तोच ओवा खातो ! आम्हांस अडचणी उत्पन्न झाल्या आहेत व त्या असह्य झाल्या आहेत; म्हणूनच एके ठिकाणीं जमून आज आपण त्यांचा विचार करण्यास प्रवृत्त झालों आहों. आम्ही कांहीं चोरांप्रमाणें एकांतांत वसून कुजबुजत नाहीं, किंवा दरवडेखोरांप्रमाणें अन्यायानें कोणांवर कोठें अवचित घालाहि घालीत नाहीं ! सगळे लोक उघडपणें, खुल्या मनानें, कायदेशीरपणें, सूर्यासमक्ष, सत्यास व ईश्वरास स्मरून, राजरोस विचार करीत आहेत. खरी राजनिष्ठा हीच आहे. जो मनुष्य मनांत एक ठेवून भलतेंच बोलतो, व पोटांत स्वार्थ ठेवून तोंडानें मात्र ' हां जी, जी हुजूर ' म्हणून मानभावीपणानें राजाची प्रीति संपादतो तो खरा राजनिष्ठ प्रजाजन अगर राजसेवक नव्हे. असली ढोंगी, पोटार्थी ' राजनिष्ठा ' आमच्या जवळ नाहीं, म्हणून जर कोणी दोष देत असेल तर तो आपल्या पदरांत घेण्यास मी तयार आहें. मला आंधळ्या, प्रजाद्रोही राजनिष्ठेची फार चीड आहे ! आमची राजनिष्ठा उजळमाथ्याची, डोळस व स्वाभिमानी पाहिजे. राज्यकारभारांत प्रजेनें राजास हातभार लावून त्याचा बोजा हलका करणें व आपलें हें कर्तव्य जाणून राजाकडे आपले हक्क मागणें, हीच खरी राजनिष्ठा होय. ब्रॅडलासाहेबांनीं पांचव्या राष्ट्रीय सभेच्या वेळीं एका भाषणांत म्हटलें आहे कीं " Real loyalty means that the claim of right is made with the consciousness of duty" बड्या इंग्रज मुत्सद्यानें केलेली ही राजनिष्ठेची खरी व्याख्या ध्यानीं ठेवा व छत्रपतींपुढें आपल्या अडचणी मांडून निर्भीडपणें राज्यव्यवस्थेंतील दोष दाखवा व राज्यकारभाराचा बोजा हळूं हळूं आपल्या शिरावर घेण्यास तयार व्हा. "

कोल्हापूर लोकप्रातिनिधि सभा भरण्यापूर्वीं व भरल्यानंतर तिचे स्वागताध्यक्ष रा. विष्णु कृष्ण राशिंगकर, अध्यक्ष डॉ. वामन बाजी रुईकर आणि चिटणीस रा. सदाशिव खंडो अळतेकर या सन्मान्य नागरिकांनीं छत्रपतिमहाराजांना अत्यंत नम्रपणानें विनंति करून दरबारनें लोकप्रातिनिधि सभेशीं सहकार्य करण्याची कृपा करावी असें कळविलें होतें; परंतु त्या कळकळीच्या नम्र विनंतीस कै. शाहू महाराजांनीं आपले सल्लागार अधिकारी मे. आर. व्ही. सबनीस दिवाण, मे. खंडेराव ऊर्फ बाळासाहेब गायकवाड हुजूर चिटणीस, मे. भास्कर विठोजी जाधव व रा. अण्णा बाबाजी लठ्ठे इत्यादींच्या सल्ल्यानें जें उद्दाम आणि बेपर्वाईचें उत्तर दिलें तें पाहिलें म्हणजे त्यांना साधी माणुसकीहि देवानें दिलेली नव्हती काय, असा प्रश्न कोणाहि सरळ मनाच्या मनुष्यापुढें उभा राहिल्यावांचून रहात नाहीं. करवीर दरबारनें लोकसभेच्या अध्यक्षांना, लोकसभा सरकारास मान्य नाहीं व या बाबतींत कोणताही पत्रव्यवहार केला जाऊं नये अशी समज दिली आणि दिवाण सबनीस यांनीं एक जाहीरनामा काढून या लोकसभेशीं कोणाहि नोकरानें संबंध ठेवू नये व या लोकसभेच्या नादीं लागून रयतेनें आपला वेळ फुकट घालवूं नये असें गॅझेटद्वारें जाहीर केलें. करवीर दरबार आणि लोकप्रातिनिधि सभेचे अधिकारी यांच्यामध्यें झालेला पत्रव्यवहार येथें खालीं दिला आहे. तो पाहून वाचकांना वरील विधानाची सत्यता पटेल अशी खात्री वाटते.

## स्वागताध्यक्षांचें दरबारास पत्र.

‘ करवीर संस्थानांतील लोकसभेच्या स्वागतमंडळाचे अध्यक्ष यांची विज्ञप्ति अशी कीं, करवीर इलाख्यांतील निरनिराळ्या लोकांच्या सूचनेवरून करवीर इलाख्यांतील रयतेचीं सुखदुःखें सरकारपुढें सविनय मांडण्याकरितां व रयतेच्या कल्याणाकरितां प्रसंगोपात उपाय सुचविण्याकरितां लोकसभा येत्या आश्विन शुद्ध पौर्णिमेस ता. २।१०।१९०६ रोजीं करवीर येथें भरविण्याचें योजिलें आहे. या सभेस सरकारस्वारीची सहानुभूति

असून शक्य ती मदत व्हावी अशी सविनय प्रार्थना आहे. त्याप्रमाणें करवीर दरबारचे सर्व कौन्सिलर व इतर मुख्य मुख्य अम्मलदार आणि नोकरलोक यांना सन्मान्य प्रेक्षक या नात्यानें लोकसभेस येण्याबद्दल स्वागतकमिटीकडून अलाहिदा आमंत्रणपत्रिका पाठविण्यांत येत आहेत. त्यांस सभेस हजर राहण्यास हरकत नसल्याबद्दल सरकाराकडून लिहून जावें अशी प्रार्थना आहे.

कोल्हापूर, ता. २७।९।१९०६.

## हुजूर चिटणीसांचें उत्तर.

मु. जा. ५२०.

तुमचा ता. २७।९।०६ चा अर्ज इकडे आला. त्यावरून तुम्ही ज्या सभेबद्दल सहानुभूति असावी असें लिहिलें आहे ती सभा कोणाची आहे, आपण ज्या स्वागत कमेटीचे अध्यक्ष असें म्हणतां त्या सभेचे ठराव काय झाले आहेत, वगैरे कोणत्याहि गोष्टीबद्दल इकडे दखलगिरी नसल्यामुळें तुमच्या अर्जाबद्दल विचार करण्यास कांहीं मार्ग नाहीं. कळावें.

ता. १ आक्टोबर १९०६.

हुजूर आज्ञेवरून,
**खंडेराव गाइकवाड,**
हुजूर चिटणीस.

कोल्हापूर लोकप्रतिनिधि सभेचें पहिलें अधिवेशन यशस्वीपणें पार पडल्यावर, लोकसभेचे सन्मान्य करवीरस्थ, अध्यक्ष डॉ. वा. बा. रुईकर व चिटणीस श्री. स. खं. अळतेकर वकील, यांनीं छत्रपतिमहाराजांकडे सभेचे ठराव सादर करतांना पुढील पत्र लिहिलें होतें.

## महाराजांना सेक्रेटरींचें व अध्यक्षांचें पत्र.

कोल्हापूर लोकसभेची बैठक ता. २ ऑक्टोबर १९०६ इसवी रोजीं शाहूपुरींत भरली होती. त्यावेळीं सर्वानुमतें पास झालेले ठराव हुजूर

सरकारकडे पाठविण्याची तजवीज अध्यक्ष नि सेक्रेटरी यांनीं करावी असें ठरलें होतें. त्यास अनुसरून पाठवीत आहे. ता. १०–१०–१९०६.

## हुजूर चिटणीसांस पत्र

ता. २ ऑक्टोबर रोजीं शाहूपुरींत कोल्हापूर लोकसभेची पहिली बैठक भरण्यांत आली होती. त्यावेळीं जमलेल्या प्रतिनिधींकडून सर्वानुमतें पास झालेले ठराव श्रीमन्महाराज शाहू छत्रपतिसाहेब सरकार करवीर यांच्याकडे पाठविण्याची तजवीज लोकसभेचे अध्यक्ष व सेक्रेटरीमार्फत व्हावी, असा शेवटचा ठराव सर्वानुमतें पास झाला होता. त्यास अनुसरून सोबत लोकसभेंत पास झालेले ठराव श्रीमन्महाराज शाहू छत्रपतिसाहेब सरकार करवीर यांचेपुढें ठेवण्याकरितां पाठविले आहेत. ते हुजूर स्वारीकडे पाठविण्याची मेहेरबानीनें आपणांकडून तजवीज व्हावी अशी विनंति आहे.

ता. १० माहे ऑक्टोबर सन १९०६ इसवी.

सदाशिव खंडो अळतेकर,
सेक्रेटरी.

वामन बाजी रुईकर,
अध्यक्ष.

From Huzur Chitnis, Kolhapur.

To Mr. Vaman Baji Ruikar,

Sir,

Your vernacular yadi dated 10th October 1906, signed as President of Lokasabha, was placed before His Highness the Maharajasaheb and I am directed to inform you that the Durbar does not recognise your so called assembly and that any further communication in the matter from you will receive no attention.

J. O. 168.

I have the honour to be,
Sir,
Your obedient servant,
K. GAIKWAD,
*Huzur Chitnis.*

करवीर सरकारचें गॅझेट, ता. १३ ऑक्टोबर १९०६ जाहीरनामा नं. ८. जनरल खातें– "कोल्हापूर येथें तारीख २ माहे ऑक्टोबर सन १९०६ इसवी रोजीं लोकसभा या नांवाची कांहीं मंडळी मिळून त्यांनीं त्या सभेचे ठराव पास झाल्याबद्दल यादी पाठविली आहे. पूर्वी अशाच प्रकारची एक 'रयत एजन्सी' स्थापन झाली होती व त्याबद्दल 'करवीर सरकारचें ग्याझीट' भाग १ ला, पृष्ठ १८१ तारीख ८ माहे ऑक्टोबर सन १८९२ याजवर वट नं. १५ ता. २४ माहे सप्टेंबर सन १८९२ चा हुकूम प्रसिद्ध झाला आहे. त्याचप्रमाणें हीही सभा असल्यानें या सभेच्या मार्फत कोणत्याही अम्मलदाराकडे अर्ज आल्यास त्यांनीं त्याबद्दल दखलगिरी घेण्याची नाहीं व त्यांनीं अगर कोणत्याही सरकारी नोकरलोकांनीं स्वतः प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष रीतीनें आपला संबंध बिलकूल ठेवण्याचा नाहीं. अशा बाबतींत रयत लोकांचा गैरसमज होऊन, कदाचित् त्यांचा वेळ, द्रव्य व मेहनत फुकट जाण्याचा संभव आहे. सबब ह्या हुकुमाची नीट समज सर्व गांवच्या रयत वगैरे लोकांस द्यावी, गॅझीटांत प्रसिद्धि न व्हावी व याचा दाखला इलाखा मजकूरचे सर्व जहागिरदार यांजकडे देण्यांत यावा, म्हणून हुजूर सरकारचा ठराव नं. ३१४, मु.जा. नं. ६०५, तारीख १२ माहे ऑक्टोबर सन १९०६ इसवीचे आज्ञेंत आलें आहे. त्याप्रमाणें तजवीज व्हावी.

R. V. SABNIS,
दिवाण सरकार करवीर.

## लोकसेवेबद्दल भयंकर सूड !

तेहतीस वर्षांपूर्वी महाराष्ट्रांतील मागासलेल्या वर्गांचे उद्धारक कै. शाहू छत्रपति महाराज आपल्या कर्तबगारीनें मिळालेल्या विजयाच्या शिखरावर आरूढ झालेले असतां, कोल्हापुरांत दरबारच्या सहकार्यानें सर्व जातीधर्मांच्या प्रजाप्रतिनिधींची पहिली लोकसभा स्थापन करण्याचा प्रामाणिक प्रयत्न कांहीं उत्साही करवीरस्थांनीं अत्यंत राजनिष्ठापूर्वक केला असतां,

कै. शाहू महाराज व त्यांचे ब्राह्मणेतर विद्वान सल्लागार यांनीं केवढ्या तिरस्कारानें त्यांची हेटाळणी केली व त्यांच्या संस्थेवर बहिष्कार पुकारला हें वरील पत्रव्यवहार स्पष्ट करून सर्वांस दाखवीत आहे; पण तेवढ्या तिरस्कारपूर्ण बहिष्कारावरच करवीर दरबार थांबलें नाहीं. लोकसभा भरविण्याचे कामीं ज्यांनीं ज्यांनीं पुढाकार घेतला त्या सर्व लोकसेवकांवर आणि त्यांच्या कुटुंबियांवर आणि जातभाईवर कै. शाहूमहाराजांनीं जो सूड घेतला, त्याला महाराष्ट्रीय संस्थानांच्या प्राचीन वा अर्वाचीन इतिहासांत तोड सांपडेल असें वाटत नाहीं !

## सन १९०८ ते १९०९

सन १९०८ व १९०९ या दोन वर्षांत कोल्हापुरामध्यें आकस्मिकपणें जें 'राजद्रोहाचें व बाँबप्रकरणाचें पीक' आल्याचा बोभाटा शाहूछत्रपति व त्यांचे हस्तक यांनीं अँग्लो-इंडियन पत्रांच्या मदतीनें विलायतेंत उघडपणें केला व त्या निमित्तानें आपल्या राजनिष्ठेचें फायदेशीर प्रदर्शन करून, कोल्हापूर संस्थानांतील सनदशीर राजकीय चळवळ चालविणाऱ्या व निरुपद्रवी असें सात्विक वृत्तीचें शिक्षणाचें किंवा उद्योगधंद्यांचें उत्तेजनार्ह कार्य करणाऱ्या भल्या भल्या नागरिकांवर राजद्रोहाचे आणि अत्त्याचारप्रवर्तनाचे खटले भरले, व त्यांना दीर्घ मुदतीच्या सक्तमजुरीच्या कठोर शिक्षा देववून त्यांना जगांतून उठविण्याची शिकस्त केली; ज्यांच्यावर मनाजोगती सूडबुद्धीची निष्ठुर शिक्षा ठोठावण्यासारखा पुरावा मिळूं शकला नाहीं, त्या सन्मान्य, निरपराधी नागरिकांना उघड वा गुप्त फर्मानांनीं करवीर इलाख्याबाहेर हद्दपार करून टाकण्यांत आलें ! यावेळीं 'विश्ववृत्त' मासिकावर राजद्रोहाचा खटला भरून त्याचे मुद्रक व संपादक रा. विनायक नारायण जोशीराव, प्रो. वामन मल्हार जोशी व प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर यांना जबर शिक्षा दिल्या. या धावपळींत 'पुरुषार्था'चे संपादक पं. सातवळेकर यांजवरही खटला भरला होता; पण त्यांतून ते दोषमुक्त झाले व कोल्हापुरी तडाक्यांतून निसटले.

रा. कृष्णाजी दादाजी कुलकर्णी रुईकर व रा. गणेश बाळाजी मोडक यांजवर बाँबचे खटले भरून त्यांना जबर शिक्षा ठोठावल्या. त्याचप्रमाणें शेणोलीकर, अंत्रणकर वगैरे विद्यार्थ्यांवरही स्फोटक द्रव्यांच्या चोरीचे खटले भरून त्यांस शिक्षा दिल्या. याच वेळीं कोल्हापूर दरबारनें ' प्रेस ॲक्टा'स जन्म दिल्यानें ' समर्थ ' छापखाना पुण्यास न्यावा लागला.व त्यामुळें समर्थ पत्र बंद पडलें. या जुलमी कायद्यामुळें ' विद्याविलास ' पत्र बंद ठेवावें लागलें. रा. बंडूनाना अभ्यंकर, रा. सदाशिव खंडो अळतेकर व रा. रामचंद्र नारायण गोखले या त्रिवर्ग वकिलांना कोल्हापूर सोडावें लागलें. त्याचप्रमाणें गोखले, नागपूरकर व गद्रे या विद्यार्थ्यांना कोल्हापुरास मुकावें लागलें. अत्यंत उद्वेगाची गोष्ट ही कीं, इंग्रजासारख्या परकीयांच्या सत्तेचे अत्यंत अभिमानी मराठा मांडलिक म्हणून मिरविणाऱ्या, स्वराज्यसंस्थापक शिवरायाचें स्वातंत्र्यप्रेम आणि स्वाभिमान व्यक्त करणाऱ्या, या करवीरराज्य संस्थापिका ताराबाईसाहेबांच्या वंशज छत्रपतींच्या कोल्हापुरांतील राजद्रोहाचा उगम त्यांच्या राजधानींतल्या ' शिवाजी क्लबांत ' आहे ! कारण सन १८९९ सालीं लोकमान्य टिळकांच्या स्फूर्तीनें स्थापन झालेल्या त्या क्लबांतील तरुण, पुण्यश्लोक शिवछत्रपतिमहाराज यांच्या स्फूर्तिदायक गुणांची नि विभूतींची पूजा टिळक संप्रदायाप्रमाणें मनोभावें करीत होते ! कै. शाहू महाराजांचे एका काळचे हस्तक व मर्जींतले अधिकारी, पुढें त्यांच्या रोषास पात्र झाल्यावर पकडवॉरंटाच्या भीतीनें कोल्हापुरांतून नाहींसे होऊन बेळगांवास वकिली करीत, 'ब्राह्मणेतर पुढारी ' झालेले, श्री. अण्णा बाबाजी लठ्ठे, हेच शाहू महाराजांच्या मृत्यूनंतर " थोड्याच दिवसांत अगदीं अनपेक्षित रीतीनें श्री. राजाराम महाराज व विशेषतः त्यांच्या मातोश्री आईसाहेब महाराज यांच्या आग्रहामुळें " शाहुरायाचे पगारी चरित्रकार बनले ! हा योगायोग मोठा विलक्षण वाटण्यासारखा आहे हें श्री. लठ्ठेहि कबूल करतात. अशा श्री. लठ्ठे वकिलांनीं आपल्या चरित्रनायकाच्या लीलांचें समर्थन करतांना जी वकिली लढविली आहे, ती आश्चर्यकारक वाटेल यांत शंका नाहीं. एका प्रसिद्ध जैन व्यापाऱ्याच्या

स्त्रीस पळविल्याचें प्रकरण राजोपाध्यांच्या जप्त उत्पन्नाप्रमाणेंच साऱ्या महाराष्ट्रांत गाजून हिंदुस्थान सरकारपर्यंत पोंचलें होतें म्हणतात; पण त्याचा निर्देशही सदर चरित्रकारांनीं इंग्रजी, मराठी शाहूचरित्रांत कोठेंच केलेला नाहीं ! त्याचें समर्थन करण्याकरितां चरित्रकार म्हणतात, " शाहूमहाराजांचें चरित्र म्हणजे पुष्कळ अंशीं संस्थानच्या आणि महाराजांच्या खासगी कागदपत्रांच्या आधारानेंच लिहावयाचें हें उघड होतें. या कागदपत्रांपैकीं कांहीं भाग गुप्त स्वरूपाचा होता. कांहीं कागदपत्रांचा उपयोग करावा कीं नाहीं हें ठरविणें कठीण होतें ! " हे गुप्त स्वरूपाचे कागद ' केसरी ' पत्रानें उघडकीस आणलेल्या प्रकारचे किंवा त्यांहूनहि अधिक बदनामीकारक आणि लाजिरवाणें असल्यास आणखी शंभर वर्षें तरी ते प्रसिद्ध करण शाहूमहाराजांच्या अत्यंत निःस्पृह नि प्रामाणिक चरित्रकारालाहि शक्य होणार नाहीं, हें सर्व वाचकांना मान्य करावें लागेल. असो. इतक्या खबरदारीनें तयार केलेल्या चरित्रांतहि कोल्हापुरी राजद्रोह व अराजकता यांचा उगम १८९९ सालच्या शिवाजी उत्सव-चळवळींतच होता असें विधान आढळतें हें लक्षांत ठेवण्यासारखें नाहीं काय ? संस्थानी प्रजेंत विचारजागृति करणारे त्याकाळीं मुख्यतः ब्राह्मण जातीचे लोक होते व सुराज्य निर्मितीसाठीं छत्रपतींकडे अर्जविनंत्या करणारेहि ब्राह्मण पुढारीच होते म्हणून शाहुछत्रपतींना ते लोक आणि त्यांची सारी जात ' शत्रू ' भासावी हें त्यांच्यासारख्या सुलतानी संस्थानिकाला तरी अगदीं स्वाभाविक होतें. पण त्या ब्राह्मणांना व त्यांच्या जातीला ' राजद्रोही ' ठरवितांना आपण स्वतः कोण ठरत आहों याचा त्यांनीं व त्यांच्या सल्लागारांनीं अधिक अक्कलहुशारीनें विचार केला असता तर बरें झालें असतें, असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

## वतनदार कुलकर्ण्यांचा नाश

राजद्रोह आणि बाँबप्रकरणाच्या आगींत आपल्या सुलतानशाहीस शह देऊं पाहणाऱ्या सर्व राजकीय चळवळ्यांना होरपळून काढल्यानंतर,

शाहूमहाराजांची वांकडी नजर खेड्यापाड्यांतून गांवकामगारांचा जो वजनदार असा वतनदार कुलकर्ण्यांचा लहानसा वर्ग सुखानें राहिलेला होता, त्यावर फिरली व थोड्याच कालांत सर्वांना जबरदस्तीनें गांव-कामगारीचें सरकारी काम सोडावयास लावून त्यांचीं वंशपरंपरागत चालत जाणारीं वतनें नष्ट करून टाकण्यांत आलीं ! तेवढ्यानेंहि शाहूराज्याचें व त्यांच्या सल्लागारांचें समाधान झालें नाहीं व त्यांचें उरलेंसुरलेलें रयताव्याचें उत्पन्नहि लुबाडून घेण्यासाठीं त्यांनीं अत्यंत कुप्रसिद्ध असें ' वाजघस्त प्रकरण ' आणि ' पंधरापट नजराणा ' उकळण्याचें फर्मान सोडलें ! या बेकायदेशीर जुलमी संस्थानी शस्त्राचा उपयोग प्रथम बिचाऱ्या कुलकर्ण्या-सारख्या ' भटाबामणाविरुद्ध ' च केला गेला हें खरें; पण माणसाच्या रक्ताची चटक लागलेलें हिंस्र जनावर जसें मग मदांध होऊन आपपरभाव सोडतें आणि आपली रक्तपिपासा शमविण्यासाठीं दिसेल त्या प्राण्यावर झडप घालतें, तसें या ' वाजघस्त प्रकरणाचें ' झालें ! खुद्द छत्रपति, त्यांचे अधिकारी नि मर्जींतलीं माणसें एवढीं सोडून बाकी सर्व जातींच्या नि धर्मांच्या माणसांना या ' वाजघस्त प्रकरणानें ' प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें थोडाफार झटका दिल्याशिवाय सोडलेलें नाहीं असें म्हणतात.

## सत्यसमाजी तमाशे व गुंडगिरी

कै. जोतिबा फुलेकृत ' सत्यसमाज ' नामक ख्रिस्ती वळणाच्या हिंदुधर्म पंथाचीं मतें कोणास सर्वस्वीं मान्य असोत वा नसोत, पण निःपक्षपातीपणानें बोलावयाचें झाल्यास तीं मतें एकेश्वरी मताच्या सर्व विचारी माणसांना सहज पटणारीं व उपयुक्त दिसणारीं अशीं आहेत; पण त्याचा एक मोठा दोष हा आहे कीं, शेंकडों वर्षें चालत आलेल्या व सर्वसामान्य हिंदु माणसांच्या हाडींमाशीं खिळलेल्या सनातन धर्मपरंपरेच्या अगदीं उलट अशी त्यांची शिकवण असल्यानें, भाविक आणि श्रद्धाळू बहुजनसमाजाला तीं खरोखरीं मान्य होणें व पसंत पडणें जवळ जवळ अगदीं अशक्य असेंच आहे. हाच अनुभव कोल्हापुरी सत्यसमाजाच्या

पंचवीस तीस वर्षांतील जोरदार चळवळीनें सर्वांस आणून दिला आहे. कारण, कै. शाहूमहाराजांनीं संस्थानी सत्ता व पैसा यांचा भरपूर पाठिंबा देऊन, विसाव्या शतकाच्या प्रारंभीं सन १९०२ पासून सुरूं केलेल्या 'वेदोक्त' प्रकरणाच्या लढ्याबरोबरच, ब्राह्मणांचें धार्मिक नि सामाजिक श्रेष्ठत्त्व नष्ट करण्यासाठीं 'सत्यसमाजी चळवळ' खुद्द कोल्हापूर शहरीं चालूं केली व नंतर तिचा बीभत्स प्रचार अत्यंत हिडिस स्वरूपांत भोंवतालच्या खेडोपाडीं करविला! त्यामुळें शेंकडों गरीब भट भिक्षुक आणि कुलकर्णी वगैरे ब्राह्मणांना जाळपोळ, शिवीगाळ, मारहाण आणि बायकांची बेअब्रू यासारख्या अत्याचारांना कांहीं काळ तोंड देऊन अनन्वित आपत्ति भोगाव्या लागण्यापलीकडे, त्या सत्यसमाजी तमाशांनीं व गुंडगिरीनें दुसरें कांहींच काम केलें नाहीं. या सत्यसमाजी अत्याचारांना प्रसिद्धी देऊन त्यांचा निषेध केल्याबद्दल 'विद्याविलास' पत्राचे संपादक रा. गणेश शंकर गोखले यांना १५३ अ, ५००, व १२४ अ अशा कलमांखालीं तीन निरानिराळे खटले भरून त्यांत अनुक्रमें १॥ वर्ष सक्तमजुरी १ महिना साधी व ६ महिने सक्तमजुरी अशी शिक्षा दिली. इतक्यानें समाधान न झाल्यानें विद्याविलास छापखान्याकडून २००० रुपयांचा जामीन मागितला व वर्तमानपत्रासही ३ हजार रुपयांचा जामीन मागितल्यानें 'विद्याविलास' पत्र बंद पडलें व छापखाना तेवढा जबर जामीन देऊन चालू ठेवला गेला. याचवेळीं वाडीचे दत्तास पाणी घालण्याबद्दल मारामारी झाल्याचे निमित्तानें वाडीच्या कित्येक पुजाऱ्यांवर खटला भरून शिक्षा दिल्या. बहुजनसमाजाची गोष्ट तर दूरच राहो, पण शिकलेसवरलेले, पांढरपेशे ब्राह्मणेतरहि शाहूमहाराजांच्या सत्यसमाजी ओढ्याचा पूर सतत दोन पिढ्या डोक्यावरून वाहून गेल्यानंतरहि पूर्वीं सारखेच कोरडे ठणठणीत राहिलेले आहेत! या 'सुधारलेल्या' कोल्हापुरांतील मराठा वकील नि कारकून मास्तराच्या घरापर्यंत 'आई यल्लमाची लिंब नेसून पूजे'चा हा जयजयकार जोरांत चालूं रहावा हें कोल्हापुरांतील सत्यसमाजाला

लाजिरवाणें नाहीं काय? बहुसंख्य मराठा समाजाला अत्यंत हानिकारक नि लाजिरवाणी असलेली 'सनातनी धार्मिक रूढी' नाहींशी करण्यांत मराठ्यांची स्वार्थहानि मुळींच नसून उलट त्यांचा आणि जगाचा मोठा नैतिक फायदाच होणार आहे; पण स्वतःच्या सर्वस्वीं हातीं असलेली ही स्वतःच्या फायद्याची साधी सुधारणा ज्या सत्यसमाजी वीरांना अजूनहि श्रीमंत राजाराम छत्रपति व श्रीक्षात्रजगद्गुरु, किंवा सत्यसमाजी कट्टर पुढारी रा. भास्कर विठोजी जाधव, जेधे आणि मंडळी यांच्या नेतृत्वाखालीं करतां येत नाहीं, त्यांनीं जातिभेद मोडण्याच्या किंवा ब्राह्मण्य नष्ट करण्याच्या वल्गना कराव्या हें अयोग्य नव्हे काय? ब्राह्मण आपणांस बरोबरीच्या नात्यानें वागवीत नाहींत म्हणून त्यांना शिव्या देणाऱ्यांनीं आपल्या जातींतील पोटभेद ठेवले हें कोणास खरें सुद्धां वाटणार नाहीं; पण तें अक्षरशः खरें आहे. कै. शाहू महाराजांच्या सच्च्या अनुयायांनीं सत्यसमाजी तत्त्वांची शिकवण अजून तरी आपल्या अंगीं थोडी थोडी बाणवून आपली आणि आपल्या मागासलेल्या बहुसंख्य मराठ्यांची खरी सुधारणा करावी म्हणजे आजपर्यंत फुकट गेलेल्या, संस्थानी प्रजेच्या हजारों रुपयांचें थोडें तरी सार्थक झाल्यासारखें होईल.

## लढ्याचें पुनः निशाण

या चळवळीच्या वेळीं जी भयंकर दडपशाही केली गेली आणि प्रजापक्षीय कार्यकर्त्यांनीं परत आपलें डोकें वर काढूं नये म्हणून जो भयंकर जुलूम करण्यांत आला, त्यामुळें पुढें कित्येक वर्षेंपर्यंत कोल्हापुरांतील राजकीय जीवन संपुष्टांत आलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. गेल्या वीस वर्षांत दाक्षिण महाराष्ट्रांतील निरनिराळ्या संस्थानांत चळवळी झाल्या, राजकीय उलाढाली झाल्या व कित्येक संस्थानांतून सुधारणांचा अल्पमात्र प्रारंभही झाला, पण अस्पृश्योद्धारक छत्रपतीच्या राजवटींत मात्र कोणतीही राजकीय चळवळ अस्पृश्यच राहिली. मागील दडपशाहीनें व सत्यसमाजी गुंडगिरीमुळें पुढारलेल्या समाजानें इतकी दहशत घेतली कीं, शिवछत्र-

पतींच्या स्वराज्यांत स्वातंत्र्य शब्द उच्चारण्यासही भीति वाटूं लागली. पण कोणत्याही गोष्टीला मर्यादा ही असतेच असते. महाराजांच्या लाडक्या रानडुकरापासून होणारा त्रास, वेठीसाठीं होणारा जुलूम, व निरनिराळ्या गुप्त पट्टया व कर यामुळें प्रजा अगदीं जेरीस आली, आणि तिनें छत्रपतींच्या कारभाराविरुद्ध आपल्या न्याय्य हक्काच्या संपादनार्थ सन १९३८ सालीं पुनः झेंडा उभारला. हें वर्षच संस्थानी प्रजापक्षीय चळवळीनें सबंध हिंदुस्थानांत दुमदुमून गेलें होतें. त्याचाही परिणाम येथील राजकर्त्यांवर अल्प प्रमाणांत झाला आणि या हृदयपालटाचें निदर्शक म्हणजे ता. १८ ऑगस्ट १९३८ रोजीं कोल्हापूर दरबारनें प्रजेला हक्कदान करण्याची केलेली घोषणा ही होय. शिरोळ पेट्यांत आर्थिक अडचणीमुळें शेतकऱ्यांत असंतोष धुमसूं लागला. प्रजेला दरबारच्या घोषणेची माहिती करून द्यावी असें प्रजा-पुढाऱ्यांना वाटूं लागलें आणि म्हणून कोल्हापूरचे समाजसत्तावादी पुढारी भाई माधवराव बागल यांच्या कर्तबगार नेतृत्वाखालीं प्रचंड चळवळ करण्याचें सरदार दिनकरराव देसाई, नानासाहेब जगदाळे, रत्नाप्पा भरमाप्पा कुंभार, रा. दे. मिणचे वगैरे कार्यकर्त्यांनीं ठरविलें. संस्थानांत सभा भरविणें तर शक्य नाहीं, तेव्हां संस्थानानजिकच्या खालसांतील गांवीं सभा भरवून प्रचार व लोकजागृति करण्याचे ठरलें. पहिली सभा ता. १४-११-१९३८ रोजीं सातारा जिल्ह्यांतील धामणी गांवीं दक्षिणी संस्थान लोकसभेचे सर चिटणीस श्री. बा. वि. शिखरे यांच्या अध्यक्षतेखालीं भरून शेतकऱ्यांच्या दुःखाला वाचा फोडण्यांत आली व कोल्हापूरच्या जुलमी कारभाराविरुद्ध लढा सुरू करण्यांत आला. दुसरी सभा बेळगांव जिल्ह्यांतील बोरगांव गांवीं ता. २०–११–३८ रोजीं होऊन तिसरी सभा ता. २७–११–३९ रोजीं उदगांव–अंकली पुलालगतच्या वृक्षाखालीं श्री. बा. वि. शिखरे यांचे अध्यक्षतेखालीं झाली. दरबारलाही या जागृतीची झळ पोंचून ता. ३०–११–३८ रोजीं शिरोळ पेट्याचा

शेतसारा ६। टक्के कमी केल्याचें जाहीर करण्यांत आलें. त्याबद्दल दरबारचे आभार मानणें व पुढील मागण्यांचा विचार करणें यासाठीं ता. ४–१२–३८ रोजीं अंकली येथें ५००० लोकांची जंगी सभा श्री. दिनकरराव देसाई यांचे अध्यक्षतेखालीं झाली.

याप्रमाणें संस्थानांत नागरिक स्वातंत्र्य नसतांना परकीयांच्या सत्ते-खालील हद्दींत जाऊन कोल्हापूर जनता आपले विचार बोलूं लागली. दहा दहा हजार लोक सभेस येऊं लागले. एकनिष्ठता व संघशक्ति श्रीशिवबांच्या कालाप्रमाणें दिसून येऊं लागली. अवघ्या दीडदोन महि-न्यांच्या अवधींत अंकली, बोरगांव, तांदूळवाडी, दुधगांव, बिळाशी, शिर-गांव, औरवाड, टाकळीवाडी, कोगनोळी, वेकेरी, गायकनवाडी वगैरे सरहद्दीवरच्या गांवांना सकाळ–संध्याकाळ सारख्या सभा भरून जनतेंतील संघटणा व जागृति जोरानें वाढूं लागली. ( १ ) डोईजड शेतसारा कमी व्हावा, ( २ ) संपूर्ण नागरिक–हक्क–स्वातंत्र्य मिळावें, ( ३ ) व जबाबदार राज्यपद्धति मिळावी, अशा मागण्या सदर सभांमधून निश्चित करण्यांत आल्या.

ता. १६–१२–३८ रोजीं अंकली येथें एक महत्त्वाची सभा झाली. त्या सभेंत दे. भ. शंकरराव देव यांचें स्फूर्तिदायक व्याख्यान झालें. सभेंत १५००० वर लोकसमुदाय हजर होता. सदर सभेंत वर उद्धृत केलेल्या तीन निश्चित मागण्या सादर करण्यासाठीं ता. २५–१२–३८ रोजीं, राजधानींत महाराजांच्याकडे मोर्चा नेण्याचें ठरलें.

## पुढाऱ्यांना अटक

मध्यंतरीं प्रजेमधील वाढत असलेली ही शक्ति सहन न होऊन दरबारनें ऐतिहासिक धरपकडीचें मोठें अस्त्र पाजळण्यास सुरुवात केली. ता. ७–१२–३८ रोजीं श्री. सिदलिंगप्पा हविरे, श्री. दत्तोपंत देशिंगकर व श्री. दादा तात्या देसाई यांना पकडण्यांत येऊन पुढें दोनच दिवसांत श्री. दिनकरराव देसाई यांनाही अटक करून चौघांवर क्रि. प्रो. को. क.

१०७ खालीं खटला भरला गेला व त्यांना एक वर्ष अटकेंत ठेवण्याचा हुकूम झाला. पण अखेर जागृत झालेला शेतकऱ्यांचा संस्मरणीय मोर्चा तारीख २५–१२–३८ रोजीं भाई माधवराव बागल यांचे नेतृत्वाखालीं राजधानीस हजारोंच्या संख्येनें गेला. स्टेशनवर येतांच भाई बागल यांनीं धीराचा संदेश देऊन राजधानींत प्रवेश केला व लगेच भाई बागल यांना क्रि. प्रो. कोड क. १०७ खालीं अटक करण्यांत आली. नंतर मोर्चाचें नेतृत्व श्री. नानासाहेब दत्ताजीराव जगदाळे यांनीं स्वीकारलें. भाई बागलांना अटक झाली तरी कोणत्याही प्रकारची शांतता ढळूं न देतां मोर्चांतील लोकांनीं आपल्या मागण्या रावबहादूर दिवाणसाहेब सुर्वे यांच्यापुढें मांडल्या. दिवाणसाहेबांनीं ता. ८–१–३९ पर्यंत सदर मागण्यांचा योग्य तो विचार करतों असें आश्वासन दिल्यामुळें व महाराज कोल्हापुरास नसल्यानें मोर्चांतील जनता शांतपणें परत आली.

## शेतकऱ्यांचा विजय

रावबहादूर दिवाणसाहेबांच्या तोंडी हुकमावरून खेडोपाडीं सभा करून जनतेनें आपल्या संघटनेच्या कामास सुरवात केली. ता. ५-१-३९ रोजीं दरबारकडून जो जाहिरनामा प्रसिद्ध झाला तो निराशाजनक होता. मोर्चाचे वेळीं दिलेलें वचन पाळलें गेलें नाहीं, म्हणून पुढील धोरण ठरविण्यासाठीं मिरज येथें ता. ९-१-३९ रोजीं २००–३०० कार्यकर्त्यांची सभा होऊन ता. १५–१–३९ रोजीं दुसरा मोर्चा नेण्याचें ठरलें. अवघ्या ५-६ दिवसांच्या तयारीनें १५ तारखेच्या अपूर्व व विस्मयजनक अशा मोर्चाची सिद्धता झाली. मोर्चाचें नेतृत्व श्री. नानासाहेब दत्ताजीराव जगदाळे यांनीं स्वीकारलें होतें.

मोर्चाचे पूर्वीं ता. १२–१–३९ रोजीं शिक्षा झालेल्या आरोपींपैकीं श्री. दिनकरराव देसाई, श्री. देशिंगकर व श्री. दादा तात्या देसाई या तिघांना सोडून देण्यांत आलें. शेतसारा ब्रिटिश हद्दीइतका केल्याचा जाहिरनामा ता. १३ रोजीं प्रसिद्ध झाला व पुन्हां ता. १४ ला दुसरें गॅझेट

काढून आपली बाजू सावरण्याचा दरबारकडून प्रयत्न झाला. याशिवाय सदर मोर्चा कोल्हापुरीं येऊं नये म्हणून पोलीस व सरकारी लहानथोर अधिकारी यांनीं सर्व उपायांचा अवलंब केला. शेतकऱ्यांची नाकेबंदी केली. सशस्त्र पोलिसांचें फिरतें प्रदर्शन खेडोपाडीं केलें. पोलिसांचा खेड्यापाड्यांतून जागता पहारा सुरू केला. पण याचा कांहीं उपयोग न होऊन कोल्हापूरची शेतकरी जनता नद्यांतून, रानावनांतून, पिकांतून सीमापार होऊन आपलें मनोगत सिद्धीस नेण्यासाठीं 'स्पेशल ट्रेन'नें हजारोंनीं कोल्हापुरास दाखल झाली. त्यापूर्वी मोर्चासाठीं गेलेल्या लोकांना कोल्हापूर स्टेशनवर मोटारींत बसवून बाहेर नेऊन सोडण्याचा धंदा दरबारच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांपासून तों पोलीस शिपायापर्यंत सर्वांनीं चालविला होता. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

या मोर्चाच्या वेळची शेतकऱ्यांची शिस्त व शांतता वाखाणण्यासारखी होती. लष्करी शिपायांच्या संगिनी व पोलिसांच्या लाठ्या सज्ज होत्या. अशा वेळीं शांतता ढळूं न देतां रेल्वे स्टेशनच्या आवाराच्या बाहेर चारचारचे रांकेनें ४००० शेतकऱ्यांनीं सडकेच्या कडेनें बैठक मारली. ते मागणी नामंजूर झाल्यास मरण्यास सिद्ध झाले. संस्थानी अधिकाऱ्यांच्या धाकदपटशा व इतर साधनांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. नंतर त्या ठिकाणीं खुद्द महाराज आले व त्यांचेसमोर मोर्चाचे पुढाऱ्यांनीं सर्वश्रुत अशा आपल्या मागण्या मांडल्या. भर उन्हामध्यें १२ ते ४ वाजेपर्यंत वाटाघाटी होऊन महाराजांनीं वचन दिलें कीं, (१) शेतसारा ब्रिटिश हद्दीइतका करण्यांत आला आहे; (२) भाषणस्वातंत्र्यावरील निर्बंध काढून टाकण्यांत आले आहेत; (३) नागरिक स्वातंत्र्याचे इतर हक्कही पंधरा दिवसांत गॅझेटद्वारा जाहीर केले जातील; (४) सर्व राजबंदी बिनशर्त मुक्त करण्याबाबत १५ दिवसांचे आंत सहानुभूतिपूर्वक विचार केला जाईल; (५) जबाबदार राज्यपद्धति लवकरच देत आहोंत. श्रीमंत छत्रपतींचें हें आश्वासन घेऊन आपल्या अपूर्व विजयांत रयत-मोर्चा शांतपणें परत फिरला.

भाई बागलांची मुक्तता ता. २३-१-३९ रोजीं झाली. दरबारनें भाषण व संघ स्वातंत्र्यावरील निर्बंध ता. २६-१-१९३९ रोजीं काढले. भाई बागलांचा सत्कार एकमुखानें व्हावा आणि संघटना व जागृति यांचें काम एकसूत्रीपणानें चालावें म्हणून ता. २५-१-३९ ते ता.१-२-३९ पर्यंत एक आठवडाभर अभूतपूर्व असा धावता दौरा संस्थानभर काढून अपूर्व जागृति करण्यांत आली. या एका आठवड्यांत ७७७ मैलांचा प्रवास झाला. ५० गांवांना एक हजार पासून दहा हजार जनसमुदायाच्या प्रचंड सभा पार पडल्या. कोल्हापूर संस्थानांतील कमींतकमी २-२॥ लाख लोकांना संघटनेचा व जागृतीचा संदेश देण्यांत आला. दौऱ्याच्या वेळची लोकांमधील निष्ठा, कार्याविषयींची कळकळ व शांतता आणि सौजन्य राखण्याची त्यांची शक्ति खरोखरच अवर्णनीय होती.

पण १५ जानेवारी तारखेला दिलेलीं वचनें दरबारकडून संपूर्ण पाळलीं गलीं नाहींत, इतकेंच नव्हे तर, जनतेंतील होत असलेली अपूर्व जागृति सहन न होऊन शांततेनें व सनदशीरपणें चाललेल्या चळवळीस मारून टाकण्याच्या उद्देशानें दरबारकडून दडपशाहीचें धोरण स्वीकारण्यांत आलें. कांहींवर १०७ कलमाखालीं खटले भरले, तर कांहींना पकडून सोडण्यांत आलें; कांहींना हातकड्या घातल्या, तर कांहींना मारहाण केली. कोल्हापूर शहरांत ता. ७-२-१९३९ रोजीं १४४ कलम पुकारण्यांत आलें. अशा प्रकारें चळवळींत प्रक्षोभ व अडथळा उत्पन्न करण्याचा प्रयत्न करण्यांत आला.

## प्रजापरिषदेची स्थापना

पण अशा परिस्थितींत देखील छत्रपतींच्या विश्वस्त मावळ्यांनीं स्वतःची शांति ढळूं न देतां आपलें संघटनेचें काम अविरतपणें चालूं ठेवलें. शिरोळ येथें श्रीरामचंद्र ऑईल मिल्समध्यें सोमवार ता. ६ फेब्रुवारी १९३९ रोजीं रात्रौ ९॥ वाजतां कोल्हापूर संस्थानच्या सर्व भागांतील २००० ध्येयनिष्ठ व उत्साही कार्यकर्त्यांचा मेळावा दे. भ. माधवराव बागल यांच्या अध्यक्षतेखालीं जमला. सभा ऐन रंगांत आली असतांना दे. भ.

माधवराव बागल यांना राजद्रोहाच्या आरोपावरून १२४ अ कलमाखालीं सभेंतून पकडून नेण्यांत आलें. प्रत्यक्ष दडपशाही सुरूं असतांना देखील केवळ सनदशीर व शांततेच्या मार्गाचाच अवलंब करून आतांपर्यंत मिळालेले हक्क उपभोगून छत्रपतींना राहिलेल्या आश्वासनाची पुन्हां जाणीव करून द्यावी या शुद्ध हेतूनें 'कोल्हापूर संस्थान प्रजापरिषद' भरविण्याचें सदर सभेंत घोषित करण्यांत आलें. या सभेंत परिषदेची पूर्व तयारी करण्याकरतां तात्पुरती प्रातिनिधिक समिति नेमण्यांत आली.

## श्री. देवांचा उपदेश

परिषदेसाठीं तात्पुरती घटना तयार करण्यांत आली आणि 'कोल्हापूर संस्थानांत श्रीमान् महाराज छत्रपति सरकार करवीर यांचे आधिपत्याखालीं न्याय्य व शांततेच्या मार्गानें संपूर्ण जबाबदार राज्यपद्धति स्थापन करणें' हें परिषदेचे ध्येय ठरविण्यांत आलें. ता. २५-२-१९३९ रोजीं प्रजापरिषदेच्या स्वागत मंडळाची सभा जयसिंगपूर येथें भरून कॉंग्रेस वर्किंग कमिटीचे सभासद श्री. शंकरराव देव यांचे स्वागतमंडळाच्या सभासदांना उपदेशपर असें भाषण झालें. या चळवळीचें उद्दिष्ट त्यांनीं फार चांगल्या तऱ्हेनें सुस्पष्ट केलें आणि स्वराज्य म्हणजे काय याची अगदीं व्यवहार्य अशी व्याख्या केली. त्यांचें पुढीलप्रमाणें भाषण झालें:

"अन्याय व जुलूम यापुढें एक क्षणभरही सहन करणार नाहीं असाच प्रजेचा निर्धार आजची ही घटना दाखवीत आहे. संपूर्ण जबाबदार राज्यपद्धति स्थापन झाल्यानंतर आपला निर्धार पूर्ण होणार आहे. योग्य साधनसंपत्ति आणि संधि स्वराज्य स्थापन झाल्याखेरीज मिळणार नाहीं. असें स्वराज्य मिळविण्यासाठीं आपण सज्ज झालों आहोंत. ही चळवळ कोल्हापूरच्या महाराजांचे विरुद्ध आहे असें म्हणणाऱ्यांना या चळवळीचा अर्थच कळलेला नाहीं. कोल्हापूर संस्थान ही छत्रपतींची गादी आहे. या देशांत ज्या छत्रपतींनीं कष्ट सोसून स्वराज्य स्थापन केलें, त्या छत्रपतींच्या गादीविरुद्ध ही चळवळ कशी असूं शकेल? कोल्हा-

पूरच्या लढ्यांत जातीय वादाला काडीमात्रही स्थान देऊं नका. स्वराज्याच्या चळवळींत ब्राह्मण-मराठा वादाला मूठमाती द्या. या चळवळीचे विरोधक ही चळवळ ब्राह्मणांनीं व मराठेतरांनीं मराठा राजाच्या विरुद्ध चालविलेली चळवळ म्हणून जनतेंत फूट पाडण्याचा प्रयत्न करतील; पण त्यांचा हा आरोप खोटा आहे. ज्या ब्राह्मणाला छत्रपतींच्या गादीविषयीं आदर व अभिमान वाटत नाहीं, तो ब्राह्मणच नव्हे. ज्या शिवछत्रपतींनीं गोब्राह्मणांचें रक्षण आपल्या रक्ताचें पाणी करून केलें, त्या छत्रपतींची ही गादी आहे. श्रीशिवाजी महाराजांनीं त्यावेळीं जर ब्राह्मणांचें संरक्षण केलें नसतें, तर आजचा ब्राह्मण दिसला असता काय? त्या छत्रपतींच्या गादीशीं कोणता ब्राह्मण कृतज्ञ राहाणार नाहीं? ब्राह्मण व मराठा हे भेद खोटे आहेत. देवासमोर जसा भेद नाहीं, तसे छत्रपतींच्या गादीपुढें ब्राह्मण आणि मराठा हे भेद असूं शकत नाहींत. आमचें भांडण छत्रपतींशीं नाहीं. आमची तक्रार राज्यपद्धतीविषयीं आहे. *जो कर देतो व कायदा पाळतो त्याला त्या कराचा विनियोग कसा करावा हें ठरविण्याचा अधिकार असावा ही आमची मागणी आहे. आणि यालाच 'स्वराज्य' म्हणतात.* " याप्रमाणें श्री. शंकरराव देवांचा स्फूर्तिदायक संदेश घेऊन कार्यकर्ते दुप्पट जोमानें कामास लागले. परिषदेच्या कार्याचा प्रचार फार धडाडीनें चालू होता आणि प्रजापरिषदेच्या स्वागतमंडळाचे सभासद हजारोंनीं वाढू लागले व ही परिषद यशस्वी होणार अशीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं. पण करवीर दरबारनें भाई माधवराव बागल यांच्यावर भरलेल्या राजद्रोहाच्या खटल्याच्या निकाल देऊन लोकांना भावी धोरणाची थोडीशी समज पटवून दिली. भाई माधवराव बागल यांना २ वर्षें सक्तमजुरी व १००० रु. दंडाची कठोर शिक्षा ठोठावून प्रजापक्षीय चळवळीस आपण कसे चिरडणार आहोंत, त्याचें प्रात्यक्षिक दाखविलें. ता. २९-३-३९ रोजीं जादा गॅझेट काढून कोल्हापूर संस्थान प्रजापरिषद ही संस्था बेकायदा असल्याचें जाहीर करण्यांत आलें. यामुळें कायदेभंग न करतां महात्माजींच्या इच्छेप्रमाणें

खालसा हद्दींत कूपवाड येथें डॉ. पट्टाभिसीतारामय्या यांच्या अध्यक्षते-खालीं ही परिषद् बोलावण्याचें ठरलें. परिषदेचा प्रचार जोरांत सुरू होताच. दरबारनें लोकांना दहशत बसावी म्हणून अमानुष अत्याचार केला; व ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादाचें भूत उठवूनही आपला कार्यभाग होत नाहीं, असें दिसून आल्यावर दरबारनें लोकांना भेडसाविण्याकरतां कार्यकर्त्यांना पकडलें, व हजारों शेतकऱ्यांना मारपीट करून त्यांना भयभीत करून सोडलें. पण परिषद् अयशस्वी करण्याच्या कामीं दरबारचे हे सर्व प्रयत्न निष्फळ ठरले.

## पहिली प्रजापरिषद

करवीर संस्थान लोकसभेचें पहिलें अधिवेशन झाल्यानंतर तेहतीस वर्षांनीं 'कोल्हापूर संस्थान प्रजापरिषदेचें पहिलें अधिवेशन' डॉ. पट्टाभिसीतारामय्या या प्रसिद्ध काँग्रेसनेत्याच्या अध्यक्षतेखालीं करवीर इलाख्याबाहेर, खालसा हद्दींत कूपवाडच्या माळावर, शनिवार तारीख १५।४।१९३९ ला भरलें! पहिल्या लोकसभेला १०१ प्रतिनिधी हजर होते, तर या प्रजापरिषदेला १०००० लोक उपस्थित होते. कै. शाहू-महाराजांच्या वेळीं भरलेली लोकसभा मुख्यतः ब्राह्मण वकीलमंडळींच्या प्रयत्नांनीं भरलेली होती, तर ही श्री. राजाराममहाराजांच्या अमदानींतील प्रचंड प्रजा-परिषद् शेतकरी नि व्यापारी वगैरे ब्राह्मणेतर पुढारी नि कार्य-कर्ते यांच्या जोरदार चळवळींचें फळ होतें. या प्रजापरिषदेंत ब्राह्मणां-ऐवजीं जैन, लिंगायत, मराठे नि मुसलमान हे लोकच मुख्य भाग घेऊन सर्व सूत्रें हालवीत होते. विशेषतः लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे, कै. शाहू छत्रपतिमहाराजांच्या अत्यंत मर्जीतले एक मराठे पुढारी नि वकील, कै. खंडेराव बागल यांचे प्रसिद्ध सत्यसमाजी व समाजसत्तावादी चिरंजीव, भाई माधवराव बागल या थोर, छत्रपतिनिष्ठ मराठा नागरिकानेंच करवीर इलाख्यांतील साऱ्या त्रस्त जनतेचें धुरीणत्व आपल्या खांद्यावर घेतलें होतें. ब्राह्मण असलेच तर ते अगदींच अल्प प्रमाणांत होते. ही चळवळ कोल्हा-

पूरच्या ‘ बामणानीं ’ पोटापायीं चालविली आहे असें म्हणण्यास जागाच राहिली नाहीं व म्हणून कांहीं या सनदशीर राजकीय चळवळीला आडमुठा विरोध न करतां तिचें आणि तिच्या नेत्यांचें श्रीमंत राजाराम छत्रपति व त्यांचे सुर्वे–पोवार, पाटील व भोसले आदि सल्लागार अधिकाऱ्यांनीं माणुसकीचा सरळपणा दाखवून कांहीं सुस्वागत केलें नाहीं. उलट, शाहूमहाराजांवर दडपशाहींत ताण करून सत्य,शांति आणि अहिंसा यांच्या सात्त्विक मार्गानें जाणाऱ्या, प्रजापक्षीय पुढाऱ्यांवर व कार्यकर्त्यांवर खटले भरून त्यांना कारावासाच्या कठोर शिक्षा ठोठावल्या ! मोठमोठे दंड गरिबांनाहि केले व शेंकडों शेतकऱ्यांना उघड्या तिकटीवर उभे करून पोलिसांकडून बेशुद्ध पडेपर्यंत बेदम मार दिला ! ! प्रजापरिषदेला सवत असावी म्हणून पोटार्थी, लाळघोटे वगैरे प्रकारचे इसम हाताशीं धरून ‘ करवीर रयतसभा ’ दरबारी अधिकाऱ्यांनीं काढली व तिची मजलस भरवून छत्रपतींचीं स्तुतिस्तोत्रें गायिलीं व संस्थानी प्रजा आणि तिचे स्वार्थत्यागी पुढारी यांच्यावर रा. रा. मोरे याच्या म्होरकेपणाखालीं मनसोक्त गालिप्रदान करण्यांत आलें !

ही प्रजापरिषदेची चळवळ दरबारच्या भयंकर जुलमानें तूर्त तरी स्थगित झालेली दिसत आहे. लोकांची प्रकट चळवळ बंद जरी पडली असली, तरी प्रजेमध्यें पेटलेला असंतोषाचा स्फुलिंग पुनः पेट घेतल्याशिवाय रहाणार नाहीं हें निश्चित आहे. जबाबदार राज्यपद्धतीची मुहूर्तमेढ आपल्या आश्वासनाप्रमाणें न रोवतां, श्री. सर राजाराम महाराज व त्यांचे स्तुतिपाठक एका तपापूर्वीं स्थापन झालेल्या इलाखा पंचायतींचे गोडवे गाण्यांतच रममाण झालेले दिसत आहेत ही खेदाची गोष्ट नव्हे काय ? या घोषणेबाबत प्रजापरिषदेनें पास केलेला ठराव फारच महत्त्वाचा असल्यानें तिकडे दुर्लक्ष करून दरबार मोठी घोडचूक करीत आहे असें म्हटल्याशिवाय रहावत नाहीं. श्री शिवाजी महाराजांचा अभिमानपूर्वक उल्लेख करणाऱ्या त्यांच्या आजच्या वंशजांनीं चार हजार लोकांच्या समक्ष दुसऱ्या मोर्चाचे पुढारी श्री. नानासाहेब जगदाळे यांना



श्री. पुंडलिकजी कातगडे, मिरज.



श्री. बा. सा. धुळी, सं. मिरज.



श्री. गोविंदराव रानडे, सं. मिरज

जें आश्वासन दिलें, त्याची पाळवणूक न करून वचनभंग करणारे छत्रपति अशी कीर्ति संपादन केली आहे. दुसऱ्या मोर्चानंतर दोन तीन दिवसांत व्हाईसरॉय यांची भेट संस्थानला व्हावयाची होते म्हणून महाराजांनीं भरीव आश्वासनें दिलीं. पण प्रजापुढाऱ्यांना दिलेलीं हीं आश्वासनें हीं 'मधु तिष्ठति जिव्हाग्रे, हृदये तु हलाहलम्' याप्रमाणें ठरावीं हें कोणत्याही सच्च्या मराठ्याला खेदजनक वाटेल यांत शंका नाहीं.

तेहतीस वर्षांपूर्वी कै. शाहू महाराजांच्या कारकीर्दींत सुरूं झालेला राजकीय हक्काचा लढा इतका काळ लोटला तरी अजून पहिल्या पायरी-वरच आहे व यावरून एक गोष्ट सिद्ध होत आहे व ती म्हणजे ही कीं, या सुलतानशाहीविरुद्ध चळवळ करणारे ब्राह्मण असोत वा ब्राह्मणेतर असोत, आणि सुलतानशाही गाजविण्यास चटावलेला संस्थानिक कै. शाहूमहाराजांसारखा भयंकर कारस्थानी जबरदस्त मनुष्य असो, कीं श्रीमंत राजाराम छत्रपतींसारखा हाडाचा गरीब व निरुपद्रवी मनुष्य असो, राजसत्ता नियंत्रणाचा प्रश्न, प्रजेच्या नेमस्त मागण्या, दूरदृष्टीचा शहाणपणा दाखवून मान्य करणारा हिंदी संस्थानिक अजूनहि फारच विरळा आढळेल असें म्हणणें भाग पडत आहे. अशा परिस्थितींत संस्थानी प्रजेला जर आपल्या गुलामगिरीचे सर्व सुलतानी पाश तोडून टाकून, शांततेच्या सनदशीर मार्गानेंच जर आपल्या मालकीची राजसत्ता आपल्या खऱ्या प्रतिनिधींच्या हातींच आणावयाची असेल, तर सर्वांनीं जातीय स्वार्थ सोडून सामुदायिक हितार्थ ऐक्य केलें पाहिजे व खऱ्या, निधड्या छातीच्या, स्वार्थत्यागी नेत्यामागून जाऊन, आपली चळवळ, लढा पूर्ण यशस्वी होईपर्यंत, अगदीं नेटानें नि चिकाटीनें सतत चालूं ठेविली पाहिजे.

# मिरजेंतील राजकीय आंदोलन

लेखकः— **प्रजापरिषदेचा अभिमानी**, मिरज.

अखिल हिंदुस्थानांत सातशें संस्थानें आणि त्यांतही मिरजेसारखें एक लहानसें संस्थान ! त्या संस्थानांत राजकीय चळवळ तरी काय असावयाची असेंच कोणालाही वाटेल ! पण मिरज संस्थानांत ब्रिटिश हद्दींत होणाऱ्या बहुतेक सर्व चळवळींचे पडसाद आजपर्यंत उठलेले आहेत. व एका काळीं ' छोटी बार्डोली ' होणाऱ्या या छोट्या संस्थानांत आज चळवळीचा मागमूसही राहिलेला नाहीं हें कोणासही आश्चर्याचें वाटणार नाहीं काय ?

दक्षिण महाराष्ट्रांतील पटवर्धनी संस्थानें म्हणून ज्यांचा उल्लेख होतो, त्यांपैकींच मिरज हें एक लहानसें संस्थान आहे. अर्थात्च जरी मिरज संस्थान लहानसें असलें, तरी ऐतिहासिक कालापासून तें लढाऊ गांव म्हणून प्रसिद्ध आहे हें विसरून चालणार नाहीं. या संस्थानचे सोलापूर जिल्ह्यांतील पंढरपूरजवळील मोडनिंब, धारवाड जिल्ह्यांतील लक्ष्मेश्वर असे दोन व मिरज एक असे तीन तालुके असून मिरज हें संस्थानचें राजधानीचें गांव आहे.

सात लाख रुपये उत्पन्नाचें व नव्वद हजार वस्तीचें हें संस्थान आहे, तथापि त्याची कीर्ति कांहीं लहानसहान नाहीं. पिण्याच्या पाण्याचें दुर्भिक्ष्य, हें त्या कीर्तीचें पहिलें कारण असून मिशन हॉस्पिटल्, एस्. एम्. आर. जंक्शन् हींही दुसरीं कारणें आहेत. तथापि येवढ्याच कारणांनीं कांहीं मिरजेची कीर्ति झालेली नाहीं. मिरज संस्थानच्या माजी अधिपतींच्या प्रजेविषयींच्या वागणुकीमुळें उत्पन्न झालेले वेळोवेळचे राजकीय झगडे हेही त्या कीर्तीचे वांटेकरी आहेत. मिरज संस्थानच्या राजकीय चळवळीच्या

तिहासास गेल्या वीस वर्षांपासून सुरवात झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं आणि त्या दृष्टीनें गेल्या वीस वर्षांत मिरज संस्थानांत झालेली राजकीय जागृतिच आपणाला प्रामुख्यानें पहावयाची आहे.

प्रजेला वाटणारीं दुःखें, गरजा, आकांक्षा, व अडचणी वेशीवर टांगणें अत्यंत जरूर असतें. व्यक्तिशः राज्यकारभाराविरुद्ध तक्रारी करणें अत्यंत कठीण व अशक्य असतें; पण त्याच तक्रारी संघटितपणें जर मांडल्या गेल्या, तर राजसत्तेविरुद्ध दाब आणणें शक्य असतें आणि अशाकरितांच श्री. न. चिं. केळकर, कै. अ. वि. पटवर्धन व कै. ग. र. अभ्यंकर प्रभृतींनीं पुढाकार घेऊन दक्षिणी संस्थान हितवर्धक सभा पुणें येथें सन १९२१ मध्यें स्थापन केली. व अल्पावधींतच मिरज संस्थान प्रजापरिषद् ही संस्था स्थापन होऊन मिरज संस्थानांतील प्रजाजनांचीं दुःखें जाहीरपणें व संघटितपणें मांडण्याचें प्रचंड साधन उत्पन्न झालें.

## चळवळीस प्रारंभ

मिरज संस्थान प्रजापरिषदेचें पहिलें अधिवेशन मिरज येथें १९२२ सालीं मे महिन्याचे ता. ११ व १२ रोजीं दोन दिवस कै. भारताचार्य चिंतामणराव वैद्य यांचे अध्यक्षतेखालीं अत्यंत उत्साहानें भरलें. या पहिल्या अधिवेशनास दे. भ. तात्यासाहेब केळकर, कै. अ. वि. पटवर्धन, श्री. ल. ब. भोपटकर, सांगलीचे कै. प्रो. ग. र. अभ्यंकर वकील वगैरे संस्थानी प्रजेच्या हिताकरितां झटणारी पुढारी मंडळी हजर होती. या पहिल्या अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष त्यावेळचे मिरजेचे प्रमुख वकील व कार्यकर्ते कै. गोविंदरावजी पटवर्धन हे होते. अध्यक्ष कै. नानासाहेब वैद्य यांनीं आपल्या भाषणांत, राजा व प्रजा यांचे संबंध कसे असावेत, पटवर्धन संस्थानांनीं फेडरेशन स्थापणें कसें युक्त होईल, अधिपतींनीं प्रजाजनांच्या प्रतिनिधींपुढें राज्यकारभाराचा वार्षिक वृतान्त व जमाखर्च ठेवणें कसें जरूर आहे, राज्य म्हणजे आपली खासगी मिळकत ही कल्पना संस्थानाधिपतींनीं सोडून देणें कसें आवश्यक आहे, वगैरे गोष्टींचा ऊहापोह स्पष्टपणें केला होता. या

अधिवेशनांत बरेच ठराव पास करण्यांत आले. त्यांत प्रथमच " मिरज संस्थानांत संस्थानाधिपतींच्या आधिपत्याखालीं जबाबदार राज्यपद्धति शांततेच्या व न्याय्य मार्गांनीं प्राप्त करून घेणें " हें या परिषदेचें ध्येय असल्याचें जाहीर करण्यांत आलें. तसेंच "जबाबदार राज्यपद्धतीचें हें ध्येय आपणांस मान्य असल्याचें संस्थानाधिपतींनीं जाहीर करून राज्यकारभाराचे हरएक बाबतींत मदत करण्यासाठीं लोकनियुक्त सभासदांचें मंडळ स्थापण्यांत यावें ". अशी स्पष्ट मागणी दीड तपापूर्वीं मिरज प्रजेतर्फे करण्यांत आलेली होती हें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. याशिवाय पाणीपुरवठ्याची व्यवस्था, ग्रामपंचायतीची स्थापना, मद्यपानास कायद्यानें बंदी, व्यापार व शेतकऱ्यांची आर्थिक सुधारणा, प्राथमिक शिक्षणाचा विस्तृत प्रमाणावर प्रचार, अस्पृश्यता काढून टाकणें वगैरेबाबत ठराव करण्यांत आले. अशा रीतीनें अत्यंत धीटपणें मिरज प्रजाजनांच्या स्पष्ट व निर्भीड मागण्या प्रजापरिषदेच्या या पहिल्या अधिवेशनांत मांडण्यांत आल्या व येथूनच मिरज संस्थानच्या प्रजापक्षीय चळवळीचा ' ओनामा ' सुरू झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

प्रजापक्षीय चळवळ जरी चालू झाली असली, तरी दरबार त्याकडे सहानुभूतीनें पाहून प्रजेच्या मागण्या तत्काळ मान्य करील अशी अपेक्षा धरणें चुकीचें ठरलें असतें. " ठोठावल्याशिवाय दार उघडत नाहीं " हें जरी सर्वांशीं खरें असलें, तरी कित्येक दारें एकदां ठोठावून उघडत नसतात. त्यावर पुष्कळ वेळ ठोठावावें लागतें. या न्यायानें मिरजेच्या प्रजेनें आपल्या अडचणी व मागण्या पुन्हां मांडणें जरूर झालें व अखेर पुन्हां मिरज येथें ता. २६ मे १९२४ ला प्रजापरिषदेचें अधिवेशन सांगलीचे प्रसिद्ध वकील कै. गणपतरावजी अभ्यंकर यांचे अध्यक्षतेखालीं भरलें. कै. अभ्यंकरांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत, " आपली स्वतःची परिस्थिति अजमाविणें, आपल्या दुःखांची जाणीव तीव्रपणानें नजरेसमोर ठेवणें, आपल्या प्रगतीबद्दल सार्वजनिक तळमळ उत्पन्न करणें, स्वराज्याचें ध्येय गांठण्याकरितां उत्साह उत्पन्न करणें, व तदनुसार अखंड प्रयत्न

करणें" हें या परिषदेचें ध्येय आहे असें सांगितलें. तसेंच त्यांनीं मिरज संस्थानचा 'भिकार मिरज' म्हणून कसा बदलौकिक झालेला आहे हें स्पष्टपणें दाखविलें व मिरज संस्थानची राजकीय अवनति कशी होत चालली आहे याचें साधार विवेचन केलें. तसेंच त्यांनीं दरबारच्या निरनिराळया खात्यांच्या खर्चासंबंधींही योग्य अशी टीका केली. तसेंच संस्थानिकांनीं कोणत्या विधायक गोष्टी कराव्यात हेंही सुचवून त्यांनीं प्रातिनिधिक सभेची मागणी मांडली. याही अधिवेशनांत पहिल्या अधिवेशनांत पास करण्यांत आलेले निरनिराळे ठराव पुनः पसार करण्यांत आले.

प्रजापरिषदेचीं दोन अधिवेशनें झालीं खरीं, पण नुसती मागणी केल्यानें ती मान्य होणें मिरज संस्थानांत तरी शक्य नव्हतें. तशी परिस्थिति अद्याप निर्माण व्हावयाची होती. मागणी करणाऱ्यांच्या मागें तशीच प्रचंड शक्ति लागते. त्यामुळें दोन्ही अधिवेशनांतील मागण्यांकडे मिरज दरबारनें कानाडोळा केला असल्यास नवल तें काय ? या परिस्थितीमुळेंच 'दाद' लागेपर्यंत ओरड करण्याचें धोरण स्वीकारणें प्रजापरिषदेला जरूर होतें व त्याप्रमाणें प्रजापरिषदेचें तिसरें अधिवशन मिरज येथें ता. २९ मे १९२७ रोजीं पुणें येथील मराठा पत्राचे त्यावेळचे संपादक श्री. बाबूराव गोखले यांचे अध्यक्षतेखालीं भरलें. या अधिवेशनास कांहीं स्थानिक 'राजनिष्ठ' मंडळींनीं विरोध करण्याचा प्रयत्न केला. पण प्रजापरिषदेच्या निष्ठावंत कार्यकर्त्यांनीं असल्या विरोधास भीक न घालतां हें अधिवेशन मोठ्या धडाडीनें पार पाडलें. अध्यक्ष श्री. बाबूरावजीनीं आपल्या भाषणांत लोकमत सुशिक्षित करून तें सामर्थ्यवान व सुसंघटित करा व आपलीं दुःखें वेशीवर टांगा असा जनतेला संदेश दिला.

प्रजापरिषदेचें चौथें अधिवेशन मिरज येथें ता. ९।९।१९२८ रोजीं श्री. गो. म. रानडे वकील यांचे अध्यक्षतेखालीं भरलें. या अधिवेशनापासून दरबारचें या प्रजेच्या चळवळीकडे लक्ष गेल्याचीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं. 'प्रजापरिषदेचा अध्यक्ष कोण असावा' हें ठरविण्याचा अधिकारही दरबारनें

आपल्या हातीं घेऊन तो निष्ठुरपणें चालवून आपल्या इच्छेप्रमाणें श्री. गोविंदरावजी रानडे यांच्या नांवास दरबारनें अखेर संमति दिली. प्रजाजनांना नुकत्याच बसविलेल्या जबर सारावाढीचें ओझें असह्य झाल्यानें ते बेजार झाले होते. त्यामुळें या अधिवेशनास मोठें महत्त्व प्राप्त झालें होतें. अध्यक्ष श्री. रानडे वकील यांनीं आपल्या भाषणांत मुख्यतः सारावाढीबद्दलच विचार प्रकट केले. तसेंच रयतांवर जी जबर सारावाढ केली होती, त्याबद्दल दरबारनें चौकशी कमिटी नेमणेबाबत एक ठराव पसार करण्यांत आला. अशा रीतीनें हें अधिवेशन अत्यंत खळबळीच्या वातावरणांत पार पडलें. परिषदेच्या अधिवेशनाचे वेळीं दरबारनें दाखविलेली वृत्ति व एकंदर परिस्थिति पाहिली असतां पुढील लढ्याची ती निशाणी होती असें स्पष्ट दिसून येतें.

यानंतर मिरज संस्थानांत सारावाढीची मोठी चळवळ होऊन कांहीं काळ शांततेचा लोटल्यानंतर मिरज तालुक्यांपैकीं मालगांव या गांवीं दे. भ. नरसिंह चिंतामण केळकर यांचे अध्यक्षतेखालीं प्रजापरिषदेचें पांचवें अधिवेशन ता. २५।५।१९३१ रोजीं भरविण्यांत आलें. याही अधिवेशनाचे वेळीं दरबारतर्फे कांटे पसरविण्याचा प्रयत्न झालाच! पण प्रजापरिषदेच्या चालकांनीं अत्यंत सावधपणानें मार्ग काढला. अध्यक्ष श्री. तात्यासाहेब केळकर यांचें भाषण प्रजा व राजा या दोघांनाही मार्गदर्शक असें झालें. स्वागताध्यक्षांनीं आपल्या भाषणांत सारावाढ–सत्याग्रहाची फलश्रुति, श्री. बा. वि. शिखरे यांना झालेली शिक्षा व त्याचे परिणाम, कांग्रेस कमिटीवरील बंदी, परस्थांचा कायदा, व्यापाराची गळेचेपी, न्यायपद्धति वगैरे अन्यायांबाबत स्पष्ट विचार मांडले. याही अधिवेशनांत भाषणस्वातंत्र्य, जबाबदार राज्यपद्धति, सारावाढ, परस्थांचा कायदा, कॉंग्रेसवरील बंदी, शिक्षणप्रसार, पाणीपुरवठा वगैरे बाबतही ठराव पास करण्यांत आले.

पण या पांच अधिवेशनांचा विशेष फायदा कांहींच झालेला दिसला नाहीं असें कोणासच वाटेल. पण तशी परिस्थिति नाहीं. प्रजेनें केलेल्या चळ-

चळीचें थोडें तरी यश प्रजेला निःसंशय मिळालेंच आहे व मिळालेल्या या यशाचा आढावा परिषदेचें सहावें व शेवटचें अधिवेशन लक्ष्मेश्वर येथें श्री. अण्णासाहेब लट्ठे यांचे अध्यक्षतेखालीं २८-२९ मे १९३२ रोजीं जें भरविण्यांत आलें, त्यावेळीं स्वागताध्यक्ष कै. गणपतराव अभ्यंकर यांनीं आपल्या भाषणांत घेतलेला आहे. तसेंच दरबारला कांहीं विधायक सूचनाही त्यांनीं आपल्या भाषणांत केल्या.या अधिवेशनांत नेहमींच्या मागण्यांबरोबरच नवीनच दिल्या गेलेल्या कायदेमंडळाबाबतही कांहीं मागण्या करण्यांत आल्या.

अशा रीतीनें दहा वर्षांत प्रजापरिषदेचीं सहा अधिवेशनें झालीं. या सहा अधिवेशनांत प्रजेच्या मागण्या कै. वामनरावजी पटवर्धन, कै. प्रो. गणपतरावजी अभ्यंकर प्रभृति संस्थानी प्रजाजनांच्या हितार्थ झटणाऱ्या पुढाऱ्यांच्या बहुमोल सल्ल्यानें मांडण्याची कामगिरी श्री. बा. वि. शिखरे, कै. डॉ. ना. वि. जोशी, रा. रा. ह. जयकर, श्री. बाबाण्णा धुळी प्रभृति मिरज प्रजेच्या नेत्यांनीं केलेली आहे. आणि अशा या प्रजापरिषदेची इतिश्री १९३२ सालीं झाली आणि गेल्या ७।८ वर्षांत मिरज प्रजाजनांनीं व त्यांच्या नव्या-जुन्या नेत्यांनीं आपलीं दुःखें वेशीवर टांगण्याचा प्रयत्न केला नाहीं. प्रजापरिषदेच्या रूपानें असलेली मिरज संस्थानच्या प्रजाजनांची संघटना अशा रीतीनें नाहींशी होऊन केवळ मिरज संस्थानच्या हितार्थ मनोभावें झटणारी अशी एकही संस्था जिवंत राहिली नाहीं व त्याचा परिणाम मिरजेबाहेरील चळवळी मिरजेंत सुरू होण्यांत झाला. अनेक छोट्या मोठ्या संस्था मिरजेंत निघाल्या व संस्थानी प्रजेच्या हिताच्या गोष्टी बाजूस राहून दुसरींच कामें मिरजेंत सुरू झालीं. प्रजापरिषदेसारखी एकादी संस्था मिरजेंत असणें हें जरूरीचें वाटत आहे. प्रजापरिषदेनें आपल्या चळवळी स्थगित केल्यानें लोकांच्या अडचणी दरबारच्या कानावर जाण्याचें एक महत्त्वाचें साधन नष्ट झालें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## पाणी ! पाणी !! पाणी !!!

मिरज शहराची कुप्रसिद्धि पाण्याच्या अभावामुळें झाली, हें वर आम्हीं एकदां म्हटलेंच आहे. राजकीय हक्काबद्दल मोठे लढे प्रजाजनांना

करावे लागतात, पण मिरज प्रजाजनांना राजकीय हक्कांप्रमाणेंच मुबलक पाणीपुरवठा मिळावा म्हणून मिरज दरबारशीं मोठा लढाच करावा लागला आहे. मिरज शहरांत भरपूर पाणीपुरवठा करण्यांत यावा म्हणून प्रजेतर्फे अनेक अर्ज, विनंत्या वगैरे सर्व न्याय्य मार्गांनीं मागणी केली गेली. पण निव्वळ अर्जविनंत्यांनीं दरबारचा अंतःकरण-पालट होऊं शकला नाहीं. प्रजापरिषदेच्या प्रत्येक अधिवेशनांतून ठरावरूपानें ही मागणी करण्यांत आली आहे. मिरजेंत त्या सुमारास इतकी दीन स्थिति होती कीं, भर उन्हांतून हातापायाला चटके बसतांना गांवांतील निरनिराळ्या हौदांवर किंवा विहिरींवर 'पाणी–पाणी' करीत शेंकडों स्त्रिया–मुलांना वणवण फिरावें लागत असे. त्यांच्या डोळ्यांतूनच काय, पण हृदयाचें पाणी होण्याची वेळ आली तरीसुद्धां घोटभर चांगलें पाणी मिळणें कठीण झालें होतें. हें पाणी मिळविणें म्हणजे एकादा "गड" सर करण्याइतकें कठीण होई! या पाण्याच्या 'स्वारी' वर निघालेल्या व्यक्तीला स्वतंत्र खास वेष करावा लागे. एक स्वतंत्र 'गाडी', 'दोर', खास 'डब्या'चें हत्यार वगैरे साधनांनीं सज्ज होऊन 'घागरगडचे सुभेदार' होण्याकरितां 'डॉन् क्विक्झोट' प्रमाणें स्वारीवर निघावें लागे. कित्येक लोकांना या पाण्याकरितां खरोखरी मारामाऱ्याही कराव्या लागल्या आहेत. ही सर्व परिस्थिति दरबारला दिसतच नव्हती असें म्हणणें अन्यायाचें होईल. पण त्याकरितां दरबारनें कांहींही सहानुभूति दाखविली नाहीं असें म्हणणें मात्र अन्यायाचें होणार नाहीं. प्रजेनें केलेल्या चळवळीबद्दल आपला दुराराध्य-पणा दाखवून एक तऱ्हेनें 'पाणी पाणी' करणाऱ्या प्रजेची हेटाळणीच केली गेली. लोक पैसा द्यावयाला तयार होते, मिशन् हॉस्पिटलमध्यें जव-ळच असलेल्या रेल्वेच्या सहाय्यानें कै. डॉ. वॉनलेस यांनीं पाण्याची सोय केली. त्यावेळीं त्यांनीं मिरज दरबारला सहकार्याबद्दल विचारलें होतें. पण कै. श्री. सर बाळासाहेबांची धीर गंभीर वृत्ति ढळूं शकली नाहीं. आणि या वृत्तीमुळेंच मिरजेंत भरपूर पाणीपुरवठा करण्याचा प्रश्न अद्याप त्रिशं-कुवत् लोंबकळत राहिला आहे. आणि "हा प्रश्न दरबारचा नसून म्युनिसि-

पालिटीचा आहे" असेंही उत्तर मिळू लागले आहे. कायदेमंडळातूनही याबद्दल मागणी झाली, तरी सुद्धा दरबारनें त्याबद्दल फारशी आस्था दाखविली नाही पण त्यानंतर श्री सर बाळासाहेब १९३७ साली जेव्हा 'राजा' या पदवीनें विभूषित झाले, त्यावेळीं 'या योजनेचा सहानुभूतिपूर्वक विचार करूं' असें आश्वासन मिळाले. पण कोण आड आलें कुणास ठाऊक! त्याच्या अतापर्यंतही पाण्याचा प्रश्न सुटला नाहीं. यामुळें मिरज शहराच्या लोकवस्तीवर, व्यापारावर व उद्योगधंद्यावर अत्यंत वाईट परिणाम झाला व एका दृष्टीनें मिरजेंतील जीवन म्हणजे पाणीच नसल्यानें 'मिरज असून नसून सारखेंच' अशी स्थिति झाली आहे

## छोटी बार्डोली

मिरजेसारखें छोटें संस्थानही कित्येक वेळा फारच मोठी कामगिरी करू शकतें, हें कांहीं काही प्रसंगीं दिसून येतें "Just as Bombay is the Gateway of India, so Miraj is the Gateway of the Southern Maratha Country" असें लँड रेकॉर्ड सुपरिंटेंडेंट श्री. मोडक यांनीं मिरज संस्थानच्या रिव्हिजन सर्वेच्या रिपोर्टांत म्हटलें आहे तें सर्वस्वीं खरे आहे.

मिरज संस्थानची सर्वे प्रथम १८९७–९८ साली झाली होती. त्यानंतर साठ वर्षांत सर्वे होऊन सारावाढ झालेली नाही. अर्थात्च त्या वेळेपावेतों कै. श्री. सर बाळासाहेब याना याबद्दल लोक दुवा देत व तेही याबद्दल अभिमानानें उद्गार काढीत पण दुर्दैव! ज्या कै सर बाळासाहेबांच्या साठ वर्षांच्या कारकीर्दींत सारावाढ आली नाहीं, त्याच्याच कारकीर्दींत जबर सारावाढ झाली या कामी पुण्याचे श्री. मोडक लँड रे. सु., सी. डी. यांची नेमणूक करून त्याच्या मदतीस मिरजेचे अधिकारी दिले. पण परस्थ तज्ञ व स्थानिक अनुभवी या दोघानीही आपली कामगिरी जबाबदारी ओळखून पार पाडली नाहीं. उलट बेजबाबदारीनें काम केल्यामुळें 'भावी लढ्या'-च्या 'रणांगणा'ची आखणीच या अधिकाऱ्यानी केली असे पुढें झालेल्या लढ्यावरून म्हणता येईल

मिरजेच्या प्रजाजनांची आर्थिक स्थिति अत्यंत हलाखीची होती. प्रजा-परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनाचे अध्यक्ष के. ग. र. अभ्यंकर आपल्या अध्यक्षीय भाषणांत म्हणतात, "आसपासचा सर्व मुलूख शांतता व सुधारणा यांनीं गजबजून गेला असतांना मिरज मात्र 'भिकार' म्हणून ओळखिली जावी ही लाजिरवाणी गोष्ट आहे." आमचा एक विनोदी मित्र म्हणतो, "बाजाराचे दिवशीं चार आण्यांपेक्षां जास्त पैशाचें लोणी घेणारा मनुष्य खचित मिरजेचा नव्हे. तो परका असावा अशी पक्की खूणगांठ बांधावी." यावरून मिरजेच्या लोकांची आर्थिक परिस्थिति कळून येणार आहे. उद्योगधंदे बसले, चांगलीं चांगलीं घराणीं बाहेरगांवीं गेलीं, शेतकरी लोक अनेक तऱ्हेचे हलके धंदे करून व स्वतःची उपासमार करून घेऊन मूळचा सारा कसातरी भरीत. बहुतेक सर्व खेडीं कर्जाच्या बोजांनीं वांकलेलीं होतीं. सरकारी कर्जानें कित्येक रयत बुडून गेले होते. बहुतेक जमिनी सावकारांच्या घशांत गेल्या होत्या. त्यांतून त्यांची सुटका करण्याचा कोणीही प्रयत्न केला नाहीं. अशी हीनदीन स्थिति रयतांची असतांनाच कै. सर बाळासाहेबांनीं कर्जकर्दमांत रुतलेल्या रयतांना संकटांत पाडलें! त्यांनीं मिरज संस्थानांत सारावाढ करण्याचें ठरविलें !!

मिरज संस्थानांत रिव्हिजन सर्व्हे सुरू झाल्यापासून ज्या ज्या सवलती व मुदती रयतांना मिळणें जरूर होतें, त्या त्यांना संस्थानाकडून मिळाल्य नाहींत. जमिनीची वर्गवारी व किंमती ठरवितांना, रयतांना आपलें म्हणणें कळविण्यास योग्य ती मुदत दिली गेली नाहीं व या आणि अशाच बाबतींत गरीब रयतांवर अन्याय झाला. सारावाढ करतांना श्री. मोडकसाहेबांनीं निराधार विधानें करून जबर वाढ केली. त्याला कांहींच प्रमाण नाहीं. मिरज तालुक्यांत ५९·४ टक्के, लक्ष्मेश्वर ६०·३ टक्के, मोडनिंब ५०·६६ टक्के अशा सारावाढीच्या तीन तऱ्हा आहेत. कांहीं कांहीं गांवांवर तर ७५ ते ७८ टक्के सारावाढ झालेली आहे. मिरज संस्थानची लोकसंख्या वाढली

आहे असें दाखवितांना पार्शी व युरोपियनांची त्यांत भर घालण्यांत आली आहे. दळणवळणाच्या बाबतींतही मिरज फारच सुधारलें आहे असें दाखविण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे. येवढेंच नव्हे तर, त्यावेळचे मिरज तालुक्यांतील रस्ते फारच चांगले आहेत असें विधानही करण्यास श्री. मोडकसाहेब कचरले नाहींत. बाजारांच्या बाबतींतही तशींच विधानें आहेत. बागाईत शेती करण्यास पाण्याची आवश्यकता असते, पण मिरज तालुक्यांत पावसाचे अभावीं पाण्याची टंचाई व दुष्काळामुळें विहिरी कोरड्या ठणठणीत पडल्या असतांनाही श्री. मोडकसाहेबांनीं रिपोर्टांत बागाईत क्षेत्रफळही वाढलेलें आहे असें दाखविलें आहे. व्यापार-उद्योग-धंद्यांचीही हीच गोष्ट. 'शिक्षणाच्या अभिवृद्धीकरितां दरबार आपल्या प्रयत्नांची शिकस्त करीत असल्याचें आढळून येत आहे' असेंही श्री. मोडकसाहेबांनीं विधान करण्यास कमी केलेलें नाहीं. अशा रीतीनें अगदीं धडधडीत वस्तुस्थितीस सोडून असलेलीं विधानें श्री. मोडकांनीं आपल्या रिपोर्टांत घुसडलीं असून जबर सारावाढीचा डोंगर या कच्च्या पायावर उभा केला.

## सारावाढीमुळें असंतोष

अशा तऱ्हेचा अन्याय झाला असतां दुबळी रयत असली तरी स्वस्थ बसणें कसें शक्य होतें? मिरज संस्थानच्या पुढाऱ्यांनीं व कार्यकर्त्यांनीं हा अन्याय चव्हाट्यावर मांडण्याचें ठरविलें व त्या दृष्टीनें त्यांचे प्रयत्न चालू झाले. यापूर्वी प्रजापरिषदेच्या तिसऱ्या अधिवेशनांत "हल्लीं मिरज संस्थानची रि. सर्व्हे चालू आहे. त्यामुळें जमीनधाऱ्याचा बोजा वाढण्याचा संभव आहे. परंतु सध्यांच्या खालावलेल्या परिस्थितींत ही नवी वाढ होऊं नये अशी प्रजाजनांची मागणी आहे. तिचा अव्हेर श्रीमंतांनीं करूं नये व ही वाढ न करण्याचें अभिवचन श्रीमंतांनीं वेळोवेळीं दिलें आहे तें खरें करून दाखवावें अशी या परिषदेची विनंति आहे," असा ठराव करून रयतेनें दयाळू राजाकडे मागणी केली होती. पण या आशा

व कल्पना फोल झाल्या. कै. श्री. राजेसाहेबांनीं साठ वर्षांत सारावाढ झाली नाहीं या सबबीवर जबर व अन्यायाची सारावाढ केली. श्री. शिखरे, कै. डॉ. ना. वि. जोशी यांनीं या अन्यायाचें लोण खेड्यापाड्यांतून पोंचविलें. शेतकऱ्यांना होणारा अन्याय समजावून दिला व तो अन्याय दूर व्हावा म्हणून श्री. सर बाळासाहेबांकडे रयतांच्या शेंकडों सह्या मिळवून अर्ज केले. पण परिणामीं कांहींच झालें नाहीं. अनेक सभा भरवून त्यांनीं रयतेंत जागृति करण्याचा सपाटा चालविला. पण यावेळीं दरबारी अधिकारी दडपशाही करण्याच्या तयारींत होते. त्यांनीं जागृति होऊं नये म्हणून सभाबंदी केली. पण यामुळें रयतांतील असंतोष कमी न होतां उलट वाढला व तो मिळेल त्या मार्गानें बाहेर पडूं लागला. रयतेची अशी मुस्कटदाबी होतांच तिसऱ्या प्रजापरिषदेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष दे. भ. बाबूराव गोखले यांनीं श्री. राजेसाहेबांना लोकप्रतिनिधींच्या शिष्टमंडळाची मुलाखत घेण्यास तारेनें विनंति केली. पण दरबारचा आतां तोल सुटत चालला होता. अर्जविनंत्या निष्फळ ठरल्या. लोकमत सभांद्वारें जाहीर करण्यास बंदी झाली. तथापि अनेक इंग्रजी-मराठी वृत्तपत्रांतून या सारावाढीविरुद्ध अनेक वेळ तक्रारी प्रसिद्ध झाल्या. पण दरबारनें तिकडे लक्ष दिलें नाहीं. रयतांचीं पावलें पुढेंच पडत होतीं.

## शिष्टमंडळास नकार

अखेर प्रजापरिषद भरवून ह्या अन्यायी सारावाढीविरुद्ध प्रजाजनांचें मत व्यक्त करण्याचें निश्चित झालें. पण सारावाढीविरुद्ध रयतांनीं ब्र काढूं नये, अशी दरबारची मनीषा असल्यानें परिषदेचे अध्यक्ष संस्थानाबाहेरचे तर नकोतच, पण संस्थानांतले सुद्धां अमूकच गृहस्थ असावेत असा ‘ सुलतानी ’ दंडक दरबारनें घातला व प्रजेच्या नेत्यांनीं तो दंडक अगदीं तंतोतंत पाळून श्री. गोविंदरावजी रानडे वकील यांना चवथ्या अधिवेशनाचे अध्यक्ष करून आपलें सारावाढीविरुद्ध लोकमत जाहीर करण्याचा कार्यभाग साधला. या अधिवेशनाचे वेळीं कांहीं ‘जास्त प्रकार’

होणार अशी साधार शंका येत होती. कारण, त्यावेळीं दरबारचे पोलीस 'हातकड्यां' सह परिषदस्थानीं हजर होते. अखेर अशा वैभवांत प्रजापरिषदेचें चवथें अधिवेशन ता.९-९-१९२८ रोजीं मोठ्या उत्साहानें पार पडलें. सारावाढीबाबत झालेल्या अन्यायाबद्दलच्या मुख्य ठरावावर दे. भ. दा. वि. गोखले, कै. डॉ. ना. वि. जोशी, श्री. माधवराव आठवले ( सांगली ) प्रभृतींचीं मुद्देसूद, निर्भीड मतें मांडणारीं भाषणें झालीं. सरकारी व लोकनियुक्त अशा मिश्र सभासदांची एक कमिटी नेमून दरबारनें चौकशी करावी अशी मागणी करण्यांत आली होती. परिषदेचे ठराव सरकारला व खेड्यापाड्यांतील हजारों रयतांना कळविण्याची कामगिरी कार्यकर्त्यांनीं हातीं घेतली. दरबारनें प्रजापरिषदेच्या या ठरावाला मुळींच मानलें नाहीं. उलट, प्रजेलाही हे ठराव कळूं नयेत या हेतूनें सभाबंदी केली. पण कार्यकर्त्यांनीं खासगी सभा करून प्रजापरिषदेचा संदेश खेडोपाडीं पोंचविला. या सर्व कामगिरींचें श्रेय श्री. वा. वि. शिखरे व श्री. पुंडलीकजी कातगडे यांना आहे. सभाबंदीचा दरबारचा डाव अशा तऱ्हेनें हुकला आणि शेतकरीवर्ग जागृत झाला. त्यांना मिरज दरबारच्या कारवाया समजूं लागल्या. दरबारनें चौकशी करण्याच्या ठरावाला धुडकावल्यानें, लोकांनीं चौकशी करून त्याचा रिपोर्ट श्री. सर बाळासाहेबांकडे करावा अशी कल्पना पुढें आली. त्याप्रमाणें श्री. पुंडलीकजी कातगडे यांनीं पुढाकार घेऊन चौकशीचें काम चालूं केलें; तसेंच दरबार परिषदेच्या ठरावांचा काय विचार करणार आहे हें समजून घेण्याकरितां कै. श्री. सर बाळासाहेब व त्यावेळचे युवराज श्री. तात्यासाहेब यांचेकडे एक शिष्टमंडळ पाठविण्याचें ठरलें. या शिष्टमंडळामध्यें दे. भ. दा. वि. गोखले, कै. अ. वि. पटवर्धन, सर्व्हंट ऑफ इंडियाचे संपादक श्री. श्री.ग.वझे, परिषदेचे अध्यक्ष श्री.गो. म. रानडे वकील, श्री.वा. वि. शिखरे, श्री. पुंडलीकजी कातगडे व मालगांवचे नेते श्री. बाबण्णा धुळी, इतकी मंडळी होती. या मंडळींनीं खेड्यापाड्यांतून हिंडून सर्व परिस्थिति अवलोकन केली व शिष्टमंडळ भेटीस निघालें. इतक्यांत "डेप्युटेशन म्हणून

या मंडळीची भेट घेऊं इच्छित नाहीं. गोखले–पटवर्धन–रानडे या तिघां-च्याच खासगी व्यक्ति या नात्यानें भेट घेऊं" असें दरबारकडून कळविण्यांत आलें. पण त्यानंतर थोडीशी वाटाघाट होऊन प्रथम वरील तिघांची व नंतर शिष्टमंडळाची भेट घेऊं असें कळविण्यांत आलें. श्री. युवराजांची भेट झाली. तथापि कै. श्री. बाळासाहेबांनीं भेट घेण्याचें नाकारलेंच ! या शिष्टमंडळाच्या कामाचा निकाल ऐकण्याकरतां खेड्यांतून शेंकडों रयत आलेले होते. पण त्या सर्वांच्या पदरीं निराशा पडली. त्यांना हा प्रकार पाहून महदाश्चर्य वाटलें. एवढेंच नव्हे तर, या शिष्टमंडळाच्या मंडळींना जाहीर व्याख्यान देण्यास दरबारनें परवानगी नाकारून प्रजाजनांचा अपमान करण्याच्या बाबतींतील उच्चांक पटकावला. हा जुलूम पाहून कोणाही शांतवृत्तीच्या मनुष्यास सात्त्विक संताप आला असता. असो. दरबारनें जरी भाषणबंदी केली तरी खासगी रीतीनें पुढाऱ्यांच्या व गरीब रयतेच्या गांठीभेटी व बोलण्यीं झालीं व भावी संकटास शांततेच्या व न्यायमार्गानें तोंड देण्याचें ठरलें. इकडे प्रजेची जसजशी एकजूट होत चालली, तसतसा दरबारचा पारा वाढत चालला व ही एकजूट फोडून प्रजेची चळवळ दडपण्याचा दरबारचा हेतु सुस्पष्ट झाला. प्रजेच्या नेत्यांनीं आपली सनदशीर वृत्ति अखेरपर्यंत सोडली नाहीं. सभा, संमेलनें, अर्ज, विनंत्या, शिष्टमंडळें, ठराव वगैरे अनेक सनदशीर शस्त्रें प्रजेनें उपयोगांत आणलीं, तरी दरबारचा अहंकार कमी होण्याचें चिन्ह दिसेना. उलट दरबारची वाढती दडपशाहीची वृत्ति दिसूं लागली व या दरबारच्या कृतीमुळेंच प्रजेला सत्याग्रहाचें अमोघ अस्त्र उपसावें लागणार असें वाटूं लागलें व अखेर मिरज दरबारनें शेतकरीवर्गाला करबंदीची चळवळ करा-वयास बेपर्वाईनें आव्हान दिलें !

कै. श्री. सर बाळासाहेबांच्या 'हिराबाग' बंगल्याच्या द्वारीं धरणें धरून बसून सारावाढीचा अन्याय दूर करून घेण्याचें शेतकऱ्यांनीं ठरविलें. पुढारी मंडळींनीं हा कृतनिश्चय खेडोपाडीं जाऊन कळविला व जोराची

तयारी केली ता.४-११-२८ रोजीं मिरज तालुक्यातील बहुतेक सर्व खेड्यांतील रयत जमावानें शेतकरी कै. श्री नरसाळासाहेबांचे पुढें धरणें धरून बसण्याकरिता निघाले. त्यांच्या बरोबर श्री वा. वि शिखरे,श्री पुटलीकजी, कै डॉ जोशी, वाईचे श्री. भय्याशास्त्री वाटवे, श्री बाबण्णा धुळी, सर्व्हंट ऑफ इंडियाचे उपसंपादक श्री दत्तोपंत आवेकर, वगैरे मंडळी होती. श्री. नर बाळासाहेबांनी, "उद्या सोमवारीं मी वाड्यात भेट घेईन" असें उत्तर पाठविलें पण येवढ्या उत्तरानें कुणाचेंही समाधान होणें शक्य नव्हतें कारण अधिकारी मंडळींनी शेतकरीवर्गाची समजूत काढण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. थोड्या धमक्याही दिल्या, पण शेतकरी मंडळी त्याना मुळींच दाद देईनात, अखेर निरनिराळ्या गावचे पुढारी व श्री. पुंटलीकजी कातगडे ही मंडळी श्री. बाळासाहेबाच्या भेटीस गेली. श्री पुटलीकजी यांनीं "सारावाढीच्या बाबतींत जो अन्याय झाला आहे त्याची चौकशी करावी. त्याकरता एक कमिटी नेमावी त्यात निम्मे सभासद लोकनियुक्त व निम्मे सरकारनियुक्त असावेत चौकशीअतीं जें ठरेल तें मान्य करण्यास रयत तयार आहे" असें स्पष्टपणें म्हटलें. यावर कै.श्री. बाळासाहेबांनीं, "मी असली कमिटी नेमावयास कधींही तयार होणार नाहीं. मग काय करावयाचें असेल तें करील मीही तसा निश्चयी आहें" असें बेपर्वाईचें अहंकारनिदर्शक उत्तर दिलें यावेळीं कै. श्री बाळासाहेब व श्री. पुटलीकजी याची बरीच 'खटाजगी' झाली व अखेर "श्रीमंत सरकार स्वत: व पुटलीकजी मिळून प्रत्येक गावात जाऊन चौकशी करूं व हें चौकशीचें काम पूर्ण होईपर्यंत तरम जाहीर केला जाणार नाहीं" असें ठरलें. हें वचन राजेसाहेबानीं शेंकडों रयतापुढें उभें राहून दिल्यामुळें सर्व रयत उठले व आपापल्या गांवीं परत गेले

श्री. पुटलीकजींनीं दुसऱ्या दिवसापासून चौकशीसबधीं काम करण्यास सुरवात केली. कागदपत्रें पाहण्यास आरंभ केला. पण ही चौकशीची भानगड उधळण्याचा काहीं अधिकाऱ्याचा डाव उघडपणें दिसून येऊ लागला. यावेळीं श्री. युवराज तात्यासाहेब राजकारणांत थोडें थोडें

लक्ष घालूं लागले होते. त्यांनीं श्री. वा. का. जोशी, श्री. गो. म. रानडे, श्री. अ. द. दातार, श्री. भा. वा. मराठे व श्री. रा. धों. शिराळकर या वकील-पंचकास गांठलें व सध्यांच्या चळवळीबाबत विचारविनिमय सुरू केला. श्री. रानडे वकील हे वास्तविक प्रजापरिषदेचे अध्यक्ष, पण 'व्यक्ती' या नात्यानें त्यांनीं त्यांत आपले हात अडकून घेतले व या वकील मंडळींनीं कुणालाही न विचारतां एका बैठकींत ४० टक्के सारावाढीस सम्मति देऊन पुढील प्रकरणाचा पाया घातला गेला. या ४० टक्के सारावाढीस सम्मति देतांना ( १ ) स्वतंत्र हायकोर्टाची स्थापना, ( २ ) पाण्याचा पुरवठा, ( ३ ) मोफत प्राथमिक शिक्षण, ( ४ ) व जबाबदार राज्यपद्धति या चार गोष्टी जमेस धरल्या होत्या म्हणे ! कै. श्री. सर बाळासाहेबांनींही या लोकांच्या तडजोडीस घाईघाईनें मान्यता दिली. व ही तडजोड वर्तमानपत्रांतून एकदांची जाहीर करण्याचें कारस्थान करण्यांत आलें, पण तें मात्र फसलें !

इकडे श्री. पुंडलीकजी कातगडे चौकशी-कमिटीच्या कामकाजाची तयारी जोरांत करीत होते, तर तिकडे कमिटी उधळण्याची 'तडजोड' (?) देखील झाली. कै. श्री. सर बाळासाहेबांनीं शेंकडों शेतकऱ्यांपुढें उभें राहून दिलेलें वचन मोडलें व श्री. पुंडलीकजींना धुडकावून लावलें. हें कै. श्री. सर बाळासाहेबांचें प्रजावात्सल्य, एकवचनीपणा पाहून दुःख झालें ! इतका प्रकार दरबारकडून चालूं असतांना देखील रयतांनीं आपली शांतवृत्ति सोडली नाहीं. त्यांनीं मिरज दरबारला ताळ्यावर आणण्याकरितां सत्याग्रह व जरूर तर करबंदी करण्याचें ठरविलें व त्याची पूर्वतयारी जोरांत चालूं झाली.

शेतकऱ्यांचा सत्याग्रहाचा दृढनिश्चय पाहून दरबारनें तो यशस्वी होऊं न देण्याचा चंग बांधला. पण त्यांचे सर्व अन्यायी उपाय हरले व अखेर ता. १५।११।२८ या दिवशीं मिरज तालुक्यांतील चार हजार रयतांनीं पुन्हां श्री. सर बाळासाहेबांचे पुढें धरणें धरून सत्याग्रह करण्यास

सुरवात केली. रयतेनें सत्याग्रहाचें रणशिंग फुंकलें! दरबार दिङ्मूढ झाला. हें सत्याग्रह युद्ध पाहण्याकरितां पुण्याहून श्री. दा. वि. गोखले, कै. अ. वि. पटवर्धन, श्री. ग. वि. केतकर वगैरे मंडळी मिरजेस आली होती.

रयतांमध्यें फूट पाडून सत्याग्रह–युद्ध बंद पाडण्याचे प्रयत्न चालूं झाले. पण त्या अभेद्य किल्ल्याला दुहीचें खिंडार पडलें नाहीं! ब्राह्मण-ब्राह्मणेतरवादाचें भूतही उठविण्यांत आलें! पण सत्याग्रहींच्या बाजूला चांगले मांत्रिक असल्यानें त्या भूताच्या लीलांचा कांहींच उपयोग झाला नाहीं!! मिरजेंतील कांहीं व्यापारी म्हणविणाऱ्या राजनिष्ठांनीं पत्रकें काढून या सत्याग्रहाला ग्रहण लावण्याचे प्रयत्न केले; पण अनेक प्रजानिष्ठ व्यापाऱ्यांनीं तावडतोब जाहीर पत्रकें काढून व हरताळ पाळून या सत्याग्रहास पाठिंबा दिला व राजनिष्ठांचे प्रयत्न हाणून पाडले. मिरज संस्थानच्या व बाहेरच्या नागरिकांनीं यावेळीं या सत्याग्रहास सहाय्य दिलें. अनेक मराठी व इंग्रजी वृत्तपत्रांनीं प्रजेला पाठिंबा दिला. पण मिरज दरबारला, दारांत सात दिवसपर्यंत धरणें धरून बसलेल्या प्रजेकडे पाहण्याचें धाडस व इच्छा झाली नाहीं, मग मागण्या वा म्हणणें ऐकण्याचें दूरच! अखेर सर्व शेतकऱ्यांनीं जागा सोडून निघून जावें असे हुकूम काढले गेले व ते रयतांनीं अक्षरशः पाळले व जागा सोडून त्यांनीं सत्याग्रह थांबविला. तथापि "वाढलेला सारा देण्याचें आमच्यांत त्राण नाहीं" असें त्यांनीं पत्रक काढून राजेसाहेबांना कळविलें.

## प्रजेचें खडखडीत उत्तर

सत्याग्रह संपला व श्री. युवराज यांनीं चौकशीचा फार्स सुरू केला. पण प्रत्येक गांवीं रयतांनीं 'श्री. सरकारनीं मागें सांगितल्याप्रमाणें श्री. पुंडलीकजी यांचेबरोबर जर चौकशी होईल तर आम्ही आमचें म्हणणें मांडूं' असें स्पष्ट कळविलें. त्यामुळें श्री. युवराजांचीही कामगिरी अगदीं अल्पावधींत संपुष्टांत आली. इकडे श्री. सर बाळासाहेबांनीं 'टाईम्स' पत्राच्या प्रतिनिधीला मुलाखत देऊन बेछूट विधानें केलीं व त्यांत त्यांनीं

"चौकशी करीन असें मी बोललों होतों,पण कोणतेंही वचन दिलें नव्हतें" असें बेधडक सांगितलें. "प्रजा माझी व मी प्रजेचा आणि त्यांचीं गाऱ्हाणीं दूर करण्याकरतां शक्य ते सर्व प्रयत्न करीन" असे उद्गार काढण्यासही त्यांनीं कमी केलें नाहीं. पण त्याच वातमीदारानें श्री. पुंडलीकजी कातगडे यांची मुलाखत घेतली. त्यांत त्यांनीं श्री. सर बाळासाहेबांच्या प्रत्येक विधानाचा खरपूस समाचार घेतला व "श्रीमंतांच्या अभिवचनानुसार चौकशी केली न जाईल, तर रयत बहुधा एक पैही सारा देणार नाहीं" असें खणखणीतपणें बजावलें.

या चळवळीच्या प्रसंगीं एक मोठा चमत्कार घडला. तो म्हणजे सत्याग्रह-प्रकरणांत रयतेच्या हिताची काळजी वहाणारे व अनाहूतपणें चाळीस टक्के सारावाढीस सम्मति देणारे श्री. बाबूराव काशिनाथ जोशी वकील हे या आंदोलन-प्रसंगीं मिरजेचे गृहस्थच आतां सरकारपक्षांत सामील होऊन प्रजेविरुद्ध दंड थोपटून उभे राहिले. त्यांच्या स्नेह्यांनींही पगडी फिरवून त्यापुढें ह्यांचाच पाठपुरावा करण्याचें घातकी धोरण स्वीकारल्यानें प्रजेच्या चळवळीस मोठाच धक्का बसला. सरकारनें श्री. बाबुराव जोशी यांना याचवेळीं कारभारी नेमून आपला डाव साधला. प्रजेला जोरानें चळवळ करणें भाग होतें. त्यांना करबंदीची चळवळ करावयाची असल्यानें त्या दृष्टीनें श्री. पुंडलीकजी कातगडे यांनीं धोरणें आंखलीं व बहुतेक वृत्तपत्रांनीं मिरज दरबारावर टीकेची झोड उठविली. रयतांची तयारी जसजशी होत चालली, तसतशी नव्या कारभारीसाहेबांनीं दडपशाहीचा वरवंटा फिरविण्यास सुरवात केली. तडजोड करावयाचीच ठरल्यास २५ टक्के वाढ कबूल करण्यास हरकत नसावी असें रयत पुढाऱ्यांनीं पूर्ण विचारांतीं ठरविलें व तसे पंचही निवडले. अखेर श्री. मा. रा. देशपांडे, बा. सा. धुळी, कृ. रा. कानडे, बा. बा. पाटील, व आ. इं. इंगवले या पंचांनीं श्री. सर बाळासाहेबांची भेट घेण्याचे प्रयत्न चालविले, पण "आम्हीं चळवळीच्या पुढाऱ्यांशीं संबंध ठेवला ही आमची चूक झाली. आतां त्यांच्याशीं आम्ही संबंध ठेवणार नाहीं" असें श्रीमंतांनीं या पंचां-

करून प्रथम लेखी आश्वासन मागितलें. व तें आश्वासन आम्ही प्रथम प्रसिद्ध करणार आणि नंतर 'सरकार, आहे तो वाढलेला सारा तसाच कायम देखील ठेवतील' असा विचित्र निरोप या मंडळींना पाठविला. कारभाऱ्यांनीं जाहीरपत्रक काढून दाखविलेली तडजोडीची वृत्ति खोटीच होती कीं काय असें या पंचांना वाटूं लागलें. पण अखेर पुन्हां वाटाघाटींना सुरवात झाली. बऱ्याच भानगडी झाल्यानंतर पुढीलप्रमाणें तडजोड ठरली:–

१. ओरिजिनल सर्व्हेचे आकारापेक्षां रिव्हिजन सर्व्हेमध्यें जी वाढ झाली आहे, त्या वाढीपैकीं शें. २५ टक्के प्रमाणें माफ करून बाकी वाढ ओरिजिनल आकारासह वसूल करावी.

२. चालूं सन १३३८ फसली एक साल रिव्हिजन सर्व्हेमध्यें झालेल्या वाढीपैकीं ३५ टक्के रक्कम वसूल करावी. सन १३३९ फसली सालापासून कलम १ यांत ठरल्याप्रमाणें सर्व आकार सालदरसाल मुदतीअखेर वसूल करावा.

३. पाटस्थळ व मोटस्थळ वगैरेसारख्या ज्या वैयक्तिक तक्रारी असतील, त्याबद्दलचा विचार अलाहिदा करण्यांत येईल. सदरहू विचार होईपर्यंत तक्रारी असलेल्या लोकांपुरताच रिव्हिजन सर्व्हेमध्यें वाढलेला सारा तह-कूब ठेवण्यांत येईल.

वरील अटीवर ता. १९।१२।१९२८ रोजीं तडजोड झाल्याचें जाहीर-नामा काढून प्रसिद्ध करण्यांत आलें.

तडजोड झाली, तरी रयतेच्या तक्रारी चालू होत्याच. तडजोडीला रयत जागले. पण दरबारची वृत्ति पालटली नाहीं. तडजोडीस रयतांची मान्यता मिळविण्याकरितां श्री. पुंडलीकजी कातगडे खेड्यांतून व्याख्यानें देणार होते, परंतु त्यांना परवानगी देण्यांत आली नाहीं. दरबारचीं कारस्थानें चालूं होतींच. शक्यतितक्या तक्रारी कमी याव्यात अशी तजवीज करण्यांत आली त्यावेळीं अधिकारी व रयत

यांच्या चकमकी वारंवार उडत. तक्रारीबाबत होणारा अन्याय श्री. सरकारपुढें नेण्याचा पंचांनीं प्रयत्न चालविला, पण त्यांना तरी आतां कोण विचारणार ? अशा तऱ्हेनें वैयक्तिक तक्रारींचीं तोंडें बंद झालीं. पंचांनीं अपेक्षेबाहेर तडजोड केल्यानें रयतही नाखूष झाली. ही परिस्थिति पाहून अधिकाऱ्यांनीं तडजोडीच्या अटी पाळल्या नसल्यास नवल नाहीं. रयतांची संघटना खिळखिळी झाली होती. दरबारच्या दृष्टीनें हा मोठा विजयच होता. अधिकाऱ्यांची अरेरावी रयत सहन करीत होते व अशा कुंचबणेंत आणि कुजक्या वातावरणांतच ही चळवळ विराम पावली. रयतेनें निकरानें लढा लढविला, त्यांची प्रतिष्ठा वाढली, पण सरतेशेवटीं लोभी आणि कठोर अंतःकरणाच्या सरकारच्या हातून सूट अशी बेताचीच मिळाली. वैयक्तिक तक्रारी लोंबकळत राहिल्या. अन्याय पुरवला पण झगडा नको अशी वृत्ति गरीब रयतेच्या अंगांत मुरूं लागली. अशा रीतीनें मिरजेच्या इतिहासांत ज्याचा अग्रभागीं उल्लेख करावा लागेल अशा सुवर्णमय सत्याग्रह-युद्धांत वा सारावाढीच्या प्रकरणांत 'मी प्रजेचा व प्रजा माझी' असें म्हणणाऱ्या कै. श्री. सर बाळासाहेबांची खरी पारख झाली व त्यांचें प्रजाप्रेम हिणकस ठरलें.

## कायदेभंग.

सारावाढप्रकरणामुळें ज्याच्या त्याच्या तोंडीं मिरज संस्थान झालें; त्याप्रमाणेंच सभाबंदीच्या कायद्यानेंही प्रसिद्धी मिळविली. १९३० सालच्या ब्रिटिश हद्दींतील चळवळीची झळ संस्थानांनाही लागली व त्या संस्थानांत मिरज संस्थानही सांपडलें. कारण सभाबंदीच्या कायद्याचें हत्यार आजपर्यंत मिरज दरबारनें आपल्या हातीं ठेवून प्रजेची मुस्कुटदाबी करण्याकरितां त्याचा अनेक वेळां उपयोग करून घेतला होता. या कायद्याविरुद्ध प्रजेनें अनेक वेळां ठराव करून असंतोष प्रगट केला होता. पण दरबारनें तिकडे मुळींच लक्ष दिलें नव्हतें. याच वेळीं पुण्याचे त्या वेळचे युवक संघाचे प्रमुख कार्यकर्ते श्री. दिनकर वासुदेव दिवेकर यांचे

व्याख्यानास मिरज दरबारनें परवानगी नाकारली. तथापि मिरजेचे त्या वेळचे प्रमुख कार्यकर्ते श्री. बा. वि. शिखरे यांनीं सभाबंदीच्या कायद्याच्या अडसरास या वेळीं झुगारण्याचा निश्चय केला. त्यांनीं प्रथम टाऊन हॉलच्या मैदानावर व्याख्यान करण्याचा प्रयत्न केला. पण अधिकारीवर्गानें तेथें सभा भरून दिली नाहीं अखेर श्री. शिखरे यांनीं ओढ्याच्या वालुकामय मैदानावर सभा भरवून श्री. दिवेकर यांचें व्याख्यान केलें. श्री. शिखरे अध्यक्षस्थानीं होते. दरबारनें श्री. शिखरे यांचेवर खटला भरला व त्यांत त्यांना २०० रु. दंड, व दंड न दिल्यास २० दिवसांच्या तुरुंगवासाची शिक्षा ता. ५-७-१९३० रोजीं झाली. मुख्य व्याख्याते श्री. दिवेकर यांना मात्र याबद्दल दरबार कांहींच करूं शकलें. नाहीं. श्री. शिखरे यांनीं कारावास भोगला. तरी इतर लोकांनीं 'कायदेभंगा'चें सत्र चालू ठेविलें होतें. या सत्रांत शिखरे यांचे बंधू श्री. पंडितराव शिखरे, कै. डॉ. ना. वि. जोशी, दा. मो. भट, सांगलीचे कै. विष्णुपंत राजवाडे, विठ्ठलराव जोशी प्रभृति अनेक मंडळींनीं भाग घेतला. या सर्व मंडळींना दरबारनें कोणतीही हरकत घेतली नाहीं. अशा रीतीनें श्री. बाळकृष्णपंत शिखरे यांनीं मोठ्या धडाडीनें सभाबंदीच्या अभेद्य तटास धडक देऊन खिंडार पाडलें व वरील वीर त्यांतून कांहींही त्रास न होतां पार पडले. पण श्री. शिखरे यांच्या वनवासास आतां कोठें सुरवात होणार होती. त्यांनीं गणेशोत्सवांत 'स्वदेशी' संबंधीं व्याख्यानें देण्याचें ठरविलें. पण दरबारनें पुन्हां विघ्नें उत्पन्न केलीं. अस्पृश्यांना 'मत्त' बनवून हलग्या-ढोल बडवून व्याख्यानें बंद पाडण्याची नवीन कल्पना एका अधिकाऱ्यांनीं काढली व तिचा अम्मल तत्काळ चालूं झाला. अशा रीतिनें यावेळीं मिरज दरबारनें 'वारा प्याल्या' प्रमाणें आपलें वर्तन ठेविलें होतें. मिरजेंत त्यावेळीं प्रचंड प्रभात फेऱ्या, मिरवणुकी निघत. पण अखेर श्री. शिखरे यांचेवर पुन्हां खटले भरण्यांत आले. मिरज तालुका काँग्रेस कमिटी बेकायदा ठरविली. अनेक झडत्या झाल्या. परस्थांचा जुलमी कायदा लावण्यांत आला आणि मिरज संस्थाननें 'जुलूमशाही' चालूं केली.

श्री. शिखरे मिरजेंतून सांगलींत गेले. मिरज दरबारनें रुद्रावतार धारण केला व प्रजेला पूर्वींपेक्षांही जास्त दावाखालीं चिरडलें. श्री. शिखरे मिरजेहून गेले व त्यामुळें मिरजेंतील प्रजाजनांच्या हिताकरितां काळजी वाहणाऱ्या मंडळींची जूट जी एकदां मोडली, ती मोडलीच. श्री. शिखरे आतां परत मिरजेस आले तरी ती जूट पुन्हां स्थापन होणें अशक्य होऊन बसलें आहे. आणि मिरज संस्थानांतील राजकीय जीवन आज मृतवत् झाल्याचें शोचनीय दृश्य दृष्टीस पडत आहे.

## नवा हक्क

फेडरेशनमध्यें सामील होण्याचे प्रसंगीं स्वतःच्या प्रजेच्या तोंडावर कांहीं तुकडा टाकण्याचे हेतूनें कांहीं संस्थानिकांनीं कायदेमंडळाचें दान केलें. त्या संस्थानिकांत मिरज संस्थानिकही सांपडले. व 'लोक आमचे-कडे आले नाहींत, तथापि आम्ही आमचें कर्तव्य करीत आहों,' असें प्रजेला कायदेमंडळाचें दान करतांना 'मी प्रजेचा व प्रजा माझी' अशी वारंवार आठवण करून देणाऱ्या मिरजेच्या अधिपतींनीं उद्गार काढले आहेत. १९२२ सालापासून प्रजेतर्फें जबाबदार राज्यपद्धतीची मागणी चालविली असतांना तिकडे दुर्लक्ष्य करून कै. श्री. बाळासाहेबांसारख्या राजानें असले उद्गार काढावेत हें महदाश्चर्य नव्हे काय? असो. असें आपणहून 'दान' दिल्याची घोषणा केली खरी, पण तें दान किती 'पवित्र' आहे बरें! कायदेमंडळाची घटना सदोष आहे, त्यांत प्रजेचें बहुमत नाहीं, या कायदेमंडळाच्या कामाबद्दल श्री. बाळासाहेब व त्यांचे अधिकारी निरुत्साही असतात, एवढेंच नव्हे तर, नियमाप्रमाणें एक-दांही बैठक भरली गेली नाहीं. त्यांतील पास झालेल्या ठरावांना केराची टोपलीच दाखविण्यांत आली. अशी तुसडी वृत्ति आजपर्यंत मिरज दरबारनें या पवित्र कायदेमंडळाबाबत दाखविली आहे. असें हें पवित्र दान १४ जुलै १९३१ रोजीं म्हणजे प्रजेच्या मागणीनंतर अंदाजें नऊ दहा वर्षांनीं अगदीं बुरसलेल्या स्थितींत पदरीं पडलें. या कायदेमंडळाचें पहिलें अधिवेशन

ता.२०।९।१९३२ रोजीं भरलें, तर दुसरें अधिवेशन ता.१५।१।१९३४ रोजीं भरविण्यांत आलें; तिसरें अधिवेशन दीड वर्षानंतर ता. २५।६।१९३५ रोजीं भरलें. चवथें अधिवेशन मध्यंतरीं सव्वा दोन वर्षांचा काल लोटल्या-नंतर म्हणजे ता.२२।११।१९३७ रोजीं एकदांचें भरविण्यांत आलें आणि पांचवें अधिवेशन पुन्हां जवळ जवळ दोन वर्षांची विश्रांति घेऊन ता. २२।९।१९३९ रोजीं भरविण्यांत आलें. यावरून कायदेमंडळाचीं अधिवे-शनें भरविण्याबाबत मिरज दरबारनें किती दिरंगाई, टाळाटाळ व नियम-भंग केला आहे हें दिसून येईल. या कायदेमंडळांत आजपर्यंत सभा-बंदीचा कायदा रद्द करणें, परस्थाचा कायदा काढणें, काँग्रेसवरील बंदी उठ-विणें, सक्तीचें प्राथमिक व मोफत शिक्षण करणें, पाण्याचा भरपूर पुर-वठा करणें, शेतकऱ्यांची आर्थिक परिस्थिति सुधारणें, व्यापारास उत्तेजन देणें, वगैरे अनेक महत्त्वाचे ठराव पास झाले. पण त्यांतील किती ठरावांना दरबारनें मान्यता दिली, हें पाहिलें असतां ‘ नास्ति ’ पक्षीं उत्तर द्यावें लागेल.

## पुनः सारावाढ प्रकरण

१९२८ सालीं मिरज तालुक्यांतील रयतांनीं मोठी चळवळ करून सारावाढ कमी करण्याचें श्रेय घेतलें. त्यावेळीं सारावाढ जरी कमी झाली, तरी उरलेली वाढ जाचक होती आणि ती कमी करण्याचे सुसंघटित प्रयत्न सन १९३८ मध्यें लक्ष्मेश्वर तालुक्यानें केले. या खेपेस तेथील मंड-ळींनीं कडेकोट तयारी केली होती. पावसानें अवकृपा केली, तरी राजाची कृपा होईना. सारावसुली चालू राही. प्रजेतर्फे अनेक अर्ज–विनंत्या झाल्या, पण दरबार त्यांची दाद देईना. पण आतां दहा वर्षांपूर्वीची परिस्थिति राहिली नव्हती. यावेळीं प्रजेच्या कणखरपणापुढें दरबारचे जुने उपाय चालणें शक्य नव्हतें. लक्ष्मेश्वर तालुक्यांतील लोकांनीं ‘करबंदी’ केली. दरबार घायकुतीस आलें होतें.

ता. २२ व २३ मे १९३८ रोजीं दक्षिणी संस्थान लोकपरिषदेचें बारावें अधिवेशन सांगली येथें सरदार वल्लभभाई पटेल यांच्या अध्यक्षते-

खालीं भरलें होतें. त्यांत " लक्ष्मेश्वर तालुक्यांतील रयतांची सारा न देण्याची स्थिति लक्षांत घेऊन श्री. राजेसाहेबांनीं लोकांची मागणी मान्य करावी व साऱ्याची सूट द्यावी " अशा आशयाचा ठराव पास झाला होता. शिवाय जनतेला मार्ग दाखविण्यासाठीं श्री. गंगाधरराव देशपांडे, श्री. हणमंतराव गाडगोळी, श्री. आर्. एस्. हुकेरीकर, श्री. पुंडलीकजी कातगडे व श्री. गो. ल. कणवूर वकील यांची एक कमिटी नेमण्यांत आली होती. या कमिटीनें प्रत्यक्ष परिस्थिति अवलोकन केली व अखेर श्री. गंगाधरराव देशपांडे, श्री. शंकरराव देव, श्री. वामनराव देसाई यांच्या मध्यस्तीनें तडजोड झाली. त्या तडजोडीप्रमाणें लक्ष्मेश्वर तालुक्यांतील सारातहकुबी, व शेंकडा वीस टक्के सारासूट मिळाली. या तालुक्याप्रमाणेंच मिरज व मोडनिंब तालुक्यांतील शेतकऱ्यांना सारा-सूट व जुडीची बाकी सूट मिळाली. कांहीं गांवांना पंचवीस टक्केही सूट दिली गेली. या घोषणेबरोबरच ( १ ) मिरज संस्थानला लागू असलेला सभाबंदीचा कायदा रद्द करण्यांत आला; ( २ ) परस्थाचा कायदा रद्द करण्यांत आला; ( ३ ) मालगांव, कवठेपिरान, लक्ष्मेश्वर, शिगली व मोडनिंब येथील म्युनिसिपालिट्या लोकनियुक्तांचें बहुमत असलेल्या व लोकनियुक्त अध्यक्ष असलेल्या, अशा करण्यांत आल्या; मिरज शहर म्युनिसिपालटीचे अध्यक्षही लोकनियुक्त झाले; ( ४ ) मिरज संस्थानास डिस्ट्रिक्ट लोकलबोर्ड ॲक्ट लागू होईल व पुढील सालांत लोकलबोर्ड प्रत्यक्ष काम करूं लागेल; ( ५ ) लक्ष्मेश्वर तालुक्यांत कानडी भाषेचें तत्त्व मान्य करण्यांत आलें; ( ६ ) लक्ष्मेश्वर तालुक्यांतील विणकऱ्यांची स्थिति सुधारणेकरितां कांहीं योजना मांडणेंत आलेस तिचा सहानुभूतिपूर्वक विचार करण्यांत येईल; ( ७ ) मिरज संस्थानमध्यें जबाबदार राज्यपद्धति अमलांत आणणेचें ध्येय दरबारास मान्य आहे, या गोष्टी जाहीर करण्यांत आल्या. ही घोषणा कै. श्री. राजे बाळासाहेब यांच्या सहीनें १२ जुलै १९३८ रोजीं करण्यांत आली. अशा रीतीनें या खेपेस लक्ष्मेश्वर तालुक्यानें पुढारीपण पत्करून चळवळ यशस्वी केली. द. सं. लोकपरिषदेनें नेमलेली कमिटी व श्री. शंकरराव देव,

श्री. शिखरे प्रभृतींनीं खटपट करून प्रजेच्या पदरांत बरेंच मोठें यश टाकलें हेंही विसरून चालणार नाहीं.

जवळजवळ वीस वर्षें प्रजेनें चळवळ केली व त्या चळवळीच्या मंथनांतून आतांपर्यंत प्रजेच्या हातीं पुढील गोष्टी आल्या आहेत:—(१) दरबारनें जबाबदार राज्यपद्धतींचें धोरण मान्य केलें. (२) कायदेमंडळ दिलें. (३) म्युनिसिपालिट्यांत लोकनियुक्तांचें बहुमत व लोकनियुक्त अध्यक्ष मिळाले. (४) लोकलबोर्ड देण्याची घोषणा केली. (५) हायकोर्टस्थापना झाली. (६) जबर सारावाढ दोन वेळां कमी करण्यांत आली. (७) स्टेट बँक व तिच्या शाखा निघाल्या. (८) सभाबंदीचा कायदा रद्द झाला. (९) परस्थाचा कायदा रद्द करण्यांत आला. (१०) कॉंग्रेस कमिटीवरील बंदी उठली. (११) स्त्रीशिक्षणांत थोडी सुधारणा झाली. (१२) श्री. राजेसाहेबांनीं शेतकरी वर्गाकरितां सत्तर हजार रु. चा ट्रस्ट करण्याची घोषणा केली. अर्थातच या 'फला' बद्दल प्रजेच्या अनेक तक्रारी आहेत, कारण जबाबदार राज्यपद्धतींचें ध्येय मान्य असलें, तरी प्रत्यक्ष कृति करण्याची इच्छा दिसत नाहीं. कायदेमंडळ सदोष आहे, हायकोर्ट जज्ज स्वतंत्र नाहीं. न्यायदानांत सुधारणा नाहीं. बँका निघाल्या असल्या तरी त्याचा व्यापारी वर्गाला सढळपणें उपयोग होत नाहीं. शिक्षणांत आमूलाग्र सुधारणा होणें जरूर आहे. शेतकऱ्यांच्या हिताकरितां ट्रस्ट जरी जाहीर झाला, तरी त्याची योजना दोन दोन वर्षें तयार होऊं शकत नाहीं. याखेरीज शेतकरीवर्गाकरितां कांहींही दरबारनें भरीव कामगिरी केलेली नाहीं.

गेल्या वीस वर्षांत मिरज संस्थानच्या प्रजेनें जी चळवळ राजकीय-दृष्टया केली त्याचें वर अवलोकन केलें आहे. मिरज संस्थानांत वरील गोष्टी ज्यांच्या कारकिर्दींत घडून आल्या, ते श्री. सर बाळासाहेब हे ता. ११-१२-१९३९ रोजी देवाधीन झाले आणि नवीन विचाराचे त्यांचे चिरंजीव श्री. तात्यासाहेब हे तक्तारूढ झाले आहेत. त्यांच्या अमदानींत

तरी येथील राज्यकारभाराला नवीन वळण लागतें का तें पहावयाचें आहे. मिरज संस्थानच्या प्रजेच्या हक्कांचें संरक्षण करण्याचे दृष्टीनें विचार करूं शकणारी एकही प्रबळ संस्था मिरजेंत नाहीं. १९२८ सालीं मिरजेला मुकलेले पुढारी श्री. बाळकृष्णपंत शिखरे जरी दहा वर्षांच्या ' वनवासा ' नंतर परत गृहीं आले असले, तरी आतां ते मिरजेंत पूर्वीची ' संघटना ' करूं शकत नाहींत असें दिसत आहे. जुने कांहीं कार्यकर्ते नामशेष झाले आहेत. कित्येकांनीं या ' भानगडी ' पासून अलिप्त रहाण्याचें धोरण ठरविलेलें दिसतें. तर कित्येक नव्या-जुन्यांचें परस्थ प्रश्नाकडेच सारें लक्ष असल्यानें मिरज प्रजेला कोणीही वाली राहिलेला दिसत नाहीं. दहा वर्षांपूर्वीची रयतांमधील संघटना व जागृति आतां दिसत नाहीं. यामुळें दरबारकडून जरी कांहीं अन्याय झाले, तरी ते दूर करण्याची वृत्ति प्रजाजनांत दिसून येत नाहीं. अशा सर्व चळवळीकरितां प्रजापरिषदेसारखी इतर पक्षभेदापासून अलिप्त असलेली संस्था मिरज संस्थानांत असणें जरूर आहे; आणि जोंपर्यंत अशी संस्था अस्तित्वांत येणार नाहीं तोंपर्यंत रयतेचा वचक अधिकाऱ्यांना वाटणार नाहीं. मिरज संस्थानांतील रयत जागृत झाली तर मिरज संस्थान अजूनही आदर्श होईल. पण तो सुदिन केव्हां उगवणार ! !

---

# औंध संस्थानला स्वराज्याचा लाभ.

लेखक : श्री. रा. र. इंगळे, बी. ए., एलएल्. बी., औंध.

श्रीशिवाजीमहाराजांनीं महाराष्ट्रांत जें स्वराज्य स्थापिलें, त्यांत दुही उत्पन्न करण्याकरितां औरंगझेबानें जे जे प्रयत्न केले, ते सर्व वायां गेलेले पाहून औरंगझेब स्वतः अगणित सेनासमुद्र घेऊन व दिल्लींतील सर्व खजिना घेऊन दाक्षिणेंत आला. त्यावेळीं एकजुटीनें व धर्मभावनेनें कामगिरी करणाऱ्या मराठा वीर मुत्सद्द्यांत औंधचे घराण्याचे परशुराम त्रिंबक प्रतिनिधि हे होते. परशुराम त्रिंबक हे सन १६६० मध्यें जन्मले व सन १७१८ मध्यें निवर्तले. त्यांचा राजारामाचे व शाहूचे कारकीर्दीशीं किती निकट संबंध होता, तें इतिहासांत सुप्रसिद्ध आहे. परशुरामपंतांनीं चवदावे वर्षींच रामचंद्रपंत अमात्य यांचे पदरीं काम धरलें. राजाराम महाराजांनीं त्यांस ‘ प्रतिनिधि ’ हा महत्त्वाचा अधिकार दिला. शाहू छत्रपतींचेही ते प्रतिनिधि झाले होते. शाहू महाराजांनीं परशुराम त्रिंबक यांस प्रतिनिधिपद देतांना जी सनद दिली आहे, तींत शेवटीं असें म्हटलें आहे “ अशीं महत्कार्यें करून राज्य रक्षण केलें, यास्तव तुम्हांवर कृपाळू होऊन प्रतिनिधीचें पद तुम्हांस वंशपरंपरेनें वतनी करून दिलें असे. भोसले यांचे राज्याचे वंशीं जो राज्य करील त्यानें तुमचे वंशाचे ठायीं ममतापुरस्सर विश्वास ठेवून वंशीं पद चालवावें. ” परशुराम त्रिंबक यांचेमागून त्यांचे द्वितीय चिरंजीव श्रीपतराव ( सन १७१८ ते १७४७), त्यांचे मागून त्यांचे कनिष्ठ बंधु जगज्जीवनराव ( १७४७ ते १७५४ ), त्यांचे मागून त्यांच्या पुतण्याचे पुत्र श्रीनिवास गंगाधर ( सन १७५४ ते १७७७ ), त्यानंतर परशुराम श्रीनिवास ऊर्फ थोटोपंत ( १७७७ ते १८४८ ) व त्यांचे मागून राजर्षि श्रीनिवास परशुराम ( सन १८४८ ते १९०१ )

असे प्रतिनिधिपदावर आरूढ झाले सध्याचे अधिपति श्री० बाळासाहेब हे सन १९०९ मध्ये राज्यपदारूढ झाले

राज्यविस्तार व भौगोलिक परिस्थितीच्या दृष्टीने पाहतां औंध संस्थानचा इतिहास दु:खद आहे एके काळी औंध संस्थानचा विस्तार फार होता व हा विस्तार मुलखगिरीबरोबर वाढे. पण पुढे पेशवाईत या संस्थानाच्या विस्तारास नेहमी संकटे प्राप्त होत व शेवटच्या बाजीरावाचे कारकीर्दीत तर या विस्तारास फारच ओहोटी लागली, एवढेच नव्हे तर, इंग्रजशाहीतही ते ग्रहण पुन्हा एकवार कै श्रीनिवासराव पतप्रतिनिधि याचे कारकिर्दीचे प्रारंभी लागले. संस्थानची राजधानी कऱ्हाड हे गाव खालसातींत सामील करण्यात आल्यामुळें औंध येथे राजधानी आली.

## औंध संस्थानची भौगोलिक परिस्थिति

औंध संस्थानचें एकंदर क्षेत्रफळ ५०१ चौरस मैल आहे. लोकसंख्या ७६५०७ आहे. औंध संस्थानचा दोन तृतीयांश मुलूख सातारा जिल्ह्यात व एक तृतीयांश मुलूख विजापूर जिल्ह्यात आहे संस्थानचे राजकीय विभाग पाच आहेत:–१ तालुका आटपाडी. २ तालुका कुंडल, ३ तालुका गुणदाळ. ४ ठाणे औंध, ५ ठाणें किन्हई. संस्थानात एकदर ७३ गावे आहेत, पैकीं ६१ गावे संस्थानचीं व १२ गावे दुमाली संस्थानचें सर्व बाबींचें मिळून एकंदर उत्पन्न ३,७९,००० रुपये आहे दरबारला सार्वभौम सरकारास काही एक खंडणी द्यावी लागत नाही औंध संस्थानचे जे पांच राजकीय विभाग सांगितले, ते एकाच ठिकाणीं एकास एक लागलेले मुळींच नाहीत, अथवा आटपाडी तालुक्याशिवाय कोणत्याही विभागातील गावें एकमेकाना लागलेली नाहींत. त्यामुळे राज्यकारभाराचा खर्च जास्त होतो

हिंदुस्थानांतील इतर लहान मोठ्या संस्थानाप्रमाणेंच औंध संस्थान हे ५० वर्षापूर्वी अत्यंत मागासलेलें संस्थान होतें औंध येथील प्रजा अत्यंत दुबळी, सोशिक, दैववादी, व अज्ञानी होती ब्रिटिश हिंदुस्थानातील स्वरा-



पंडित श्री॰ दा॰ सातवळेकर, औंध.

ज्याच्या चळवळीचे पडसाद सन १९२० सालपर्यंत औंध प्रजेच्या गांवींही नव्हते. तथापि संस्थानचे हल्लींचे अधिपति श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधि हे तालुक्यांतून दरवर्षी ज्यावेळीं जमावंदीकरितां जात, त्यावेळीं त्यांचे अध्यक्षतेखालीं तेथील लोकांची मामुली सभा होई. तिला ‘ रयत परिषद् ’ असें नांव असे. त्यांत लोकांनीं आपल्या मागण्या पुढें मांडाव्या व त्यांना श्रीमंतांनीं उत्तरें द्यावीत, असाच क्रम बरेच वर्षें सुरू होता. लोकांच्या मागण्यांचें स्वरूप मामुली असे. दुष्काळामुळें सारासूट, तगाई मिळणें, वॉर-लोन परत मिळणें, गांवास धर्मशाळा–रस्ता–देऊळ–शाळा पाहिजे, वगैरे स्वरूपाच्या मागण्या असत. त्याला उत्तरही त्याच पद्धतीचें मिळत असे. सारासूट मिळणें शक्य नाहीं, फार तर सवलत दिली जाईल; वॉरलोन परत केलें जाईल, पण त्यामुळें रस्ते, धर्मशाळा यांकडे खर्चण्यास पैसा पुरणार नाहीं, वगैरे स्वरूपाचीं उत्तरें असत. तथापि रयतेविषयींची श्री. राजेसाहेबांची कळकळ त्यांत प्रतिबिंबित झालेली असे यांत शंका नाहीं. प्रजेशीं समरस होण्याची अधिपतींची वृत्ति होती, म्हणूनच इतरत्र न होणाऱ्या वरीलसारख्या औपचारिक रयतसभा तरी भरविल्या जात असत. कांहीं व्यक्तींना उद्योगधंद्याकरितां प्रोत्साहन म्हणून सक्रिय मदतही केली होती. श्री. किर्लोस्कर व ओगले हीं या सक्रिय सहानुभूतीचीं जिवंत स्मारकें होत. ही रयतसभेची स्थिति पालटून औंध संस्थानचे बजेटवर चर्चा करणेकरितां संस्थानांतील कांहीं प्रमुख व्यक्तींना निमंत्रण करणेची प्रथा पुढें सुरू झाली. या लोकांत संस्थानचे अधिकारी, वकील, डॉक्टर, इनामदार, कारखानदार, सावकार व व्यापारी असे होते. या प्रकारची पहिली सभा ता. ४-११-१९२१ रोजीं औंध येथें भरली होती. संस्थानचे कारभारी राव. वा. वि. दाते हे अध्यक्ष होते. बजेटचे बाबतींत सरकारास सल्ला देणें एवढेंच या सभेचें काम होतें. ता. २५।१०।१९२२ रोजीं भरलेल्या अशा प्रकारच्या सभेंत दिवंगत श्रीमंत राजेसाहेब ( हल्लींचे अधिपतींचे ज्येष्ठ चिरंजीव ) यांनीं पुढीलप्रमाणें उद्गार काढले:—

"औंध संस्थानच्या प्रजाजनांना आपले सभोंवार काय चाललें आहे व आपले हक्क काय आहेत याची जाणीव उत्पन्न करण्याकरितां संस्थानाधिपतींचे पुष्कळ प्रयत्न चालू आहेत. बजेट म्हणजे जमाखर्चाचें अंदाजपत्रक. ज्या राज्यांत जमाखर्चाचा उत्तम मेळ बसून राज्यव्यवस्था चाललेली असते, त्या राज्याची स्थिति उत्तम समजली जाते. रयतेनें आपण जो कर देतों, तो केवळ राजाचे चैनीसाठीं देत नसून आपल्या सुखसोयीसाठीं देतों असें समजून जरूर त्या सोयी करून घेतल्या पाहिजेत व त्याकरतां राज्यकारभारास मदत करणें हें आपलें कर्तव्य मानलें पाहिजे.

"अद्याप रयतेस आपल्या कर्तव्यकर्माची ओळख होऊन ज्या प्रकारच्या मागण्या यावयास पाहिजेत, त्या प्रकारच्या न येतां, फक्त एका विशिष्ट म्हणजे पब्लिक वर्क्स खात्यासंबंधींच येतात. सबब रयतेस तुम्ही आपल्या कर्तव्याची ओळख करून दिली पाहिजे."

हा उपदेश अत्यंत योग्य असाच होता. या वर्षापासून राज्यकारभाराची सात सेक्रेटरींमध्यें खातेंविभागणी होऊन प्रत्येक खात्याचा कारभार एका दृष्टीनें स्वतंत्र झाला. ही पद्धति आरंभीं फलदायी व कार्यक्षम अशी दिसली, तथापि पुढें कांहीं वर्षांच्या अनुभवानें ती त्याज्य ठरून हल्लीं ती नामशेष झाली आहे.

## प्रातिनिधिक सभेची पहिली पायरी

या पद्धतींत पुष्कळसे गुण होते, परंतु ही पद्धत यशस्वी होणेस कार्यक्षम अधिकारीवर्ग संस्थानास लाभला नाहीं व खर्च डोईजड वाढून अपेक्षेप्रमाणें संस्थानचे कारभारांत सुधारणा घडून आल्या नाहींत. शेवटीं आर्थिक निकृष्ट परिस्थिति व बेजबाबदार अधिकारी वर्ग या खडकावर ही नौका आपटून पुनः पूर्ववत् सर्व अधिकार प्रधानमंडळाचे हातीं आलेले आहेत. ता. १६।११।१९२३ रोजीं श्रीमंतांनीं आपणहून आपल्या वाढदिवसानिमित्त लोकांना आपले प्रतिनिधि निवडून ते बजेटवर वादविवाद

करतील असा अधिकार दिला. त्याप्रमाणें ता. १६–२–१९२४ रोजीं बजेटची चर्चा करणेसाठीं सभा भरली; यांत सरकारी अंमलदार १० व सरकारनियुक्त सभासद ७ असून लोकनियुक्त सभासद १८ होते; व सभेचे अध्यक्ष पूर्वीप्रमाणेंच संस्थानचे कारभारी हे होते. या प्रकारें ३५ सभासदांचें कौन्सिल निर्माण करण्यांत आलें. सरकारनियुक्त सभासदांत यावेळीं प्रथमच रावब. रा. रा. काळे व कै. श्री. वाग्भट नारायण देशपांडे या संस्थानबाहेरील इसमांची सरकारनियुक्त सभासदांत नेमणूक करण्यांत आली होती.

ग्रामपंचायतीचा कायदा प्रथम सन १९१६ सालीं संस्थानला लागू केला व तो १९१९ इ. सालीं दुरुस्त केला. तथापि ग्रामपंचायतींचें काम समाधानकारक चालत नव्हतें. सन १९२४ सालीं ३२ ग्रामपंचायती संस्थानांत होत्या. त्याबद्दल श्रीमंत आपल्या भाषणांत म्हणतात, “ ग्राम-पंचायतींचें काम साधारण चाललें आहे. यालाही निरक्षेप बुद्धीनें व चलाखीनें काम करणारीं साक्षर माणसें अजून मिळावीं तितकीं मिळत नाहींत. तथापि आणखी कांहीं दिवसांनीं या पंचायतींचा फार उपयोग होईल अशी आमची खात्री आहे. ”

यावरून ग्रामपंचायतींचें काम समाधानकारक चालण्यास काय अडचणी होत्या, याचें पूर्ण ज्ञान श्रीमंत राजेसाहेब यांना झालेलें होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. ती स्थिति हल्लीं किती सुधारली आहे व साक्षरतेचें प्रमाण कायम असून लायक लोक या कामाकरितां कितपत मिळूं शकतील हा विचार ग्रामपंचायतीवर आधारलेलें स्वराज्य देतांना श्री. राजेसाहेबांनीं केला असता, तर बरें झालें असतें असें वाटतें. असो.

सन १९२५ सालचे बजेटची बैठक ता.२४-१२-२४ रोजीं भरली होती. त्यांत कायदेकानूसंबंधीं ठराव मांडणेबद्दल अधिकार सदरहु सभेस असावेत म्हणून लोकांकडून सूचना आली होती. पण ती मंजूर झाली नाहीं. या बैठकींत न्याय व अंमलबजावणी खात्यांची फारकत, सेक्रेटरींची

संख्या कमी करणें, अबकारी उत्पन्न कायमचें सोडून देणें, नोकर लोकांचे पगाराचें टाइमस्केल ठरविणें वगैरे बाबतींत बरेच महत्त्वाचे प्रश्न होते. पण यांपैकीं कोणत्याही प्रश्नाचा निकाल लागला नाहीं. या बैठकींत श्री. पंडितजी सातवळेकर यांनीं सरकारवर कडक टीका करून बजेट-संबंधीं खालील दोन शर्तींवर सन १९२५ सालचे बजेटचा मसुदा पार करणेबद्दल ठराव मांडला.

१. प्रत्येक खात्याकडे बजेटांत धरलेल्या रकमेपेक्षां जास्त खर्च होऊं नये.

२. बजेटांत कर्जफेडीकडे धरलेली सर्व रक्कम कर्जफेडीकडेच देणेंत यावी.

हे ठराव सरकारतर्फे स्वीकारण्यांत येऊन फक्त त्यांत थोडा फेरफार करण्यांत आला; तो असा कीं, ज्या मानानें जमा कमी, त्या मानानें म्हणजे त्या प्रमाणानें प्रत्येक खात्याचा खर्च तहकूब ठेवावा व त्याचप्रमाणें कर्जफेडही त्याच प्रमाणांत तहकूब ठेवावी.

या बैठकींत विणकारांचे मागावर असलेला कर माफ केल्यानें येणारी तूट भरून काढण्याकरितां कापडाच्या दर ताग्यामागें ८८६ बसविलेला छाप्याचा कर माफ करण्यांत आला. या करानें व्यापारावर फारच अनिष्ट परिणाम होऊन, संस्थानचा व्यापार मोडकळीस आला होता. त्याचप्रमाणें " संस्थानचें कर्ज फिटेपर्यंत संस्थानचे खर्चासंबंधानें तपासणी करण्यासाठीं एक कमिटी नेमावी व तिनें प्रत्येक महिन्याचे २० तारखेस तपासणी करावी" असा ठराव पसार झाला. ही योजना श्रीमंतांनीं आपलें भाषणांत जाहीर केली व या योजनेनें संस्थानचे खर्चावर लोकांचें प्रत्यक्ष नियंत्रण राहून खर्चाचे बाबतींत बजेटप्रमाणें बरोबर अंमलबारी होण्यासही मदत होईल, अशी अपेक्षा व्यक्त केली गेली. परंतु आजपर्यंतच्या अनुभवानें ही अपेक्षा या घटकेपर्यंत कधींही सफल झालेली नाहीं. रयतेच्या प्रतिनिधींनीं लोक-कल्याणाच्या काय काय गोष्टी त्यांनीं केल्या, याचा आढावा श्रीमंतांनीं

सभासदांना विचारला व शिक्षण, निर्व्यसनीपणा, दुफळी मोडून एकी करणें व उद्योगधंदे वाढविणें, याकामीं अधिक कळकळ दाखवून तनमनधन खर्चावें अशी श्रीमंतांनीं सूचना केली. याप्रमाणें सन १९२५ सालाकरितां पंडितजी सातवळेकर, रा. लक्ष्मण गणेश पटवर्धन, व एक सरकारी अधिकारी अशी तिघांची बजेट नियंत्रणाकरितां कमिटी नेमिली.

## प्रातिनिधिक सभेची अधिकार वाढ

प्रातिनिधिक सभेला कायदे करण्याचें व राज्यकारभारासंबंधीं सर्वसाधारण ठराव मांडणेचें एक अंग कमी होतें, तेंही या वर्षीं म्हणजे सन १९२६ सालीं सदरहु बाबतींत अधिकार दिल्यानें पूर्ण झालें. व या वर्षापासून सभेची बैठक वर्षांतून दोनदां म्हणजे डिसेंबर व जून महिन्यांत भरणेची प्रथा सुरू झाली. राज्यकारभारासंबंधीं जे प्रश्न विचारणेस परवानगी होती, त्यावर उपप्रश्न विचारणेचाही अधिकार देणेंत आला. यासालीं सेक्रेटरी-पद्धत खर्चाची आहे, सबब सेक्रेटरींची संख्या कमी करावी अशी सूचना आली असतांही अव्यवहार्यतेच्या सबबीवर ती फेटाळण्यांत आली. त्याचप्रमाणें संस्थानांतून दारू, गांजा वगैरे मादक पदार्थांचीं दुकानें बंद करण्यासंबंधीं लोकांनीं सूचना केल्या होत्या, पण मर्यादित स्वरूपांत देण्याची पद्धत (Rationing) अवलंबिली असल्यानें त्या पदार्थांचा खप आपोआप कमी होईल असें उत्तर सरकारतर्फे देण्यांत आलें. त्याचप्रमाणें यासालीं औंध, कुंडल, गुणदाळ व किन्हई या तालुक्यांची रिव्हिजन सर्वे करून तरम शेंकडा ३३/– टक्केपेक्षां जास्त वाढविल्याची कबुली सरकारनें दिली, परंतु " तरमाची मुदत ६० वर्षांची असल्यानें व या वाढलेल्या तरमाची रक्कम संस्थानचे कर्जफेडीकडेच लावणेंत येणार असून संस्थानचें कर्ज फिटेपर्यंत संस्थानचे कोणत्याही खर्चांत वाढ करण्यास वाव नाहीं " असें प्रातिनिधिक सभेच्या अध्यक्षांनीं ता. १७-१२-१९२५ रोजीं भरलेल्या प्रातिनिधिक सभेंतील आपल्या भाषणांत सांगितलें. पब्लिक वर्क्स स्वरूपाचीं कामें म्हणजे सडका दुरुस्ती, नदीला धरण बांधणें, शेती सुधारणा करणें

वगैरे स्वरूपाच्या सूचना या सभेपुढें लोकप्रतिनिधींनीं केल्या होत्या. पण "संस्थानची हल्लींची सांपत्तिक स्थिति लक्षांत घेतां तूर्त अशीं कामें हातीं घेतां येणार नाहींत" असें सरकारतर्फे सांगण्यांत आलें. या सभेंत पंडितजी सातवळेकर यांनीं काटकसर करून व अनवश्यक लोक कमी करून बचत होईल ती रक्कम कर्जफेडीकडे देण्याबद्दल सुचविलें. "संस्थानचें उत्पन्न जर पूर्वीपेक्षां वाढलेलें आहे, तर अशी हलाखीची स्थिति कां?" असा रोकडा सवाल सरकारास त्यांनीं टाकला. ७०,००० रुपये वाढलेले आहेत व याचा विनियोग कर्जफेडीकडे होणार म्हणून आश्वासन आहे, पण तसें होणें शक्य दिसत नाहीं, असें स्पष्ट मत त्यांनीं सांगितलें. पंडितजी सातवळेकर यांनीं कारभार-कमिशन नेमण्याची एका ठरावानें मागणी केली व तो ठराव पास झाला. पब्लिक वर्कर्सचीं कामें तालुकावार होत नाहींत अशी ओरड सर्व सभासद करीत होतेच. त्याकरितां पब्लिक वर्क्ससंबंधीं राजधानीचे ठिकाणीं ⅓ खर्च व बाकी ठिकाणीं त्या त्या तालुक्याचे उत्पन्नाचे मानानें खर्च करण्यांत यावा, असा ठराव संमत करण्यांत आला. पोलीस खात्यांत जास्त लायख व हुषार माणसें नेमावींत व पोलीस ट्रेनिंग स्कूलमध्यें जे उमेदवार पाठवावयाचे, ते खात्यामध्यें कांहीं वर्षें अनुभव घेतलेले असावेत असेही ठराव पास झाले. श्रीमंतांनीं जी काटकसर-कमिटी नेमली, तिनें आपला अहवाल जून १९२६ मध्यें सादर केला. कायदेकानू करणेकरितां जून १९२६ मध्यें प्रातिनिधिक सभेची बैठक भरली होती, तींत ग्रामपंचायतीचा कायदा सुधारून पास करण्यांत आला व त्यायोगें ग्रामपंचायतीचे अधिकार वाढविणेंत आले. आजपर्यंत किरकोळ अर्जानें दाद मागणेची लोकांची असलेली संवय, श्रीमंत असे अर्ज सद्धेतूनें कां होईना घेत असल्यामुळें, वाढीस लागली होती. त्याबाबत किरकोळ अर्जानें दाद मिळूं नये म्हणून ठराव मांडण्यांत आला होता, पण तो परत घेण्यांत आला. धंदेशिक्षणासंबंधीं शाळानिहाय योजना करावी असा रावब. काळे यांचा ठराव पास झाला.

नव्या निवडणुकी होऊन सन १९२६ च्या डिसेंबर महिन्यांत जी प्रातिनिधिक सभेची बैठक भरली, त्यांत पहिल्यानेंच पुण्याचे श्री. अनंत विनायक उर्फ वामनराव पटवर्धन, माधव व्यंकटेश लेले, व पूर्वी असलेले रावब. काळे यांची बिनसरकारी सभासद म्हणून सरकारनें नेमणूक केली. आजपर्यंतच्या प्रातिनिधिक सभेंत रावब. काळे व श्री. वाग्भटराव देशपांडे हीं जीं बाहेरचीं माणसें होतीं, त्यांनीं व संस्थानपैकीं पंडितजी सातवळेकर यांनीं थोडेंबहुत मार्गदर्शनाचें काम केलेलें होतें. परंतु श्री. वामनराव पटवर्धन औंधच्या प्रातिनिधिक सभेंत आल्यापासून सभेस खरी वाचा फुटली व प्रातिनिधिक सभेस खरें स्वरूप प्राप्त आलें. त्यांच्या ठिकाणीं संस्थानी प्रजेच्या कल्याणाविषयींची उपजत भावना व त्यांची सडेतोड, निर्भीड, निर्भय पण अभ्यासू वृत्तीनें पूर्ण विचारांतीं केलेली टीका म्हणजे सरकारला केलेलें आव्हानच असावयाचें. त्यांनीं दहा वर्षें औंध संस्थानांत काम केलें, पण त्यांना कधींही आळस व चालढकल हे शब्द माहीत नव्हते. सरकारवर टीकेचे कठोर प्रहार करण्यांत ते जितके तयार, तितकेच सरकारच्या अडचणी ध्यानांत घेऊन त्यांनाही मदत करण्यास तयार. अशा रीतीनें एकीकडे प्रातिनिधिक सभेच्या सभासदांना शिक्षण देतांना, त्यांनीं सरकारी सभासदांनाही त्यांच्या कर्तव्याची जाणीव करून देऊन प्रातिनिधिक सभेची इभ्रत ब्रिटिश हद्दींतील कौन्सिलच्या बरोबरीनें वाढविली. बजेट कसें मांडावें व कसें छापावें, या साध्या गोष्टीपासून तों सरकारी सभासदांनीं कशीं उत्तरें द्यावींत यापर्यंत त्यांनीं काळजी घेतली व कोणताही अन्यायविषयक प्रश्न सरकारच्या रोषास न भितां विचारण्यास कमी केलें नाहीं. श्री. वामनराव पटवर्धन म्हणजे औंध प्रातिनिधिक सभेच्या लोकानियुक्त सभासदांना माहेरघर वाटे. त्यांच्याकडे कोणीही कसेही पण खरे प्रश्न पाठवावेत! ते प्रश्न ते बिनचूक निर्भीडपणें विचारीत. सरकारी सभासदांवर त्यांचा वचक असे, पण त्यांचेबद्दलचा आदर कधींच मावळला नाहीं. एकाच शब्दांत

सांगावयाचें म्हणजे कांहीं काळ वामनराव प्रातिनिधिक सभेचा आत्मा होते. प्रातिनिधिक सभेंत लोकनियुक्त सभासद आजपर्यंत १८ व सरकारी अधिकारी ७ होते व सरकारनियुक्त बिनसरकारी सभासद ११ होते, त्याऐवजीं आतां म्हणजे १९२६ सालीं प्रथमच डिसेंबरच्या बैठकींत लोकनियुक्त सभासद २० व सरकारी अधिकारी व सरकारनियुक्त सभासद मिळून १६ झाले. अशा प्रकारें लोकनियुक्त सभासदांचें बहुमत निर्माण झालें. अशा वेळीं रा. वामनराव पटवर्धन यांच्यासारख्या सभासदांची मदत प्रातिनिधिक सभेस लाभल्यानें प्रजापक्षीय चळवळीस चांगलाच जोम आला. यावेळीं पंडितजी सातवळेकर यांनीं आपल्या भाषणांत स्पष्टपणें सांगितलें कीं, " लोकप्रतिनिधींना हें पक्कें समजून चुकलें आहे कीं, आपलें कोणी ऐकत नाहीं. लोकांनीं ज्यावेळीं आम्हांला निवडून दिलें, त्यावेळीं, त्यांनीं हेंच विचारलें कीं, तुम्हांला मागच्या तीन वर्षी निवडून दिलें तें जमीनसारा दीडपट करण्यासाठींच कीं काय ? गुदस्तसालीं ठरलेल्या प्रमाणें बजेटप्रमाणें खर्च न होतां ३५००० रु. जास्त खर्च झाला व प्रातिनिधिक सभेच्या संमतीशिवाय जमीनसारा दीडपट वाढविला. सभेकडून पास होणारे ठराव बंधनकारक समजले जात नव्हते. अशा रीतीनें सभा म्हणजे फार्स व हा खेळखंडोबाच आहे असें म्हटलें पाहिजे असे त्रागयाचे उद्गार लोकप्रतिनिधींकडून निघत. श्री. वामनराव पटवर्धन यांनीं संस्थानचे प्रजेला दर माणशीं ६ रु. कर द्यावा लागतो, तो बराच जास्त आहे व सर्वसाधारणपणें संस्थानचा कारभार कायद्यानें न चालतां फर्मानानें चालतो याकडे सभेचें लक्ष वेधलें. ब्रिटिश हद्दीप्रमाणें बजेट छापणेबद्दल व आवश्यक असणारी बरीचशी माहिती दिली नाहीं ती देणेबद्दल त्यांनीं सूचना केली व 'सभा म्हणजे डिबेटिंग सोसायटी नव्हे. तिचे ठराव हवेंत जाऊं नयेत. सभासदांवर जास्त विश्वास ठेवला पाहिजे' असें त्यांनीं बजावलें. त्याचप्रमाणें आजपर्यंत लोकप्रतिनिधींची हेटाळणी होत होती, ती यापुढें चालणार नाहीं असा इषाराही देण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. या सालींच

प्रथम संस्थानचे हिशेब चार्टर अकौंटंटमार्फत तपासून घेण्याबद्दल व्यवस्था व्हावी असें ठरलें. तसेंच चालू सालापासून दरसाल ५००० रु. गंगाजळी ठेव म्हणून स्वतंत्र ठेवावी व ती दरबारनें खर्च करूं नये असें ठरलें. गेले सालपर्यंत ही ठेव ५५००० रु. झाली होती. परंतु दुर्दैवानें गेल्या सालीं ती खर्च करण्यांत आली.

औंध स्टेट बँकेच्या असमाधानकारक स्थितीकडे या सालापासूनच सभेचें लक्ष वेधण्यास सुरवात झाली. व पुढें १९३२ आक्टोबरमध्यें बँक ही संस्थानपासून स्वतंत्र होऊन लिमिटेड कंपनी झाली. किरकोळ अर्जानें कोर्टांत चाललेल्या दरखास्तीचे कामीं अंमल तहकुबी देणें व वाईट लोकांना विनाचौकशी हद्दपार करणें, या गोष्टी संस्थानांत चालू होत्या व त्याचें समर्थन राजेसाहेबांच्या जन्मजात हक्काच्या सबबीवर ( Royal Prerogative ) खुद्द श्रीमंतांकडूनच होत होतें, हें खुद्द श्रीमंतांच्या भाषणावरूनच दिसून येतें.

सन १९२६ सालीं संस्थानांत औद्योगिक कमिशनची नेमणूक झाली होती व त्याचा रिपोर्टही श्रीमंतांकडे गेला होता, पण पुढें त्याची अंमलबजावणी कांहींच झाली नाहीं. त्याचप्रमाणें सन १९२७ सालीं शेतकी कमिशन नेमलें होतें. त्या कमिशनचा रिपोर्टही श्रीमंतांकडे आला होता. पण त्याचीही पुढें अंमलबजावणी कांहींच झाली नाहीं. सन १९२७ च्या डिसेंबरच्या प्रातिनिधिक सभेच्या बैठकींत एका सभासदांनीं प्रातिनिधिक सभेच्या सभासदांना खुली चर्चा ( free discussion ) करण्याचा हक्क असावा असा ठराव आणला होता. त्यावरून सभेंत आपणांस भाषण-स्वातंत्र्य आहे याची सुद्धां कल्पना कांहीं सभासदांना नव्हती. परंतु सरकारतर्फें तसें भाषण-स्वातंत्र्य आहे, त्याकरितां ठरावाची जरूरी नाहीं असें सांगितल्यावर सदर ठराव परत घेण्यांत आला.

या सभेंत रावब. काळे वकील यांनीं संस्थानांत दारू—अफू वगैरे मादक पदार्थांना बंदी करणारा ठराव सभेपुढें मांडला व तो सर्वानुमतें पासही झाला. सदरहू ठराव पुढीप्रमाणें होताः—

## दारूबंदीचा ठराव

" औंध संस्थानांतून दारूसारख्या मादक व आरोग्यास विघातक अशा पदार्थांची बंदी करणेविषयीं ही सभा श्रीमंत पंतप्रतिनिधी सरकार यांस शिफारस करीत आहे. हें दारूबंदीचें धोरण स्वीकारल्यामुळें अबकारीचे कमी होणाऱ्या उत्पन्नानें संस्थानच्या उत्पन्नांत पडणारी तट अंशतः भरून काढणेसाठीं जरूर तर संस्थानांनीं एखादी योजना सभेपुढें मांडली तर त्याचाही सभा विचार करून त्या बाबतींत योग्य तो पाठिंबा सरकारास देण्यास तयार होईल. "

या ठरावास श्री. वामनराव पटवर्धन व पंडितजी सातवळेकर यांनी जोरदार भाषण करून पाठिंबा दिला होता. रावब. काळे यांनीं दुसरा ठराव पुढीलप्रमाणें मांडलाः—

" नेक नामदार व्हाइसरॉय व गव्हर्नर जनरल यांनीं राजकोट येथील दरबारांत तारीख २२–११–१९२७ रोजीं केलेल्या भाषणांत जाहीर केल्याप्रमाणें ' ब्रिटिश सरकार आणि हिंदी संस्थानें यांच्यामधील परस्परसंबंध कसे असावेत याविषयीं रिपोर्ट करण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत येईल.' तेव्हां या बाबतींत संस्थानानें मांडावयाची योजना व त्याचप्रमाणें या संस्थानाकडून जबाबदार राज्यपद्धति अमलांत आणण्यासाठीं व यापुढें करावयाची योजना तयार करण्यासाठीं या कौन्सिलची एक लहानशी सल्लागार कमिटी नेमण्यांत यावी. "

मध्यंतरीं संस्थानचे खर्चाबद्दल जी काटकसर कमिटी नेमली होती, तिच्या सूचना हळुहळू पण शक्य तितक्या कडक रीतीनें अंमलांत आणूं

असें श्रीमंतांनीं आपले एका भाषणांत सांगितलें. दारूबंदीच्या ठरावाबद्दल "सातारा जिल्ह्यांत दारूबंदी केली आहे अशी पक्की बातमी लागल्याबरोबर त्याच्या आधीं आम्ही दारू बंद करूं असें आम्ही आज आपणांस अभिवचन देतों" असें श्रीमंतांनीं सांगितलें.

सन १९२८ च्या जून महिन्यांत प्रातिनिधिक सभेची बैठक भरली, त्यावेळीं श्रीमंतांच्या सल्लागार मंडळांत लोकप्रतिनिधींचा समावेश व्हावा असा ठराव रा. ळ. ग. पटवर्धन यांनीं आणला होता व त्यास रा. ब. काळे यांनीं दुजोरा दिला होता. परंतु पैशाचे अभावीं तसें करतां येत नाहीं असें सरकारतर्फे सांगण्यांत आलें. रावब. काळे यांचें औंध संस्थानांतील सार्वजनिक देवस्थानें, सार्वजनिक व धर्मादाय संस्था यांच्या मिळकतींच्या कारभाराची व्यवस्था लावण्याचें बिल सभेपुढें आलें होतें, पण तें सन १९३३ सालापर्यंत पास होऊं शकलें नाहीं.

सन १९२८ सालीं श्रीमंतांच्या वाढदिवसानिमित्त प्रातिनिधिक सभेला आपला अध्यक्ष निवडणेचा हक्क मिळाला. त्याप्रमाणें डिसेंबरमध्यें भरलेल्या प्रातिनिधिक सभेचे पहिले लोकनियुक्त अध्यक्ष म्हणून रावब. काळे यांची निवड झाली. या सालापासून फायनॅन्स कमिटी नेमण्याचा उपक्रम सुरू झाला. हिंदुधर्मशास्त्रसुधारणेचा कायदा पहिला हा या वेळेस पास झाला; त्याअन्वयें (अ) कोणत्याही मनुष्यानें आपले बहिणीचा, मुलीचा, अगर कुमारिका स्थितींत जिच्याशीं विवाहसंबंध सशास्त्ररीतीनें झाला नसता, अशा स्त्रीचा मुलगा दत्तक घेतला, तर तें दत्तविधान अशास्त्र ठरणार नाहीं. (ब) शूद्रवर्णाच्या दासीपुत्रास पित्याचे मिळकतींत वारसाचे बाबतींत इतर वर्णापेक्षां तो केवळ शूद्र आहे येवढ्यामुळेंच दासीपुत्र या नात्यानें कांहीं जास्त हक्क प्राप्त होणार नाहींत. त्याचप्रमाणें श्री. वि. गो. दर्शने यांचा बालविवाह व जरठ–कुमारी विवाह प्रतिबंधक कायदा पास झाला. स्वतंत्र व समाईक हायकोर्ट नेमण्यासंबंधीं श्री. वामनराव पटवर्धन यांनीं सूचना आणली, पण श्रीमंतांनीं ती सूचना स्वीकारली नाहीं.

आजपर्यंत बजेटप्रमाणें न वागतां प्रत्येक खात्यांत जें रि-ॲप्रोप्रिएशन होत असे तें बंद करण्यांत येईल असें आश्वासन सरकारतर्फे देण्यांत आलें.

## घटना कमिटी

१९२९ च्या मार्च माहिन्यांत स्वतंत्र हायकोर्टची स्थापना होऊन रावसा. वा. रा. गुत्तीकर रिटायर्ड फर्स्ट क्लास सबजज्ज यांची हायकोर्ट जज्ज म्हणून नेमणूक झाली. त्याचप्रमाणें जबाबदार राज्यपद्धतीची घटना करण्यासाठीं कमिटीही नेमण्यांत आली. त्यांत रावब. काळे, श्री वामनराव पटवर्धन, श्री. दादासाहेब करंदीकर वगैरे सभासद होते. पांच वर्षांत संपूर्ण स्वराज्य देऊं अशी श्रीमंतांनीं १९२९ डिसेंबरमध्यें घोषणा केली व त्याप्रमाणें ही कमिटी नेमली होती. कमिटींत श्री. न. चिं. केळकर प्रो. ग. र. अभ्यंकर यांचींही नांवें होतीं. पण त्यांना व श्री. दादासाहेब करंदीकर यांना काम करण्यास मुळींच वेळ मिळाला नाहीं. याच बैठकींत १९३० च्या औंध संस्थानच्या नवीन राज्यघटनेचें बिल सभेपुढें रावसा गुत्तीकर यांनीं मांडलें. त्यांत सभासदांचें प्रमाण लोकनियुक्त २१ सरकारानियुक्त १८ असें ठरलें. व ५ वर्षांनीं लोकानियुक्त सभासदांपैकी एक मंत्री सरकारनें नेमण्याचा हक्क बिलांत ठेवला असल्याचें सांगितलें पं. सातवळेकर यांनीं बिलाप्रमाणें अंमलबजावणी झाली, तर येथें राम-राज्य होईल म्हणून त्याची मुक्तकंठानें स्तुति केली व हें बिल पास होऊन सन १९३० चा १ ला कायदा पास झाला.

सन १९२८ सालापासून इनकमटॅक्स बिल प्रातिनिधिक सभेंत येत होतें. प्रथमतः सन १९२८ सालीं हें बिल सभेपुढें आलें, त्यावेळीं त्यास श्री. अ. वि. पटवर्धन, श्री. ल. का. किर्लोस्कर, श्री. ओगले, श्री. सं. बा. दर्शने व पंडितजी सातवळेकर यांनीं जोराचा विरोध केला. श्री. पटवर्धन यांचें म्हणणें असें कीं, औंध संस्थानांत माणशीं कराचा बोजा ६–६॥ रु. आहे तोच अगोदर जास्त असल्यानें आणि संस्थानांत व्यापारधंदा बुडित स्थितींत असल्यानें या कराचा परिणाम लोकांवर विपरीत होईल व रयतेची स्थिति

झालवेल. दरसाल प्रातिनिधिक सभेनें बजेट पास करावें, परंतु त्याप्रमाणें अंमलबजावणी मात्र होऊं नये हा क्रम सारखा सुरू होता. त्यास पायबंद घालणेकरतां पं. सातवळेकर यांनीं डिसेंबर १९२८ च्या सभेंत एक ठराव आणला कीं “ गेल्या पांच वर्षांच्या सरासरीनें संस्थानचें उत्पन्न अमुक असें ठरवावें व त्यांपैकीं कर्जफेड व गंगाजळीसाठीं रकमा निराळ्या काढून ठेवून शिल्लक रक्कम सर्व खात्यांमध्यें खर्चाच्या वांटणीसाठीं म्हणून ठेवावी.”

## नोकरांचे हाल

याप्रमाणें कर्जफेड व गंगाजळी दरसाल नियमितपणें रहावी अशी योजना केली. नोकर लोकांचे हाल तर विचारावयास नको. कर्ज-फेड होई-पर्यंत पगारवाढ नाहीं व कर्जफेड होणेचीं चिन्हें तर दरसाल दुरावत चाललीं; अशा परिस्थितींत १०-५ वर्षें गेल्यावर राव. धांदरफळे दिवाणांच्या कारकीर्दींत सन १९३४ सालीं एकदाचें नोकर-पगाराचें टाईम स्केल झालें. पण तेंही पुढें कांहीं काळ बंदच राहिलें. मध्यवर्ती सत्ता सात खात्यांत विभागल्यामुळें जें तें खातें आपल्या वांटणीस येईल, ती रक्कम खर्च करून टाकूं लागलें व यामुळें कर्जफेड न होतां कर्ज वाढतच चाललें. शारदा ॲक्टाचे धर्तीवर एक बिल प्रातिनिधिक सभेंत रा. वि. गो. दर्शने यांनीं मांडलें, त्यांत पुरुषांच्या विवाहाची किमान मर्यादा १६ वर्षें व मुलींची १४ वर्षें होती. श्री. वामनराव पटवर्धन यांनींच प्रथम स्वतंत्र हाय-कोर्ट नेमण्याची सूचना डिसेंबर १९२८ च्या बैठकींत आणली व तिला १९२९ च्या जून महिन्यांत प्रत्यक्ष हायकोर्ट नेमून मूर्त स्वरूप आलें.

सन १९२६ सालीं घरावर परदेशी पत्रे घालूं नयेत असें सर्क्युलर निघालें, त्यामुळें रयतेला भयंकर त्रास व जुलूम सोसावा लागला. शेवटीं तें सर्क्युलर सन १९३१ सालीं या प्रातिनिधिक सभेंत ठराव आणून रद्द करून घ्यावें लागलें. ग्रामपंचायतीचे अधिकार वाढविण्याचें बिलही सन

१९३० सालीं पास होऊन पंचायतींना दिवाणी दाव्यांत २०० रु. पर्यंतचे दावे चालविणेचे अधिकार व कांहीं मर्यादेपर्यंत फौजदारी अधिकार देण्यांत आले.

## प्रजापरिषदेची स्थापना

आजपर्यंत संस्थानांतील प्रजेचीं गाऱ्हाणीं पुढें मांडण्यास प्रातिनिधिक सभा हेंच एकमेव स्थान होतें. आतां त्याचे जोडीस सन १९३१ सालापासून प्रजापरिषद् निर्माण करण्यात आली. या प्रजापरिषदेचें पहिलें अधिवेशन सन १९३१ च्या मे महिन्यांत आटपाडी येथें श्री. अनंत विनायक पटवर्धन यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें. स्वागताध्यक्ष औंधचे पं. सातवळेकर होते. त्यांनीं आपल्या भाषणांत इतर अनेक गोष्टींबरोबर औंध संस्थानांतील स्वराज्यांत कोणत्या गोष्टी घडल्या पाहिजेत याचा प्रामुख्यानें विचार केला. ( १ ) बेकार लोकांस भरपूर काम व भरपूर मजुरी मिळावी; ( २ ) प्रजेवर फाजील कराचा बोजा पडूं नये; ( ३ ) लांचलुचपतीशिवाय सर्वांस सहज न्याय मिळावा; ( ४ ) सर्वांस सुरक्षितपणा वाटावा; ( ५ ) अधिकाऱ्यांच्या लहरीवरच आमची सुरक्षितता आहे अशी शंका प्रजेमध्यें राहूं नये; ( ६ ) दारू, गांजा, भांग व अफू या व्यसनांचीं दुकानें संस्थानांत नसावींत; ( ७ ) परदेशी कापडास संस्थानांत बंदी असावी, वगैरे मुद्दे पं. सातवळेकर यांनीं आपल्या भाषणांत मांडले. या गोष्टींवरून संस्थानांतील प्रजेला कशा तऱ्हेचा पालट पाहिजे होता तें उघड दिसून येतें. अध्यक्ष आपल्या भाषणांत म्हणाले कीं, इतर संस्थानांत प्रजापक्षीय चळवळीस राजसत्तेकडून विरोध होत असतो,परंतु येथें श्रीमंत बाळासाहेबांनीं स्वतः लोकपक्षीय चळवळीचे बाबतींत उपक्रम केला असल्यामुळें संस्थानच्या सत्ताधाऱ्यांकडून या चळवळीस विरोध होईल अशी येथें मुळींच परिस्थिति नव्हती. उलट अशा परिषदेला श्रीमंतांच्याकडून सहानुभूतीचा संदेश आला आहे. नरेंद्रमंडळाच्या सदोष घटनेचा व

इतर ब्रिटिश हद्दींतील व दक्षिणी संस्थानांतील चळवळीचा आढावा घेऊन अध्यक्षांनीं इतर ठिकाणीं संस्थानी प्रजेची मुस्कटदाबी कशी होते तें सांगून संस्थानी प्रजेची मागणी जबाबदार राज्यपद्धतीची आहे व यापुढें संस्थानांचे संघ स्थापन होणें कसें जरूर आहे व त्याकरितां छोट्या संस्थानांनीं करावयाचा उपक्रमही त्यांनीं विशद केला. अनेक संस्थानांचें एक हायकोर्ट,एक पोलिसखातें, एक विद्याखातें-आरोग्यखातें वगैरे कशीं निर्माण होतील तें त्यांनीं सोदाहरण सिद्ध केलें. त्यांनीं औंध संस्थानांतील आजपर्यंतच्या राजकीय प्रगतीचा आढावा घेऊन नुकत्याच पास झालेल्या घटनेच्या १९३० च्या १ ल्या कायद्याचें त्यांनीं विवेचन केलें व त्याबाबत श्रीमंतांना धन्यवाद देऊन प्रजेचीं कर्तव्यें कोणतीं याचाही ऊहापोह करणेस ते विसरले नाहींत. सन १९३५ सालीं सुरू होणाऱ्या जबाबदार राज्यपद्धतीची धुरा पतकरणेची तयारी प्रजेनें दाखविली पाहिजे असें त्यांनीं बजावून सांगितलें. व शेवटीं प्रजादक्ष प्रभु व कर्तव्यदक्ष पुढारी यांच्या गोड संयोगानें औंध संस्थानचें कल्याण दूर नाहीं, असा आशावाद त्यांनीं प्रगट केला. परिषदेंत पास झालेले पुढील ठराव महत्त्वाचे होतेः—

१. कांहीं गांवांना आजपासून स्वराज्याचे सनदेंतील अधिकार क्रमाक्रमानें अनुभवासाठीं म्हणून देण्यांत यावेत. तो क्रम पुढीलप्रमाणें असावा;

( अ ) या गांवांत ग्रामसभा किंवा नगरसभा स्थापण्यास आवश्यक तें सरकारी सहाय मिळावें. व त्यासाठीं आवश्यक असलेले नियम बनवावे.

( ब ) ग्रामसभा स्थापल्यावर त्यांस पहिल्या वर्षीं स्थानिक स्वराज्यसंस्थेचे अधिकार देण्यांत यावेत.

( क ) दुसऱ्या वर्षीं ग्रामपंचायत व पब्लिक वर्क्ससमिति वगैरेंचे अधिकार मिळावेत.

२. सरकारनें प्रथम वर्षी कमीतकमी ५००० रु. पर्यंत शेतसारा हातसुतामध्यें घेण्याचें ठरवावें व त्याप्रमाणें जाहिरनामा प्रसिद्ध करावा.

३. संस्थानांतील बेकारी दूर करण्यासाठीं परदेशी सूत व कापड विकण्यास कायद्यानें बंदी करावी.

४. रिव्हिजन सर्वेंत बागायत नसलेल्या जमिनीवर बागायत आकार घेण्यांत येत आहे त्याचा कमिटी नेमून निर्णय करावा.

५. रिव्हिजन सर्वेच्या वेळचे धारणीचे दर हल्लीं फार उतरले आहेत, सबब दरसाल ज्या प्रमाणांत धारण स्वस्त असेल त्या प्रमाणांत शेतसाऱ्यांत सूट जाहीर करावी.

६. संस्थानांतून दारू-भांग-अफू-गांजाचीं दुकानें कायमपणें उठवावीं.

७. किरकोळ अर्जावरून विनाचौकशीनें हुजूरकडून एकदम तांतडीचे हुकूम सुटतात; या पद्धतीनें रयतेस अतिशय त्रास होतो व नुकसान होतें. म्हणून अर्ज आल्यानंतर त्याची दोन्ही बाजूंतर्फे योग्य चौकशी करून नंतरच निकाली हुकूम देण्यांत यावे.

८. दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानी प्रजेनें व संस्थानिकांनीं उत्तम राज्य-व्यवस्था ठेवण्यासाठीं कांहीं विशिष्ट खात्यांसंबंधीं प्रत्येक संस्थानांत स्वतंत्रपणें व्यवस्था ठेवणें खर्चाचें असल्यानें सर्व संस्थानातर्फे समाईक व्यवस्था करण्याचा उपक्रम करावा व त्याचा प्रारंभ न्यायखात्यापासूनच करण्यांत यावा.

९. फेडरल घटनेमध्यें दोन्ही सभागृहांत संस्थानी प्रजेनें निवडून दिलेले प्रतिनिधीच घेण्यांत यावेत व फेडरल घटनेमध्यें नागरिकांच्या मूलभूत हक्कांचा समावेश करण्यांत यावा.

याप्रमाणें औंध संस्थानला स्वराज्याची सनद मिळाली, या आनंदानें स्थानिक पुढारी हुरळून गेले असतां त्यांना परिस्थितीचें यथार्थ दर्शन बाहेरील लोकांकडूनच होत गेलें. या परिषदेंत कै. वामनराव पटवर्धन यांनीं संस्थानांतील कारभाराच्या दोषांची छाननी स्पष्टपणें केली होती. यानंतर लगेच पुढील सालीं म्हणजे १९३२ च्या मार्च महिन्यांत औंध संस्थान प्रजापरिषदेचें दुसरें अधिवेशन कुंडल मुकामीं भरलें. स्वागताध्यक्ष श्री. बाबुराव लाड पाटील असून अध्यक्ष कै. प्रो. गणेश रघुनाथ अभ्यंकर वकील सांगली हे होते. प्रो. अभ्यंकरांसारखा संस्थानी चळवळींत मुरलेला, व संस्थानी प्रश्नाचा दीर्घ व सखोल अभ्यास करणारा पुढारी अध्यक्ष लाभल्यानंतर औंध संस्थानच्या प्रजेस आपल्या परिस्थितीचें ज्ञान झालें नाहीं तरच आश्चर्य! 'स्वराज्य' मिळालें या पोकळ डौलांत प्रजा गुरफटून गेली होती व आपण अपात्र असून ५ वर्षांत आपली तयारी कशी काय होईल याच एका विवंचनेंत सर्व लोक होते. त्यामुळें राज्य-कारभारांतील ढोबळ दोषांकडेही कोणास लक्ष देणेस फुरसत नव्हती.

## प्रो. अभ्यंकरांची खरमरीत टीका.

अशा स्थितींत कै. प्रो. अभ्यंकर यांनीं आपले भाषणांत संस्थानांतील राज्यकारभारांतील दोष मोठ्या खुबीनें पण स्पष्टपणें लोकांसमोर मांडले. ते म्हणाले कीं, औंध संस्थानचा राज्यकारभार सहानुभूतीचा आहे पण तो जबाबदार मात्र नाहीं. व त्या दृष्टीनेंच पुढील विधायक सूचना त्यांनीं केल्याः—पब्लिक अकौंटस कमिटी निर्माण करण्यांत यावी; श्रीमंतांच्या खासगी खात्याचा खर्च १,७१००० रु. होतो, तो संस्थानचे उत्पन्नाचे मानानें जास्त आहे सबब एकंदर उत्पन्नाचे मानाशीं या खर्चाचें प्रमाण निश्चित करण्यांत यावें; किरकोळ अर्जावरून दिवाणी कोर्टाकडून झालेल्या पद्धतशीर निकालावर श्रीमंत अर्ज घेऊन त्यांत ढवळाढवळ करीत असतात, त्यासंबंधीं येथें स्पष्ट नमूद केलें पाहिजे कीं, श्रीमंतांच्या शुद्ध हेतूबद्दल कोणाचीही शंका नाहीं; परंतु कोर्टें स्थापन

केलीं, कायदे लागू केले व लायक माणसांची योजना केल्यानंतर कायद्यांनीं घालून दिलेल्या मार्गाचें उल्लंघन करणें, त्यांत कितीही उदात्त हेतु असला तरी, रास्त होणार नाहीं. मनुष्याची कृति सदोष असते, तीच गोष्ट माणसांनीं केलेल्या न्यायाबद्दलची आहे. परंतु कायदेकानू व काम चालविण्याचे आंखून दिलेले मार्ग यांनीं जो निर्णय होईल तो शेवटचा समजून पत्करला पाहिजे. तो न्याय्य किंवा अन्याय्य आहे हें परमेश्वराशिवाय इतरांनीं सांगणें मोठें धोक्याचें आहे व याच कारणामुळें न्यायदानाच्या बाबतींत अंतिम सीमा घालून दिलेल्या आहेत. राजा जरी सर्व न्यायदानाचा उगम असला, तरी तो या नियमाचें अतिक्रमण करीत नाहीं असें खुद्द इंग्लंडच्या उदाहरणावरून दिसून येणार आहे. दयेची बाब ही केवळ राजाच्या वैयक्तिक अधिकारांतील असली, तरी मंत्रिमंडळाच्या सल्ल्याशिवाय या अधिकाराचा उपयोग केव्हांही करण्यांत येत नाहीं. यासाठीं संस्थानमजकुरीं जे विद्यमान कायदे आहेत, त्यांत आंखून दिलेल्या मार्गानें न्यायदान झाल्यानंतर किरकोळ अर्जानें हात घालण्याचा उपक्रम अजिबात बंद झाला पाहिजे. अशा तऱ्हेची ढवळाढवळ करणें हें बेसनदशीर असल्यानें, तें बेकायदेशीर नसलें, तरी अयोग्य व गैरशिस्त आहे व श्रीमंतांसारख्या शुद्ध हेतूच्या गृहस्थांनीं अशा बाबतींतील तक्रारींस यत्किंचितही जागा ठेवूं नये. श्रीमंतांच्या सद्धेतूचा फायदा घेऊन पुष्कळ लोक आपला गैरशिस्त लाभ करून घेत आहेत. असंतुष्ट व अयशस्वी झालेल्या एखाद्या पक्षकारानें अन्यायाचा कांगावा करून एखादा अर्ज करावा व श्रीमंतांनीं दिवाणी कोर्टाच्या अंमलबजावणींत ढवळाढवळ करावी; अशा प्रकारानें सर्व न्यायपद्धति लोकांच्या अनादरास पात्र होत आहे. न्यायपद्धतीबद्दल लोकांचा विश्वास दृढ असणें हें सुराज्याचें पहिलें लक्षण आहे. परमेश्वरानें निर्दोष मनुष्य निर्माण केला नाहीं, ही जाणीव लक्षांत ठेवून राजमान्य न्यायपद्धतीनें केलेल्या निकालांत सहसा ढवळाढवळ न करण्याचा प्रघात शक्य तितक्या लवकर अंमलांत आणावा. त्याचप्रमाणें संस्थानांतील नागरिकांना मूलभूत हक्क देण्यासही श्रीमंतांनीं मागेंपुढें पाहूं

न्ये. याप्रमाणेंच इतर बारीकसारीक गोष्टींबद्दलही त्यांनीं आपल्या भाषणांत बराच ऊहापोह केला. पं. सातवळेकर यांनीं आपल्या भाषणांत प्रजेला अनुकूल वेळ आली असून पंचवार्षिक योजना मांडून आपली तयारी कशी करावी त्याचें त्यांनीं स्पष्टपणें सभेपुढें विवेचन केलें. संस्थानाधिपतींच्या खाजगी खर्चाबद्दल अध्यक्षांनीं टीका केली. याबाबत अनेक लोकांत मतभेद होऊन औंध दरबारनेंही त्याचा इनकार केला व हा खर्च मर्यादित आहे असें प्रतिपादलें. अध्यक्षांनीं हें खाजगी खर्चाचें प्रमाण नरेंद्रमंडळाचे चर्चेंत शें. ५ पासून ७½ टक्के असलें तरी शें. १० टक्के तर वाजवी असें मानण्याचा कल दिसतो असें सांगून औंध संस्थानचा खाजगी खर्च सभासदांच्या मताप्रमाणें सुद्धां शेंकडा २२ टक्के आहे असें आपल्या समारोपाच्या भाषणांत अध्यक्षांनीं सांगितलें. ते पुढें म्हणाले कीं, " औंध संस्थानच्या घटनेला ' स्वराज्याची सनद ' म्हणून कोणी अयथार्थ स्तुति करूं लागले, तर त्यासंबंधींचा भ्रमनिरास करणें अत्यंत जरूर आहे. या घटनेस स्वराज्याची सनद मुळींच म्हणतां येणार नाहीं. स्वराज्य प्राप्त करून घेण्याच्या मार्गांतील हा एक मोठा हप्ता आहे असें फक्त म्हणतां येईल. घटनेप्रमाणें श्रीमंत वागतील तर बजेटावरील फार मोठा ताबा लोकांना मिळाला असें म्हणतां येईल. " या परिषदेंत पुढील महत्त्वाचे ठराव पास झाले:—

१. संस्थानमधील सारावाढ प्रमाणाबाहेर आहे, सबब तिची फेर-चौकशी व्हावी.

२. नोकरलोकांच्या पगाराचें स्केल ठरवावें.

३. रेकार्ड ऑफ राइटचें काम अत्यंत असमाधानकारक आहे, त्याकडे लक्ष पुरवावें.

४. संस्थानांत योग्य कायदेकानू व काम करणेचे नियम लागू केले आणि कोर्टें स्थापन केलीं व लायख माणसें न्यायदानासाठीं नेमल्यानंतर-

सुद्धां किरकोळ अर्ज घेऊन श्रीमंतांनीं ढवळाढवळ केल्यानें फारच नुकसान होत आहे सबब ही वहिवाट शक्य तितक्या लवकर बंद करावी.

५. कोर्ट फी स्टांप कमी करावा.

६. ग्रामपंचायतींत स्टांप माफ करावा.

७. संस्थाननें फेडरेशनमध्यें सामील व्हावें व त्यापूर्वी प्रजेच्या मूलभूत हक्कांची घोषणा करावी.

प्रजापरिषदेंत पास झालेल्या या ठरावांची अंमलबारी झाल्याचें जरी प्रत्यक्ष दिसून येत नव्हतें,तरी प्रजापक्षीय चळवळीस चांगलाच जोर चढत चालला होता. या पुढील प्रजापरिषदेचें तिसरें अधिवेशन औंध मुक्कामी राजधानींत श्री. रा. ब. गणेश कृष्ण चितळे यांच्या अध्यक्षतेखालीं ता २२ मे १९३३ रोजीं भरलें. औंध येथील एक वेळचे नागरिक असलेले श्री.कृष्णाजी शंकर दीक्षित हे स्वागताध्यक्ष होते. अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत समतोल बुद्धीनें राजधर्म व प्रजाधर्म यांचें मार्मिक विवेचन करून शेती सुधारणा, सहकारी पतपेढ्या, ग्रामसुधारणा, उद्योगधंदे वगैरेबाबत अनेक उपयुक्त सूचना केल्या. न्यायकोर्टासंबंधीं प्रजेच्या तक्रारी योग्य असल्याची त्यांनीं ग्वाही दिली व यावर सर्व संस्थानांचें समाईक हायकोर्ट स्थापणेबद्दलचा उपाय त्यांनीं सुचविला. त्यांनीं श्रीमंतांच्या खाजगी खर्चाबद्दलही ओझरता उल्लेख केला व शेवटीं "हल्लीं आपणांस प्रत्यक्ष कृति पाहिजे, पोकळ शब्दांचें अवडंबर नको" असें सांगून विधायक कार्य करण्याबद्दल लोकांना विनंति केली.

या परिषदेंत पास झालेले महत्त्वाचे ठराव पुढीलप्रमाणें होते:—( १ ) शुभ्रपत्रकाचा निषेध; ( २ ) सारावाढीसंबंधीं चौकशी कमिटीची मागणी; ( ३ ) शेतसाऱ्यांत तहकुबी; ( ४ ) शेतकऱ्यांचे स्थावर इस्टेटीचे लिलांव व जप्त्या तहकुबी; ( ५ ) तालुका समितींचे नियम करून त्या स्थापणेची मागणी; ( ६ ) गुणदाळ तालुक्यांत मातृभाषा कानडी असावी; ( ७ ) शेतकऱ्यांना ऋणमुक्त करण्याची योजना करावी; ( ८ ) किरकोळ

अर्जानें सरकारांनीं कोणताही निकाल करूं नये वगैरे ठराव पास झाले. एकंदर परिषदेंतील ठरावांचा रोख श्रीमंतांकडून जास्त हक्क मागण्याकडे नसून दिलेले हक्क आत्मसात् कसे करतां येतील याचीच काळजी प्रजेला लागलेली होती असें दिसत होतें. शेवटीं रावब. चितळे यांनीं श्रीमंतांनासुद्धां 'जनतेचा विश्वास संपादन करून कायद्याचा बोज यथायोग्य ठेवून वागलें पाहिजे' असा कटु परंतु सत्य व पथ्यकर सल्ला दिला. औंध संस्थानांतील लोकपक्षीय सभासदांनीं संस्थानच्या राज्यकारभारांतील दोष काढून टाकण्याविषयीं जी शिकस्त केली आहे, तिची जाणीव त्यांनीं श्रीमंतांना करून दिली.

## प्रिव्ही कौन्सिल

सन १९३१ च्या डिसेंबर महिन्यांत प्रातिनिधिक सभेची बैठक झाली, त्यांत महत्त्वाचे ठराव पुढीलप्रमाणें होते:— सार्वजनिक फंडाचा नियंत्रण-कायदा पास झाला. औंध संस्थानांत आजपर्यंत सिव्हिल प्रोसीजर कोड-प्रमाणें ३ कोर्टें होतीं, तीं कमी करून नवीन कायद्यानें मधलें दिवाणी कोर्ट कमी करून फक्त दोनच कोर्टें ठेवलीं. त्याचप्रमाणें सर्व खटल्यांत असेसर्स नेमणेसंबंधींही ठरावही पास झाला. यायोगें लोकांना न्याय-शिक्षण मिळावें असा हेतु होता. परंतु पुढें हे लोक वेळेवर येईनासे झाले व कोर्टाचे कामांत त्यांची व्यर्थ अडचण मात्र होऊं लागली म्हणून ते फक्त थोड्या खटल्यांतच घ्यावेत असें ठरलें. वकील फी कमी करून ती शेंकडा ३ टक्के करणेचा ठराव पास झाला. प्रौढ शिक्षणाबद्दलचा ठराव मंजूर झाला, पण त्याचा प्रत्यक्ष परिणाम आजपर्यंत दिसून आलेला नाहीं. प्रिव्ही कौन्सिलचें बिलही मंजूर होऊन त्याप्रमाणें तें कोर्ट अस्तित्वांत आलें.

पुढील वर्षीं प्रजापरिषद गुणदाळ येथें दे. भ. श्री. निवासराव कौजलगी वकील यांचे अध्यक्षतेखालीं भरली. त्यांत प्रामुख्यानें संस्थानांतील जमीनसारा रिव्हिजनमध्यें भरमसाट वाढला आहे, तरी व बागायत आकार

मोजणी न करितां अजमासानें जो बसविला आहे, तो कमी व्हावा यावरच सर्व भर देण्यांत आला. परिषद् भरविणेचे कामीं तेथील कार्यकर्ते रा. गो. ल. कणबूर यांनींच पुढाकार घेतला होता. गुणदाळकडे कापूस पिकत असून तेथील लोकांना हातसूत काढणेंचीही संवय आहे, त्यामुळें परिषदेच्या उत्तेजनामुळें खादीची निपज वाढणेस मदत झाली.

## ऋणविमोचन

माहे जून १९२३ मध्यें प्रातिनिधिक सभेचें जें अधिवेशन झालें, त्यांत प्रथमच ग्राम-सभा व तालुका समितीच्या खर्चाकरितां बजेटमध्यें २००० रु. मंजूर करण्यांत आले. या बैठकींत रा. ल. ग. पटवर्धन यांनीं संस्थानच्या कर्जफेडीसंबंधीं मार्मिक पण सडेतोड भाषण केलें. ते म्हणाले "गेल्या १० वर्षांत जमा ४० लक्षांची धरली असून प्रत्यक्ष ४४ लाख रुपये हातांत आले व खर्चाकडे ३६ लक्ष रुपये मंजूर झाले असून त्याप्रमाणें खर्च न होतां, आलेली सर्व जमा खर्च झालेली आहे व कर्ज-फेड मुळींच झालेली नाहीं." श्री. ल. का. किर्लोस्कर यांनीं ग्रामसभा व तालुका समिती स्थापन झालेल्या आहेत, त्याकरितां ७२ गांवांना अवघे २००० रु. म्हणजे प्रत्येक गांवास ३० रुपये येतात व यानें काय होणार अशी तक्रार केली. संस्थानांत कर्जफेड झाली पाहिजे, ती झाल्याशिवाय धंदेशिक्षणाची सोय होत नाहीं; रेकार्ड ऑफ् राइटस् नीट नाहीं; इन्स्पेक्शन बरोबर होत नाहीं वगैरे तक्रारी पुढें मांडल्या गेल्या कै. श्री. वामनराव पटवर्धन यांनीं बजेटमध्यें न धरलेला खर्च दरबार कसा करितें याचें सोदाहरण विवेचन केलें व अशा रीतीनें चालणार असेल,तर बजेट आमचे पुढें न येणेंच बरें अशी निर्वाणीची भाषा काढली. श्री. वि.गो. दर्शने यांनीं पोलिस खात्याची दक्षता कमी असलेबद्दल व मोजणीचे अर्ज बिन तजविजीनें पडून आहेत याबद्दल तक्रार केली. ग्रामपंचायतींत लायख लोक मिळत नाहींत,यामुळें टग्यांचें फावतें व अधिकाराचा दुरुपयोग होत आहे व यामुळें स्वराज्यापेक्षां सुराज्य बरें असें वाटूं लागलें आहे असें त्यांनीं स्पष्टपणें सांगितलें. रावब. काळे यांचें देवस्थान-

संबंधींचें बिल या बैठकींत पास झालें. इन्कमटॅक्स बसविणेसंबंधींचें बिल सभेपुढें येऊन त्यावर दिवाण, हायकोर्ट जज्ज श्री. नानासाहेब चापेकर यांनीं व अध्यक्षांनीं अनुकूल भाषण केलें व रा. किर्लोस्कर, श्री. सातवळेकर, श्री. कलाल, रुस्तुमराव देशमुख व श्री. वामनराव पटवर्धन यांचीं विरोधी भाषणें झालीं. याचें पहिलें वाचन पास होऊन तें सिलेक्ट कामिटीकडे गेलें. श्री. सातवळेकर यांनीं शेतसारा कसा कमी करतां येईल यासंबंधीं तज्ञांची कमिटी नेमण्यासंबंधींचा ठराव मांडला, पण तो तहकूब ठेवण्यांत आला.

औंध संस्थान मध्यवर्ती बँक लिमिटेड करणेचा कायदा सन १९३२ मध्येंच पास झाल्यानें, त्याप्रमाणें बँक लिमिटेड होऊन आक्टोबर १९३२ पासून बँकेचें ऑफिस स्वतंत्र झालें व संस्थाननें बँकेचे रु. १००००० चे शेअर्स घेऊन आपल्या ठेवीही त्यांत ठेवल्या. करमणुकींचे खेळावर त्यांत होणारे उत्पन्नावर $\frac{१}{२}$ प्रमाणांत कर घेणेबद्दलचा ठरावही या सभेंत पास झाला. डिसेंबर १९३३ मध्यें प्रातिनिधिक सभेच्या बैठकींत इनकम-टॅक्स सिलेक्टकमिटीचा रिपोर्ट आला, त्यांत हा कर संस्थानाचे हिताचे दृष्टीनें बसवूं नये असा अभिप्राय व्यक्त झाला व त्यामुळें तें बिल दुसऱ्या वाचनाचे वेळीं नापास झालें. सन १९३४ च्या एप्रिलमध्यें प्रातिनिधिक सभेची नवी निवडणूक होऊन त्यांत बरेच नवीन सभासद निवडून आले व सरकारनियुक्त सभासदांत रावब. काळे, ना. सरदार जगन्नाथ महाराज, श्री. वाग्भटराव देशपांडे, अनंत विनायक पटवर्धन, अप्पामहाराज पंडित व स्त्री-सभासद सौ. मनोरमाबाई ठकार अशी प्रमुख मंडळी होती. लोकनियुक्त सभासदांत श्री. रामचंद्र रघुनाथ इंगळे, पंडितजी सातवळेकर, श्री. शंकरराव ओगले, लक्ष्मण गणेश पटवर्धन, गो. ल. कणबूर, लक्ष्मण काशि-नाथ किर्लोस्कर, वगैरे प्रमुख सभासद होते. अध्यक्षस्थानीं रावब. काळे यांचीच योजना झाली.

या खेपेस आटपाडी तालुक्याच्या सभासदांची निवडणूक रद्द ठरल्यानें ते हजर नव्हते. त्यामुळें या बैठकींत बजेटाव्यतिरिक्त कांहीं काम झालें नाहीं. श्री. अनंत विनायक पटवर्धन हे फिनॅन्स कमिटीचे लोकांतर्फे सूत्र-चालक असल्यानें त्यांच्या नेतृत्वाखालीं बजेट बसलें म्हणजे त्यांत सभेंत फरक होत नसे व ते असेपर्यंत हा क्रम अव्याहत चालू होता. डिसेंबर १९३४ च्या बैठकींत श्री. इंगळे यांनीं न्यायखातें व अंमलबजावणी खातें वेगळें करणेबद्दलचा ठराव मांडला. त्यास श्री. वाग्भटराव देशपांडे, अनंत विनायक पटवर्धन, ल. का. किर्लोस्कर यांनीं जोराचा पाठिंबा दिल्यावर तो पास झाला व त्यास श्रीमंतांची मंजुरी मिळून त्याची अंमलबजावणीही ताबडतोब सुरू झाली. औंध संस्थानच्या इतिहासांत ही गोष्ट चिरस्मर-णीय होईल यांत शंका नाहीं. आजपर्यंत खुनी केसमध्यें गरीब पक्षकारांतर्फें गरिबांचा वकील नेमणेंत येत नसे, तीही पद्धत श्री. इंगळे यांचा ठराव पास होऊन करणेंत आली. त्याचप्रमाणें आजपर्यंत औंध संस्थानांत जीं सर्क्युलरें व कायदे पास झाले, ते एकत्र छापून मिळावेत म्हणून श्री. इंगळे यांनीं ठराव आणला होता. त्याचीही अंमलबारी होऊन त्याप्रमाणें पुस्तक तयार करणेंत आलें. याहीपेक्षां महत्त्वाचा असा एक ठराव रा. इंगळे यांनीं आणला होता व तो म्हणजे ब्रिटिश हद्दींत ज्याप्रमाणें कोणाही नागरिकाला भारतमंत्र्याविरुद्ध विरुद्ध दावा आणतां येतो, त्याप्रमाणें औंध संस्थानांत अशा प्रकारें कोणाही नागरिकास सरकार-विरुद्ध दावा आणतां यावा व तो दावा औंध दरबारचे दिवाण यांचे-विरुद्ध चालावा. हा ठराव सरकारतर्फें संमत झाला व पुढें २।३ वर्षांत सरकारवर दावेही आणले गेले. अशा तऱ्हेनें कोणत्याही नागरिकास सरकारवर दावा करणेचा हक्क प्रस्थापित केला गेला. गुणदाळ तालुक्यांत सारावाढ जास्त झाली आहे, ती कमी करणेबद्दलचा श्री. कणबूरांचा ठराव तहकूब राहिला. याप्रमाणें सारावाढीबद्दल दरसाल ठराव येतच होते परंतु

याकडे कोणींच लक्ष दिलें नाहीं. त्याचप्रमाणें रेव्हिन्यू सर्वेनंतर ज्या ातकऱ्यांनीं आपले खर्चानें विहिरी खणल्या, त्यावर बसविलेला बागाईत ाकार माफ करावा हाही ठराव दरसाल येतच होता. श्री. वाग्भटराव देशपांडे ांनीं शेतीच्या जमिनींचे लहान लहान तुकडे पडूं नयेत म्हणून जो ाव आणला होता तो पास होऊं शकला नाहीं. औंध बँकेचें पहिलें बोर्ड ; वर्षे अधिकारारूढ राहील हें सरकारी बिल कौन्सिलांत नापास झालें व यामुळें लोकांत डायरेक्टरांबद्दल लोकमत काय आहे, तें प्रकट झालें. रंतु सरकारच्या जादा अधिकारांत ( Veto ) हें बिल कायदा म्हणून ंमलांत आलें. संस्थानमध्यें गांवोगांव चावडी व धर्मशाळा बांधणेबद्दल ा. किर्लोस्कर यांनीं ठराव आणला होता, परंतु बजेटच्या ओढगस्त स्थितीमुळें त्याचा उपयोग कांहींच झाला नाहीं. गेलीं २।३ वर्षे संस्थानचा ोलीसखात्याचा कारभार अव्यवस्थित असल्याबद्दल प्रश्नांच्या रूपानें भासद लोक तक्रार करीत होते. हा प्रश्न सन १९३५ च्या जूनमध्यें वेशेष धसास लागला. त्याचप्रमाणें न्यायखात्यांतील रा. पतकी न्यायाधीश ांचे कामाबद्दलहीं चोहोंकडून प्रश्न येतच होते. पण या बाबींना सन १९३५ च्या डिसेंबरमधील सभेंत विशेष चालना मिळाली. पोलीसखात्यांत अधिक कार्यक्षम व हुषार लोक नेमणेबद्दलचा श्री. इंगळे यांचा ठराव सभेनें पास केला.

ब्रिटिश हिंदुस्थानांत जारी असलेल्या मुदतीचे कायद्याचे दुरुस्तीचा ायदा, तसेंच सुधारलेलें सिव्हिल प्रोसिजर कोड वगैरे जरूर असणाऱ्या ुजबी दुरुस्तीचे कायद्याचीं बिलें रा. रा. इंगळे यांनीं सभेपुढें आणून ास्थानांतील कायदा ब्रिटिश हद्दींतील कायद्याचे बरोबर आणण्याचा यत्न केला.

## टीकेचा कारभारावर परिणाम

पूर्वी ठरल्याप्रमाणें सन १९३५ सालीं श्रीमंतांनीं श्री. लक्ष्मण काशिनाथ किर्लोस्कर यांची दरबारमंत्री म्हणून योजना केली व त्यांचेकडे ग्रामोद्धार,

उद्योगधंदे, शाळा, दवाखाने वगैरे खातीं दिलीं. श्री. इंगळे व कै. श्री. वामनराव पटवर्धन यांनीं वेळोवेळीं प्रातिनिधिक सभेंत जीं सडेतोड व निर्भीड भाषणें केलीं, त्यांचा परिणाम संस्थानचा राज्यकारभार सुधारणेच्या दृष्टीनें अतिशय झाला व सरकारी अधिकाऱ्यांना प्रातिनिधिक सभेचा वचक विशेष तऱ्हेनें वाटूं लागला. लोकनियुक्त सभासदांमधून मंत्री नेमले खरे, पण विविध कारणानें विशेष काम होऊं शकलें नाहीं आणि यामुळें घटनेचा हेतु सफळ झाला नाहीं. राज्यकारभाराचा खर्च डोईजड झाला होता. नागरिकत्वाचे मूलभूत हक्कावर अतिक्रमण केलें जात होतें. पोलिस खातें निर्बल झालें होतें व त्यास चांगला धुरीण नव्हता. न्यायखात्यांत हायकोर्ट चांगलें होतें, परंतु खालील न्यायाधिशाबद्दल लांचलुचपतीच्या तक्रारी भर प्रातिनिधिक सभेंत प्रश्नरूपानें व भाषणांत केल्या जात होत्या. बँकेच्या कर्जवसुलीबद्दल लोकांत समाधान नांदत नव्हतें. प्रातिनिधिक सभेंत विचारले जाणाऱ्या प्रश्नांचीं उत्तरें नीट मिळत नव्हतीं. याचवेळीं दिवाण राव. धांदरफळे जाऊन श्री. वाग्भटराव देशपांडे यांची दिवाणपदावर योजना झाली. त्यामुळें संस्थानचे लोकांत एक प्रकारचा विश्वास उत्पन्न झाला, परंतु लोकांच्या दुर्दैवानें ते मार्च १९३६ मध्यें मोटारच्या अपघातानें दिवंगत झाले व त्याऐवजीं श्री. शिवरामपंत दर्शने हे दिवाण झाले. यावेळीं संस्थानच्या रयतेची ऋणमुक्तता करावी अशी जोराची चळवळ सुरू होती. विशेषतः लोकांपेक्षां श्रीमंत राजेसाहेब यांनाच ही तळमळ विशेष लागून राहिली होती. भावनगर संस्थाननें शेतकऱ्यांची कर्जमुक्तता केल्यापासून या प्रश्नास फारच जोरानें चालना मिळाली व त्याप्रमाणें येथें एक ऋणविमोचनाचा कायदाही पास झाला. परंतु संस्थानच्या आर्थिक तंगीमुळें हा कायदा फक्त एकाच गांवास लागू करितां आला व पुढें या कायद्याचें व चळवळीचें नांवही ऐकूं येईनासें झालें.औंध संस्थानांत फॅक्टरी ॲक्ट याचवेळीं लागू करण्यांत आला. ट्रेझरीचें काम व व्यवहार औंध संस्थान मध्यवर्ति बँकेमार्फत होऊं लागल्यामुळें

लोकांची पुष्कळच सोय झाली. दरम्यान विचूद घाट तयार करणेकारितां २२०००/—रु. खर्च करण्यांत आले, त्यास प्रातिनिधिक सभेची मंजुरी नव्हती म्हणून बराच गवगवा झाला; परंतु विचूद ही व्यापारी वसाहत वसविणेच्या दृष्टीनें सभासदांनीं ती रक्कम मंजूर केली.

इंदूर साहित्य संमेलनाचें अध्यक्षपद श्रीमंतांना मिळून संस्थानच्या लौकिकांत भर पडली. रावब. काळे आजारी असल्यानें सभेचे अध्यक्ष श्रीमंत जगन्नाथमहाराज पंडित हे होते. व जून १९३६ च्या प्रातिनिधिक सभेच्या बैठकीपूर्वी रावब. काळे निवर्तल्यामुळें श्री. जगन्नाथमहाराज हेच कायमचे अध्यक्ष झाले. त्यांनीं आजपर्यंत जी कामगिरी केली ती अत्यंत स्पृहणीय अशीच आहे. त्यांची वृत्ति सरळ असून त्यांना कामाचा उरक व माहिती पुरेपूर आहे व नेहमीं लोकपक्षा-बद्दल सहानुभूति बाळगून व सरकार पक्षाशीं मिळतें घेऊन ते आपलें काम निर्भीडपणें व समतोल वृत्तीनें करीत आहेत. न्यायखात्यांतील अधिकाऱ्यांच्या लांचलुचपतीच्या तक्रारीमुळें त्या अधिकाऱ्यास कायमची रजा देण्यांत आली. अशा तऱ्हेनें न्यायखात्याचा कारभार निर्दोष झाला.

श्री. वाग्भटराव देशपांडे यांनीं डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज म्हणून रा. बसले यांची केलेली नेमणूक सार्थ ठरून त्यांचें कामही संस्थानच्या सर्व लोकांना पसंत पडलें. त्यांचा कामाचा उरक,कायद्याचें सखोल व सूक्ष्म ज्ञान, न्याय-खात्याची इभ्रत वाढविण्याची वृत्ति व कडक शिस्त यांचा उपयोग, औंध संस्थानच्या न्यायखात्यांत सुधारणा होण्यास पुष्कळच झाला. न्यायमूर्ति चाफेकर हे हायकोर्टांत आल्यापासून हायकोर्टांतील सांचून राहिलेलीं कामें तावडतोब निकालांत निघालीं व त्यांच्या अनुभवाचा व ज्ञानाचा फायदा सर्व खात्यांस झाला. विशेषतः त्यांनीं श्रीमंतांच्या हुकमावर जे विरुद्ध मतप्रदर्शन निर्भीडपणें केलें, त्यानें राज्यकारभारांत तर सुधारणा झालीच, परंतु एकंदर जनतेला त्यामुळें आपले हक्कांना

न्यायखात्यांत संरक्षण मिळेल व तें संरक्षण वेळप्रसंगींसुद्धां राजाच्या विरुद्धही मिळेल असा आत्मविश्वास वाटूं लागला. त्यांचें काम सरकार व प्रजा या उभयतांना अत्यंत पसंत पडेल असेंच झालेलें आहे. सन १९३६ च्या जूनच्या सभेंत औंध संस्थानच्या पोलिस खात्याच्या बेशिस्त कारभाराबद्दल श्री. इंगळे यांनीं प्रखर टीका केली. श्री. कणबूर यांनीं खालचे अधिकारी वरिष्ठांचा हुकूम कसे पद्धतशीरपणें धाब्यावर बसवितात तें सप्रमाण दाखवून दिलें. ना. अप्पामहाराज पंडित यांनीं तर 'स्वराज्य दिलें असें म्हणतात पण खरोखर कांहीं दिलेलें नाहीं असें अधिकाऱ्यांचे वर्तनावरून वाटतें' असें स्पष्टच सांगितलें.

एप्रिल १९३७ मध्यें प्रातिनिधिक सभेची नवी निवडणूक झाली, त्यांत पूर्वीं लोकनियुक्त सभासद २१ होते ते १४ झाले व एकूण सभासद ३९ होते ते २६ झाले. हा फरक मागील खेपेस जी घटनेंत दुरुस्ती झाली त्यामुळें करण्यांत आला. या खेपेसही श्री. जगन्नाथ महाराज हेच सभेचे अध्यक्ष एकमतानें निवडले गेले. मध्यंतरीं श्री.ल.का. किर्लोस्कर यांनीं दरबार मंत्रिपदाचा राजिनामा दिला होता. या खेपेस दरबार मंत्री म्हणून लोकनियुक्त सभासद श्री. केळकर वकील यांना नेमण्यांत आलें. त्यांना पगार अथवा वेतन दरमहा २५ रु. ठरविणेंत आलें. त्यांची कामगिरी त्यांच्या दोन वर्षांच्या कारकीर्दींत विशेष उल्लेखनीय अशी झाली नाहीं. पोलिस खात्यांत बाहेरील तज्ञ म्हणून राव ब. पटवर्धन यांची डी. एस. पी. चे जागेवर नेमणूक झाली. त्यांच्याविषयीं लोकांच्या ज्या कांहीं आकांक्षा होत्या, त्या सर्वस्वी फलद्रूप झाल्या नाहींत व त्यामुळें त्यांनाही वर्ष दीड वर्षांत जावें लागलें. या खेपेस श्री. वामनराव पटवर्धन यांची प्रकृति नादुरुस्त असल्यानें त्यांना सभासद म्हणून नेमण्यांत आलें नव्हतें. त्यांच्या कामगिरीबद्दल प्रातिनिधिक सभेनें गौरवपर उद्गार काढून पुढील ठराव पास केला:

"संस्थानी स्वराज्य वर्तमानपत्रकार व संस्थानी चळवळीचे आद्य जनक असे श्री. वामनरावजी पटवर्धन यांनीं गेल्या ९ वर्षांत ह्या प्रातिनिधिक सभेचे सभासद या नात्यानें औंध संस्थानची जी बहुमोल सेवा केली, त्याबद्दल ही प्रातिनिधिक सभा त्यांचें अभिनंदन करते व त्यांना परमेश्वर दीर्घायुरारोग्य देऊन त्यांचेकडून अशीच संस्थानी प्रजेची सेवा व्हावी अशी इच्छा प्रदर्शित करते." श्री. वामनरावजींनीं लोकनियुक्त सभासदालाही जें काम करतां येणार नाहीं तें काम करून दाखविलें आहे, असें रा. कणबूर म्हणाले. रा. इंगळे म्हणाले कीं, "रा. वामनरावजींनीं आपल्या ९ वर्षांच्या कारकीर्दींत या कौन्सिलची इभ्रत वाढविली. भीडभाड सोडून श्रीमंतांना सल्ला दिला. त्यांनीं सर्व सभासदांना शिस्त शिकविली. त्यांचा उपकार स्मरला नाहीं तर आपल्या अंगीं कृतज्ञता नाहीं असें होईल." सरकारतर्फे दिवाणांनीं या ठरावास दुजोरा देतांना पुढील उद्गार काढले. "वामनरावांच्या निर्भीड, निस्पृह व सडेतोड सल्ल्याची सरकारला उणीव भासल्यावांचून राहणार नाहीं." खुद्द श्रीमंतांनीं वामनरावजींच्या कामगिरीबद्दल पुढील गौरवपर उद्गार काढले. ते म्हणाले, "त्यांची प्रातिनिधिक सभेंतील श्रेष्ठ कामगिरी इतर संस्थानांना धडा घालून द्यावा अशा उच्च दर्जाची आहे."

मार्च १९३७ मध्यें दिघंची येथें आटपाडी तालुक्याची प्रजापरिषद केसरीचे संपादक श्री. जनार्दन सखाराम करंदीकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती; त्यांत संस्थानांत सार्वत्रिक कशी सुधारणा व्हावी, पोलीस खातें कसें सुधारावें, ग्रामोद्धाराकरितां काय योजना करावी याबद्दल स्थूलमानानें चर्चा झाली. सन १९३७।३८ सालचे प्रातिनिधिक सभेंत इनकम टॅक्सचें बिल राव. नानासाहेब चाफेकर यांनीं मांडलें. त्यांत दुरुस्ती होऊन २००० रुपयांवर इनकमटॅक्स असावा हें ठरून तें बिल पास झालें. औंध संस्थानांत सन १९३६ पासून शेतकी सल्लागार म्हणून एका अधिकाऱ्याची नेमणूक झाली होती, परंतु त्यांचा संस्थानला व्हावा तसा उपयोग न झाल्यानें अगर लोकांना त्यांचा उपयोग करून घेतां न आल्यानें त्यांना सन १९३९ सालीं कमी केलें गेलें. औंध संस्था-

नांत इतर देशांप्रमाणें प्रगतिपथाच्या पायऱ्यां म्हणून पंचवार्षिक योज
श्रीमंतांच्या रौप्य जुबिलीनिमित्त सन १९३६ च्या आक्टोबरांत आं
ग्यांत आली होती. परंतु त्या योजनेचें पुढें कांहीं झालेंच नाहीं. या
वेळीं रा. कणबूर यांनीं ग्रामपंचायतीच्या कारभाराची चौकशी कमि
नेमण्याबद्दल आपला पुढील ठराव मांडला होता.

"संस्थानांत पुष्कळशा ग्रामपंचायती बरोबर चालत नसून त्यामु
रयतेचे कल्याणाचा सरकारचा स्तुत्य हेतु बिलकूल साध्य न होतां ट
गेरी वाढली आहे. तरी त्यासंबंधीं एक ग्रामपंचायतीच्या कारभारा
चौकशी कमिटी नेमावी." यावरून ग्रामपंचायतीबद्दल रयतेंत कोणत्य
तऱ्हेची भावना होती हें प्रतीत होत आहे. परंतु हा ठराव त्यांनीं लोकांच्य
आग्रहावरून परत घेतला. औंध संस्थानची राज्यघटना सन १९३० च
कायद्यानें बनली, पण तींत बरेच दोष राहून गेले होते. कांहीं अधिका
रींत निर्दिष्ट नसतांना ते श्रीमंत वापरीत होते, तेही घटनेंत समाविष्ट करा
जरूर होतें. म्हणून हें राज्यघटना-सुधारणेच्या कायद्याचें बिल जु
१९३७ मध्यें प्रातिनिधिक सभेपुढें आलें व त्याचें पहिलें वाचन होऊन
सेलेक्ट कमिटीकडे गेलें. हें बिल सिलेक्ट कमिटींतून सुधारून आलेनंत
जानेवारी १९३८ मध्यें पास करणेंत आलें.

सन १९३७ सालीं पाऊस वेळेवर न झाल्यानें आटपाडी तालुक्यांत जवळ
जवळ दुष्काळ होता. त्यांत पिकाची आणेवारी सहा आणे लावल्यानें लोकांन
कायद्याप्रमाणें तहकुबी अगर सूट कांहींच मिळण्याचें चिन्ह दिसत नव्हते
पिकाची आणेवारी चुकीची आहे अशी लोकांनीं ओरड चालविली
रयतेस सारा देण्यास त्राण नाहीं याबद्दल आटपाडी येथें लोकांच्या सभ
सुरू झाल्या. सभांमधून नेहमींच्या पद्धतीप्रमाणें कांहीं जबाबदार, तश
बेजबाबदार मंडळीही बोलूं लागली. याचा बंदोबस्त करणेकरितां व आणे
वारी पुनः करण्याकरितां त्यावेळचे संस्थानचे दिवाण राव. दर्शने
आटपाडीस गेले. त्यांनीं पुनः आणेवारी दुरुस्त केली व दुष्काळी

गांवांना तहकुबी देण्याचें आश्वासन दिलें. पण एवढ्यानें लोकांचें समाधान होईना. ते कांहीं तरी सूट द्या असें म्हणूं लागले. दिवाण म्हणत कीं "काय-याप्रमाणें सूट देतां येत नाहीं." यावरून प्रकरण चिघळत चाललें. आट-पाडीस दर आठवड्यास सभा होऊन सत्याग्रहापर्यंतची भाषा निघूं लागली. झेंडावंदन–मिरवणुकी–भाषणें यांनीं लोकांत उत्साह उत्पन्न झाला. पुढा-ऱ्यांनीं तुमचा सारा जास्त आहे, तो कमी करतों अशी भाषा सुरू केल्यानें आसपासच्या खेड्यापाड्यांचे लोक सभेस भराभर जमूं लागले. दिवाण परत औंधास आले. राजकुमार श्रीमंत अप्पासाहेब हेही आटपाडीस जाऊन आले, पण त्याचाही कांहीं उपयोग झाला नाहीं. दिवाण परत आल्या-नंतर त्यावेळचे डी. एस. पी. राव. पटवर्धन हे पोलिस पार्टी बरोबर घेऊन आटपाडीस गेले. त्यामुळें लोकांना व पुढाऱ्यांना दहशत बसेल अशी त्यांची कल्पना होती ती फोल ठरली. दरम्यान मिरजेचे श्री. बा. वि. शिखरे व श्री. शंकरराव देव त्यांनीं व्याख्यान दिल्यानें चळ-वळीस चांगलाच जोर आला. व तेथून २००० शेतकऱ्यांचा मोर्चा ता.२९-८-१९३८ रोजीं औंधास आला. त्यांचें मागणें शेतसारा कमी करा व स्वराज्य द्या असें होतें. मोर्चा येणेपूर्वी आटपाडीचे चार पुढारी लोक रुस्तुमराव देशमुख, मिठुलाल कलाल, अमिद्दीन मेस्त्री व गणेश बंडो देशपांडे या चौघांवर क्रि. प्रो. कोड १०८ प्रमाणें सरकारांतून नोटिसा निघाल्या होत्या. मोर्चा राजवाड्यापुढें आल्यानंतर श्रीमंतांनीं लोकांना चार उपदेशपर शब्द सांगितले. श्रीमंत अप्पासाहेब, पंडितजी सातवळेकर व श्री. इंगळे ही मंडळी औंध गांवाबाहेर मोर्चास सामोरी गेली होती. श्री. शिखरे याच वेळीं औंधांत येऊन दाखल झाले. श्री. शंकरराव देवांना बोलावणें होऊन ते दुसरे दिवशीं आले व त्यांचें व्याख्यान झालें. त्यांनीं सर्व लोकांना परत जाणेस सांगून तुमच्या मागण्या श्रीमंतांपुढें मांडण्याचें त्यांनीं आश्वासन दिलें. त्यांच्या सल्ल्याप्रमाणें लोकांवर काढलेल्या नोटिसा परत घेण्यांत आल्या व येथून स्वराज्याच्या घटनेबद्दल वाटाघाट सुरू झाली. राजकुमार श्री. अप्पासाहेब वर्ध्यास महात्मा गांधींना भेटण्यास गेले. तेथें श्रीमंत राजेसाहेब यांना नेऊन

त्यांचीही भेट घडवून आणली. पुढें राज्यघटनेचा कच्चा मसुदा तयार करून तो महात्मा गांधींना पुनः दाखविण्यांत आला. त्यांतील तत्त्वें महात्माजींनीं सांगितलीं, त्याप्रमाणें आराखडा तयार होऊन हल्लींचा स्वराज्याचा कायदा २१ जानेवारी १९३९ रोजीं औंध प्रातिनिधिक सभेंत पास करून घेण्यांत आला. त्यांतील बऱ्याच गोष्टींबद्दल सभासदांचा प्रामाणिक मतभेद होता, परंतु श्री. अप्पासाहेब यांनीं लोकांना कांहीं गोष्टींबद्दल पुढें दुरुस्ती करून घेऊं म्हणून आश्वासन दिलेवरून व महात्माजींचा आशीर्वाद व बाहेरील प्रतिष्ठित पाहुणे श्री. बाळ गंगाधर खेर ( त्यावेळचे मुंबई इलाख्याचे मुख्य मंत्री ), गंगाधरराव देशपांडे, शंकरराव देव यांच्यापुढें औंधच्या प्रजेनें विरोध दर्शवूं नये असें ठरल्यानें विरोध झाला नाहीं. ही स्वराज्याची घटना ग्रामपंचायतींवर अधिष्ठित झालेली असून गांव हेंच यांतील autonomous unit आहे. पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं It is a federation of village republics असें या योजनेचें वर्णन केलें आहे. ही घटना अमलांत आल्यानंतर ग्रामपंचायतीच्या निवडणुकी झाल्या. हा एक अभूतपूर्व प्रयोग असल्यानें त्याच्याकडे सर्व जनतेचें व संस्थानाबाहेरील प्रजापक्षीय कार्यकर्त्यांचें विशेष लागून राहिलें असल्यास नवल नाहीं. एकंदरींत औंध संस्थानमध्यें प्रथमतः जुलमानें बोलावल्या जाणाऱ्या रयत सभेचें रूपांतर हल्लींच्या प्रातिनिधिक सभेंत होऊन स्वराज्य घटना कशी बनत गेली याचा इतिहास वर सांगितलाच आहे. या कामीं राजकुमार श्रीमंत अप्पासाहेब यांचा अत्युच्च कोटीचा ध्येयवाद व समाजसत्तावाद, श्रीमंत राजेसाहेब यांची स्वार्थत्यागाची तयारी व महात्मा गांधी यांनीं कांहीं मूलभूत तत्त्वें घटनेंत समाविष्ट करणेबद्दल अगर त्या तत्त्वावर घटना अधिष्ठित करणेबद्दल धरलेला आग्रह असा त्रिवेणी संगम या नवीन घटनेंत दृष्टीस पडतो. ही घटना निर्दोष आहे असें कोणीही म्हणत नाहीं व ती राबवीत असतां तिच्या व्यवहार्यतेबद्दलचा अनुभव लोकांना येणारच आहे. तेव्हां त्याबद्दल विशेष प्रस्ताव न करितां हा स्वराज्य चळवळीचा इतिहास येथेंच समाप्त करतों.

---

# जमखंडी संस्थानांतील प्रजापक्षीय चळवळ



लेखकः—अ. वा. सावडे, बी. ए., एलएल. बी., जमखंडी.

कोणतीहि चळवळ ज्या त्या ठिकाणच्या निरनिराळ्या परिस्थितीवर विशेषतः अवलंबून असते. ज्या ठिकाणीं राजा व त्याचे अधिकारी एकंदरींत प्रजेच्या हिताकडे लक्ष देऊन राज्यकारभाराचा गाडा चालवितात, त्या ठिकाणीं चळवळ करण्याची इच्छा तेथील प्रजेला सहसा होत नाहीं; तथापि आजूबाजूच्या परिस्थितीमुळें जशी जशी लोकांना आपल्या हक्काची जाणीव होऊं लागते, त्या त्या मानानें राज्यकारभारांत आपल्याला अधिकार असावेत म्हणून समाजांतले जाणते लोक लोकांच्या वतीनें चळवळीस प्रारंभ करितात. अशा चळवळींचें स्वरूप त्याबद्दलच्या राजाच्या विशिष्ट धोरणानुरूप बदलत जातें. सबब चळवळीच्या इतिहासाचें अवलोकन करितांना, या सर्व प्रश्नांचा विचार थोडक्यांतच कां होईना पण करणें क्रमप्राप्तच आहे.

आपणांस अलीकडील लोकजागृतीच्या कार्याचाच प्रामुख्यानें विचार करावयाचा आहे. तथापि ज्याप्रमाणें इमारतीस पाया अथवा झाडास मुळया, त्याप्रमाणें कोणत्याही कार्यास अगर चळवळीस पार्श्वभूमि अथवा मागचा इतिहास हा असणारच व विशिष्ट कालांतील चळवळीची यथार्थ कल्पना येण्यास अगदीं स्थूलमानानें व विहंगम दृष्टीनें तरी त्या मागील इतिहासाचें पर्यालोचन करणें जरूर आहे. ह्या दृष्टीनें अलीकडील चळवळीची हकीकत कालमानानें तीन भाग कल्पून लिहिण्याचें मीं ठरविलें आहे.

पहिला भागः—१९१७ पूर्वीच्या कार्याचें विहंगमावलोकन.

दुसरा भागः—१९१७ ते १९२७ चा दहा वर्षांचा काल.

तिसरा भागः—१९२७ पासून आतांपर्यंतचा काल.

ह्या निरनिराळ्या कालांतील गोष्टींकडे प्रत्यक्ष वळणेपूर्वीं जमखंडी संस्थानच्या इतिहासाची थोडीशी माहिती देणें योग्य व उपयुक्त ठरणार आहे.

जमखंडी संस्थान हें मुंबई इलाख्यांतील दक्षिण महाराष्ट्र संस्थानांपैकीं एक प्रमुख संस्थान आहे. त्याचें क्षेत्रफळ ५२४ चौरस मैल असून लोकसंख्या १९३१ च्या खानेसुमारीप्रमाणें १,१४,२८२ आहे. या संस्थानांत जमखंडी, बन्हट्टी व कुंदगोळ अशीं तीन शहरें असून ७७ खेडीं व ११ मजरीं आहेत. राज्यकारभाराच्या सोयीसाठीं जमखंडी व कुंदगोळ असे दोन तालुके, व वाठार, पाठखळ व ढवळपुरी अशीं तीन ठाणीं करण्यांत आलीं आहेत. जमखंडी तालुक्याचा भाग बेळगांव जिल्ह्यांत मोडत असून कुंदगोळ तालुका धारवाड जिल्ह्यांत आहे. वाठार, पाठखळ व ढवळपुरी हीं ठाणीं अनुक्रमें सातारा, सोलापूर व नगर जिल्ह्यांत आहेत. ह्या संस्थानचा बहुतेक सर्व भाग कर्नाटकांतच असल्यानें कर्नाटकाच्या प्राचीन इतिहासांत जीं स्थित्यंतरें झालीं, त्याचा परिणाम या भागावर पूर्णपणें झालेला आढळून येतो. हा भाग प्रथम चालुक्य, राष्ट्रकूट व यादव यांच्या अमलाखालीं होता असें इतिहासावरून दिसून येतें. त्यानंतर विजयनगर साम्राज्याची सत्ताहि या भागांत होती. नंतर बहामनी सत्तेचा अंमल या प्रदेशावर कांहीं काल चालत होता. त्यावेळीं जमखंडीचा किल्ला बळकट असल्याची ख्याति होती. त्यानंतर विजापूरची आदिलशाही नष्ट झाल्यावर मराठ्यांच्या सत्तेखालीं हा प्रदेश गेला व त्यांच्या अमदानींत पटवर्धनांनीं या भागांतील पालेगार लोकांची बंडाळी नाहींशीं करून आपला अंमल या भागावर बसविला.

हल्लींचे संस्थानाधिपति राजा श्रीमंत शंकरराव आपासाहेब हे या पटवर्धन घराण्यापैकीं असून इतिहासप्रसिद्ध परशुरामभाऊंचे ते वंशज

दुसरा भागः—१९१७ ते १९२७ चा दहा वर्षांचा काल.

तिसरा भागः—१९२७ पासून आतापर्यंतचा काल.

ह्या निरनिराळया कालांतील गोष्टीकडे प्रत्यक्ष वळणेपूर्वी जमखडी संस्थानच्या इतिहासाची थोडीशी माहिती देणें योग्य व उपयुक्त ठरणार आहे.

जमखडी सस्थान हे मुबई इलाख्यातील दक्षिण महाराष्ट्र सस्थानापैकीं एक प्रमुख संस्थान आहे त्याचे क्षेत्रफळ ५२४ चौरस मैल असून लोकसख्या १९३१ च्या खानेसुमारीप्रमाणें १,१४,२८२ आहे. या संस्थानांत जमखंडी, बन्हट्टी व कुंदगोळ अशी तीन शहरें असून ७७ खेडी व ११ मजरी आहेत. राज्यकारभाराच्या सोयीसाठीं जमखडी व कुंदगोळ असे दोन तालुके, व वाठार, पाठखळ व ढवळपुरी अशी तीन ठाणी करण्यांत आली आहेत जमखडी तालुक्याचा भाग बेळगाव जिल्ह्यांत मोडत असून कुदगोळ तालुका धारवाड जिल्ह्यांत आहे. वाठार, पाठखळ व ढवळपुरी ही ठाणी अनुक्रमें सातारा, सोलापूर व नगर जिल्ह्यात आहेत. ह्या सस्थानचा बहुतेक सर्व भाग कर्नाटकातच असल्यानें कर्नाटकाच्या प्राचीन इतिहासात जीं स्थित्यतरें झाली, त्याचा परिणाम या भागावर पूर्णपणें झालेला आढळून येतो. हा भाग प्रथम चालुक्य, राष्ट्रकूट व यादव याच्या अमलाखालीं होता असे इतिहासावरून दिसून येते त्यानंतर विजय-नगर साम्राज्याची सत्ताहि या भागांत होती नंतर बहामनी सत्तेचा अमल या प्रदेशावर कांहीं काल चालत होता त्यावेळी जमखडीचा किल्ला बळकट असल्याची ख्याति होती त्यानतर विजापूरची आदिलशाही नष्ट झाल्या-वर मराठ्यांच्या सत्तेखाली हा प्रदेश गेला व त्यांच्या अमदानीत पटवर्ध-नानीं या भागांतील पालेगार लोकांची बंडाळी नाहीशी करून आपला अंमल या भागावर बसविला.

हल्लीचे संस्थानाधिपति राजा श्रीमंत शंकरराव आपासाहेब हे या पटवर्धन घराण्यापैकी असून इतिहासप्रासिद्ध परशुरामभाऊंचे ते वंशज

श्रीमंत राजा शंकरराव आपासाहेब यांनींहि त्यांचा लौकिक कायम ठेविला आहे; इतकेंच नव्हे तर, आपल्या संस्थानच्या परिस्थितीप्रमाणें जास्तच सुधारणा होण्याबद्दल ते बरीच खटपट करीत आहेत.

१९१७ पूर्वीच्या कालांत एकादी संस्था स्थापून अथवा एकादें विशिष्ट ध्येय डोळ्यापुढें ठेवून संघटितपणें कार्य झाल्याचें दिसून येत नाहीं. कोणत्याहि व्यक्तीस सार्वजनिक रीत्या कांहीं उपसर्ग पोंचला, तर सल्ला वगैरे विचारण्या-करितां असा इसम जमखंडी अगर इतर शहरांतील प्रमुख व्यक्तीकडे जाऊन आपली अडचण मांडीत असे व त्याच्या सल्ल्याप्रमाणें दाद लावून घेण्याची खटपट करीत असे. या कालांतील असे प्रमुख नागरिक म्हणजे कै. अप्पासाहेब ऊर्फ यशवंत गणेश वाटवे व कै. सदाशिवरावजी पेंडसे हे वकीलद्वय होत. हे दोघेहि सद्गृहस्थ विद्वान् तर होतेच, परंतु आपणां-कडून कांहींतरी सार्वजनिक सेवा व्हावी अशी त्यांना खरी तळमळहि होती. श्री. अप्पाराव वाटवे ह्यांनीं १९१० मध्यें आपला वकिलीचा धंदा सोडला व धार्मिक वृत्तीनें ते आपलें आयुष्यक्रमण घालवूं लागले; तरी सभा वगैरे झाली तर ते हजर राहून आपले विचार धैर्यानें व निर्भीडपणें मांडून लोकांना योग्य तो मार्ग दाखविण्याचें कार्य करीत असत. ते चांगले वक्ते तर होतेच, शिवाय त्यांचा स्वभाव अत्यंत करारी होता. १९३० पर्यंत अशा तऱ्हेनें सर्व सार्वजनिक कार्यांत ते लक्ष घालीत असत. पूर्वींपासून म्हणजे १८८५–८६ पासून त्यांचा हा क्रम चालू होता असें दिसून येतें. १९३० पासून पुनः त्यांनीं आपला पूर्वी सोडलेला वकिली-व्यवसाय चालू केला आणि तेव्हांपासून सार्वजनिक कार्यांत ते जास्त धडाडीनें लक्ष घालूं लागले. अलीकडील दहा वर्षांतील कोणतीहि सभा, संमेलन अगर परिषदेचें अधिवेशन झाल्यास रात्र अगर दिवस याचा विचार न करितां, आपल्या उतारवयांत डोळ्यांस नीट दिसत नसतांनाही, दुसऱ्यांचें साहाय्य घेऊन ते बिनचूक हजर असत, व ते हजर असले म्हणजे अध्यक्ष-पदाचा मान हटकून त्यांना मिळावयाचाच. आपलें धार्मिक नित्यकर्म आटोपून

ते इतर कार्यकर्त्यांबरोबर प्रचाराकरितां खेड्यावर जात. एकंदरींत त्यांनीं शेवटपर्यंत, १९३९ चे नोव्हेंबरांत इहलोक सोडीपर्यंत, चांगलीच कामगिरी बजाविली यांत शंका नाहीं. त्याचप्रमाणें श्री. सदाशिवराव पेंडसे यांचेंहि होतें. तें लोकांना सल्ला तर देत असतच, शिवाय राज्यकारभारांतील दोष दिसल्यास वरिष्ठ अधिकाऱ्यांना ते वैयक्तिक रीत्या सूचना करींत असत व त्यांच्या सूचनांचा आस्थेनें विचार होऊन त्या सूचनाही दरबारकडून स्वीकारल्या जात असत असें कळतें. त्यांचें लोकांमध्यें चांगलें वजन होतें व दरबारकडून त्यांना योग्य तो मान मिळत असे. १९१८ सालीं ज्यावेळीं जमखंडी म्युनिसिपालिटीस आपला लोकनिक्त अध्यक्ष व चेअरमन निवडण्याचा अधिकार मिळाला, तेव्हां पहिले लोकनियुक्त अध्यक्ष होण्याचा मान एकमतानें त्यांनाच लाभला. रा. अप्पाराव वाटवे हे तत्पूर्वी म्हणजे १९०५–१० सुमारास चेअरमन होते. अशाच आणखी एका सद्गृस्थांच्या कार्याचा उल्लेख करणें या स्थळीं योग्य होणार आहे. ते गृहस्थ म्हणजे वन्हट्टीचे प्रसिद्ध लिंगायत पुढारी कै. तमण्णाप्पा चिक्कोडी हे होत. ते कै. महादेव गोविंद रानडे यांचे शिष्य म्हणवून घेत असत. १९०७-०८ पासून कांहींना कांहीं कार्य करीत असत. ते चांगले साहित्यिक तर होतेच, पण या भागांतील जी कानडी भाषा, त्याबद्दल त्यांची आस्था तेव्हांपासून विशेष होती व तिच्या प्रसारार्थ ते अहर्निश झटत असत.

जमखंडी संस्थानांत जमखंडी येथें हायस्कूलची स्थापना १८८८ सालीं झाली. तत्पूर्वी येथे पांचव्या यत्तेचा अभ्यास संपविल्यावर पुढील अभ्यासाकरितां पुण्याकडे विद्यार्थी जात असत. त्याप्रमाणें रा. विनायक लिंगो परांजपे, सदाशिव बळवंत काळे, रंगो गोविंद कुलकर्णी, व भिकाजी गणेश फडके हे पुण्यास न्यू इंग्लिश स्कूलमध्यें शिकण्यास गेले होते. त्यावेळच्या विशिष्ट परिस्थितींत ही शिक्षणसंस्था निघालेली होती. उच्च ध्येय विद्यार्थ्यांच्या पुढें ठेवून योग्य शिक्षण देण्याकरितां कै. लोकमान्य टिळक, आगरकर, आपटे, केळकर, नामजोशी, गोळे वगैरें-

सारख्या अव्वल दर्जाच्या विद्वान् राष्ट्रभक्तांनीं ही संस्था काढून स्वार्थ-त्यागानें ती चालविली होती. येथून गेलेल्या विद्यार्थ्यांच्या मनावर त्यांच्या शिक्षणाचा चांगलाच परिणाम झाला होता व ते इकडे परत आल्यावर, तेथील वातावरण कांहीं अंशानें कां होईना इकडे निर्माण करावें, अशी त्यांची उत्कट इच्छा होती. इकडे वर्तमानपत्रेंहि वाचावयास मिळत नसत. एक सरकारी लायब्ररी होती, पण त्यांतील वर्तमानपत्रें अधिकाऱ्यांचेकडे जाऊन पडत असत. तेव्हां प्रथम ही अडचण दूर व्हावी म्हणून वरील मंडळींनीं व तसेंच नारायण सांवत दीक्षित, होनवाड, आवा काळे, नरसो देसाई, हरीभाऊ काळे वगैरे तरुणांनीं वर्गणी जमवून 'वाचन-वाटिका' नांवाची संस्था १८८८–९० च्या सुमारास काढली. पुढें येथील स्थानिक तरुणहि त्यांत भाग घेऊं लागले. तेव्हां 'विद्याभिरुचि-वर्धक मंडळी' अशा नांवाची संस्था स्थापून पुढें त्याच्या 'वाचन-वाटिका' व 'वाक्धैर्योत्पादिनी' नांवाची वक्तृत्वोत्तेजक सभा अशा दोन शाखा स्थापन करण्यांत आल्या. रा. परशुराम बळवंत ऊर्फ अप्पा काळे यांची या संस्थेबद्दल सहानुभूति असून ते साहाय्य करीत असत. ह्या दोन्ही संस्था चांगल्या चाललेल्या होत्या. श्री. अंताजीपंत पटवर्धन, श्री. जनूभाऊ करंदीकर, दत्तोपंत मिरजकर ( मुधोळ ), श्री. तमण्णाप्पा चिक्कोडी ( बन्हट्टी ), शंकरराव जोशी, वामनराव पटवर्धन, विठ्ठलराव शिंदे, अप्पासाहेब वाटवे, सदाशिरावजी पेंडसे वगैरेंचीं व्याख्यानें वरचेवर होत असत. या जोरदार कार्यक्रमामुळें संस्था लोकप्रिय झाली. याच सुमारास राव. शंकर भालचंद्र बापट कारभारी होऊन आलेले होते; त्यांनीं वकील, व्यापारी व नोकर वगैरेंची सभा भरवून 'वाचनमंदिर' नांवाची संस्था स्थापन केली. एकाच ध्येयानें प्रेरित होऊन काम करणाऱ्या या दोन्ही संस्थांचे १९०५ सालीं एकीकरण करण्यांत आलें. मात्र सभेचा लोप होऊन वाचनालयाचें काम व्यवस्थितपणें चालू झालें.

त्यानंतर लवकरच अखिल हिंदुस्थानांत वंगभंगाची चळवळ सुरू झाली. तेव्हां येथील हायस्कूलमधील सातव्या इयत्तेंतील कांहीं विद्यार्थ्यांनीं पुढा-

कार घेऊन तिकडे जशी चळवळ चालली आहे, त्याप्रमाणें संस्थानांतहि कांहीं तरी करण्याचा विचार चालू केला. स्वदेशीचा प्रसार, मुष्टिफंड जमवून तो स्वदेशी कारखाने काढण्याकरितां पाठविणें, लेख लिहिणें, बातम्या देणें वगैरे कार्यक्रम जोरदार रीतीनें वर्षसहा महिने चालविला होता. त्यांत श्री. दामोदर रामचंद्र हुल्याळकर (सध्यांचे डॉ. दामुअण्णा) शंकरराव कारखानीस, अनंतराव जोशी, विठ्ठल महादेव कोल्हटकर, बाबूराव म्हसकर, बंडोपंत वाटवे वगैरे तरुण मंडळी प्रमुख होती; पुढें त्यांचा येथील अभ्यासक्रम संपल्यावर व प्रमुख मंडळी बाहेर शिक्षणास गेल्यानें व तसेंच त्यावेळीं इतरत्र दडपशाहीचा वरवंटा जोरानें फिरल्यानें ही चळवळ संपुष्टांत आली.

१९१४ चे सुमारास डॉ. हुल्याळकर हे कलकत्ता येथील आपला डॉक्टरीचा अभ्यास संपवून जमखंडीस परत आले; तेव्हांपासून या कार्यास पुनः चालना मिळाली. ते व त्यांचे मित्र रा. गोविंद हणमंत कुलकर्णी, रा. शंकरराव आपटे, रा. फडके वकील, रा. सदाशिवराव पेंडसे व राव. महाबळ वगैरे मंडळी १९१५ सालीं पुणें येथें बॅ. बाप्टिस्टा यांचे अध्यक्षतेखालीं भरलेल्या मुंबई प्रांतिक परिषदेच्या अधिवेशनास जाऊन आली व तसेंच त्यांच्यापैकीं कांहीं मंडळी १९१६ सालीं बेळगांव मुक्कामीं कै. दादासाहेब खापर्डे यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या अधिवेशनास हजर होती. त्या सर्वांच्या मनांत सार्वजनिक कार्याविषयीं आस्था पूर्वींपासूनच असल्यामुळें व या परिषदांमध्यें भाग घेण्याचें असल्यास एकाद्या स्थानिक संस्थेची जरूरी आहे असें दिसून येऊं लागल्यामुळें या मंडळींनीं जमखंडी येथील इतर प्रमुख नागरिकांना जमवून ‘ लोकसभा ’ नांवाची संस्था स्थापन केली. या संस्थेचा उद्देश काय होता व त्या संस्थेनें काय कार्य केलें, हें समजून घेण्याकरिता १९१७ ते १९२७ च्या दुसऱ्या कालखंडाकडे वळलें पाहिजे.

हा दुसरा म्हणजे सन १९१७-२७ चा कालखंड हा लोकसभेच्या कार्यकर्त्यांचा काल असें संबोधणेस हरकत नाहीं. कारण, लोक-

सभेनें या अवधींत बरीच उपयुक्त कामगिरी बजावली व त्यांत सर्वांत महत्त्वाचें काम म्हणजे तीनचार वर्षें खटपट करून जमखंडी संस्थान प्रजापरिषद् भरविण्यास परवानगी मिळविली व शेवटीं अशी परिषद् प्रथम जमखंडी येथें भरवून संस्थानांतील लोकजागृतीचें कार्य करणेकरितां एक उत्तम साधन लोकांना उपलब्ध करून दिलें.

लोकसभा स्थापन करण्याचे कामीं येथील श्री. भास्कर बहिरव महाबळ (हल्लींचे न्यायमंत्री), श्रीनिवास दासो आनीखिंडी, यशवंत गणेश वाटवे, सदाशिव धोंडो पेंडसे, दामोदर रामचंद्र हुल्याळकर, लक्ष्मण विष्णु परांजपे, राचप्पा आंवली, विठ्ठलराव फाटक, वासुदेवराव वाटवे, भीमाजी विनायक आपटे, पुरुषोत्तम केशव फडके, माधव त्रिमलराव देशपांडे वगैरेंनीं पुढाकार घेतला होता. या सभेचा उद्देश पुढीलप्रमाणे ठरविण्यांत आला होता:—

"जमखंडी सरकार व प्रजाजन यांचे दरम्यान प्रेमभाव वृद्धिंगत करून प्रजाजनांमध्यें कर्तव्याची व हक्काची जाणीव उत्पन्न करून अत्यंत राजनिष्ठपणें आणि कायद्याचें यत्किंचितहि अतिक्रमण न करितां पूर्ण सनदशीर मार्गानें प्रजाजनांच्या अडचणी वेळोवेळीं सरकारच्या नजेरस आणून त्या दूर करून घेणें आणि संस्थानचा राज्यकारभार लोकमताचा विचार करून आणि प्रजेच्या सुखसोईकडे लक्ष देऊन चालविण्यांत यावा, याकरितां राज्यकारभारांत शक्य व इष्ट त्या सुधारणा सरकारच्या सहानुभूतीनें व सहकारितेनें घडवून आणणें व जमखंडी प्रजाजनांची सर्व बाजूंनीं सुधारणा होण्याविषयीं प्रयत्न करणें."

श्री. श्रीनिवास दासो आनीखिंडी हे या लोकसभेचे पहिले अध्यक्ष झाले व त्यानंतर दरसाल निरनिराळा अध्यक्ष निवडला जात असे. याप्रमाणें श्री. फडके, श्री. आबासाहेब परांजपे, श्री. विठ्ठलराव फाटक, श्री. सदाशिवराव पेंडसे, डॉ. हुल्याळकर यांनीं अध्यक्ष म्हणून कामें केलीं आहेत. राव. महाबळ हे दोन वर्षें सेक्रेटरीचें काम पाहात होते. त्यावेळीं दरसाल जून महिन्यांत राज्यारोहण दरबार भरत असे. त्या दरबारचे

प्रसंगीं या लोकसभेतर्फे लोकांच्या अडचणी व मागण्या सरकारपुढें मांडण्यांत येत असत व त्यांचा विचार होऊन त्या त्या मागण्यांना दरबारकडून उत्तरें मिळत. या लोकसभेचे सभासद वाढविण्यासाठीं खेडो-पाडीं प्रचार करण्यांत आला. त्या प्रयत्नास साधारण यशहि बरेंच मिळालें; कारण, सुरवातीस २०।२२ देखील सभासद नव्हते. परंतु दोन वर्षांच्या प्रयत्नानें ती संख्या साठांपर्यंत वाढली व पुढील दोन वर्षांत तर ती २०० पर्यंत गेली. कुंदगोळ व बिद्री या ठिकाणीं लोकसभेच्या शाखा स्थापण्याचा कार्यकर्त्यांनीं प्रयत्न केला, परंतु तो फलद्रूप झाला नाहीं.

संस्थानी प्रजेच्या हितसंबंधास बाध आणणारे जे जे प्रश्न उपस्थित झालेले होते, त्याबद्दल लोकमत व्यक्त करण्याकरितां सभा भरवून, भाषणें करून, ठराव पास करून, ते ज्या त्या अधिकाऱ्यांच्याकडे पाठविण्याचें कार्यही या संस्थेमार्फत उत्तम तऱ्हेनें झालें आहे.

लोकसभेनें सालोसाल दरबारपुढें कोणत्या अडचणी मांडल्या अगर प्रश्न विचारले व त्यांचा दरबारकडून काय काय विचार झाला, हें साद्यंत-पणें देऊन हा लेख वाढविणेची इच्छा नाहीं व जरूरीहि नाहीं. त्यावेळीं दरबारपुढें मांडलेल्या मागण्यांचा विचार केला असतां, अगदीं किरकोळ म्हणजे पाण्याच्यां तक्रारी दूर करणें वगैरेंपासून गोवधबंदी, मद्यपानबंदी, कानडी दप्तर करणें व राजकीय सुधारणा जारी करणेंपर्यंतच्या महत्त्वाच्या मागण्या केल्या गेल्या होत्या असें स्पष्टपणें दिसून येतें.

यावेळीं संस्थानांत व संस्थानाबाहेर कोणत्या घडामोडी होत होत्या, कोणते महत्त्वाचे प्रश्न उपस्थित झाले होते, त्याबद्दल लोकांकडून कांहीं करण्यांत आलें काय, हें समजून घेतलें म्हणजे या कालांतील कार्याचा पूर्ण आढावा घेतल्यासारखें होणार आहे.

इ. स. १९१७–१८चे सुमारास या संस्थानांत रिव्हिजन सर्व्हेचें काम सुरें होत आलें होतें व जागतिक युद्धामुळें महागाई झालेली होती. अशा परिस्थितींत जमीनसाऱ्यांत वाढ करण्यांत आली. ही वाढ कुंदगोळ तालु-

क्यांत विशेष रीतीनें झाली. जमखंडी तालुक्यांतहि कृष्णाकांठच्या जमिनींचा आकारहि बराच वाढविला गेला, परंतु लोकांनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. कुंदगोळ तालुक्यांत ही वाढ चुकीची व अन्यायाची झाली आहे हें दाखविणेकरितां आजूबाजूच्या ब्रिटिश हद्दीच्या जमिनींचे तुलनात्मक आकार देऊन एक मोठा तक्ता व रिपोर्ट तयार करून तो सरकारकडे पाठविला होता; या कामीं तेथील श्री. त्रिमलराम देसाई, हणमंत तिमाजी कुलकर्णी, मुदकप्पा बेटदूर व हावनूर वकील वगैरेंनीं पुढाकार घेतला होता; परंतु या सर्व प्रयत्नांचा कांहींहि उपयोग झाला नाहीं; तसेंच इनाम जमिनीवर तरम आकार घेण्याबद्दलहि जो हुकूम झाला, तो संस्थानचे इभ्रतीस कमीपणा आणणारा असल्यानें व गॅझेटमध्यें तरम आकार बसविणेविषयीं दिलेलीं कारणेंहि योग्य नाहींत सबब तरम आकार बसविणेंत येऊं नये, अशी लोकसभेनें मागणी केली होती. त्यास दरबारतर्फे वाढत्या खर्चाच्या सोयीसाठीं ही तजवीज करणें नाखुषीनें जरूर पडलें असें उत्तर देण्यांत आलें. त्यामुळें जो आकार बसला तो कायमचाच बसला.

कै. श्रीमंत रामचंद्रराव आपासाहेबांचे वेळेपासून संस्थानांत जमखंडी, हुन्नूर, बन्हट्टी, कुंदगोळ, सांवशी व कमडोली अशा सहा ठिकाणीं म्युनिसिपालिट्या अस्तित्वांत होत्या. १९१८ पूर्वी फक्त जमखंडी म्युनिसिपालिटीस मात्र एकूण २१ सभासदांपैकीं ७ सभासद निवडण्याचा अधिकार होता. बाकीच्या म्युनिसिपालिट्यांना निवडणुकीचें तत्त्वच लागू नव्हतें. १९१८ सालीं जमखंडी म्युनिसिपालिटींत लोकनियुक्त सभासदांचें बहुमत करण्यांत आलें व २१ सभासदांपैकीं ११ सभासद लोकनियुक्त असण्याची सवलत देण्यांत आली. तसेंच जमखंडी म्युनिसिपालिटीस आपला अध्यक्ष व चेअरमनहि निवडणेचा अधिकार देण्यांत आला. तसेंच, इतर म्युनिसिपालिट्यांना निवडणुकीचें तत्त्व लागू करणेंत आलें व एकूण सभासदांमध्यें निम्मे सभासद लोकनियुक्त असावेत असें ठरविण्यांत आलें. १९२० पासून

जमखंडी तालुक्यांतील होसूर, शेगुणशी, आसंगी व आलगूळ, बिद्री, सावळगी, तुगव व हुलगबाळी आणि कुंदगोळ तालुक्यांतील बेटदूर व यलिबाळ अशा दहा मोठ्या खेड्यांत व्हिलेज सॅनिटरी कमिट्या स्थापण्यांत आल्या. एकंदरींत या कमिट्यांचें काम केव्हांच समाधानकारक रीतीनें चाललें नाहीं व कांहीं कांहीं खेड्यांतून कमिटीचें अस्तित्व कागदावरच केवळ राहिलें.

१९१८ पूर्वी जमखंडी म्युनिसिपालिटीस निवडणुकीचा अधिकार दिला होता, तरी त्याबद्दल विशेष आस्था लोकांत वाटत नव्हती व निवडणुकीहि क्वचितच होत. परंतु ती परिस्थिति १९१८ नंतर पार पालटली. नवीन मंडळी उमेदवार म्हणून पुढें येऊं लागली व निवडणुकीहि दिवसेंदिवस चुरशीच्या होत चालल्या. सरकारी व नेमलेल्या सभासदांनीं नेहमीं सरकारी धोरणास चिकटून राहून व लोकनियुक्तांपैकीं कच्च्या दिलाचे लोक सरकारपक्षाकडे सहजच जात असल्यानें म्युनिसिपालिट्यांत सरकारी धोरणाप्रमाणेंच सर्व काम चाले. एकादा सन्मान्य पुढारी इकडे आला व लोकनियुक्त सभासदांना म्युनिसिपालिटीतर्फे त्यांस मानपत्र द्यावें असें मनांत आलें, तरी सहसा तें करणें त्यांना शक्य होत नसे. याची प्रचीति दे. भ. नरसोपंत ऊर्फ तात्यासाहेब केळकर ह्यांना या शहरातर्फे १९२२ मध्यें आमंत्रण दिलें होतें, त्यावेळीं दिसून आली. त्यांनी इकडे न येण्याबद्दल गुप्त खटपटही झाली होती असें म्हणतात, परंतु त्यांनीं त्याला न जुमानतां इकडे येण्याचें कबूल केलें. इकडे आल्यावर त्यांना मानपत्र देण्याचा प्रश्न निघाला. तो म्युनिसिपालिटींत संमत झाला नाहीं, तेव्हां लोकसभेनें पुढाकार घेऊन त्यांचा यथोचित सन्मान केला व त्यांना मानपत्र समर्पण केलें; त्यावेळीं त्यांनीं मोठें मार्मिक भाषण केलें. ते म्हणाले कीं, 'या शहर म्युनिसिपालिटीनें मानपत्र दिलें असतें, तर एका शहरातर्फे तें झालें असतें; परंतु त्याला विरोध केल्यानें सर्व संस्थानतर्फे मानपत्र मिळालें हें बरेंच झालें.' आतांपर्यंत चळवळ नव्हती तेव्हां विरोधाचा प्रश्नच नव्हता; परंतु चळवळीला प्रारंभ झाल्याबरोबर दरबारची विरोधाची भूमिका हळू हळू दिसूं

लागली. लोकसभेनें संस्थानांत लोकलबोर्डांची स्थापना करणेबद्दल दरबारकडे मागणी केली होती, परंतु उत्पन्न कमी असल्यानें लोकलबोर्ड स्थापून उपयोग नाहीं असें दरबारकडून उत्तर देण्यांत आलें.

## असहकारितेच्या चळवळीचा परिणाम

याच वेळीं खालसा मुलुखांत महात्मा गांधी यांच्या नेतृत्त्वाखालीं असहकारितेची चळवळ अगदीं जोरांत होती. काँग्रेसनें भाषावार प्रांतरचना ठरवून निरानिराळे प्रांत ठरविले. त्यांत दक्षिण महाराष्ट्र संस्थानें महाराष्ट्रांतील सातारा जिल्ह्यांत सामील करण्यांत आलीं. वास्तविक जमखंडी संस्थानाचा समावेश कर्नाटकांत होणें जरूर होतें. कर्नाटक प्रांतिक काँग्रेस कमिटीनें तसें सामीलहि केलें होतें, परंतु त्यापूर्वींच हा भाग सातारा प्रांतास जोडल्यामुळें तत्त्वाच्या दृष्टीनें चुकीचें झालें, असें येथील कांहीं कार्यकर्त्यांना वाटूं लागलें. त्यावेळीं येथें काँग्रेस कमिटीची स्थापना झाली होती व काँग्रेसचे सभासद मिळविण्याचें काम जोमानें चाललें होतें. टिळक स्वराज्य फंडनिधिहि चांगल्याच प्रमाणांत जमला होता. दोन खादी भांडारें निघालीं होती व त्यांचेंहि काम समाधानकारक रीतीनें चाललें होतें. प्रचाराकरितां खालसा मुलखांतील कीर्तनकार, प्रवचनकार व वक्ते येत असत. अर्थात् हें नवें मन्वंतर दरबारला रुचलें नसावेंसें दिसलें. कारण सन १९२१ मध्यें सार्वजनिक सभांच्यावर नियंत्रण घालणेचा पुढीलप्रमाणें जाहीरनामा काढणेंत आला:—

" ज्या अर्थीं सार्वजनिक अस्वस्थता उत्पन्न करणाऱ्या व सार्वजनिक शांततेचा भंग करणाऱ्या सार्वजनिक सभा भरूं देणें इष्ट नाहीं, त्याअर्थीं असा हुकूम करणेंत येत आहे कीं,

ब्रिटिश हिंदुस्थान अथवा एकादें नेटिव्ह संस्थान यांचा राज्यकारभार, तत्संबंधीं धोरण अगर हित, यासंबंधीं अगर ज्यामुळें सार्वजनिक स्वस्थतेचा भंग अगर चळवळ होईल, असा कोणताहि विषय यासंबंधीं सार्वजनिक मतप्रसाराचा ऊहापोह अगर वाद करणेसाठीं जमखंडी संस्थानचे हद्दींत कोणतीहि सार्वजनिक सभा डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट जमखंडी

अगर त्यांनीं या बाबतींत अधिकार दिलेल्या कोणताहि अंमलदार यांचे लेखी परवानगीशिवाय भरविणेंत येऊं नये.

खुलासाः—"सार्वजनिक सभा" या शब्दसमूहाच्या अर्थांत कोणतीहि सभा, कीर्तन, जलसा अगर तमाशा जेथें सर्व जनतेस अगर जनतेचे कांहीं भागास अगर वर्गास जाणेची मुभा आहे अशा सभांचा समावेश होतो.

शिक्षाः—अशी परवानगी घेतल्यावांचून अशी सार्वजनिक सभा भरवील अगर त्यास उत्तेजन देईल त्यास व अशा सभेमध्यें कोणी व्याख्यान अगर भाषण करील त्यास व अशी सभा जे आपले इमारतींत अगर मोकळ्या जागेंत भरवूं देतील त्या मालकास सहा महिनेपर्यंत कैदेची शिक्षा अगर २०० रु. पेक्षां जास्त नाहीं इतका दंड अथवा दोन्ही प्रकारच्या शिक्षा करणेंत येतील."

लोकसभेनें हा हुकूम रद्द करणेबद्दल मागणी केली होती; त्यांस संस्थानच्या चळवळीसंबंधानें कोणतीच हरकत येत नाहीं, बाहेरच्या अनिष्टकारक चळवळीस सदर कायदा लागू केला आहे असें दरबारचें उत्तर आलें. या हुकुमाचा शब्दप्रयोग पाहिला तर दरबारचे मनांतच आल्यास यांतून न सुटतां भाषण करणें म्हणजे तारेवरील कसरतीचें काम केल्यासारखें कसें आहे याची कल्पना सहज होण्यासारखी आहे. याच वेळीं बिद्रीचे रा. वामनराव देसाई यांनीं कांहीं खेड्यांतून चांगला प्रचार केला व आसपासच्या खेड्यांत सूत कातण्याच्या धंद्यास बरेंच उत्तेजन मिळालें. काँग्रेसचें कार्य इकडे चालू होतें, त्याचा परिणामहि लोकांच्या मनावर होत होता; काँग्रेस सभासदांची संख्या १२०० पर्यंत गेली होती. अशा समयीं जमखंडी तालुका काँग्रेस कमिटी सातारा जिल्ह्यांतून काढून कर्नाटकांत विजापुरास जोडणेंत यावी अशी चळवळ सुरू झाली. मराठी बोलणारी बरीच मंडळी या तत्त्वास विरोध करूं लागली, तेव्हां सर्व काँग्रेस सभासदांची मतगणना (रेफरेंडम) करणेंत यावी असें ठरून, त्याप्रमाणें ती करण्यांत आली. त्यावेळीं ३५० सभासद होते. ३०० विरुद्ध ५० अशा

बहुमतानें हा भाग कर्नाटकांत सामील करण्यांत यावा असें ठरलें व शेवटीं ऑल इंडिया काँग्रेस कमिटींत व काँग्रेसमध्यें ती सूचना पास झाल्यावर हा भाग रीतसर कर्नाटकास जोडणेंत आला. अशा प्रकारच्या निरनिराळ्या वादानें जनतेचें लक्ष सार्वजनिक कार्याकडे वेधत चाललें होतें. लोकसभेनें दोनतीन वर्षें प्रचारक नेमून लोकांमध्यें जागृति करण्याची खटपट केली. पुढें योग्य इसम न मिळाल्यानें व कार्यहि समाधानकारक न झाल्यानें तें काम बंद पडलें. मध्यंतरीं १९३० ते १९३४ पर्यंतच्या कायदेभंगाचे चळवळींत येथील काँग्रेस कमिटी बंद करणेंत आली. पुढें ती १९३५मध्यें पुनः चालू झाली व तिचें काम चालूं असून काँग्रेसच्या कार्यास पाठिंबा देण्यांत येत असतो.

या कालखंडांत पुढील कार्याची भूमिका तयार झाली, असें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. खालसांत काँग्रेसची सर्व राष्ट्रभर दुमदुमून सोडणारी प्रचंड चळवळ चालली होती. संस्थानांतहि चळवळ चालू करण्याबद्दल प्रयत्न चालले होते. श्री. तात्यासाहेब केळकर व कै. श्री. वामनरावजी पटवर्धन यांनीं या उद्देशानें प्रेरित होऊन "दक्षिणी संस्थान हितवर्धक सभा" या नांवाच्या संस्थेस जन्म दिला होता. त्यांच्या सूचनेप्रमाणें सांगली, भोर, मिरज वगैरे संस्थानांत प्रजापरिषदांचीं अधिवेशनें होऊं लागलीं, व लोकमत तयार होत चाललें. पुढें लवकरच कै. वामनरावजी पटवर्धन यांनीं व्यक्तिशः जबाबदारी पत्करून केवळ संस्थानी प्रश्नास वाहिलेलें 'संस्थानी स्वराज्य' वृत्तपत्र काढून या कामीं चळवळीस जें साहाय्य केलें व त्यामुळें या चळवळीचा जो फायदा झाला, त्याबद्दल संस्थानी प्रजेनें सदैव त्यांचें ऋणीच असलें पाहिजे.

१९१६ सालीं जमखंडी येथें पी. बी. हायस्कूलच्या माजी विद्यार्थ्यांचें जंगी संमेलन भरलें होतें. त्यावेळीं जमखंडी संस्थानांतील शिक्षणखात्याबद्दल व शिक्षणपद्धतीबद्दल बरीच चर्चा होऊन शिफारशीवजा कांहीं ठरावहि झाले. त्यांत शिक्षणपद्धतींत कोणत्या सुधारणा कराव्यांत याबद्दल

विचार करण्यासाठीं एक कमिटी नेमण्यांत यावी अशीही एक सूचना होती. त्याप्रमाणें माजी अधिपति श्री. सर परशुरामराव भाऊसाहेब यांनीं कै. अनंत विनायक ऊर्फ बामरावजी पटवर्धन यांचे अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली. त्या कमिटीचे प्रो. रा. द. रानडे,एम्. ए., श्री.गोपाळराव हुल्याळकर, एम्. ए., एलएल. बी., श्री. आनीखिंडी, बी. ए., श्री. के. ना. जोशी, व राव. भा. द. महाबळ हे सभासद होते. या कमिटीनें पुष्कळ साक्षीपुरावा घेऊन व कागदपत्रांची छाननी करून दरबारकडे अहवाल पाठविला व कै. श्रीमंत भाऊसाहेब यांनीं कमिटीच्या कामाबद्दल अत्यंत समाधान दर्शवून त्या रिपोर्टास पूर्णपणें संमति दिली. त्यांत मराठी व कानडी अशा दोन्ही भाषांमधून शिक्षण देण्याची योजना अमलांत आणावी व कानडी भाषा ही प्रधान माध्यम ठरविण्यांत यावी व मराठी शाळा राजधानीच्या व तालुक्याच्या मुख्य ठिकाणीं तेवढ्या चालूं ठेवाव्या, वगैरे महत्त्वाच्या शिफारसी कमिटीनें केल्या होत्या.

संस्थानांत लँड रेव्हिन्यू कोड लागूं असून पिकांच्या आणेवारीचे नियम मात्र लागू करण्यांत आले नव्हते. पीक बरोबर नसतांहि रयतांकडून सारा वसूल करणें अन्यायाचें आहे असें कांहीं कार्य-कर्त्यांच्या नजरेस आलें. १९२२-२३ सालीं पाऊस पुरेसा न पडल्यानें पिकांची स्थिति समाधानकारक नव्हती. सरकारतर्फे पिकांची आणेवारी मामुली वहिवाटीप्रमाणें झाली. तेव्हां लोकसभेनें पिकांची आणेवारी करून ती दरबारपुढें मांडावी व इतरत्र असलेल्या नियमाप्रमाणें साऱ्याची तहकुबी मिळणेबद्दल खटपट करावी असें ठरलें व प्रयोगादाखल जमखंडी येथील वकील श्री. नारायण विष्णु हुल्याळ व लोकसभेचे रयत सभासद रा. संगन बसाप्पा चिक्कोप यांनीं आठ दिवस सतत परिश्रम करून व स्वत: हिंडून जमखंडी कसब्यांतील कांहीं भागांतील पिकांची आणेवारी केली व सभेंत ठरल्याप्रमाणें तो रिपोर्ट जमखंडी तालुक्याचे मामलेदारां-कडे पाठविला. त्याबद्दल त्यावेळच्या कारभाऱ्यांना भयंकर घुस्सा आला

व त्या कामीं लोकसभेला समजहि देण्यांत आली होती. या हुकुमाची भाषाहि आक्षेपार्ह असल्यानें दरबारला परत लिहून झालेला गैरसमज दूर करणेंत यावा असें ठरल्याबद्दल वदंता होती. हा आणेवारीच्या प्रश्नाचा प्रथम प्रयत्न होय व तो दरबारतर्फे मान्य करणेस पुढें १८ वर्षे लागली व अद्यापहि त्याप्रमाणें अंमल बरोबर होत आहे असें म्हणवत नाहीं. लोकांचेवरहि त्याची जबाबदारी आहेच, हें नाकबूल करून चालणार नाहीं.

ब्रिटिश मुलुखांतील मॉंटफर्ड सुधारणांप्रमाणें संस्थानमजकुरीं प्रजाजनांस हक्क देणेबद्दलचा उपक्रम करण्यांत यावा अशी लोकसभेची दरबारकडे मागणी होती. त्याचा विचार चालू आहे असें दरबारकडून उत्तर मिळालें. त्याच सुमारास औंध संस्थानांत तसा उपक्रम झाला होता व येथील लोकसभेनें तेथील अधिपतींचें व प्रजाजनांचें त्याबद्दल अभिनंदन केलें होतें. येथील दरबारचा काय विचार चालला होता हें मात्र समजलें गेलें नाहीं. पुढें दुर्दैवानें लवकरच श्रीमंत सर परशुरामराव भाऊसाहेब यांचा आकस्मिकपणें अंत झाला व अज्ञान कारकीर्द सुरू झाली, त्यामुळें तो प्रश्न तसाच शिल्लक राहिला. याच वेळीं कौन्सिल ऑफ स्टेट ( मध्यवर्ती वरिष्ठ मंडळ ) मध्यें इंडियन स्टेटस् बिल पास झालें होतें व तो कायदा पार्लमेंटपुढें विचारासाठीं होता. हा कायदा पास होऊं नये अशाबद्दल 'दाक्षिणी संस्थान हितवर्धक सभे'कडून जो विनंतिअर्ज गेला होता, त्याबद्दल जमखंडी नागरिकांचें मत कळविण्याकरितां रीतसर डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांची परवानगी घेऊन लोकसभेच्या विद्यमानें जाहीर सभा भरून त्याबद्दल लोकमत व्यक्त करण्यांत आलें. "हें बिल संस्थानांतील लोकमत लक्षांत न घेतां तयार केलेलें आहे. तशा प्रकारचा कायदा करण्यास पार्लमेंटनें मंजुरी देऊं नये व बादशहा पंचम जॉर्ज यांना संमति न देण्याबद्दल विनंति करण्यांत यावी' अशा आशयाचा ठराव सर्वानुमतें पास करणेंत आला. त्याचा सारांश लोकसभेमार्फत नेकनामदार व्हाइसरॉयसाहेब यांचेकडे व भारतमंत्रि यांचेकडे पाठविण्यांत आला. श्रीमंत सर परशुरामराव भाऊसाहेब

यांचे आकस्मिक निधनाचे वेळीं हल्लींचे अधिपतींना १७ वें वर्ष नुकतेंच पुरें झालें होतें. ॲडमिनिस्ट्रेटर नेमल्यास पुनः सर्व नवी घडी होणार, तेव्हां तसें न होतां श्रीमंत डॉवेजर राणीसाहेब यांना रीजन्सीचे अधिकार देऊन एका कौन्सिलची व्यवस्था करावी, अशी येथील लोकसभेनें विनंति केली. त्यावेळीं पुण्याचे श्री. वामनरावजी पटवर्धनहि हजर होते. तशी योजना श्रीमंत सर परशुरामराव भाऊसाहेब यांचे कारकीर्दींत ते युद्धास गेल्यावेळीं दोनदां व मागें विलायतेच्या सफरीकरितां गेल्या वेळीं एकदां, अशी तीन वेळां करण्यांत आली होती व ती पूर्ण यशस्वीहि झाली होती. तो ठराव व्हाइसरॉय, मुंबईचे गव्हर्नर व पोलिटिकल एजंट यांचेकडे तारेनें पाठविणेंत आला. लोकसभेच्या या मागणीप्रमाणें रिजन्सी कौन्सिलची व्यवस्था झाली; तसेंच श्रीमंत शंकरराव आपासाहेब यांना २१ वर्षें पुरीं होण्यापूर्वींच मुखत्यारी देणेंत यावी, अशीहि मागणी वरिष्ठ सरकारकडे लोकसभेनें केली होती व त्याप्रमाणें श्रीमंतांना २१ वर्षें पूर्ण होण्यापूर्वींच थोडे दिवस अगोदर राज्यसूत्रें मिळालीं.

याप्रमाणें कामें चालू असतां, लोकसभा जास्त प्रातिनिधिक झाली पाहिजे याची जाणीव लोकसभेच्या कार्यकर्त्यांना झाली होती व म्हणून १९२२ पासून लोकसभेमार्फत जमखंडी संस्थान प्रजापरिषद भरविण्याची खटपट चालली होती. तसे प्रयत्न चालले असतां राव. महाबळ यांनीं सरकारी नोकरी पत्करली व रा. वामन त्रिंबक ऊर्फ भाऊराव आपटे यांनीं या लोकसभेच्या कामांत लक्ष घालण्यास सुरवात केली. या बाबतींत पुष्कळ पत्रव्यवहार दरबारबरोबर व इतर तालुक्यांतील कार्यकर्त्यांबरोबर होऊन १९२७ मध्यें प्रजापरिषद् भरविण्याचें ठरलें व लोकसभेनें आपल्या कामाचीं सर्व सूत्रें प्रजापरिषद्केकडे सोंपवून विश्रांति घेण्यास सुरवात केली. प्रसंग येईल तेव्हांच ती जागी होते. येथील चळवळीचा दुसरा कालखंड येथेंच पुरा होतो.

जमखंडी संस्थान प्रजापरिषदेचें पहिलें अधिवेशन जमखंडी मुक्कामी ता. ८ व ९ ऑगस्ट १९२७ रोजीं लोकमान्य टिळक यांचे पट्टशिष्य व महाराष्ट्राचे सुप्रसिद्ध पुढारी श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या अध्यक्षते- खालीं भरून अत्यंत उत्साहानें व यशस्वी रीतीनें पार पडलें. वास्तविक परिषद् भरविणें म्हणजे कांहीं मंडळींनीं मनांत आणल्यास एक साधी गोष्ट आहे; परंतु संस्थानांतील विशिष्ट परिस्थितीमुळें तो विचार कांहीं कार्यकर्त्यांच्या मनांत आल्यापासून तो कृतींत उतरण्यास लोकसभे- सारख्या संस्थेसहि पांच वर्षें चिकाटीनें प्रयत्न करावे लागले; या एकाच गोष्टीवरून संस्थानांत लोकजागृतीचें कार्य करणें किती अवघड आहे हें दिसून येतें. शिवाय मार्गांत बरींच विघ्नें येऊन त्यांतून मार्ग काढून प्रयत्नानें मिळविलेलें यशच विशेषच उत्साहवर्धक असतें व हीच गोष्ट या प्रजापरिषदेच्या वेळीं लोकांच्या निदर्शनास आली. परवानगी मिळाल्या दिवसापासून अवघ्या पंधरा दिवसांत कार्यकर्त्यांनीं सर्व तयारी केली. जमखंडी येथील सुप्रसिद्ध सावकार श्री. श्रीनिवास दासो आनिखिंडी यांची एकमतानें स्वागताध्यक्षाचे जागीं निवड करण्यांत आली. लोकसभेचे पहिले अध्यक्ष या नात्यानें त्यांना हा पहिला मान मिळाला हेंहि योग्यच झालें. परिषदेस दे. भ. केळकरांच्यासारखा राजकारणांत मुरलेला, त्यांतल्या- त्यांत संस्थानी राजकारणाचा सांगोपांग व विवेचक बुद्धीनें अभ्यास केलेला असा कर्णधार मिळाल्यानें, लोकांच्या उत्साहांत व आनंदांत विशेषच भर पडली. बन्हट्टीच्या म्युनिसिपालिटीनें त्यांना मानपत्र सम- र्पण केलें व स्वागतसभेनें त्यांची मोठ्या थाटाची मिरवणूक काढून त्यांचा गौरव केला. बन्हट्टीचे पुढारी कै. तमण्णाप्पा चिक्कोडी यांची उपस्वागताध्यक्ष, व रा. भाऊराव आपटे, डॉ. हुल्याळकर, रा. अप्पाराव वाटवे व कृष्णाजीपंत रानडे यांची चिटणीसांच्या जागीं निवड झाली. अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत या संस्थानाधिपतींच्या उज्ज्वल परंपरेचा गौरवपूर्ण उल्लेख करून प्रजापरिषदेच्या जरूरीबद्दल व उपयुक्ततेबद्दल पुढील उद्गार काढले: " राज्यकारभाराचे बाबतींत प्रजेनें अंशभागी असावें

ही कल्पना इंग्रजी शिक्षणामुळें प्रामुख्यानें उत्पन्न झाली ही गोष्ट नाकबूल करितां येणार नाहीं, व ती राजा व प्रजा या उभयतांच्या मनास पटूं लागली आहे. अशा रीतीनें परस्पर साहाय्यक मनोवृत्तीची ही वाढ थांबविणें कोणासहि शक्य नसल्यानें अशा प्रकारचीं अधिवेशनें भरविणें अपरिहार्य झालें आहे. राजा व प्रजा यांचीं सुखदुःखें परस्परांत इतकीं सूक्ष्मपणें गुंतलीं आहेत कीं, तीं एकमेकांपासून विलग करणें शक्यच नाहीं. आपल्या प्रजेस राज्यकारभाराचे बाबतींत अंशभागी केलें म्हणजे तितक्या अंशानें राजाचें वैभव व अधिकार कमी होतात, ही कल्पना मुळीं तर्कशास्त्रास पटणारी नाहीं. अगदीं प्रथमतः ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, संस्थानांतील चळवळ संस्थानिकांच्या आधिपत्याखालीं आणि त्यांच्या सहानुभूतीनें सुरू ठेवण्याची आहे. प्रजापरिषदा भरूं लागल्या म्हणजे व्यक्तिशः संस्थानिकांच्या हक्कावर कांहीं संकट येणार आहे अशांतला प्रकार नाहीं. ब्रिटिश प्रजाजनांनीं राजकीय हक्काबद्दल तिकडे जो झगडा चालविला आहे, त्याचें स्वरूप संस्थानी चळवळीहून अगदींच भिन्न आहे. संस्थानांतील राज्यकर्ते आपले आहेत ही गोष्ट सदैव लक्षांत ठेविली पाहिजे. खरोखर राजा व प्रजा यांचें नातें पितापुत्राचें आहे, ही कल्पना जितकी सुंदर तितकीच अर्थपूर्ण आहे. सल्लामसलत देण्यास योग्य झालेल्या पुत्राचा सल्ला घरच्या कारभारांत ज्याप्रमाणें पित्यानें घ्यावयाचा, त्याचप्रमाणें प्रजेची सल्लामसलत राज्यकारभाराचे बाबतींत राजानें घेणें आवश्यक आहे. उलट, प्रजेनेंही योग्य तो सल्ला देण्याचे बाबतींत कुचराई करितां कामा नये. संस्थानिकांचे बरोबर प्रजेची वागणूक राजनिष्ठ पण निस्पृहपणाची, मर्यादायुक्त पण स्पष्टपणा न सोडणारी आणि प्रेमळ पण उभयतांच्या हितास जपणारी अशी पाहिजे." या आशयाचें श्री. केळकर यांचें भाषण अत्यंत विचारपरिप्लुत व उद्बोधक आणि पुढील सर्व कार्यास मार्गदर्शक झालें असें म्हणण्यास प्रत्यवाय वाटत नाहीं. पुढें ते आपल्या भाषणांत म्हणाले "श्रीमंतांनीं प्रजापरिषदेस परवानगी देऊन आपली जबाबदारी पार पाडली आहे व आपली जबाबदारी ओळखून आपण काम चालवावें, परस्परांचा विश्वास कायम

राहिला पाहिजे हें आपण लक्षांत ठेवून मागणी करणेची ती स्पष्टपणें व एक-मुखानें करा. मागणें हें आपलें काम आहे व तारतम्य पाहून देणें हें श्रीमंतांचें काम आहे. परंतु त्या कामींहि पुढील बंधनें आपण घालून घेतलीं पाहिजेत.:— ( १ ) आपले जसे हे राजे, तसेंच ह्या राजांचे जे अधिराजे, त्यांच्या-संबंधानें येथें चर्चा करणें अनाठायीं होय; ( २ ) आपणांस वाटेल तर आपल्या राजाविषयीं चांगला शब्द बोलूं नका, पण व्यक्तिशः राजाची अगर राजघराण्याची किंवा व्यक्तिशः अधिकाऱ्यांची निंदा करूं नका; (३)धर्मासंबंधानें व जातीसंबंधानें बोलूं नका."तसेंच श्री. केळकरांनीं राजा व प्रजा यांच्या संबंधाबद्दलच्या निरनिराळ्या कल्पना सांगून सध्याच्या परिस्थिती-संबंधानें ते म्हणाले "राजा व प्रजा यांचे संबंध 'ट्रस्टी व बेनिफिसियरी' ह्यांसारखे आहे. बेनिफिसियरींच्या हिताकरितां वाटेल तसा पैसा खर्च करण्याचा अधिकार ट्रस्टीला असतो, पण आपण मेहनतान्याकरितां कांहीं घेण्याचें नाहीं अगर नेमून घेण्याचें नसतें हें राजानें समजून घेतलें पाहिजे. संस्थानिकांनीं आपलें संस्थान काय लहान, आमच्यानें काय होणार, अशी सबब पुढें न करितां आपल्या प्रजेला कांहींतरी अधिकारदान दिलेंच पाहिजे. त्यांनीं प्रजेला दूर लोटूं नये; त्यांच्या अडचणींची व तक्रारींची चर्चा होऊं द्यावी. मनु पालटला आहे व पालटलेल्या काळाला सर्वांनीं नमून चालावें. अधिकार मागणें हें दुधारी शस्त्र आहे. अधिकार मागण्याचे आधीं ते दिल्यानंतर आपली जबाबदारी ओळखून कार्य करण्याची पात्रता व शक्ति अंगांत आली पाहिजे. खेड्यांतून ग्रामपंचायती स्थापन करून खेड्यांची व्यवस्था नीट ठेवितां येते हें जनतेनें दाखविलें पाहिजे. स्थानिक संस्था, ग्रामपंचायती व सहकारी पतपेढ्यांच्या द्वारें आपली लायखी आपण अगोदर सिद्ध केली पाहिजे. तात्पर्य, प्रजेनें राजनिष्ठ असणें हें प्रजेचें कर्तव्य आहे व आपली जबाबदारी ओळखून हकाची मागणी करणें जरूर आहे. त्याचप्रमाणें श्रीमंतांनीं प्रजेच्या आकांक्षा पूर्ण होण्याकरितां प्रातिनिधिक कौन्सिल निर्माण करावें एवढेंच माझें म्हणणें आहे."

या परिषदेंत पुष्कळ ठराव पास करण्यांत आले. त्या सर्वांचा उल्लेख करण्याची जरूरी नाहीं. एका ठरावानें " संस्थानांत संस्थानाधिपतींच्या आधिपत्याखालीं जबाबदार राज्यपद्धति शांततेच्या व योग्य मार्गांनीं प्राप्त करून घेणें आपलें ध्येय आहे " असें ठरविणेंत आलें. तसेंच म्युनिसिपालिटींत लोकनियुक्त सभासदांचें प्रमाण वाढविणेंत यावें, सारावसुली करणेपूर्वीं पिकांची आणेवारी लोकनियुक्त पंचामार्फत ठरवावी, हल्लीं बसलेला सारा वाढवूं नये, शेतकऱ्यांच्या शारीरिक, औद्योगिक व सांपत्तिक स्थितीची पाहणी करणेकरितां कमिटी नेमावी वगैरे ठराव पास झाले. आणखी एक महत्त्वाची सूचना चर्चेकरितां म्हणून परिषदेपुढें मांडण्याची परवानगी श्री. बाबूराव म्हसकर यांनीं अध्यक्षांकडे मागितली. तिचा उल्लेख केल्यावांचून ह्या परिषदेची हकीकत पूर्ण होणार नाहीं. येथील कांहीं अधिकारी लोकांकडून लांच खातात, त्यांची चवकशी व्हावी अशाबद्दलची श्री. म्हसकरांची ही सूचना होती. त्यावेळीं अध्यक्षांनीं कांहीं आधार आहे काय, असें विचारतां ज्या त्या अधिकाऱ्यांची पूर्वीची स्थिति व त्यांचे पगाराचें उत्पन्न व खर्च यांचें मान लक्षांत घेतां हल्लीं इस्टेट आहे तेवढी लांच घेतल्यावांचून होणें शक्य नाहीं असें सांगण्यांत आलें. परंतु अध्यक्षांनीं त्यांस शेवटीं परवानगी दिली नाहीं. सर्वसामान्य समाजाला नेहमीं उपसर्ग होतो, परंतु शाबीत करणेस कठीण असा हा प्रश्न आहे व त्याबद्दल पुढें निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या रूपानें सदैव लोकांच्यापुढें आलेलें आहे. नंतर मातृभाषेंतून अर्ज वगैरे आल्यास, मग ती भाषा कानडी, मराठी, तेलगू, मुसलमानी अगर गुजराथी असो, त्याच भाषेंतून जबाब वगैरे घेऊन कामें चालून निकाल देणेंत यावेत असा एक ठराव पास झाला. त्यावर बडोदें व ग्वाल्हेर येथें अनुक्रमें गुजराथी व हिंदी काम चालतें सबब इकडे कानडीचा पुरस्कार करण्यास हरकत नाहीं असें अध्यक्षांनीं आपलें मत दिलें. त्यानंतर परिषदेचें दुसरें अधिवेशन बन्हट्टी मुक्कामीं बेळगांवचे त्यावेळचे आमदार श्री. पंडितापा रायपा चिकोडी यांचे अध्यक्षतेखालीं ता. १३ व १४ फेब्रुवारी १९२९ रोजीं

झालें. तिसरें अधिवेशन हुन्नूर मुक्कामीं ता. ८-२-१९३१ रोजीं कर्नाटकचे सुप्रसिद्ध पुढारी कै. श्रीनिवासराव कौजलगी यांचे अध्यक्षतेखालीं व चवथें अधिवेशन कुंदगोळ येथें धारवाडचे पुढारी आमदार श्री. विश्वनाथ-राव जोग यांचे अध्यक्षतेखालीं ता. २८ व २९ जानेवारी १९३३ इ. रोजीं, पांचवें अधिवेशन सावळगी येथें ता २०–२१ मार्च १९३५ रोजीं बेळगांवचे सुविख्यात वकील व कँग्रेस कार्यकर्ते श्री. नारायणराव जोशी यांचे अध्यक्षतेखालीं झालें. सहावें अधिवेशन कुंदगोळ तालुक्यांतील सांवशी गांवीं ता. ३०–३१ मे १९३८ रोजीं, व सातवें ता. ३ व ४ जून १९३९ रोजीं जमखंडी मुक्कामीं कर्नाटकांतील एक उत्साही कँग्रेस कार्य-कर्ते श्री. अंदानेप्पा दोड्डमेट्टी यांच्याच अध्यक्षतेखालीं पुन: भरलें. आम्हांस प्रस्तुतचे प्रसंगीं प्रत्येक अधिवेशनांतील साद्यंत हकीकतीचा विचार कर्तव्य नाहीं, परंतु स्थूलमानानें परीक्षण करून कार्य कोणत्या स्वरूपाचें होत होतें, त्याचा परिणाम लोकांवर व दरबारवर कितपत होत होता एवढेंच पहावयाचें आहे. तसेंच या काळांतील इतर जे महत्त्वाचे प्रश्न या संस्थानांत उद्भवले होते, खालसा मुलुखांत कोणत्या स्वरूपाची चळवळ चालली होती व त्याचा एकंदरीनें संस्थानी राजकारणावर काय परिणाम होत होता हेंहि लक्षांत घेणें जरूर आहे.

आतांपर्यंत प्रजापरिषदेचीं एकूण सात अधिवेशनें झालीं. त्यांत १९३८ मध्यें सांवशी येथें भरलेल्या अधिवेशनास त्यावेळच्या एकंदर परिस्थितीनें विशेष महत्त्व प्राप्त झालें व ती प्रजापरिषद चांगली गाजली. तेव्हांपासून प्रजापरिषदेस स्वतंत्र व व्यवस्थित स्वरूप प्राप्त झालें. म्हणून त्या अधि-वेशनाचा व त्यापुढील अधिवेशनाचा स्वतंत्रपणें विचार करावा लागणारा आहे. १९३५ अखेर झालेलीं अधिवेशनें सरळ ठरीव चाकोरींतून आपला कार्यभाग चालवीत असल्याचें दिसून येतें. अधिवेशनापूर्वी महिना पंधरा दिवस कार्यकर्त्यांनीं जागें होणें, एक तात्पुरती कमिटी नेमणें, स्वागत-कमिटी बनवून रक्कम जमविणें, अध्यक्ष ठरविणें, फार तर खेड्यांतून

ेषदेसाठीं प्रचार करणें व आमंत्रणें देणें, दोन दिवस जमून भाषणें करून व पास करणें, म्हणजे काम खलास. पुढचें काम झालेंच तर त्या ठरावांची : नक्कल श्रीमंत सरकारांचेकडे पाठविणें व शक्य झाल्यास त्यांची शिष्ट- ळानें भेट घेऊन ते ठराव त्यांचेकडे सादर करणें एवढेंच काम होई. ्या दिखाऊ कार्यानें संस्थेस महत्त्व थोडेंच येणार व आपला कार्यभाग डाच होणार ? या अवधींत कांहीं सुधारणा घडून आल्या आहेत, लोकांच्या मागण्याहि कांहीं अंशानें दरबारनें मान्य केल्या आहेत ही ् खरी आहे; तथापि त्याला महत्त्वही बेताचेंच आहे.

या कालखंडांत खालसा मुलुखांत नवीन सुधारणा कोणत्या द्याव्यात बद्दल विचार करण्याकरितां व हिंदुस्थानांतील परिस्थितीची समक्ष ाणी करून व लोकांचें म्हणणें ऐकून घेऊन रिपोर्ट करण्याकरितां ं गोऱ्या सभासदांचें 'सायमन कमिशन' बादशहांकडून नेमण्यांत लें होतें व त्यांत एकहि हिंदी मनुष्य घेण्यांत आला नाहीं म्हणून त्यावर हिष्कार टाकणेंत यावा याबद्दल या देशांतील सर्व पक्षांचें एकमत होतें. ा कामीं तेथें बरीच मोठी चळवळ झाली. तसेंच हिंदी संस्थानें व खालसा ्रख यांचा पुढील राजवटींत कोणता संबंध रहाणार व संस्थानिकांचे ्संबंध कोणते आहेत, त्यांच्यामध्यें व सार्वभौम सरकारचे दरम्यान असलेले संबंध यांचा विचार करून रिपोर्ट करणेकरितां बटलर कमिटी आपलें काम करीत होती. त्यांत संस्थानी प्रजेला स्थानच देण्यांत आलें नव्हतें. ह्या दोन्ही कमिट्यांचे रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यावर इंग्लंड येथें जी गोलमेज परिषद् भरविण्यांत आली, त्यांतहि संस्थानी प्रजेचे प्रतिनिधी घेण्यांत आले नव्हते. खालसा मुलुखांत त्यावेळीं महात्मा गांधी यांचा दांडी-मार्च व नंतर सत्याग्रह व कायदेभंगाचें रणकंदन चालून व्हाईस- रॉय लॉर्ड आयर्विन व महात्मा गांधी यांचे दरम्यान सुदीर्घ वाटाघाट होऊन तडजोड झाली व महात्मा गांधी काँग्रेसची बाजू मांडणेकरितां काँग्रेसचे—म्हणजेच या देशाचे एकमेव प्रतिनिधि म्हणून, इंग्लंडला जाऊन

निराश होऊन परत फिरले. ते स्वदेशीं परत येतात न येतात तोंच, सरकारनें दडपशाहीचें हत्यार उपसून कॉंग्रेसची चळवळ चिरडून टाकण्याचा प्रयत्न केला. हा इतिहास ताजा असल्यानें येथें विशेष विशद करण्याची जरूरी नाहीं. याचा येथें उल्लेख करण्याचें कारण इतकेंच कीं, या सर्व घडामोडींचा संस्थानी चळवळीवर परिणाम होत होता. या संस्थानांतूनहीं कॉंग्रेसचें काम तालुका कॉंग्रेस कमिट्या स्थापून चालू होतें व त्यामार्फत खालसा मुलुखांतील कायदेभंगांत भाग घेण्याकरितां कांहीं तरुण गेले होते. व त्यांना कारागृहवासहि पत्करावा लागला. त्यांत येथील डॉ. हुल्याळकर यांचे चिरंजीव श्री. बाबूराव, रामाचार्य आयाचित, वामनराव देशपांडे, पंडित, कुलकर्णी, चिमड, वगैरे तरुणांनीं भाग घेतला होता. या धामधुमींत येथील कॉंग्रेस कमिटी बंद ठेवणेंत आली होती व ती सन १९३४ मध्यें कायदेशीर ठरून पुनः सुरू करण्यांत आली. दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेचीं तसेंच आखिल हिंदुस्थान संस्थानी लोकपरिषदेचीं अधिवेशनें संस्थानी प्रश्नांस व चळवळीस जोरानें चालना देत होतीं. संस्थानी प्रजेमध्यें जागृति उत्पन्न करून त्यांच्या हक्काची जाणीव करून देण्याचे उद्देशानें व सर्व संस्थानी हिंदुस्थानानें एकत्र येऊन आपलें हित साधणेकरितां खटपट करण्याच्या दृष्टीनें संस्थानी सप्ताह साजरे करण्यांत आले. १९३१ सालीं जो सप्ताह साजरा केला, त्यांत (१) संस्थानी प्रजेच्या कमींत कमी मागण्या नमूद करून राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षाकडे त्या पाठविण्याकरितां तयार केलेल्या अर्जावर सह्या मिळविणें, (२) अखिल भारतीय संस्थान प्रजापरिषदेचे सभासद मिळविणें, व (३) शक्य तितक्या ठिकाणीं शक्य तितक्या सभा व व्याख्यानें जुळवून आणून संस्थानी प्रजेच्या मागण्यांचें महत्त्व व त्यांची आवश्यकता जनतेस पटवून देणें, याप्रमाणें कार्याची व्याप्ति ठरविण्यांत आली होती. त्या सर्व कामांत जमखंडी संस्थानांतील कार्यकर्त्यांनीं ठरल्याप्रमाणें कार्य पुरें केलें. त्याबद्दल दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानी प्रजासप्ताहाचा अहवाल म्हणून जो

छापला आहे, त्यांत "जमखंडी, औंध, शिरहट्टी व तेरदाळ या ठिकाणच्या कार्यकर्त्यांप्रमाणें जर चोहोंकडे कार्य झालें असतें, तर इच्छित आंकडा (सभासदांचा व सह्यांचा) खास पुरा झाला असता व जागृतिहि बरीच झाली असती यांत संशय वाटत नाहीं" असें नमूद करण्यांत आलें आहे. यावरून येथील कार्यकर्त्यांची व त्यांच्या कार्याची कल्पना सहजच होणार आहे. तसेंच संस्थानी प्रजेच्या वतीनें, सार्वभौम सरकार वगैरेंचेकडे तारा वगैरे करून दाक्षिणी संस्थान प्रजापरिषद् व अखिल भारतील संस्थान लोकपरिषद् यांच्या कार्यास पाठिंबा देण्याचें कार्य ज्या त्या वर्षी ह्या संस्थाननें केलें आहे. ह्या अल्पशा कार्याला अवास्तव महत्त्व देऊन स्तोम माजविण्याचा हेतु नाहीं, परंतु सर्व संस्थानी प्रजेबरोबर येथील कार्यकर्तेही चळवळ पुढें नेण्याकरितां कळकळीनें प्रयत्न करीत होते इतकेंच दिग्दर्शित करण्याचें आहे.

हल्लींचे श्रीमंत राजेसाहेबांनीं १९२६ सालीं राज्याचीं अधिकारसूत्रें आपल्या हातीं घेतलीं, तेव्हां त्यांनीं जें भाषण केलें त्यांत "प्रजेचें हित तें आपलें हित" या उच्च तत्त्वाचा पुरस्कार करून त्याच दृष्टीनें आपला राज्यकारभाराचा गाडा हाकण्याचें धोरण आपण ठेवणार असल्याचें त्यांनीं घोपित केलें व त्यानंतर पुष्कळ प्रसंगीं त्याचा पुनरुच्चार त्यांनीं केला आहे. निर्विकार मनानें विचार केल्यास त्यांची ती सदिच्छा असल्याचें व त्या दृष्टीनें त्यांनीं गेल्या कांहीं वर्षांत आस्थापूर्वक प्रयत्न केल्याचें कांहीं उदाहरणांवरून दिसून येतें. परंतु पुष्कळ प्रसंगीं ज्या वातावरणांत श्रीमंत राजेसाहेब वावरतात, त्याचा परिणाम त्यांचेवर होत असल्यामुळें त्यांच्या मताप्रमाणें व प्रजेच्या इच्छेप्रमाणें करणें त्यांनाच अवघड होऊन बसतें कीं काय तें समजत नाहीं. त्यांचें ध्येय पूर्णपणें सिद्धीस जाण्यास तीव्र मनीषा, दृढनिश्चय व आत्यंतिक स्वार्थत्याग करून प्रजाहित साधण्याची उत्कटता ह्या गुणांची अत्यंत जरूरी असते. असो.

श्रीमंत राजेसाहेबांनीं राज्यसूत्रें हातीं घेतल्याबरोबर जमखंडीस म्हणजे राजधानीच्या ठिकाणीं पिण्याच्या पाण्याचें दुर्भिक्ष जें सालोसाल सतावीत

होतें, तें दूर करण्याकरितां ५।६ लाख रुपयांची योजना हातीं घेऊन ती त्यांनीं पार पाडली. या संस्थानांतील शिक्षणसौकर्याचा लौकिक महशूरच आहे; त्यांत पुणें येथील न्यू पूना कॉलेजास माजी अधिपति कै. सर परशरामभाऊ यांच्या स्मारकाकरितां जमविलेला निधि अदमासें एक लक्ष रुपये व तसेंच दरसाल ५००० रु. प्रमाणें २० वर्षांत १ लक्ष रूपये सदर संस्थेस देऊन, संस्थानच्या ५० विद्यार्थ्यांच्या उच्च शिक्षणाची मोफत सोय केली व त्या कॉलेजचें नांव बदलून "सर परशुराम-भाऊ कॉलेज' असें ठेवून त्यांचे स्मारकाचें कार्य पूर्ण केलें. बन्हट्टी व कुंदगोळ येथील शाळेचें ए. व्ही. स्कूलमध्यें रूपांतर करून दुय्यम शिक्षणाची सोयहि केली. परंतु प्राथमिक शाळांची संख्या मात्र, शाळा चांगल्या चालत नाहींत, या सबबीखालीं व विनाकारण खर्च होतो या कारणानें, भराभर कमी होत होती. याप्रमाणें १९३५ पर्यंत अजमासें १२ शाळा बंद झाल्या ही दुःखाची गोष्ट आहे. यांत दरबारला सर्वांशीं दोष देणें इष्ट वाटत नाहीं. लोकांकडेही थोडासा आहेच.

संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति स्थापन करणें हें आपलें ध्येय असल्याचें जाहीर करून सुरवात म्हणून १९३२ सालीं प्रातिनिधिक कायदे-मंडळाबाबतचा कायदा करून अंमल सुरू केला. आणखी कांहीं किरकोळ सुधारणा झाल्या व कांहीं करहि लोकांवर लादण्यांत आले. त्याचा विचार प्रजापरिषदांच्या अधिवेशनांचा व कायदेमंडळांतील कामकाजाचा विचार करतेवेळीं आपोआपच होणार आहे.

आतां आपण पुनः दुसऱ्या प्रजापरिषदेच्या अधिवेशनाकडे येऊं. त्या परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री. तमण्णाप्पा चिक्कोडी यांनीं आपल्या भाषणांत संस्थानांत उद्योगधंद्याच्या शाळा काढणेंत याव्यात, संस्थानांतील बहुसंख्य समाज कानडी असून दरबारांत त्याला स्थान नसणें ही अन्यायाची गोष्ट दूर करावी, अधिकारीवर्गात प्रजेमधील सर्व वर्गांतील योग्य गृहस्थांना नोकरी देण्याची व्यवस्था व्हावी, बनहट्टी येथील शाळेमध्यें

ायख पदवीधर नेमून तें हायस्कूल करणेंत यावें वगैरे सूचना केल्या. ाध्यक्ष श्री. पंडितापा यांनीं खालसा हिंदुस्थान व संस्थानें यांमधील संबंध ंसा असावा व येथें चळवळ कशी करणेंत यावी याबद्दल ऊहापोह करून ंस्थानांत जबाबदार राज्यपद्धति स्थापन करण्याचे बाबतींत कोणाचाहि ाडथळा येऊं नये व जितक्या लवकर ती अस्तित्वांत येईल तितकें ंस्थानिक व प्रजा या दोघांनाहि तें हितकर आहे असा आपला अभिप्राय यक्त केला. या अधिवेशनांत नवीन झालेल्या ठरावांपैकीं महत्त्वाच्या एक- ोन ठरावांचा उल्लेख करणें इष्ट वाटतें.

एका ठरावानें मिरज येथील प्रजा व राजा यांचे दरम्यान सारावाढी- द्दल चाललेल्या चळवळींचे बाबतींत योग्य रीतीनें उभयतांनीं निकाल ेला याबद्दल आनंद व्यक्त करण्यांत व दुसऱ्या ठरावानें अखिल भारतीय ंस्थानी प्रजेतर्फे जें शिष्टमंडळ विलायतेस गेलें होतें, त्यांतील एक सभासद ो. गणपतरावजी अभ्यंकर यांनीं संस्थानी प्रजेची बाजू शिष्टमंडळाच्या तीनें स्पष्टपणें व निर्भिडपणें मांडली याबद्दल परिषदेनें त्यांचें अभिनंदन रून आनंद व्यक्त केला. संस्थान मजकुरीं दोन न्यायाधीश नेमून हाय- ोर्ट बेंच स्थापन करण्यांत यावें असा दरबारला विनंति करणारा एक ठराव ास करण्यांत आला.

हुन्नूर येथें भरलेल्या तिसऱ्या अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष श्री. मल्लेशप्पा नगंडी यांनीं दुसऱ्या अधिवेशनानंतर प्रजापरिषदेच्या मागणीप्रमाणें वतंत्र हायकोर्ट बेंचाची स्थापना केल्याबद्दल व सभाबंदीचा कायदा, ंशतः कां होईना रद्द केल्याबद्दल, श्रीमंत सरकारांचें अभिनंदन आपल्या ाषणांत केलें. या अधिवेशनास कर्मवीर अण्णासाहेब शिंदे हे जमखंडीचे नागरिक म्हणून हजर होते व त्यांचें गोलमेज परिषदेवरचें भाषण फारच दणदणीत असें झालें. या परिषदेंत किरकोळ स्वरूपाचे बरेच ठराव पास झाले. त्यांत नवीन व महत्त्वाचे असे ठराव पुढीलप्रमाणें आहेतः—

. ( १ ) ( अ ) गेल्या पांच वर्षांत शेतीची स्थिति अतिशय खाला-वली आहे व पावसाचें प्रमाणहि कमी होत गेलें आहे. त्यांत यंदा पीक अगदींच कमी आलें असून कापसाचे व धान्याचे भाव फारच उतरल्यानें शेतकरी फारच जेरीस आले आहेत. तरी सरकारांनीं योग्य चवकशी करून गरीब व असमर्थ रयतेस सारासूट द्यावी व इतरांस तहकुबी द्यावी अशी या सभेची सरकारांस विनंति आहे.

( ब ) हल्लींची परिस्थिति लक्षांत घेतां संस्थानांतील जमिनींचा सारा फारच जास्त आहे, सबब तो शें. ५० टक्के कमी करणेंत यावा.

( २ ) ( अ ) गोलमेज परिषदेच्या बैठकींत संस्थानिकांनीं व संस्थानिकांच्या प्रतिनिधींनीं हिंदुस्थानांत घटनात्मक स्वरूपाची राज्यपद्धति चालू करण्याच्या तत्त्वास संमति दिल्याबद्दल आनंद.

( ब ) गोलमेज परिषदेस संस्थानी प्रजाजनांचे प्रतिनिधी न बोलावल्यानें संस्थानी प्रजेच्या हितसंबंधाची फारच आबाळ झाली आहे. यापुढें अशा ज्या परिषदा भरतील, त्यांत संस्थानच्या प्रजाप्रतितिधींना आमंत्रण देण्यांत यावें. तसें न झाल्यास खालसांतील पुढाऱ्यांनीं त्यांत भाग घेऊं नये.

( ३ ) संस्थानिकांनीं पुढील राज्यघटनेंत मध्यवर्ति सत्ता मान्य केल्याशिवाय व संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति अमलांत आणल्याशिवाय संयुक्त राज्यघटनेंत त्यांना स्थान देण्यांत येऊं नये.

चवथ्या अधिवेशनाचे अध्यक्ष श्री. विश्वनाथराव जोग यांनीं आपल्या भाषणांत पुढील महत्त्वाच्या सूचना दरबारास केल्या. ( १ ) संस्थानांतील बहुसंख्यात्मक प्रजा कानडी असून त्यांच्या कांहीं स्पष्ट दिसणाऱ्या अडचणी दूर करण्याविषयीं संस्थानाधिकाऱ्यांनीं अवश्य लक्ष द्यावें. ( २ ) खालसांतल्यापेक्षां सारा जास्त आहे तो कमी करावा. ( ३ ) सदर्न मराठा संस्थानें म्हणून संबोधल्या जाणाऱ्या संस्थानांनीं मिळून आपल्या सर्वांचें

एक सब् फेडरल कोर्ट किंवा सदर्न मराठा स्टेट्स् ज्यूडिशियल कौन्सिल नांवाची समायिक न्यायसंस्था स्थापण्याचा प्रयत्न करावा.

या अधिवेशनास कै. गणपतरावजी अभ्यंकर व कै. वामनरावजी पटवर्धन हे दोघेहि हजर होते व त्यांच्या सहाय्यानें बरेच उपयुक्त ठराव पास करण्यांत आले. कांहीं महत्त्वाचे पुढें दिले आहेत:—

(१) कायदेमंडळांत लोकनियुक्त सभासदांचें प्रमाण $\frac{3}{4}$, मंडळास अध्यक्ष व उपाध्यक्ष निवडणेचा अधिकार द्यावा; श्रीमंतांच्या खासगी खर्चाचें विविक्षित प्रमाण ठरवून त्याव्यतिरिक्त सर्व अंदाजपत्रकावर चर्चा करण्याचा अधिकार असावा.

(२) श्रीमंत सरकारांनीं कायदेमंडळ सुरू करतांना प्रजेला मूलभूत हक्क दिल्याची घोषणा करावी.

पांचव्या अधिवेशनाचे अध्यक्ष श्री. नारायणराव जोशी यांनीं आपल्या भाषणांत संस्थानी प्रश्नाबद्दल कॉंग्रेसनें स्वीकारलेल्या धोरणाबद्दल जो बराच गैरसमज झाला आहे तो चुकीचा असें सांगून कॉंग्रेसनें संस्थानी प्रजेस केव्हांहि सोडणार नाहीं असें कळविलें. कानडी दप्तराबद्दल कायदेमंडळांत चर्चा करण्यास बंदी केल्याबद्दल विषाद व्यक्त केला.

आतां या काळपर्यंत कायदेमंडळाच्या कामकाजाचें ओझरतें निरीक्षण करून सहाव्या व सातव्या प्रजापरिषदेच्या अधिवेशनाकडे वळणें इष्ट होईल.

## कायदेमंडळाचें कामकाज

संस्थानांत प्रातिनिधिक कायदेमंडळाचा कायदा १९३२ मध्यें दरबारनें लागू केला व पुढें निवडणुकीचे नियम वगैरे होऊन १९३३ च्या जून महिन्यांत प्रथम निवडणुकी झाल्या व कामकाजाचे नियम वगैरे होऊन प्रत्यक्ष कामास १९३४ पासून प्रारंभ झाला व तेव्हांपासून नियमितपणें अधिवेशन भरत आहे. मंडळाला अधिकार बेताचेच देण्यांत आल्यानें त्यापासून विशेष फायदा होईल असें कोणासच वाटलें नाहीं; पहिल्या निवडणुकींत डॉ. हुल्याळकर, श्री. सावडे वकील, श्री. शेगुणसी

वकील, श्री. बंगी वकील, श्री. वाटवे वकील, श्री. तिलोकचंद शेटजी व कुंदगोळचे श्री. आपटे व श्री. शिवराव कुलकर्णी वगैरे ठळक ठळक मंडळी निवडून आली. लोकनियुक्त सभासदांचें बहुमत नांवाचेंच होतें. शिरवड्याचे सभासद नांवाचे लोकनियुक्त पण सरकारनियुक्ताप्रमाणें भासत. इतर कांहीं सभासद नेहमींच लोकमताला चिकटून राहतील याबद्दल खात्री नव्हती. अशा परिस्थितींत महत्त्वाचें काम करून लोकहित साधण्याची आशा कमी. तथापि दिलेल्या अधिकाराचा उपयोग योग्य तऱ्हेनें करण्याची आपण खटपट करावी, या भावनेनें कार्यकर्ते तेथें गेले, पण तीन वर्षांच्या अनुभवानें कार्यकर्त्यांची व लोकांची निराशा होत चालली. दिलेले अधिकार फारच मर्यादित, पण तेहि पूर्णपणें व सरळपणें वापरूं देण्याची दरबारची प्रवृत्ति दिसेना. विचारलेल्या प्रश्नांस सरळ उत्तरें न देणें, महत्त्वाचे प्रश्न दूरान्वयानें कोणत्या तरी कलमाखालीं ओढून आणून विचारणेस बंदी करणें, सरकारी बिलावरील चर्चा मुद्दाम लांबलांब भाषणें करून लांबविणें, बिनसरकारी ठराव होतां होईल तों कायदेमंडळापुढें चर्चेकरितां न येतील, अशी व्यवस्था करणें, पिकांच्या आणेवारीसारखे सर्वसंमत ठराव पास झाले, तरी त्यांचा अंमल न करणें, बजेटावरील चर्चेकरितां पूर्वींच्या सालचे नक्की आंकडे न देणें, वगैरे प्रकारामुळें दरबारचें धोरण सरळपणाचें दिसेना. शेतसारा कमी करणें व रयतांची स्थिति सुधारणें हे महत्त्वाचे प्रश्न होते; पहिल्या प्रश्नास तर प्रातिनिधिक मंडळाच्या कामकाजांत शिरकावच मिळेना; पण दुसऱ्या कामाकरितां मात्र एक कमिटी नेमण्यांत आली. त्या कामीं प्रश्नपत्रिका काढून उत्तरें मागविण्यांत आलीं, तोंडी पुरावा घेण्यांत आला, प्रत्येक साक्षीदाराचे जबानींत व उत्तरांत शेतसारा जास्त असल्यानें कमी करणेबद्दलची सूचना होती, तरी ती लक्षांत घेतली गेली नाहीं. कमिटींतील लोकनियुक्त सभासद श्री. बंगी व शेगुणसी यांची त्याबद्दल खात्री झाली असून ते तरी आपलें भिन्न मत त्या बाबतींत व्यक्त करणार असें वाटत होतें. शेवटीं

त्यांनींहि ऐन प्रसंगीं सारा उतरविण्याची जरूरी नाहीं अशा बहुमत वाल्यांच्या दरबारी मताला संमति दिल्यामुळें लोकांना अचंबा वाटला आणि दरबारी धोरणाचीं चक्रें कशीं फिरत आहेत, त्याची कल्पना येऊं लागली. दप्तरची भाषा कानडी करण्यांत यावी, हा ठराव पहिल्या अधिवेशनांत नापास झाला होता, त्याबाबतींत दरबारतर्फेच्या सभासदांचीं जीं भाषणें या ठरावाविरुद्ध झालीं, त्यांत या सूचनेची जवळ जवळ हेटाळणीच करण्यांत आली. दुसऱ्या वर्षी कानडी–मराठी वादाची सबब सांगून त्या प्रश्नास प्रातिनिधिक मंडळांत बंदीच करण्यांत आली. सारावसुलीचे बाबतींत दरबारी धोरणाबद्दल डॉ. हुल्याळकर यांना दुसऱ्या वर्षाच्या अधिवेशनांत मांडलेली कपाती (Token cut) ची सूचना पास झाली, तर लगेच दुसरे वर्षी तशी सूचनाच मांडतां येत नाहीं अशी दुरुस्ती नियमांत करणेंत आली. लोकनियुक्तांपैकीं बऱ्याच सभासदांनीं आपलीं कामें लक्ष लावून केलीं. बजेटवरील भाषणें चांगलींच होत होतीं, पण त्याचा फायदा तर लोकांना नाहींच, उलट प्राप्तीवरील कराचें बिल जरूर नसतां दरबारनें गडबडीनें प्रातिनिधिक मंडळापुढें मांडून पासहि करून घेतलें. त्यास लोकनियुक्त सभासदांपैकीं श्री. बंगी, शेगुणसी, बाटवे व कोरी यांनीं पाठिंबा दिला, इतकेंच नव्हे, तर त्या वर्षाची प्रातिनिधिक मंडळाची बैठक संपल्यावर पोलिसांच्या साहाय्यानें रा. बाटवे व रा. बंगी यांनीं खेडोपाडीं हिंडून ह्या करानें लोकांचें कल्याण आहे असा प्रचार केला. श्री. साबडे व डॉ. हुल्याळकर यांनीं त्या कराविरुद्ध मोहीम सुरू केली. शेवटीं त्याला श्रीमंतांनीं मंजुरी दिलीच व जो कर बसला तो आतांपर्यंत कायमच झाला आहे. त्यावेळीं कांहीं सभासदांचें मत अनुकूल करून घेण्यास त्या उत्पन्नापैकीं कांहीं अंश शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्याकडे खर्च करण्यांत येईल असें आश्वासन देण्यांत आलें. परंतु पुढें त्याचें नांवहि नाहीं. ह्या सर्व प्रकारामुळें १९३६ सालीं जें दुसऱ्यांदा निवडणुकीचें काम सुरू झालें, त्यांत कांहीं अधिकाऱ्यांची कांहीं विवक्षित उमेदवारांतर्फे जोरांत

ढवळाढवळ सुरू झाली. त्यामुळें श्री. सावडे व डॉ. हुल्याळकर यांनीं तसें स्पष्ट जाहीर करून निवडणुकींतून आपलें अंगच काढून घेतलें.

## कुंदगोळ तालुका परिषद

तिकडे कुंदगोळ तालुक्यांत सारावाकी वसुलीचा प्रश्न हातघाईला आलेला होता. त्यावाबत कांहीं जमिनी खालसा करण्यांत आल्या व कांहीं जप्तींत होत्या. वसुलीचे कामीं कडक व सक्तीचे उपाय योजले होते. त्याबद्दल तालुका परिषद भरविण्याचा तेथील कार्यकर्त्यांनीं उपक्रम करण्याचा बेत करून तयारीस सुरुवात करतांच तिला बंदी करून अध्यक्ष श्री. रंगराव दिवाकर व इतर कार्यकर्त्यांवर नोटिसा बजावून बंदी करण्यांत आली व जणूं कांहीं बंडच होत आहे असा देखावा उभा करून संस्थानी, रेल्वे व खालसा पोलिसांचा कडेकोट पहारा ठेवण्यांत आला. त्या अदूरदर्शी धोरणाबद्दल बरीच प्रतिकूल टीका होऊन दरबारचें नांव बद्दू झालें. नंतर अजमासें १॥-१॥। वर्षांनीं दरबारनें कुंदगोळ तालुका परिषद भरविण्यास परवानगी दिली. वास्तविक सभाबंदीचा कायदा १९२९ मध्यें अंशतः रद्द झाल्यानंतर अशा परवानगीची जरूरीच नव्हती; परंतु दरबारनें बंदी केल्यामुळें ती उठवावी लागली. अशा परिस्थितींत १९३८ च्या मे महिन्यांत कुंदगोळ येथें दे. भ. दिवाकर यांच्या अध्यक्षतेखालीं कुंदगोळ तालुका-परिषद व सांवशी येथें दे. भ. अंदानेप्पा दोड्डमेट्टी यांच्या अध्यक्षतेखालीं जमखंडी संस्थान प्रजापरिषदेचें ७ वें अधिवेशन भरून तीं दोन्ही मोठ्या उत्साहानें पार पडलीं.

## सांवशी प्रजापरिषद आणि नंतर.

जमखंडी संस्थानच्या राजकीय चळवळीच्या इतिहासांत या सांवशी प्रजापरिषदेस अतिशय महत्त्वाचें स्थान दिलें पाहिजे. त्या वेळीं जमखंडी संस्थानांतील अंतर्गत परिस्थिति कशी होती ह्याची हकीकत वर आलीच आहे. चळवळीस जोर येण्यास बाहेरची परिस्थितिहि तशीच अनुकूल व उत्तेजनकारक झाली होती. १९३८ हें सालच संस्थानी चळवळीस अत्यंत महत्त्वाचें



डॉ. दामुआण्णा हुल्याळकर, जमखंडी.



श्री. शि. गं. कुलकर्णी, सं. जमखंडी.



श्री. वंगी, जमखंडी.

गेलें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. दरबारनें आपल्या मागण्या मान्य न केल्यास प्रजेनें काय करावें हा प्रश्नच लोकांच्या डोळ्यांपुढें नव्हता. संस्थानिकांच्याकडून हक्क अगर अधिकार मिळण्याचेबाबत तीव्र निराशा झाल्यावर, लोकांनीं पुढील मार्गाचा विचार करण्यास सुरुवात केली. खालसांतील आठ प्रांतांत कॉंग्रेस राज्य सुरू झालें होतें. सांवशी येथील अधिवेशनाच्या पूर्वीच गुजराथेंतील मान्सा संस्थानांत सत्याग्रहास सुरवात झाली. कर्नाटकांत रामदुर्ग प्रजेनें पुढाकार घेऊन, संस्थानाधिपतीकडून सवलती व हक्क घेण्याचा निर्धार करून रणशिंग फुंकलें होतें. सांवशी-नजीकच असलेल्या मिरज संस्थानपैकीं लक्ष्मेश्वर तालुक्यांत अशीच चळवळ सुरू झाली होती. या सर्व चळवळीचा मुख्य उद्देश जमीनसारा कमी करणें व आणेवारी करून सारा घेणें हा होता व त्यास राजकीय हक्कांच्या मागणीचीही जोड देण्यांत आली. दक्षिणी संस्थान लोकपरिषदेचें अधिवेशन १९३८च्या मे महिन्यांत सांगली येथें सरदार पटेल यांचे अध्य-क्षतेखालीं भरलें होतें व त्यांत रामदुर्ग व लक्ष्मेश्वर तालुक्यांतील सत्याग्रह-चळवळीबद्दल चर्चा झाली होती व तेथील परिस्थिति अवलोकन करण्या-करितां त्या परिषदेनें दोन कमिट्याहि नेमल्या होत्या. म्हैसूर येथें चळवळ चाललीच होती. नुकतेंच विदुराश्वत्थम् गोळीबार–प्रकरण झालें होतें. कॉंग्रेस कार्यकर्त्यांचें लक्ष संस्थानी चळवळीकडे इतक्या जोरानें यापूर्वी केव्हांच खेंचलें गेलें नव्हतें. आतां याबद्दल जास्त विस्तार न करतां खुद्द परिषदेच्या कार्याचा आढावा घेतों. अध्यक्ष रा. दोड्डमेट्टी यांचें भाषण अगर उद्घाटनप्रसंगीं डॉ. कव्वूर यांनीं केलेलें भाषण हीं सर्व उत्तम व जोरदार झालीं.

कुंदगोळ तालुक्यांतील परिस्थितीमुळें व या अधिवेशनाच्या प्रचारा-मुळें लोकांच्यामध्यें उत्साह फार दिसला व कार्यकर्त्यांच्या मनांत यंदां आपणांस दरबारकडून योग्य सवलती न मिळाल्यास पुढचा मार्ग पत्करावा असा विचार उत्पन्न झाला होता. पुढचा मार्ग म्हणजे करबंदी अथवा

सत्याग्रह याशिवाय दुसरा कोणता असणार ? या कारणांमुळें परिषदेस लोकसमुदाय भयंकर जमला. ७०००-८००० रयतांचा मेळावा यापूर्वीच्या कोणत्याहि अधिवेशनास उपस्थित नव्हता. त्यानंतर दुसरें वैशिष्ट्य म्हणजे कार्यकर्त्यांनीं व रयतांनीं आपल्या अडचणी-मग त्या लांचलुचपतीबद्दल असोत अगर वसुलीच्या कामीं त्रासाबद्दलच्या असोत-अत्यंत निर्भय व स्पष्टपणें जाहीर रीतीनें परिषदेपुढें मांडल्या. इतका मोठा जमाव जमलेला परंतु परिषदेस प्रारंभ झाल्यापासून ती खलास होईपर्यंत जमलेला प्रचंड लोकसमुदाय लक्षपूर्वक चाललेल्या सर्व चर्चेकडे लक्ष देऊन होता ही महत्त्वाची गोष्ट आहे. म्हणजे असल्या चर्चेंत लक्ष देणें जरूरीचें आहे ही भावना रयत लोकांमध्यें उत्पन्न होऊं लागली होती ह्याचें तें द्योतक आहे. या अधिवेशनांत पास झालेल्या ठरावांची संख्या कांहीं कमी नाहीं. नंबराकडे लक्ष दिल्यास शेवटच्या ठरावाचा नंबर ४५ वा आहे. त्याशिवाय एकेक ठरावांत पोट ठराव आहेत ते निराळेच. त्यांपैकीं कांहीं विशेष महत्त्वाच्या ठरावांचा फक्त उल्लेख करितों.

( १ ) साऱ्याचें प्रमाण हल्लींपेक्षां किमान ५०टक्के कमी करण्यांत यावें व रयतांची निकृष्टावस्था लक्षांत घेऊन सारातहकुबी व सूट देण्याचें उदार धोरण श्रीमंत राजेसाहेबांनीं स्वीकारावें.

( २ ) पिकांची आणेवारी करण्याच्या पद्धतीचा अंमल संस्थानांत नसणें ही संस्थानास लांछनास्पद गोष्ट आहे व ती सुरू करण्याबद्दल लोकांच्या मागणीचा दरबारकडून विचारच झाला नाहीं याबद्दल दरबारचा निषेध परिषद करते.

( ३ ) कायदेमंडळाच्या दुसऱ्या निवडणुकीच्या वेळीं कांहीं अधिकाऱ्यांनीं निष्कारण लुडबूड करून लोकप्रतिनिधींच्या मार्गांत विघ्नें उत्पन्न केल्यामुळें त्यांच्या कृतीचा तीव्र निषेध परिषद करते.

( ४ ) संस्थानांत नोकर लोकांच्या व्यापार-व्यवहार नियंत्रणाबाबत संस्थानी दरबारनें नियम करून त्यांचा अंमल सुरू झाला असला तरी

लांचखाऊ प्रवृत्ति कमी झालेली नाहीं. सबब ती पूर्ण नाहींशी होणेकरितां योग्य ती तजवीज करणेबद्दल सरकारला विनंति.

( ५ ) सारावसुलीच्या कामीं दुभतीं जनावरें घेऊन जाणें, पाण्यास जातांना हरकत करणें, शेतकामाचीं गुरें अडविणें, कापसाच्या गांठी दुकानांत नेतेवेळीं हरकत करणें वगैरेसारख्या ज्या बेकायदेशीर उपायांचा अवलंब करण्यांत येतो, त्यांचा निषेध व अशा उपायांना कायदेशीरपणें विरोध रयतांनीं करावा अशी रयतांना विनंति.

( ६ ) संस्थानचें दप्तर कानडी करणेबद्दल आग्रहपूर्वक दरबारास विनंति.

( ७ ) रयत लोकांची खरी सुधारणा होण्यास संघटनेची जरूरी असल्यानें रयत लोकांनीं स्वावलंबनपूर्वक ग्रामसंघाची स्थापना करून आरोग्य व इतर विधायक कार्यक्रमाचीं कामें चालूं करावींत.

ह्या व इतर महत्त्वाच्या ठरावांवरील वक्त्यांचीं भाषणें अतिशय कळकळीचीं व जोरदार अशीं झालीं, ही ध्यानांत घेण्यासारखी गोष्ट तर खरीच; परंतु त्यांच्या भाषणांत जरूर तो स्वार्थत्याग करण्याची दृढ निश्चयाची जी भावना व्यक्त झाली, त्यास विशेष महत्त्व आहे. आणखी एका ठरावाचा उल्लेख करून पुढील हकीकतीकडे वळूं. ‘ कायदेमंडळाची घटना व नियम अत्यंत सदोष असल्यानें लोकोपयोगी कार्य करण्याच्या दृष्टीनें ती अत्यंत निरुपयोगी आहे. ह्यांत लोकांना जबाबदारीचे हक्क मिळण्याची सोय होण्याच्या दृष्टीनें फरक केल्यावांचून स्वाभिमानी प्रतिनिधींनीं त्यांत भाग घेऊं नये व असलेल्या सभासदांनीं राजीनामे द्यावेत ’ हा ठराव पास झाला. लगेच तेथें हजर असलेले तीन सभासद श्री. आपटे, श्री. शि. गं. कुलकर्णी व श्री. पंचाप्पा कोरी यांनीं आपल्या जागांचे राजीनामे अध्यक्षांकडे दिले व त्यांचें अभिनंदन करण्यांत आलें. प्रातिनिधिक मंडळाचे सभासद रा. बाटवे हा ठराव येण्यापूर्वींच कांहीं वेळ गांव सोडून गेले व रा. बंगी वकील परिषदेंत तेव्हां उपस्थित नव्हते.

नंतर श्री. बाळण्णवर, श्री. लाहोटी, श्री. होसूर, श्री. मुधोळ, व श्री. सावळगी यांनीं परिषदेच्या सूचनेस मान देऊन आपल्या जागांचे राजीनामे दिले. या सद्गृहस्थांनीं परिषदेची सूचना मानून तिला एक प्रकारचें महत्त्व दिलें. यानंतर कुंदगोळ तालुक्यांतील कांहीं खेड्यांना सारा न देण्याचा सत्याग्रह सुरू करण्यास परवानगी देण्याबद्दलची सूचना एका सद्गृहस्थांनीं आणली व चर्चा झाली. शेवटीं तूर्त त्याबद्दल घाई करणें इष्ट न वाटल्यानें तो प्रश्न बाजूला सारला गेला. या सर्व प्रकारावरून चळवळीचा वारा कोणत्या दिशेनें वाहूं लागला होता हें स्पष्ट दिसण्याजोगें आहे. परिषद् संपली व पुढील वर्षापर्यंत कार्य करण्याकरितां कार्यकारी मंडळ नेमण्यांत आलें. परिषदेनें फार बहार केली असें म्हणत लोक जाऊं लागले व कार्यकारी कमिटीचे सभासद जाण्याची घाई करूं लागले, परंतु अध्यक्ष मोठे हुषार व खमके ! ते त्यांना तसेंच कसें जाऊं देणार ? दोन दिवसांत उत्पन्न झालेल्या वाफेचा पुढील कार्यक्रमाकरितां उपयोग करून घेण्याचें त्यांनीं मनांत ठरविलें. लगेच रात्रीं कार्यकारी कमिटी बोलावून दोन दिवसांतील कामाचा आढावा घेऊन पुढील कार्यक्रम ठरवून त्याप्रमाणे कामांची विभागणी करून ज्या त्या कामाचा भार ज्या त्या सभासदावर टाकून व पुढील कमिटीची बैठक ठरवूनच ते तेथून निघाले. ही गोष्ट सर्वांत महत्त्वाची झाली. तोंडची वाफ दवडण्यांत परिषदेचें महत्त्व नसून झालेले ठराव कृतींत उतरविण्याकरितां वर्षभर प्रयत्न करण्यांत परिषदेचें महत्त्व आहे. हें तत्त्व त्यांनीं पटवून व्यवस्थेशीर रीतीनें कामास प्रारंभ करून दिला. त्याप्रमाणें कार्यकारी कमिटीनें पुढें वर्षभर काम केलें व जी नवी पद्धति ह्या उत्साही अध्यक्षांनीं घालून दिली ती अद्याप चालली आहे. ह्या परिषदेचा राजेसाहेबांचे मनावर चांगलाच परिणाम झाला. पुढें १८-१९ जून १९३८ रोजीं लोकांना कोणत्या सवलती देण्यांत याव्यात याबद्दल स्थानिक कार्यकर्त्यांच्यापुढें अधिकाऱ्यांनीं प्रश्न काढिला. तारें

कार्यकारी कमिटीच्या सभासदांना व दे. भ. रंगनाथराव दिवाकर यांना बोलावून घेण्यांत आलें. अध्यक्ष श्री. दोड्डमेट्टी यांना कांहीं जरूरीच्या कामामुळें येणें झालें नाहीं. ४।५ दिवस वाटाघाटी चालल्या. दरबारी अधिकाऱ्यांच्या बरोबर बोलण्याचें काम दे. भ. दिवाकर यांचेकडे कार्यकारी कमिटीनें सोंपविलें, तरी ते प्रत्येक कामांत कमिटीचा सल्ला घेतच होते. सारासूट किती टक्के असावी, या मुद्यावर वाटाघाटी फिसकटणार असा रंग दिसूं लागला, व पण शेवटीं उभयतांचे दरम्यान एकदांचे करार ठरले व त्यांची घोषणा त्या माहिन्यांत होणाऱ्या ता. २४-६-१९३८ रोजीं राज्यारोहणदरबारांत करणेंचें निश्चित झालें. संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति स्थापन करणें हें आपलें ध्येय असल्याचें श्री. राजेसाहेबांनीं आपल्या भाषणांत स्पष्ट करून व त्याकरितां पुढील सुधारणा कोणत्या स्वरूपाच्या असाव्यात हें ठरविण्याकरितां सरकारी व प्रजेचे प्रतिनिधी अशा मिश्र कमिटीची योजना करणार असल्याचें जाहीर केलें व पुढीलप्रमाणें घोषणा केली—

१. जमखंडी संस्थानचा कायम शेतसारा ( संयुक्त जमीनबाब ) सन १९३८–३९ सालापासून पांच वर्षें शें. २५ टक्के कमी करण्याचें ठरविलें आहे.

२. जमखंडी संस्थानांत घेण्यांत येत असलेली वनचराई सन १९३८–३९ सालापासून माफ करण्याचें ठरविलें आहे.

३. संस्थान मजकुरीं कुंदगोळ तालुक्यांत घेण्यांत येत असलेलें खळीभाडें १९३८–३९ सालापासून माफ करण्याचें ठरविलें आहे.

४. कुंदगोळ तालुक्यापैकीं सांवशी, व्हसह्ळी, गुडेनकट्टी, शिरूर व बसापूर या गांवचे कांहीं रयतांना १९३७–३८ सालच्या साऱ्याची तहकुबी देण्यांत आली; शिवाय ह्या गांवची सन १९३७–३८ सालची आतां राहिलेली बाकी पुढील सालचे हप्त्यापर्यंत तहकूब करण्याचें ठरविलें आहे.

५. जमखंडी तालुक्यापैकीं टकलगी व टक्कोड या गांवचे कांहीं रयतांची १९३७-३८ सालची साऱ्याची तहकुबी देण्यांत आली आहे. त्याशिवाय ह्या गांवची सन १९३७-३८ सालची राहिलेली बाकी आतां पुढील सालचे हप्त्यापर्यंत तहकूब करण्याचें ठरविलें आहे.

६. १९३८-३९ सालापासून मुंबई इलाख्यांतील अमलांत असलेले लँड रेव्हिन्यू कोडप्रमाणें आणेवारीची पद्धत संस्थानमजकुरीं अमलांत आणण्याचें ठरविलें आहे.

७. सन १९३७-३८ सालापूर्वीच्या शेतसाऱ्याच्या बाकीपैकीं सूट देणेचा प्रसंग आल्यास त्याबाबत ज्या त्या गांवच्या आणेवारीकरितां असलेल्या समितीच्या शिफारसीप्रमाणें सूट देणेची आहे.

८. सन १३४१ ते १३४५ फसली सालअखेरच्या थकलेल्या बाकी-बद्दल पांच वर्षांचे हप्तेबंदीची जी सूट शेतकऱ्यांना देण्यांत आली होती तेवढी ती आतां सर्वांना देणेचें ठरविलें आहे.

९. सरकारी साऱ्याकरितां लोकांच्या जमिनी खालसा करण्यांत येऊन सरकारच्या ताब्यांत असल्यास ज्या त्या मालकांकडून मागणी आल्यास थकलेला सारा घेऊन परत करण्याचें ठरविलें आहे.

१०. सर्व म्युनिसिपॅलिटींतील लोकनियुक्त सभासदांचें प्रमाण तीन चतुर्थांश करण्यांत आलें. व जमखंडी म्यु. प्रमाणें इतर म्युनिसिपॅलिट्यांना अध्यक्ष व उपाध्यक्ष निवडण्याचा अधिकार देण्यांत आला आहे.

ह्यावरून लोकांना बऱ्याच सवलती मिळाल्या हें स्पष्ट आहे. पुढें यांपैकी आणेवारीसंबंधानें व वतनदारांवर जुडी बसविल्यानें पहिल्या प्रश्नाबाबत वा‍ आला म्हणून व तसेंच घटनासमितीबद्दल व सारासुटीबद्दल प्रजापरिषद् कार्यकारी कमिटी व दरबार यांचे दरम्यान पुष्कळ मतभेद होऊन वाद उत्पन्न झाला. परंतु त्यांपैकीं बऱ्याच प्रश्नांचा निकाल शेवटीं सामोपचारानें व

श्री. दिवाकरांच्या चातुर्यानें मिटला, आणखी कांहीं प्रश्न असेच भिजत पडले आहेत. प्राप्तीवरील करासंबंधीं गेल्या वर्षीं मतभेद विकोपास जाऊन करबंदी होणार असल्याबद्दल व युद्धमंडळ नेमण्यापर्यंत पाळी आली होती, परंतु शेवटीं दरबारनें १००० पर्यंतची किमान मर्यादा वाढविण्यास संमति दिली• त्याची आकारणी करणेच्या पद्धतीबद्दल बरेच तीव्र मतभेद आहेत. घटना-समितीवर प्रजापरिषदेच्या कार्यकारी कमिटीपैकीं श्री.साबडे व श्री.पंचाप्पा कोरी, कायदेमंडळातर्फे श्री. नाडगीर व श्री. आपटे व सरकारतर्फे प्रो. बॅ. खर्डेकर, रावसा. महाबळ, राव. धारेश्वर व राव. टिकेकर यांची नेमणूक झाली आहे व तिचें काम अद्याप चालूं आहे.

यानंतर जमखंडी येथें भरलेल्या प्रजापरिषदेनें सांवशीची परंपरा पुढें चालू केली आहे. त्या अधिवेशनांत संपूर्ण जबाबदार राज्यपद्धतीचा एक महत्त्वाचा ठराव पुढें मांडून तो पास करण्यांत आला. तसेंच कार्यकारी कमिटीनें तयार केलेली परिषदेची घटना मंजूर करण्यांत आली. घटनासमितीशीं सहकार करावा अगर करूं नये असा प्रश्न उद्भवला व शेवटीं सहकार करावा असें ठरविलें. त्यानंतरच्या कार्यकारी कमिटीनें पुनः निरनिराळ्या प्रश्नांबद्दल विचार करणेकरितां रयत, विणकर, शिक्षण, विधायक कार्यक्रम, कायदा, सल्लागार, लांचनिवारक अशा उपसमित्या नेमल्या आहेत. या उपसमित्यांचें काम जितक्या आस्थेनें व्हावयास पाहिजे तितक्या आस्थेनें होत नाहीं म्हणून त्याबद्दल प्रयत्न चालूं आहेत.

यानंतर आणखी दोन प्रश्न विशेष महत्त्वाचे असे निघाले. एक टक्कळगी येथील जमिनी फारच खराब असल्यानें गेल्या वर्षीं दिलेली सुटीची सव-लत त्यांना अपुरी होती म्हणून त्या गांवच्या रयतांना जास्त सूट मिळ-णेबद्दल चालविलेली खटपट व कुंदगोळच्या साराबाकीच्या सुटीचा प्रश्न. पहिलें काम जमखंडी प्रजापरिषदेच्या अध्यक्षांनीं दे. भ. हणमंतराव कौजलगी यांच्या नेतृत्वाखालीं श्री. साबडे व श्री. लिमडे यांचें शिष्टमंडळ नेमून व दुसरा प्रश्न कार्यकारी कमिटीनें दे. भ. दिवाकर यांचे नेतृत्वा-

खालीं श्री. आपटे यांच्या सहाय्यानें श्रीमंत राजेसाहेबांची भेट घेऊन या प्रश्नाचा निकाल करून घेण्याकरितां सोंपविलें. दोघांनींहि (दे. भ. कौजलगी व दे. भ. दिवाकर) परिश्रम करून हा प्रश्न राजेसाहेबांचे पुढें मांडला. टक्कळगीच्या लोकांस जास्त सवलती देण्याची जरूरी असल्याचें श्रीमंतांनीं मान्य केलें व पुढील वसुलीच्या आंत तजवीज होईल असें आश्वासन दिलें. दुसऱ्या बाबतींतहि सहानुभूतिपूर्वक विचार होऊन गेल्या वर्षीं डिसेंबर महिन्यांत कुंदगोळ तालुक्यांत ४०००० रु. व जमखंडी तालुक्यांत अजमासें २००० रु. मागील सारासूट जाहीर केली आहे व या हप्त्याचे वेळीं विविक्षित मुदतींत मागील सारा एकदम भरल्यास बाकीची सूट देण्यांत येईल असें जाहीर करण्यांत आलें आहे.

## उपसंहार

याप्रमाणें गेल्या वीस वर्षांतील चळवळींची त्रोटक हकीकत दिली आहे. यावरून येथील कार्याची कल्पना सर्वांना सहज येण्यासारखी आहे. येथील चळवळ संथ व धिमेपणानें चालली आहे. त्यांत सातत्य आहे. निष्कारण विरोध उत्पन्न न करितां कार्याकडे दृष्टि ठेवून कार्यकर्ते एकंदरीनें कार्य करीत असलेले दिसतात. या कार्यांत गेल्या दोन वर्षांत कर्नाटकचे सुप्रसिद्ध पुढारी श्री. दिवाकर, श्री. हणमंतराव कौजलगी व श्री. दोड्डमेट्टी यांनीं जें मनोभावानें व कळकळीनें सहाय्य केलें, तें खरोखरच प्रशंसनीय आहे. पुष्कळ मतभेदाचे प्रश्न उद्भवले, तरी दरबार व कार्यकर्ते एकमेकांस जाणून निष्कारण ताणून तोडण्यापेक्षां समंजसपणानें साधून लोकांचें हित साधण्याकडे दोघांचेंहि लक्ष आहे. कोणतीही चळवळ सुरू झाली म्हणजे त्याचा फायदा करून घेण्याकारितां स्वार्थी व लबाड लोक सभ्यपणाचा आव आणून पुढें येतील. आपला हेतु साधण्याकरितां कार्यकर्त्यांमध्यें पुढाऱ्यांचेबद्दल गैरसमज पसरवून विघ्नें उत्पन्न करीत असतात. अशा वेळीं नेत्यांनीं, यांच्यापासून चळवळ व कार्य शुद्ध ठेवण्याकरितां आपले स्वतःला व सामान्य

लोकांना फार जपलें पाहिजे. बाहेर कांहीं अनिष्ट वावटळ उठली म्हणजे त्याचा आघात येथेंहि होऊन उगाच मनें कलुषित होतात. अशा प्रसंगीं उदार भाव मनांत बाणून आतांपर्यंत ज्याप्रमाणें सर्व वर्गाच्या व जातीच्या लोकांनीं एकोप्यानें कामास प्रारंभ केला आहे, तो एकोपा कायम ठेवून कामें केल्यास त्यामुळें प्रजेचें व राजाचें हित होऊन संस्थानचे कीर्तींत भर पडेल. राजकारणांत अगर व्यवहारांत हटवादीपणापेक्षां सन्मान्य तडजोडीनेंच जास्त हित होतें, हें तत्त्व सर्वश्रुतच आहे. येथील कार्यकर्त्यांनीं तें नीट ध्यानांत ठेविलें आहे ही विशेष उल्लेखनीय गोष्ट आहे, व जमखंडी संस्थानांतील सनदशीर चळवळीच्या यशस्वी लढ्याचें हेंच बीज आहे.

॥ इति शुभम् ॥

---

# सांगली संस्थानांतील राजकीय चळवळीचा इतिहास

( लेखकः—काशिनाथ हरि खाडिलकर, बी. ए., एलूएल्. बी., सांगली. )

## प्रास्ताविक

हिंदवी स्वराज्याबद्दल संस्थानांतून जी चळवळ चालू झाली, त्यांत बऱ्याच मोठ्या प्रमाणांत ज्यांना यश मिळालें, त्यांमध्यें सांगली संस्थान हें प्रमुखपणें उल्लेख करण्यासारखें संस्थान आहे. या चळवळीचा इतिहास म्हणजे त्यांत काम करणाऱ्या अनेक कार्यकर्त्यांच्या सार्वजनिक कार्याचा आढावा होय. असा इतिहास हा भावी कार्याच्या दृष्टीनें स्फूर्तिदायक व मार्गदर्शी होत असल्यानें ज्यांनीं या संस्थानी स्वराज्याच्या चळवळीची मुहूर्तमेढ रोंवली, त्या माननीय कार्यकर्त्यांपैकीं प्रमुख कै. वामनरावजी पटवर्धन यांच्या स्मरणार्थ निघणाऱ्या या ग्रंथांत या इतिहासाचें स्मरण कृतज्ञतेनें करणें जरूर व योग्यच आहे.

या लेखांत फक्त सांगली संस्थानपुरतीच या चळवळीची माहिती जरी देणेची असली, तरी या घडामोडींत इतर अनेक कार्यकर्त्यांबरोबर कै. वामनरावजी यांचा सतत महत्त्वाचा भाग आहे हें प्रारंभींच स्पष्टपणें नमूद करीत आहोंत. संस्थानिकांमध्यें कालमान परिस्थिति जाणून वागण्याची दृष्टि निर्माण होऊन संस्थानी सुधारणेची प्रजेची चळवळ यशस्वी झाली पाहिजे असें 'दक्षिणी संस्थान हितवर्धक सभा' स्थापन करणाऱ्या कै.वामनराव पटवर्धन, कै. गणपतराव अभ्यंकर व श्री. तात्यासाहेब केळकर प्रभृतींना वाटत होतें ती दृष्टि सांगली संस्थानच्या सुविद्य अधिपतींत दिसून आली. इ. स. १९३८ च्या डिसेंबरांत राजेसाहेबांनीं जी सुधारणेची घोषणा केली त्यानें सांगलींतील प्रजापक्षीय चळवळीला यश मिळालें असें दिसून



कै. विनायकराव माईणकर, सांगली.



श्री. अश्वत्थराव माहिषी, सांगली.

ईल; आणि म्हणूनच राजेसाहेबांच्या या जाहीर घोषणेनंतर इतर अनेक ोठ्या पुढाऱ्यांबरोबर कै. वामनरावजी पटवर्धन यांनींही समाधान व्यक्त ेलें व श्रीमंतांचें अभिनंदन केलें. अशा रीतीनें यशस्वी झालेल्या चळवळीचा ा इतिहास असल्यानें तो जितका सविस्तर देतां येईल तितका देण्याचा ाम्ही प्रयत्न करीत आहोंत.

## पूर्व इतिहास

सांगली संस्थानचा प्रदेश हा एक गटाचा एकत्रित नसून उत्तरेस भीमा नदीपासून दाक्षिणेस तुंगभद्रा नदीच्या कांठापर्यंतच्या विस्तृत मुलुखांत तो पसरलेला आहे. संस्थानचे मिरज प्रांत, कवठें महांकाळ, मंगळवेढें, तेरदळ, शहापूर ( दोदवाडसह ) व शिरहट्टी असे तालुके असून एकंदर क्षेत्रफळ ११३६ चौ. मैल आहे व लोकसंख्या २,५८,५१२ आहे. संस्थानचें उत्पन्न पूर्वी सुमारें ९ लाखांचें होतें, तें वाढत वाढत आतां सोळा लाखांचे-वर झालें आहे. सांगली हें पहिल्यापासून पुढारलेलें संस्थान असून त्याचा लौकिक वाढता आहे. या संस्थानचा इतिहास तीन पिढ्यांचा आहे. पटवर्धन संस्थानांच्या वेळोवेळीं झालेल्या वांटण्यांत श्रीमंत पहिले चिंतामणराव आपासाहेब यांनीं आपली वांटणी निराळी घेतांना सांगली हें आपलें राजधानीचें गांव करून सांगली संस्थानची स्वतंत्र स्थापना केली. त्यांची संस्थानच्या प्रगतीबद्दल किती तीव्र आस्था होती हें विश्रुतच आहे. व्यापार, कलाकौशल्याची वाढ, उद्योगधंद्यांची स्थापना अशा प्रजेच्या हितासंबंधींच्या अनेक गोष्टी त्यांनीं केल्या आहेत. प्रजा पोटच्या पोराप्रमाणें त्यांना प्रिय वाटत असे; म्हणूनच प्रजेचा पैसा प्रजेच्या हिता-कडे लावण्याचा त्यांचा कटाक्ष असे. त्यांच्यानंतर श्रीमंत तात्यासाहेब यांनीं पूर्वीची परंपरा तशीच पुढें चालू ठेवली. जुना दाखला कांहीं केल्या मोडावयाचा नाहीं असा त्यांचा कटाक्ष असे. दौलत आणि खाजगी यांच्या खर्चाची सरभेसळ त्यांनीं कधींच होऊं दिली नाहीं. त्यांची न्याय-प्रियताही अत्यंत जाज्वल्य होती. सांगलीच्या व्यापारी पेठेचा पाया श्रीमंत

आपासाहेबांनीं घातला व श्रीमंत तात्यासाहेब यांच्या कारकीर्दींत येथील पेठेची भरभराट झाली. या दोन्ही कारकीर्दींत तालुक्यांच्या स्थितीची माहिती घेतां एकंदरींत शेतकरीवर्ग सुखी होता असेंच आढळून येतें. राजयंत्राच्या दृष्टीनें कारभाऱ्याच्यामार्फत पण प्रजेचे हितसंबंध लक्षांत घेऊन राज्यकारभार हांकला जात असे. श्रीमंत तात्यासाहेबांच्या कारकीर्दींत दरम्यान दोन वेळां ॲडमिनिस्ट्रेशन बसण्याचा प्रसंग आला, तरी प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें कधींही वैगुण्य आलें नाहीं. लोकांच्या दृष्टीनेंही विचार करतां, लोक सुखी होते, इतकेंच नव्हे तर, जागरूकही होते असें दिसून येतें. संस्थानी चळवळीचा किंचित् सुद्धां प्रारंभ त्या काळीं दिसण्याचा प्रसंग नव्हता, तरी पण सार्वजनिक हितबुद्धीचीं कामें करणारीं माणसें व ह्याबद्दलची जाणीव त्या काळींही होती असें दिसून येईल. सांगलीचा मुंबई–पुण्याकडील राजकारणाशीं संबंध त्या काळांतही होता व त्या वेळच्या होणाऱ्या काँग्रेसच्या सभांना सांगलींतून त्या काळींही प्रतिनिधी गेल्याचा दाखला सांपडतो. तालुक्यांचे गांव किंवा सांगली येथें सार्वजनिक काम करणाऱ्या संस्था असत व वकील, व्यापारी लोक त्यांत भाग घेत असत. डिग्रजसारख्या लहान खेड्यांतही 'लोकहितवर्धिनी सभा' म्हणून एक संस्था होती अशीही माहिती मिळते.

या काळांत पुढें सार्वजनिक कार्यकर्ते म्हणून प्रसिद्धीस आलेले श्री. वामनराव पटवर्धन, श्री. कृष्णाजीपंत खाडिलकर, श्री. गणपतराव अभ्यंकर वगैरे तरुण मंडळी आपला शिक्षणक्रम संपवून पुढील आयुष्यक्रमाच्या तयारींत होती. श्री. वामनराव पटवर्धन यांनीं त्या काळची आपली आठवण म्हणून पुढील माहिती लिहून ठेवली आहेः—'सन १८८९ च्या सुमारास होणारी मुंबईची काँग्रेस व त्या वेळीं उत्पन्न झालेले सार्वजनिक प्रश्न यांची माहिती देण्याकरितां पुण्याहून नामजोशी वगैरे मंडळी सांगलीस आली होती व त्यांच्या व्याख्यानांनीं हायस्कूलमधील विद्यार्थ्यांना या विषयाची माहिती होऊन त्यांनीं राष्ट्रीय सभेकरितां

आपापसांत वर्गणीही गोळा केली होती. यासंबंधांत सभा तेव्हां श्रीमारुतीच्या देवालयांत होत.' यावरून सांगली संस्थानांत राजकीय विषयाच्या चर्चेच्या बाबतींत स्वतंत्र वातावरण केव्हांपासूनचें आहे हें कळून येणार आहे. सांगलीमध्यें विचारस्वातंत्र्य व सभास्वातंत्र्य पूर्णपणें जनतेला होतें व शहापूर येथें एक वर्तमानपत्रही त्यावेळीं प्रसिद्ध होत होतें. अशा रीतीनें श्रीमंत तात्यासाहेब यांच्या कारकीर्दीच्या अखेर म्हणजे १९०० साल अखेर एकंदर परिस्थिति पुष्कळच चांगली होती असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## अज्ञान कारकीर्द

श्रीमंत तात्यासाहेबांचेनंतर अज्ञान कारकीर्दींत सांगली संस्थानचे अधिकार कांहीं वर्षें रावबहादूर अच्युत भास्कर देसाई व त्यानंतर कॅप्टन वर्क या ॲडमिनिस्ट्रेटरांकडे गेले. सांगली संस्थानच्या रेल्वे, वॉटर वर्क्स वगैरेसारख्या योजनांचा विचार रावबहादुर अच्युत भास्कर यांचे कारकीर्दींत सुरू झाला होता, तरी या योजनांची प्रत्यक्ष अंमलबजावणी व याशिवाय दुसऱ्याही लोकहिताच्या गोष्टी कॅ. वर्क यांचे कारकीर्दींत झाल्या व यामुळेंच वर्कसाहेबांचें नांव निघतांच सांगलीच्या प्रजाजनांना सानंद कृतज्ञता वाटते. त्यांनीं अशाच रीतीनें राज्यकारभार चालविला कीं, लोकांच्या आकांक्षा आपोआपच वाढीस लागल्या. शिक्षण, व्यापार, सुव्यवस्थित राज्यकारभार इत्यादि गोष्टींची प्रगति त्यांचे कारकीर्दींत इतकी झाली कीं, इतर संस्थानांतील व खालसांतील बांधव प्रेमळ हेव्यानें सांगली संस्थानकडे पाहूं लागले. प्राथमिक व सक्तीच्या शिक्षणाचा प्रश्न या बुद्धिमान् पुरुषानें, खालसामध्यें ना. गोखले यांचें बिल येण्यापूर्वींच, सांगली संस्थानांत सोडवून दाखविला. अत्यंत महत्त्वाची गोष्ट ह्मणजे 'रयत सभे'ची स्थापना कॅ. वर्कसाहेबांनीं केली ही होय. अलीकडील काळांत प्रजातंत्री राज्यकारभार असावा असें जें मोठें तत्त्व प्रतिपादण्यांत येतें, त्या तत्त्वाचें थोडेसें बीजारोपण कॅ. वर्क यांचे कारकीर्दींत झालें व राज-

कारणास नवें वळण लागलें. कॅ. बर्क यांचे कारकीर्दींत सुधारणेचा जो प्रयत्न झाला, तो जनतेच्या सहकार्यानें झाला ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. त्यांनीं सांगलीची सर्वांगीण वाढ होण्यासाठीं केलेल्या प्रयत्नांत कै. हरीपंत खाडीलकरांसारखे सरकारी ऑफिसर किंवा कै. प्रो. अभ्यंकरांसारखे लोकांचे पुढारी यांची सल्लामसलत ते वेळोवेळीं घेत, व सर्वांच्या सामुदायिक प्रयत्नाचा परिणाम म्हणजे सांगलीचा उत्कर्ष असें म्हटल्यास तें वस्तुस्थितीचें बरोबर चित्र होईल. या काळाचें आणखी एक तऱ्हेचें वैशिष्ट्य आहे. या सुमारास ब्रिटिश हिंदुस्थानांत वंगभंगानंतर उत्पन्न झालेली चळवळ जोरास लागून सर्व ठिकाणीं फार खळबळीचें वातावरण उत्पन्न झालें होतें. अर्थात् या सर्व चळवळीचा परिणाम आसपासच्या इतर संस्थानांप्रमाणेंच किंबहुना इतरांपेक्षां बऱ्याच मोठ्या प्रमाणांत सांगली संस्थानच्या प्रजेवरही झाला होता हें सांगलींतील जनतेच्या जागृतीचेंच निदर्शक आहे.या कालांत ब्रिटिश हिंदुस्थानांत स्वदेशी,बहिष्कार,राष्ट्रीय शिक्षण व मद्यपानबंदी वगैरे ज्या अनेक चळवळी लोकमान्य टिळकांकडून केल्या गेल्या, त्या सर्वांस मनुष्यबळ, द्रव्यबळ देण्यांत व इतर रीतीनें मोठ्या प्रमाणांत सांगलीनें भाग घेतलेला आढळून येईल. तसेंच पैसाफंडासारखे फंड जमविणेचे कामीं सांगलीनें महत्त्वाचा भाग घेतला आहे व टिळक खटल्याच्या खळबळीचे परिणामही सांगलीवर झाले आहेत. ना. गोखल्यांच्या भारतसेवक समाजाच्या स्थापनेच्या पूर्वविचारांशींही सांगलीचा संबंध आहे व त्या संस्थेची स्थापना याच सुमारास होऊन त्याच्या पहिल्या सभासदांत सांगलीचे श्री. वामनरावजी पटवर्धन हे एक आजीव सदस्य झाले हेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे. या बाबतींत कै. वामनरावजी यांनीं लिहिलेल्या माहितीवरून त्यांचेशीं झालेली या संस्था—स्थापनेची पहिली चर्चा सन १९०३ सालीं सांगलीस झाली व श्री. अभ्यंकर व माईणकर वगैरे मित्रमंडळींशीं बरेच दिवस विचारविनिमय होऊन सन १९०४ सालीं श्री. वामनरावजी यांनीं सोसायटींत जाण्याचें नक्की ठरविलें. त्यामुळें श्री. अभ्यंकर, माईणकर व सांगलीची इतर अनेक मंडळी यांचे सर्व्हंटस्

ऑफ इंडिया सोसायटीशीं नेहमींच प्रेमाचे व आपुलकीचे संबंध राहिले. अशा रीतीनें या कालांत नामदार गोखले व लो. टिळक या दोघांच्याही राजकारणांत सांगली सहभागी झाली व त्यामुळें सांगलीचा लौकिक राजकारणांत वाढता राहिला. राजकीय दृष्ट्या तो काल किती खळबळीचा व अडचणीचा होता, याचा विचार केल्यास त्यावेळचे सांगलीचे राज्यकर्ते व कार्यकर्ते या दोघांच्याहि कर्तृत्वाबद्दल कौतुक वाटल्याशिवाय राहात नाहीं.

कॅप्टन बर्क या कर्तृत्ववान् ॲडमिनिस्ट्रेटरकडून, त्यांच्या पांच वर्षांच्या यशस्वी कारकीर्दीनंतर सन १९१० सालीं सध्यांचे आधिपति श्रीमंत चिंतामणराव आपासाहेब यांनीं जेव्हां अधिकारसूत्रें हातीं घेतलीं, त्यावेळच्या एकंदर परिस्थितीचें वैशिष्ट्य वरीलप्रमाणें होतें. जुनी उदात्त परंपरा व नवा मनु यांचा उत्कृष्ट मेळ घातलेल्या राजकीय भूमिकेवर हल्लींच्या श्रीमंत राजेसाहेबांनीं पदार्पण केलें व आज त्या कालाकडे विहंगम दृष्टीनें पाहिल्यास श्रीमंतांनीं हा पूर्व लौकिक आपल्या कारकीर्दींत वाढविला असें दिसून येतें. सन १९१० ते सन १९२० हा श्रीमंतांचे कारकीर्दीचा दहा वर्षांचा काल श्रीमंतांनीं जुन्या कारकीर्दीची नव्या कारकीर्दीशीं सांगड बरोबर घालून राज्यकारभार चांगला करण्यांत घालविला व साम्राज्य सरकारशीं आपले संबंध पूर्वीप्रमाणें चांगले राखण्याची दक्षता घेतली. सन १९१४ सालचे सुमारास महायुद्ध सुरू होऊन त्यांत श्रीमंतांनीं सांगली संस्थानतर्फे सर्वतोपरी सहकार्य केलें व साम्राज्य सरकाराकडून पदव्या व वंशपरंपरा ११ तोफांची सलामी वगैरे सन्मान मिळून संस्थानचा दर्जा बराच वाढविला. सन १९२० नंतरही ब्रिटिश राजकारणाशीं व साम्राज्य सरकारशीं श्रीमंत राजेसाहेब यांचे जे संबंध दिसून येतात, त्यावरून 'मुत्सद्दी संस्थानिक' म्हणून त्यांची योग्यता साम्राज्य सरकारास पटली असल्याचें आढळून येतें. नरेंद्र मंडळाच्या कार्यांतही श्रीमंतांनीं पहिल्या-

पासून महत्त्वाचा भाग घेतला असून त्याच्या स्टँडिंग कमिटीचे अद्यापही ते सभासद निवडून येतात; यावरून मोठमोठ्या संस्थानिकांमध्यें त्यांचे-बद्दल किती चांगल्या तऱ्हेचें मत आहे हें दिसून येतें. पुढें राउंड टेबल कॉन्फरन्समध्यें छोट्या संस्थानांतर्फेचें प्रतिनिधित्व श्रीमंतांना मिळाल्या-मुळें सांगली संस्थानचें महत्व ब्रिटिश राजकारणांत किती मोठें झालें याची सर्वांस माहिती आहेच. राजेसाहेबांच्या या कार्याला श्रीमंत सौ. राणी-साहेबांसारख्या सुविद्य सहचारिणीनें सर्वतोपरी सहाय्य केलें आहे हीही सांगली प्रजेच्या दृष्टीनें अभिमानास्पद गोष्ट आहे. सांगलीची जनता ही गेल्या महायुद्धाच्या अखेरीस राजकीय उत्क्रान्तीच्या प्रयत्नांत मागें नव्हती. सन १९१७ सालीं हौस ऑफ कॉमन्समध्यें ग्रेटब्रिटनच्या प्रधानमंडळानें हिंदुस्थानच्या भविष्यकालीन राजकारणाबद्दल जी जाहीर घोषणा केली व मि. मँटेग्यु चौकशीकरितां हिंदुस्थानांत येणार असें ठरलें, त्यावेळेस सांगलीस श्री. गणपतरावजी अभ्यंकर यांनीं श्री. वामनरावजी पटवर्धन वगैरे मित्रमंडळीशीं चर्चा करून संस्थानी प्रजेच्या प्रश्नांस तोंड पाडणेचा प्रयत्न करण्याचें ठरविलें व ' नेटिव्ह स्टेट्स आणि पोस्ट वॉर रिफॉर्मस ' या नांवाचें पुस्तक लिहून संस्थानी चळवळीचा प्रारंभ केला. मि. मँटेग्यू-साहेबांनीं त्यावेळीं आपल्या हिंदुस्थानांतील दौऱ्यांत संस्थानी प्रजाप्रति-निधींची जरी मुलाखत घेतली नाहीं, तरी संस्थानी प्रजेची बाजू त्यांच्या-पुढें मांडण्याच्या या खटपटीचा परिणाम थोडाबहुत तरी झाला असें मँटफोर्ड रिपोर्टावरून दिसून येईल. संस्थानी चळवळ पद्धतशीर होण्यास जागृतीचे व ज्ञानप्रसाराचे प्रयत्न जास्त झाले पाहिजेत ही जाणीव सांगलीच्या कार्यकर्त्यांत त्यावेळींही होती. त्यामुळें याच कालांत सांगलीला वसंतव्याख्यानमालेसारख्या किंवा युनियन क्लबासारख्या संस्था नव्या दृष्टीनें चालविल्या गेल्या. सन १९२० च्या सुमारास सांगलीस युनियन क्लबाच्या खटपटीनें भरलेलें ज्योतिष संमेलन पंचांगाच्या सुधारणेच्या प्रश्नापुरतेंच महत्त्वाचें ठरलें असें नसून त्यानिमित्त सांगलीस झालेल्या लो. टिळकांच्या भेटीनें, राजकीय जागृतीचा एक अभूतपूर्व व

अत्यंत परिणामकारक प्रसंग असें त्याचें स्वरूप झालें. या प्रसंगाची आठवण झाली म्हणजे दोन व्यक्तिविषयक उल्लेख करणें जरूर वाटतें. त्या व्यक्ति म्हणजे वैद्य बिनिवाले व श्री. केशवरावजी छापखाने या होत. प्रस्तुत लेखकाशीं या दोघांच्या त्यावेळीं झालेल्या चर्चेचें जें स्मरण लेखकास आहे, त्यावरून ज्योतिषसंमेलनानिमित्त लो. टिळकांचें आगमन हा प्रसंग राजकीय जागृतीच्या दृष्टीनें अतिशय परिणामाचा होईल अशी त्यांची कल्पना होती व अनेक खळबळीनें युक्त अशी झालेली ती भेट खरोखरच उत्कृष्ट परिणामकारी ठरली यांत शंका नाहीं. याची जाणीव सांगलीच्या जनतेस पूर्ण असल्यानें व लोकमान्यांच्या स्फूर्तिदायक सहवासाचा परिणाम जनतेच्या मनावर अतिशय असल्यानें लोकमान्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या स्मारकाची चळवळ लागलीच झाली व त्याचा अखेर परिणाम म्हणून 'लो. टिळक स्मारक मंदिर' ही राजकीय जागृतीचें काम करणारी संस्था स्थापिली गेली. या संस्थेच्या योगें संस्थानी चळवळींचें कार्य करण्यास आधार झाला असून कार्यकर्त्यांस स्फूर्ति मिळत आहे. ही इतर संस्थानांपेक्षां वैशिष्ट्यपूर्ण व सांगलीस अभिमान वाटण्यासारखी गोष्ट आहे.

सन १९१० ते १९२० या कालांतील सांगलींतील कांहीं चळवळींची माहिती देत असतांना जे कांहीं थोडे व्यक्तिविषयक उल्लेख करण्यांत आले, त्यामुळें सांगलीच्या ज्या अनेक प्रसिद्ध व विद्वान् मंडळींनीं राजकारण, शिक्षण, उद्योगधंदे व देशसेवा वगैरेमध्यें कार्य करून लौकिक मिळविला व सांगलीच्या बाहेर सांगलीचें नांव गाजविलें, अशा कित्येक सांगलीच्या सुपुत्रांची आठवण लेखकास होत आहे व सर्वच व्यक्तींचा नामनिर्देश न होण्याचें कारण ही यादी फार मोठी आहे. इतकीं सुशिक्षित, इतकीं कीर्तिवान् व इतकीं कर्तृत्वशाली माणसें सांगली संस्थानच्या प्रजाजनांतून बाहेर पसरल्याचा परिणाम सांगलीचा मोठेपणा सर्वतोमुखीं होण्यांत झाला व त्यामुळें सांगलीबाहेरील सामाजिक, धार्मिक व राज-

कीय वगैरे कामांत कार्य करणाऱ्या संस्था किंवा शिक्षक व उद्योगधंदे यां-मध्यें काम करणारी सांगलीबाहेरची मंडळी यांचें सांगलीशीं व सांगलीच्या अनेक प्रश्नांशीं सतत सहकार्य झालें व त्यामुळें सांगलींतील वर नमूद केलेल्या निरनिराळ्या क्षेत्रांतील कार्य जें यशस्वी झालें, त्यांचें श्रेय वरील मंडळीसच आहे. सांगलीचे सांगलीबाहेरील मंडळींशीं जे आपुलकीचे व एकमेकांबद्दल सद्भावनेचे संबंध राहिले, त्यामुळेंच १९२० सालीं लोक-मान्य टिळक व पुढें वर्षाभरांतच महात्मा गांधी हे सांगलीस आले. महात्मा गांधींचें त्यावेळचें आगमन हें कॉंग्रेसच्या राजकारणाला नवें वळण मिळा-ल्याच्या वेळचें असल्यानें त्यांची त्यावेळची भेट ही सांगलीच्या सुदृढ वातावरणाचें द्योतकच म्हणणेस हरकत नाहीं. या पुढाऱ्यांच्या भेटीनें आणखी एक फायदा झाला. खालसा मुलखांतील राष्ट्रीय सभेसारख्या संस्थांनीं संस्थानी प्रजेचीं गाऱ्हाणीं आपलीं समजून त्यांचा पुरस्कार त्या त्या संस्थांनीं करावा असें त्यावेळीं संस्थानी प्रजामंडळाचें कार्य करणाऱ्या पुढाऱ्यांना वाटत असे व नागपूर राष्ट्रीय सभेंत संस्थानी प्रजाजनांना कॉंग्रेसचे सभासद करून घेऊन त्यांचा समावेश राष्ट्रीय सभेंत करावा असें ठरलें होतें; पण संस्थानांत प्रत्यक्ष कार्य करतांना ज्या अडचणी उत्पन्न होतात, त्यांचें परिमार्जन एवढ्यानें होत नाहीं असें कार्यकर्त्यांना आढळून आलें. सांगलीसारख्या पुढारलेल्या संस्थानांतही लो. टिळक व महात्मा गांधी यांच्या वेळीं ज्या अडचणी व जे प्रश्न उत्पन्न झाले, त्यामुळें संस्थानी प्रश्नांचा विचार स्वावलंबनानें व स्वतंत्रच झाला पाहिजे अशी भावना उत्पन्न झाली. हे विचार सांगलीपुरतेच उत्पन्न झाले असें नसून ते सर्व ठिकाणच्या संस्थानी कार्यकर्त्यांतही उत्पन्न झाले होते व संस्थानी राजकारणाला नवें वळण देण्याकरितां श्री. वामनरावजी पटवर्धन, श्री. न. चिं. केळकर वगैरे संस्थानी प्रश्नांबद्दल आस्थापूर्वक विचार करणाऱ्या गृहस्थांनीं 'दक्षिणी संस्थानहितवर्धक सभा' ही संस्थाही स्थापन केली होती. याचा परिणाम म्हणून निरनिराळ्या संस्थानांत प्रजापरिषदा भरून

लोकजागृति व्हावी असा प्रयत्न सुरू झाला व भोर आणि सांगली येथें पहिल्या परिषदा झाल्या.

## श्री. छापखाने यांची मार्मिक मीमांसा

'दक्षिणी संस्थान हितवर्धक सभे'च्या स्थापनेनंतर सांगलीची जी पहिली प्रजापरिषद झाली, ती भरविण्याला वर नमूद केलेलें संस्थानी चळवळीचें नवें राजकारण हें जसें निमित्त होतें, तसेंच सांगली संस्थानपुरतींही विशेष कारणें त्यावेळीं होतीं. एकतंत्री राज्यपद्धतीच्या अंगीं असा एक चमत्कारिक गुण आहे कीं, प्रजेच्या गाऱ्हाण्यांकडे ते व्यक्तिशः कितीही सालस असले तरी राज्यकर्त्यांची सहानुभूतीची दृष्टि सहजासहजीं वळत नाहीं. आमची सांगली झाली तरी या सामान्य नियमास अपवाद कशी ठरणार ? शिवाय प्रजेचीं कित्येक गाऱ्हाणीं श्रीमंतांच्या कृपादृष्टीच्या आटोक्यांत न आलेलीं अशीं होतीं. तसेंच कॅप्टन बर्क यांचे वेळीं स्थापन झालेल्या रयत सभेपासून अपेक्षित फलनिष्पत्ति होत नाहीं अशी वाढूं लागलेली तक्रार, डोईजड राज्यकारभार, बड्या पगाराच्या परस्थांची भरती वगैरे कारणें सांगलीची प्रजापरिषद भरणेचे वेळीं सांगलीच्या जनतेच्या मनांत होतीं. आणखी एक प्रासंगिक पण महत्त्वाची तक्रारही त्यावेळीं उत्पन्न झाली होती. ती तक्रार म्हणजे सांगलीस त्या सुमारास जारी करणेंत आलेला सभाबंदीचा कायदा ही होय.' ही कारणमीमांसा पहिल्या परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री. केशवराव छापखाने यांनीं पुढीलप्रमाणें केली आहेः– " सांगली ही दक्षिण महाराष्ट्राची शिक्षणविषयक राजधानी झाल्यामुळें तेथें ब्रिटिश इंडियांतील उदार मताचें व राजकीय तत्त्वज्ञानाचें वीं प्रथम रुजावें हेंही स्वाभाविक होतें. या शहरीं लोकमान्य टिळक, महात्मा गांधी यांच्या आगमनामुळें व इतरही कित्येक थोर, विचारी, कर्त्या पुरुषांच्या वेळोवेळच्या भेटीमुळें एक तऱ्हेची विचारांची ज्योत तेवत राहिली हेंहि अंशतः आजच्या सभेच्या कल्पनेस कारण असेल. किंबहुना दाक्षिणी संस्थान प्रजापरिषदेच्या अलीकडील

प्रयत्नांचाही कांहीं उपयोग झाला असेल; परंतु या सर्वांहूनही खरा परिणाम अलीकडेच लागू केलेल्या, अत्यंत चीड आणणाऱ्या सभाबंदीचे कायद्याचा झाला असें मानलें पाहिजे. सांगलीचा मोठेपणा या कायद्यानें पार नष्ट करून टाकला. सांगली जर सर्वतोपरी मागें पडलेलें, अन्यायानें गांजलेलें, जुलमाची संवय पडलेलें व एकंदरींत हलक्या मतलबाच्या स्वार्थपरतेला बळी पडलेलें संस्थान अथवा शहर असतें, तर या सभा-बंदीच्या कायद्याचें कोणासच कांहीं वाटलें नसतें. परंतु सांगलीच्या पूर्व-पुण्याईनें येथें नागरिकत्वाचें वळण व नागरिकत्वाच्या हक्काची गोडी आगाऊच लागून राहिली होती; म्हणून ज्यावेळीं दडपशाहीचें शस्त्र नाहक या संस्थानावर उपसण्यांत आलें व कीर्तनासारख्या धार्मिक स्वरूपाच्या संमेलनाला सुद्धां निर्दयपणें बंदी करणेंत आली त्यावेळीं इतउत्तर स्वस्थ बसण्यांत अथवा भीड धरण्यांत हंशील नाहीं अशी सर्व सूज्ञ लोकांची खात्री होऊन चुकली. ”

श्री. छापखाने यांनीं केलेलें त्यावेळच्या परिस्थितीचें वर्णन वाचलें म्हणजे एकंदर परिस्थितीचे कांटे प्रजेला कसे वोंचत होते यांचें उत्तम चित्र सर्वांपुढें उभें राहात आहे. या परिषदेपासून सुरू झालेल्या या जोरदार चळवळीमुळें तो कायदा रद्द झाला व येथील जनतेची नैमि-त्तिक पण महत्त्वाची तक्रार दूर झाली व जबाबदार राज्यपद्धतीच्या हक्कप्राप्तीच्या चळवळीला पुढें मार्ग मिळाला. सन १९२३ सालीं शहापुरास भरलेल्या परिषदेच्या अधिवेशनाच्या अध्यक्षीय भाषणांत श्री. गणपतरावजी अभ्यंकर यांनीं रयत सभेच्या पुनर्घटनेबद्दल जे पुढील उद्गार काढले आहेत, त्यावरून प्रजेच्या त्यावेळच्या आकांक्षांची बरोबर कल्पना येईल. प्रो. अभ्यंकर त्या वेळीं असें म्हणाले होते कीं, “ १९०९ सालीं ब्रिटिश इंडियांत कायदेकौन्सिलची जी स्थिति होती व कायदेकौन्सि-लास जे अधिकार होते, त्याचप्रकारचे अधिकार जरूर त्या फरकांसह रयतसभेस आजमितीस देण्यास कोणतीही हरकत नाहीं. बजेटावर

टीका करण्याचा, प्रश्न विचारण्याचा, व लोकहिताच्या बाबतींत ठरावाच्या रूपानें अधिकाऱ्यांचें लक्ष वेधविण्याचा हक्क कांहीं काळ अनुभवल्यानंतर रयतसभेच्या अधिकारांत वाढ करण्यास कोणतीही अडचण येणार नाहीं व त्याचें स्वरूप हल्लींच्या द्विदल राज्यपद्धतीच्या धोरणानें ठेवल्यास संस्थानच्या प्रजेची निःसंशय उन्नति होईल. त्यानंतरही कांहीं कालानें खासगीखेरीज इतर सर्व बाबींवर रयतसभेस अधिकार दिल्यास ते बजावण्याची पात्रता या संस्थेस येईल व ती निःसंशय कार्यक्षम होईल. परकीय अशा ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं आपल्या प्रजेस प्रांतिक स्वायत्तता देण्याचा काल सुमारें पंधरा वर्षांचा अगर वीस वर्षांचा ध्वनित केला आहे. तितक्या कालांत जरी वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें स्वायत्तता म्हणजे खासगीखेरीज इतर खात्यांच्या बजेटावरील ताबा, कायदे करण्याचे हक्क व राज्यकारभारावरील हुकमत प्रजेच्या हातीं देण्याचें ठरविलें तरी संस्थानिकांस किंवा संस्थानास धोका उत्पन्न होणार नाहीं. ”

कै. गणपतरावजी अभ्यंकर यांनीं १९२३ सालीं काढलेले वरील उद्गार पाहिले व १९३८ च्या डिसेंबरांत सांगलीच्या राजेसाहेबांनीं रयत असेंब्लीच्या सुधारणेची जी घोषणा केली ती पाहिली म्हणजे दीड तपाच्या अव्याहत चळवळीनंतर प्रजेची आकांक्षा पूर्णपणें नाहीं तरी मोठ्या प्रमाणांत फलद्रूप झाली असें दिसून येईल. हें यश मिळण्यास प्रजापरिषदेच्या चळवळीचें सातत्य हेंच विशेष कारण झालें. कशाहि अडचणी उत्पन्न झाल्या तरी एकदां सुरू केलेलें परिषदेचें कार्य आजवर नेटानें चालविण्यांत संस्थानी कार्यकर्त्यांनीं हयगय केली नाहीं हें पुढें सतत झालेल्या प्रजापरिषदेच्या अधिवेशनांच्या इतिहासावरून दिसून येईल.

## प्रजापरिषदेची कामगिरी

सन १९२२ सालीं प्रजापरिषदेच्या अधिवेशनास प्रारंभ झाल्यापासून सन १९३९ पर्यंत या संस्थेची एकंदर १४ अधिवेशनें झालीं. संस्थानी चळवळीचे इतर ठिकाणीं जे प्रयत्न चालू आहेत, त्याची माहिती घेतां

इतकें सातत्य इतर ठिकाणीं क्वचितच आढळून येतें. सांगलीच्या परिषदांचा आणखी एक विशेष लक्षांत घेण्यासारखा आहे व तो विशेष म्हणजे सांगली प्रजापरिषदेचीं अधिवेशनें फक्त राजधानीच्या गांवीं म्हणजे सांगलीसच भरलीं असें नसून सांगली संस्थानांतील सर्व तालुक्यांच्या मुख्य गांवीं तीं भरलीं; इतकेंच नव्हे तर, तालुक्यांतील मागडी, उगारखुर्द, हनगंडी अशा खेड्यांमध्येंही तीं अत्यंत यशस्वी रीतीनें भरविण्यांत आलीं. यावरून सांगली संस्थानांतील जागृति खेड्यापर्यंतही किती होती, याचें हें उत्कृष्ट निदर्शक आहे व अशीं अधिवेशनें तालुक्यांत व खेड्यांत झाल्यानें परिषदेच्या चळवळीचें लोण शेतकऱ्यांपर्यंत पोंचलें गेलें हाही परिणाम स्पष्ट दिसण्यासारखा आहे. प्रत्येक तालुक्यांत अधिवेशन झाल्यानें त्या त्या वेळीं तेथील स्वागताध्यक्षांना त्या तालुक्याची परिस्थिति प्रजेच्या पुढाऱ्यांपुढें मांडण्याची संधि मिळाली आहे व सर्व अधिवेशनापुढें आलेल्या विषयांची व ठरावांची छाननी केल्यास सामुदायिक व मोठ्या प्रजाहिताच्या प्रश्नाबरोबरच तालुक्यांचे प्रश्न व तालुक्यांच्या अडचणी यांचा भरपूर विचार परिषदेनें केला आहे. सांगली हें राजधानीचें ठिकाण असल्यामुळें व व्यापार आणि शिक्षण या बाबतींत पुढारलेलें असल्यामुळें संस्थानांतील चळवळीचे वैशिष्ट्य येथें विशेष प्रमाणांत दिसावें हें साहाजिक आहे. पण हें जरी खरें असलें, तरी या सांगलीच्या चळवळीच्या समुद्राच्या पोटांत निरनिराळ्या विचारांचे शीतोष्ण प्रवाह जे वाहात आहेत ते कोठून व कसे उत्पन्न झाले हें समजण्यास पांचही तालुक्यांची परिस्थिति लक्षांत घेणें जरूर आहे. प्रजापरिषदेच्या स्वागताध्यक्षांच्या भाषणांवरून या प्रवाहांचें सूक्ष्म अवलोकन केल्यास निरनिराळ्या वेळीं सांगली संस्थानांतील चळवळीचें उष्णतामान कमीअधिक कोणामुळें झालें याचें आकलन होईल. सर्व तालुक्यांतील खेड्यांतून शेतकऱ्यांची आर्थिक परिस्थिति व गरजा बव्हंशीं एकाच स्वरूपाच्या असून त्या बाबतींत सर्व तालुक्यांतील तक्रारी एकाच स्वरूपाच्या दिसतील. संस्थानचा पैसा शेतकऱ्यांच्या उन्नतीकरितां जास्त खर्चला जावा याबद्दलही सर्व ठिकाणीं एकमतच दिसेल. राज्यकारभार

प्रजेच्या तंत्रानें व प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें चालावा ही मागणी सर्व ठिकाणीं एकमताचीच होणार. संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति सुरू व्हावी व शेतकऱ्यांवरील साऱ्याचा बोजा कमी व्हावा असे ठराव सर्वच ठिकाणीं होतात. तालुकानिहाय कांहीं प्रश्न त्या त्या परिस्थितींत जसे उत्पन्न झाले तसे त्या त्या वेळीं ठरावरूपानें चर्चिले गेले व त्यावरून तालुक्याच्या जनतेच्या मनोरचनेची व त्यांच्या तक्रारींची बरोबर कल्पना सर्वांना येऊन कार्याची आंखणी जास्त व्यापक स्वरूपांत केली गेली. परिषदेच्या अधिवेशनांतील आणखी थोडा तपशील देण्यापूर्वी सालवार परिषदांचे स्वागताध्यक्ष व अध्यक्ष व तीं कोठें व केव्हां भरली याची माहिती एकत्रित देणें उपयुक्त असल्यानें ती या खालीं देत आहों:—

| क्रमांक | इ. सन | कोठें भरली | स्वागताध्यक्ष | अध्यक्ष |
|---|---|---|---|---|
| १ | १९२२ | सांगली | श्री. केशव रामचंद्र छापखाने, एम्. ए., एल्एल्. बी. वकील | श्री. रामचंद्र शंकर उर्फ आडव्यापा मंगसुळी |
| २ | १९२३ | शहापूर | श्री. नरसिंगसा गणोसा शालगार | श्री. गणेश रघुनाथ अभ्यंकर, बी ए., एल्एल्.बी. वकील |
| ३ | १९२४ | शिरहट्टी | श्री. शिवजोगय्या भोरशेट्टी | श्री. विनायक कृष्ण माईणकर, बी. ए., एल्एल्. बी. वकील |
| ४ | १९२५ | सांगली | श्री. विनायक गोविंद उर्फ आबासाहेब करमरकर | श्री. केशव रामचंद्र छापखाने, बी. ए., एल्एल्. बी. वकील |
| ५ | १९२७ | सांगली | श्री. महादेव केशव आठवले, बी. ए., एल्एल्. बी. | श्री. लक्ष्मण बळवंत उर्फ अण्णासाहेब भोपटकर, बी. ए., एल्एल्. बी. वकील पुणें |

| क्रमांक | इ. सन | कोठें भरली | स्वागताध्यक्ष | अध्यक्ष |
|---|---|---|---|---|
| ६ | १९२८ | तेरदळ | श्री. कृष्णाजी गोविंद उर्फ तमणप्पा देशपांडे वकील | श्री. पंडिताप्पा रायाप्पा चिकोडी, बी. ए., बेळगांव |
| ७ | १९२९ | मंगळवेढे | श्री. गुरुनाथ काशिनाथ कुलकर्णी | श्री. रघुनाथ पांडुरंग उर्फ दादासाहेब करंदीकर, वकील सातारा |
| ८ | १९३० | कवठे महांकाळ | श्री. गणेश नारायण उर्फ दादासाहेब गाडगीळ | श्री. अश्वत्थराव राघवेंद्र महिषी, वकील शिरहट्टी |
| ९ | १९३१ | उगार | श्री. महादेव वासुदेव दिवेकर शास्त्री | श्री. दामोदर विश्वनाथ उर्फ बाबूराव गोखले, बी. ए., एलएल. बी. सहसंपादक केसरी पुणें |
| १० | १९३३ | सांगली | श्री. जंबूआण्णा बाबाजी आरवाडे | श्री.श्रीधर गणेश वझे, बी.ए., मेंबर सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी, पुणें. |
| ११ | १९३४ | रबकवी | श्री. मुरगया स्वामी चागोजी मठ | रावसाहेब पी. जी. हलकट्टी, बी.ए.,एलएल.बी., वकील विजापूर |
| १२ | १९३७ | मागडी | श्री. श्रीनिवासराव मागडी | श्री. विष्णु अनंत देशपांडे मरळीकर |
| १३ | १९३८ | उगार खुर्द | श्री. काशिनाथ हरि उर्फ दादासाहेब खाडिलकर, बी ए., एलएल बी., वकील सांगली | दे. भ. शंकर दत्तात्रय देव, सभासद काँग्रेस वर्किंग कमिटी |
| १४ | १९३९ | हनगंडी | श्री. केशव गोविंद कुलकर्णी, बी. ए.,एलएल बी., वकील | श्री. पंडिताप्पा रायाप्पा चिकोडी, बी.ए., बेळगांव |

याप्रमाणें अध्यक्ष व स्वागताध्यक्ष यांची सालवार माहिती एकत्रित दिल्यानंतर प्रजापरिषदेच्या कार्याचा विचार करतां या निरनिराळ्या परिषदांचे वेळीं नेमलेले संस्थेच्या कार्यकारी मंडळाचे चिटणीस कोण होते

याची माहितीही उपयुक्त असल्यानें तीं नांवें यापुढें सालवार नमूद करीत आहों.

१–१९२२—( १ ) श्री. काशिनाथ हरि खाडिलकर, वकील सांगली
( २ ) वैद्य गोविंद रामचंद्र बिनिवाले ”
२–१९२३—( १ ) श्री. काशिनाथ हरि खाडिलकर, वकील ”
( २ ) वैद्य गोविंद रामचंद्र बिनिवाले ”
३–१९२४—( १ ) श्री. काशिनाथ हरि खाडिलकर, वकील ”
( २ ) वैद्य गोविंद रामचंद्र बिनिवाले ”
४–१९२५—( १ ) श्री. रामचंद्र गोविंद देवल ”
( २ ) श्री. विश्वनाथ सखाराम कानिटकर ”
( ३ ) डॉ. दत्तात्रय वासुदेव करंदीकर ”
५–१९२७—( १ ) श्री. काशिनाथ हरि खाडिलकर, वकील ”
( २ ) श्री. हरि गोविंद टिळक, वकील ”
६–१९२८—( १ ) वैद्य गोविंद रामचंद्र विनिवाले ”
( २ ) श्री. श्रीनिवास नारायण पाटील, तेरदळ
७–१९२९—( १ ) वैद्य गोविंद रामचंद्र विनिवाले सांगली
( २ ) श्री. विष्णु रामचंद्र राजवाडे ”
( ३ ) श्री. खंडो मल्हार लकडे, वकील ”
८–१९३०—( १ ) श्री. रामचंद्र बळवंत कुलकर्णी,
दुधगांवकर वकील, सांगली
( २ ) श्री. श्रीनिवास नारायण पाटील, तेरदळ
( ३ ) श्री. बापूराव मंगसुळी, शिरहट्टी
९–१९३१—( १ ) श्री. रामचंद्र बळवंत कुलकर्णी
दुधगांवकर वकील, सांगली
( २ ) श्री. बापूराव मंगसुळी, शिरहट्टी
( ३ ) वैद्य गोविंद रामचंद्र बिनिवाले, सांगली

| | | | |
|---|---|---|---|
| १०–१९३२— | ( १ ) | श्री. रामचंद्र बळवंत कुलकर्णी दुधगांवकर वकील, | सांगली |
| | ( २ ) | श्री. मुरगेंद्र संगप्पा हिरेमठ, वकील, | ,, |
| | ( ३ ) | श्री. भीमगोंडा बी. पाटील, वकील, | ,, |
| ११–१९३४— | ( १ ) | श्री. कब्बे वकील, | शहापूर, |
| | ( २ ) | श्री. रामकृष्णपंत बदामीकर वकील, | रबकवी |
| | ( ३ ) | श्री. भीमगोंडा बी. पाटील वकील, | सांगली |
| | ( ४ ) | श्री. रघुनाथ मल्हार लकडे वकील, | ,, |
| १२–१९३७— | ( १ ) | श्री. धोंडो रघुनाथ देशपांडे, | शिरहट्टी |
| | ( २ ) | श्री. श्रीनिवासराव पाटील, | तेरदळ |
| | ( ३ ) | श्री. वाटवे वकील, | सांगली |
| | ( ४ ) | श्री. हरिभाऊ टिळक | ,, |
| १३–१९३८— | ( १ ) | श्री. हरि रघुनाथ सराफ, | शहापूर |
| | ( २ ) | श्री. नेमगोंडा दादा पाटील, | सांगली |
| | ( ३ ) | वैद्य केशव हरि खाडिलकर, | ,, |
| १४–१९३९— | ( १ ) | श्री. हरि रघुनाथ सराफ, | शहापूर |
| | ( २ ) | श्री. नेमगोंडा दादा पाटील, | ,, |
| | ( ३ ) | वैद्य केशव हरि खाडिलकर, | ,, |

परिषदांचे अध्यक्ष, स्वागताध्यक्ष, कार्यकारी मंडळाचे चिटणीस यांच्या वरील यादीवरून प्रजेच्या चळवळीच्या कार्यांत संस्थानांतील सर्व मताच्या कार्यकर्त्यांनीं कसा व किती भाग घेतला याची सर्वांस कल्पना येईल. याच वेळीं पुनः एकदां नांवें नमूद नसलेल्या कार्यकर्त्यांची यादी मोठी आहे, हें नमूद करणें जरूर आहे. तसेंच सांगली संस्थानच्या बाहेरील आसपासच्या संस्थानांतील कार्यकर्ते किंवा पुणें, मुंबई वगैरे ब्रिटिश मुलखांतील सर्व पक्षाचे कार्यकर्ते यांच्या सहकार्याची माहिती देणें महत्त्वाचें आहे. विशेषतः श्री. वामनराव पटवर्धनांसारखे संस्थानी प्रजेच्या

चळवळीला वाहून घेतलेले लोकपुढारी, सांगली संस्थान प्रजापरिषदेच्या बऱ्याच अधिवेशनांस हजर राहून, व परिषदेच्या कार्यांत महत्त्वाचा भाग घेऊन आपल्या ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा देत आले आहेत. सांगलीची कार्यकर्ती मंडळीही इतर संस्थानी परिषदांस व दाक्षिणी सं. प्रजापरिषदेच्या किंवा अखिल भारतीय संस्थान लोकपरिषदेच्या कार्यांत तितक्याच मोठ्या प्रमाणांत व आस्थेनें भाग घेत आली आहे हेंही खरें आहे व सांगली संस्थानच्या राजकीय जागृतीचें तें एक चिन्हच आहे. याच वेळीं सन १९२०।२१ सालच्या असहकाराच्या चळवळींत व पुढील कॉंग्रेसच्या चळवळींत संस्थानी प्रजेतर्फे सांगलीनें फार मोठा भाग घेतला आहे व ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीवर श्री. केशवरावजी छापखाने व श्री. विठ्ठलराव जोशी असे पुढारी निवडून आले आहेत, हा इतिहास सर्वांस माहीत आहे. टिळक महाविद्यालयाच्या स्थापनेपासून त्या संस्थेंत व पुण्याच्या कॉंग्रेसच्या कार्यांत तेव्हांपासून महत्त्वाचीं कामें करणारीं आचार्य लिमये, डॉ. लागू सारखीं सांगलीचीं माणसें त्या चळवळीपासून उदयाला आलीं. सांगलीस तेव्हांपासून कॉंग्रेस कमिटी असून कॉंग्रेसचे विधायक कार्यक्रमाचें व इतर कार्य येथें थोड्या प्रमाणावर कां होईना सतत केलें जात आहे. कॉंग्रेसप्रमाणेंच येथें प्रागतिक पक्षाचीही मंडळी आहेत. येथें लोकशाही स्वराज्यपक्ष आहे, तसें हिंदु महासभाही आहे. बाहेरील अशा संस्थांशीं संबंध असलेले पुढारी येथें आहेत, तसेंच स्थानिक कारणानें झालेले निरनिराळे पक्ष आहेत. विशेष हें कीं या सर्व कार्यकर्त्यांचें सांगली संस्थान प्रजापरिषदेच्या कार्यास सतत सहाय्य होत आलें आहे, व अनेक अडचणी आल्या तरी परिषदेचें कार्य यशस्वी होत गेलें आहे.

हें यश किती महत्त्वाचें आहे याची कल्पना येण्यास, सन १९२२ सालच्या पहिल्या परिषदेमध्यें पास झालेल्या ठरावांचा थोडा आढावा घेतल्यास मदत होणार आहे. परिषद ज्या उद्देशानें स्थापन झाली, त्यावरून पहिल्या अधिवेशनांत कोणकोणते ठराव आले असतील याचें अनुमान

करतां येण्याजोगें आहे. परिषदेची चळवळ श्रीमंतांचेबद्दलच्या राजनिष्ठे-वरच अधिष्ठित असल्यानें राजनिष्ठेचा ठराव करणें प्रजेचें कर्तव्यच होतें. खेड्यांतील रयतेच्या हलाखीची स्थिति सुधारणें, हा तर प्रजापरिषदेच्या चळवळीचा मुख्य गाभा म्हणून ग्रामपंचायतीच्या स्थापनेचा ठराव येणें क्रमप्राप्तच होतें. श्री. गणपतरावजी अभ्यंकर यांनींच हा ठराव मांडला होता. खेड्यांतील प्रजेचें कल्याण श्रीमंतांचे हातून घडावें म्हणून त्यांना त्याप्रमाणें सल्ला देणारें सल्लागार मंडळ असावें असाही योग्य ठराव साह-जिकच झाला. कोठल्याही राज्यकारभाराचा चोखपणा त्यांत मिळणाऱ्या न्यायावरून अजमावतां येतो म्हणून न्याय व अम्मलबजावणी खात्यांची फारकत करण्याची मागणी प्रजेनें केली हें योग्यच होय. संस्थानी प्रजेला जातिभेद मनांत न आणतां सरकारी नोकरींत नेमण्याचा ठराव तर जिव्हाळ्याचा प्रश्न होता, व म्हणूनच श्री. माईणकरांसारख्या नेमस्त वृत्तीच्या गृहस्थांनीं सुद्धां हा ठराव मांडतांना फार तडफदार भाषण केलें. पहिल्या परिषदेच्या वेळचें पहिलें महत्त्वाचें शल्य म्हणजे सभा-बंदीचा कायदा; अर्थांत या विषयावर दरबारवर बोचक टीका होणें अपरिहार्यच होतें आणि त्यांतल्या त्यांत हा ठराव मांडणारे श्री. छापखाने! मग त्यांनीं दरबारचे वाभाडे काढून परस्थ अधिकाऱ्यांना हास्यास्पद केलें असल्यास नवल नाहीं. संस्थानी प्रजेच्या सर्व तक्रारी जबाबदार राज्यपद्धतीच्या अभावामुळेंच उत्पन्न होतात. अर्थात् जबाबदार राज्यपद्धतीच्या मागणीचा ठराव व या ध्येयप्राप्तीकरतां कॅ. बर्क यांनीं स्थापन केलेल्या रयतसभेची सुधारणा करून तीस जास्त हक्क देणें या-बद्दलचे जोराच्या मागणीचे ठराव प्रजेतर्फे करण्यांत आले हें योग्यच होय. आर्य वैद्यकाला उत्तेजन, मद्यपानबंदी, प्राथमिक शिक्षणाचा खेड्यांतून प्रसार व शिक्षणप्रसारांत मागसलेल्या जातींना सवलती वगैरे महत्त्वाचे ठराव झाल्याचें पहिल्या परिषदेच्या हकीकतीवरून दिसून येईल. पहिल्या एकदोन परिषदांतील ठराव थोड्या तपशिलानें नजरेस घातले म्हणजे

प्रजेच्या बऱ्याच गाऱ्हाण्यांची साधारण कल्पना सर्वांस होईल म्हणून थोड्या तपशिलानें वरील विवेचन केलें आहे. सन १९२३ सालीं भरलेल्या शहापूर येथील दुसऱ्या परिषदेंत संस्थानच्या जमाखर्चाच्या दृष्टीनें कांहीं ठराव करण्यांत आलेले दिसतात; तसेंच अस्पृश्यतानिवारण, औद्योगिक पाहणी वगैरे ठराव अगत्यानें संमत केलेले दिसतात. प्रजापरिषद निरनिराळ्या तालुक्यांत भरत गेली, त्यामुळें प्रत्येक तालुक्यांतील गाऱ्हाण्यांबद्दल स्वतंत्र ठराव होणें साहजिकच होतें. जंगलच्या हक्काबद्दलचे ठराव, खेडोपाडीं पाण्याची सोय करणेबद्दलचे ठराव, कानडी भाषा व कानडी दप्तर याबद्दलचे ठराव, धरणाच्या पाणीपट्टीविरुद्ध तक्रारींचे ठराव, वगैरे ठराव निरनिराळ्या तालुक्यांत झालेले आहेत व अशा रीतीनें प्रारंभींच्या परिषदांतील ठरावांवरूनच सांगली संस्थानच्या प्रजेच्या बहुतेक सर्व मागण्या स्पष्टपणें कळण्यासारख्या आहेत. या मागण्यांचा उपयोग काय झाला व त्यापुढील परिषदांत आणखी कोणते महत्त्वाचे प्रश्न उत्पन्न झाले याचा विचार करण्यापूर्वी सन १९२४ सालीं सांगलीस दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेच्या चौथ्या अधिवेशनाची जी बैठक झाली, त्याची माहिती सांगलीच्या राजकीय चळवळीच्या इतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाची व पुढील राजकारणावर कांहींसा परिणाम करणारी असल्यानें त्याची थोडी सविस्तर हकिकत या वेळींच विचारांत घेणें युक्त आहे.

## दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेचें अधिवेशन

आम्हीं प्रारंभींच नमूद केल्याप्रमाणें दक्षिणी संस्थान प्रजापरिषद ही संस्था पूर्वींच स्थापिली जाऊन तिचीं पुणें येथें दोन व बेळगांवास तिसरें अशीं तीन अधिवेशनें झालीं होतीं. हीं तिन्हीं अधिवेशनें ब्रिटिश हद्दींतच झालीं; व चौथें अधिवेशन सांगलींत व्हावें अशी जरी कार्यकर्त्यांची इच्छा होती, तरी त्या वेळच्या एकंदर अवघड परिस्थितींत ते तसें करूं शकले नाहींत व मधला मार्ग म्हणून सांगली नजीकच्या विश्रामबाग स्टेशनाजवळ कुपवाडचे हद्दींत नामदार बॅ. मुकुंदराव जयकर यांच्या अध्यक्षतेखालीं

तारीख २८ व २९ मे १९२४ रोजीं अधिवेशन करविणेंत आलें. दिवस उन्हाळ्याचे असल्यामुळें व या दिवसांत वळिवाचे पाऊस पडण्याचा संभव असल्यानें परिषद् गांवांत भरविणें सोयीचें होईल म्हणून संस्थानच्या दिवाणाकडे परवानगीचा अर्जही देणेंत आला होता, पण त्यांचें पुढीलप्रमाणें नकारार्थी उत्तर आलें:—

फौ. जा. नं. $\frac{७३६}{२४}$

मेसर्स महादेव केशव आठवले व गोविंद रामचंद्र विनिवाले सेक्रेटरी द. सं. प्रजापरिषद् राहणार सांगली यांस,

दिवाण व डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट सांगली यांजकडून

दाक्षिणी संस्थान प्रजापरिषदेचें अधिवेशन तारीख २८।२९ मे १९२४ रोजीं सांगली येथें भरविण्यास परवानगी मिळावी म्हणून आपण इकडे ८।५।२४ रोजीं अर्ज केला आहे, त्या अर्जाच्या बाबतींत आपणांस कळविण्यांत येते कीं, आपले अर्जाप्रमाणें सांगली येथें सदरहु परिषद् भरविणेस परवानगी देतां येत नाहीं असें कौन्सिलनें ठरविलें आहे. तारीख १२।५।२४.

Sd./— R. S. Athavale
डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट, सांगली.

याप्रमाणें दरबारचें नकारार्थी उत्तर आल्यानें कुपवाडच्या माळावर श्री. छापखाने यांच्या मालकीच्या जागेंत परिषदेचा मंडप घालण्याचें ठरविण्यांत आलें. या सभेबाबत श्री. धावते वगैरे स्थानिक मंडळींच्या तक्रारींचाहि विचार करणेंत आला; पण त्या तक्रारी परिषदेचे अध्यक्ष श्री. जयकर आले तरी मिटल्या नाहींत. श्री. जयकर सांगलीस आल्यावर या चळवळीस कांहीं अंतस्थ फूट असावी असेंहि दिसून आलें व या बाबतींत ब्राह्मणेतर पुढाऱ्यांस भेटून व त्यांच्याशीं वाटाघाट करून कांहीं समेट होतो का पहावें असा प्रयत्न श्री. जयकर व स्वागतमंडळानें केला; सुमारें

चीस मंडळी स्वागताध्यक्ष श्री. अभ्यंकर यांच्या बंगल्यावर आली व सुमारें चार तासांच्या चर्चेनंतर श्री. जयकरांनीं एक तडजोड सुचविली; पण ती नाकारली गेल्यामुळें समेटाची भाषा खुंटली व साडेचार तासांची वाटाघाट व्यर्थ गेली. पुढें परिषदेच्या वेळीं मुद्दाम जमविलेल्या लोकांकडून दंगल माजविण्यांत आली व सभेचें अधिवेशन खासगी म्हणून जाहीर करावें लागलें. अशा रीतीनें सभेस जरी प्रारंभास अपशकून करणेंत आला, तरी पुढें बैठक अत्यंत यशस्वीपणें पार पडली. परिषदेस मिरज, बुधगांव, कुरुंदवाड, जव्हार, जमखिंडी, अक्कलकोट, भोर, जंजिरा, सावंतवाडी, कोल्हापूर, इचलकरंजी, औंध आणि हैद्राबाद वगैरे बहुतेक सर्व दाक्षिणी संस्थानांतून प्रतिनिधी आले होते व परिषदेंतील ठराव व त्यांवरील भाषणें महत्त्वाचीं झालीं. अध्यक्ष बॅ. जयकर यांनीं आपल्या समारोपाचे भाषणांत सर्व प्रकारच्या अडथळ्यांतूनही परिषद यशस्वी पार पडली यावद्दल आनंद व्यक्त केला असून परिषदेंत पास झालेले ठराव सर्व जातींच्या फायद्याचे कसे आहेत याबद्दल ऊहापोह करून संस्थानिक व त्यांचे अधिकारी यांची अशा चळवळीबद्दल जी वृत्ति दिसून आली, त्याविरुद्ध त्यांनीं तक्रार केली. झालेल्या दंगलीमुळें अल्पावधींत आपणाला बरेंच ज्ञान मिळालें व त्याचा आपण अवश्य उपयोग करून घेऊं, संस्थानिकांनीं निष्कारण साशंक वृत्ति ठेवूं नये असें सुचवून संस्थानहद्दींत राज्यकारभार चालविण्याला लायख माणसें पुष्कळ आहेत, परंतु त्यांना योग्य संधि मिळत नसल्यामुळेंच त्यांच्या बुद्धिमत्तेचें व कर्तृत्वाचें चीज होत नाहीं असें त्यांनीं सांगितलें व संस्थानी प्रजेच्या आत्मोन्नतीची ही चळवळ जोरानें चालू ठेवण्यास विनंति केली. अशा रीतीनें हें अधिवेशन यशस्वी झालें, तरी कुपवाड येथें झालेल्या दंगलीचें कारण पुढें करून सांगली दरबारनें दोन प्रेस नोटा प्रसिद्ध केल्या व संस्थानी प्रजापरिषद व त्याचे चालक यांना दोष दिला व स्वागतमंडळाचे अध्यक्ष श्री. अभ्यंकर यांचेवर झालेली आपली इतराजी दुसऱ्या प्रेसनोटनें दरबारनें जाहीर

केली. पुढें दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेच्या कार्यकारी मंडळानें व सांगली संस्थान प्रजापरिषदेनें या बाबतींत दरबारशीं पत्रव्यवहार करून दरबारनें काढलेली प्रेसनोट परत घेणें कसें अवश्य आहे हें विशद करून दाखविलें व समाधानाची गोष्ट अशी कीं, दरबारनें तावातावांत काढलेली प्रेसनोट खुलासा करून परत घेतली. श्री. अभ्यंकर यांचेविरुद्ध तावडतोबीनें कांहीं फरक झाला नाहीं, तरी पुढें दरबारनें सालोसाल त्यांचेशीं जें वर्तन केलें, त्या-वरून दरबारला आपली चूक पटून दरबारनें त्यांत जरूर ती दुरुस्ती केली असेंच दिसून येतें. हा इतिहास लिहीत असतां पुढें सन १९३८ मध्यें याच संस्थेचें बारावें अधिवेशन सरदार वल्लभभाई पटेल यांचे अध्यक्षतेखालीं खुद्द सांगलीसच भरलें ही घटना मनःचक्षूपुढें उभी राहते. ही गोष्ट एक तऱ्हेनें आश्चर्यकारक असली, तरी सांगलीच्या राजकीय उच्च मनोभूमिकेचें निदर्शकच असल्यानें या अपूर्व स्थित्यंतराबद्दल अभिमानाचे विचार कोणाचेही मनांत येतील. याबद्दलचा उल्लेख प्रसंगानें पुढें आम्ही करणारच आहोंत.

## सुधारणांचा पहिला हप्ता

कुपवाड परिषदेनें नव्या विघ्नाची कल्पना दिली, तरी त्या विघ्नाला सांगलीची प्रजा भिऊन गेली नाहीं, तर उलट आपला लढा जास्त पद्धत-शीर व जास्त परिणामकारी करण्याच्या प्रयत्नांस ती लागली. ‘फोडा व झोडा’ असें धोरण ब्रिटिश मुलखांत व सर्व संस्थानांत जोरानें अनुसरलें जात होतें, त्याचा सांगलीवरही परिणाम होईल कीं काय अशी भीति होती; पण सुदैवानें सांगलीनें यांतून मार्ग काढला व आपला एकोपा राखला. तेरदळ परिषदेचे अध्यक्ष श्री. पंडितापा चिकोडी यांनीं आपले भाषणांत याबद्दल पुढीलप्रमाणें निर्वाळा दिला आहे : “ब्राह्मण-ब्राह्मणेतर दोन्ही पक्ष मिळून एकोप्यानें सर्व काम चाललें होतें. कोणीही दुराग्रह अगर हट्ट धरला नाहीं. ब्राह्मणेतर बंधूंच्या हिताच्या कांहीं सूचना ब्राह्मण बंधूंनीं केल्या. माझ्या देखत सर्व गोष्टींची चर्चा चाले; मला कोठें भेदभाव दिसून

आला नाहीं. सरकारच्या स्वार्थाच्या आड तुम्ही नक्की येतां असें त्यांना वाटलें तर ते ही संस्थाही बंद पाडण्यास कमी करणार नाहींत किंवा तुमच्यांत फूट पाडण्याचे प्रयत्न होतील व तुमच्यांत भांडणें लागलीं कीं Law and order च्या सबबीवर तुम्हाला दडपून टाकणेंत येईल. म्हणून माझें तुम्हांस असें सांगणें आहे कीं, कोणच्याही फुसलावणीस बळी पडूं नका व या परिषदेची कास केव्हांही सोडूं नका व प्रेमानें वागा. शिक्षणाच्याच केवळ एका दृष्टीनें विचार केला तरी या परिषदेचें महत्त्व फार आहे." श्री. पंडिताप्पा चिकोडींसारख्या वयस्थानें काढलेले उद्गार लक्षांत घेतले म्हणजे दरम्यानच्या वादानें वातावरण थोडें फार दूषित झालें, तरी त्याचा दुष्परिणाम फार भोंवला नाहीं व एक-दिलानेंच जबाबदार राज्यपद्धतीची मागणी करणेंत आली. तेरदळनंतर मंगळवेढ्यास जी परिषद झाली, त्या दरम्यान ब्रिटिश मुलखांत रॉयल कमिशननंतर बटलर कमिटी नेमण्यांत आली व सन १९२७ च्या डिसेंबर महिन्यांत अखिल भारतीय संस्थान प्रजापरिषदेचें अधिवेशन होऊन बटलर कमिटीकडे त्या संस्थेमार्फत कैफियत पाठविणेंत आली. प्रो. अभ्यंकर व बॅ. चूडगर वगैरेंचें शिष्टमंडळ विलायतेस पाठविण्यांत येऊन संस्थानी कारभाराची वस्तुस्थिति प्रमुख मुत्सद्यांपुढें व इंग्रजी जनतेपुढें मांडण्यांत आल्यानें संस्थानी प्रश्नाबद्दल मोठीच कामगिरी या अवधींत झाली. मंगळवेढें येथें झालेल्या प्रजापरिषदेपुढें कार्यकारी मंडळाचा जो अहवाल मांडणेंत आला, त्यांत वरील प्रसंगाबद्दल असें नमूद आहे कीं, 'कार्यकारी मंडळानें या वर्षी केलेली कालसंमत गोष्ट म्हणजे अखिल भारतीय प्रजा-परिषदेच्या शिष्टमंडळाचा जाहीर सन्मान ही होय. तारीख १५-९-२८ इ. रोजीं शिष्टमंडळास निरोप देण्याकरितां सांगलीस सभा बोलावली होती. तसेंच शिष्टमंडळ विलायतेहून परत आल्यावर शिष्टमंडळाचा स्वागत-समारंभही कार्यकारी मंडळानें यशस्वी केला.' मंगळवेढें परिषदेंतही या बाबतींत श्री. गणपतरावजी अभ्यंकर यांचें अभिनंदन होऊन बटलर

कमिटीबद्दल स्वतंत्र ठरावही झाला आहे. याच सुमारास कार्यकारी मंडळाचे चिटणीस वैद्य गोविंदराव बिनिवाले यांनीं श्रीमंतांस एक अनावृत्त पत्र लिहून जुन्या रयत असेंब्लीच्या सुधारणेबाबत श्रीमंतांचें व कार्यकर्त्यांचें लक्ष वेधलें. मंगळवेढें परिषदेच्या सुमारास विलायतेंत राउंड टेबल परिषद होणेची होती व त्यांत श्रीमंत राजेसाहेब सांगली हे एक प्रतिनिधी होते. मंगळवेढें परिषदेचे अध्यक्ष श्री. दादासाहेब करंदीकर हेही त्यावेळीं विलायतेस जाणार होते व त्यांनीं विलायतेंत संस्थानी प्रश्नाची वकिली करावी असाही बेत होता. या एकंदर चळवळीचा परिणाम होऊन परिषदेच्या आठ वर्षांच्या कार्यास अंशतः कां होईना यश आलें व सन १९३० सालच्या एप्रिल महिन्यांत रामनवमीच्या सुमुहूर्तावर रयतसभेच्या सुधारणेचा कायदा श्रीमंतानीं जाहीर केला.

## रयत असेंब्ली

या कायद्याचा मसुदा तयार करण्याकरितां जी कमिटी नेमली होती, त्यावर श्री. अभ्यंकर, आठवले, वामनराव पटवर्धन वगैरे सभासद होते. यापूर्वीची रयतसभा म्हणजे रयतेचीं गाऱ्हाणीं राज्यकर्त्यांपुढें सालोसाल मांडलीं जाण्याकरितां व प्रजेच्या उन्नतीच्या कामांत सभेमार्फत जनतेचें सहकार्य मिळण्याकरितां स्थापन केलेली एक संस्था एवढेंच होतें. प्रत्येक तालुक्यातर्फे दोन दोन प्रतिनिधि व तालुक्याचे मामलेदार व सांगलीचा एक प्रतिनिधी अशी मंडळी पूर्वीं कांहीं दिवस नायब कारभाऱ्याचे अध्यक्षतेखालीं व पुढें दिवाणांचे अध्यक्षतेखालीं जमून चर्चा होई. या रयत सभेची बैठक ता. १५-६-१९०८ रोजीं भरली होती. रयत सभेस जबाबदारीचे खरे अधिकार जुन्या प्रांतिक कौन्सिलांच्या अंशानें देखील नव्हते. यांत बदल करून जबाबदार राज्यपद्धतीचा पहिला हप्ता म्हणून 'सांगली स्टेट रयत असेंब्ली रेग्युलेशन १/१९३०चा' हा कायदा करणेंत आला आहे. यांत जुन्या प्रांतिक कायदेमंडळाच्या धर्तीवर प्रश्न विचारणें, बजेटावर कांहीं बाबींखेरीज चर्चा करणें, कायदे करणें व ठराव मांडणें वगैरेबद्दलचे अधिकार या असेंब्लीस

देण्यांत आले. या राजकीय सुधारणेच्या हप्त्याबद्दल श्रीमंतांचें परिषदेकडून जाहीर अभिनंदनही करणेंत आलें. या सुधारणांमुळें कवठ्याची परिषद विशेष तऱ्हेनें पार पडली. दिलेल्या सुधारणा अपुऱ्या आहेत असा आक्षेप घेणारा एक पक्ष होता. त्यांना उत्तर देतांना राजकारण म्हणजे तडजोडीची परंपरा आहे असें श्री. गणपतरावजी अभ्यंकर यांनीं सांगितलें. त्या दृष्टीनें विचार करतां '१९३० चा सांगली संस्थानचा कायदा' राजकीय उन्नतीच्या लढ्यांतील पहिला विजय आहे असें त्यांनीं पटवून दिलें व मिळेल तें पदरांत घेऊन जास्तीकरितां प्रयत्न करा हा लोकमान्यांचा संदेश यांनीं सर्वांस सांगितला. संस्थानी प्रजेला या सुधारणा अपुऱ्या वाटणेचें आणखी एक कारण होतें. ब्रिटिश इंडियांत कॉंग्रेसची सत्याग्रहाची चळवळ पुनः होऊन गांधी-आयर्विन करारामुळें त्याला एक प्रकारें यश आलें होतें. तेव्हां आपल्या बळावर आपले हक्क मिळवितां येतात हें संस्थानी प्रजेलाही दिसून आलें होतें. संस्थानी प्रजेची दृष्टि आतां एक तऱ्हेनें विशाल झाली होती. मंगळवेढें परिषदेंत श्री. वामनरावजी पटवर्धन यांनीं राउंड टेबल कॉन्फरन्समध्यें संस्थानी प्रजेला प्रतिनिधित्व पाहिजे अशी मागणी करणारा जो ठराव मांडला, तो याच विशाल दृष्टीचा व आत्मविश्वासाचा द्योतक होता व आपणही आपल्या स्वार्थत्यागानें व एकजुटीनें अधिक हक्क मिळवूं असा आत्मविश्वास येऊं लागला होता व म्हणूनच त्यावेळच्या सुधारणा प्रजेला पसंत पडल्या नाहींत, तरी त्या राबवून अधिक हक्क संपादन करण्याकरितां संघटना करण्याकडे पुढाऱ्यांचें लक्ष लागलें. या नव्या कायद्याप्रमाणे स्थापित होणाऱ्या असेंब्लीचे पोटनियम करून निवडणुकी करणेस अवधि नसल्यानें श्रीमंतांनीं पुढाऱ्यांशीं विचारविनिमय करून सर्वच्या सर्व सभासदांच्या तालुकावार व गटवार नेमणुकी केल्या व असेंब्लीची बैठक भरविली. या नव्या कायद्याखालीं जे दोन तज्ज्ञ नेमण्याचा सरकारास हक्क आहे, त्यांतील एक श्री. वामनरावजी पटवर्धन होते हें येथें नमूद करणें जरूर आहे. या १९३० च्या असेंब्लीचे अधिकार जरी मर्यादित असले, तरी या असेंब्लींत काम करणाऱ्या सभासदांनीं

प्रांतिक कायदेकौन्सिलांतील कामकाजाप्रमाणें पद्धतशीर काम करून सांगलीच्या या कायदेमंडळाचा लौकिक वाढविला आहे. या सालानंतर ज्या प्रजापरिषदा झाल्या त्या रयत असेंब्लीच्या कामकाजाला पूरक व हक्कवाढीच्या मागण्या करण्याच्या दृष्टीनें नवी चळवळ करणाऱ्या अशा झाल्या व त्यामुळें बऱ्याच वेळचीं अधिवेशनें रयत असेंब्लीच्या बैठकीच्या आसपास भरविणेंत आलीं आहेत. रयत सभेच्या निवडणुकी लढविणें, प्रजापरिषदेची घटना तयार करणें, रयत सभेच्या पुढें येणाऱ्या प्रश्नांचा विचार करणें, व असेंब्लीच्या कायद्यांतील उणीवा दाखवून देणें याकडेच पुढील अधिवेशनांतील ठरावांची प्रवृत्ति आहे. उगारच्या १९३१ सालच्या अधिवेशनांत संघटनेची महत्त्वाची जाणीव झाल्यामुळें कार्यकारी मंडळानें वर्षभर कोणतीं कामें करावीं याबद्दल पूर्वी कधीं न झालेला असा विस्तृत व मार्गदर्शक ठराव श्री. नानासाहेब खाडिलकर यांनीं मांडलेला दिसतो. हीं अधिवेशनें त्यावेळच्या उत्पन्न झालेल्या कांहीं प्रासंगिक प्रश्नांमुळें महत्त्वाचीं झालीं. मार्केट ॲक्टासारख्या प्रश्नानें सांगलीचें वातावरण एका काळीं दुमदुमून गेलें व त्यावेळची भारत सेवक समाजाचे सदस्य श्री. वझे यांचे अध्यक्षतेखालीं भरलेली परिषद् विशेष खळबळीची झाली. मार्केट ॲक्टाच्या वेळीं व्यापाऱ्यांनीं तेरा दिवस सत्याग्रह केला आणि त्याचें फळ त्यांना मार्केट ॲक्ट मागें घेण्यांत मिळालें. आणखी एक महत्त्वाची गोष्ट त्या सुमारास विशेष परिणामाची झाली व ती म्हणजे जागतिक मंदी ही होय. यामुळें शेतकरी वर्गाच्या प्रश्नाकडे परिषदेचें जास्त लक्ष लागलें व शेतसारातहकुबी व सूट व कर्जविमोचन याबद्दलचे ठराव परिषदेपुढें जास्त प्रमाणांत येऊं लागले. कॉंग्रेसच्या राजकारणाशीं प्रजापरिषदेचा जास्त जास्त संबंध येऊं लागून हे संबंध कशा प्रकारचे असावेत याबद्दलही सांगली प्रजापरिषदेच्या या पुढील अधिवेशनांत ठराव झालेले दिसून येतात. सन १९३० व १९३२ च्या सालसांतील सविनय कायदेभंगाच्या चळवळींत संस्थानांतील वातावरण सर्वसाधारण शांत होतें असें म्हणण्यास

हरकत नाहीं. या कायदेभंगाच्या चळवळींत शहापूरच्या दोघां तरुणांना आपटबार उडविण्याबाबत मात्र शिक्षा झाली. शहापूर व सांगली येथें प्रभात फेऱ्या निघत असत आणि त्याबद्दल वटहुकूम काढण्यांत आले होते. शिरहट्टी तालुक्यांत सन १९३४–३५ मध्यें जो दुष्काळ पडला, त्यावेळीं बेलहट्टी येथें श्री. वामनराव पटवर्धन यांच्या अध्यक्षतेखालीं शेतकरी परिषद भरविण्यांत आली. श्री. अश्वत्थराव महिषी यांच्या पुढारीपणाखालीं दुष्काळग्रस्तांना मदत देण्याचें कार्य फार मोठ्या प्रमाणावर करण्यांत आलें. आणि त्यावेळीं दरबारनें सारासूट, सारातहकुबी व तगाई देण्याचे बाबतींत स्वीकारलेलें संकुचित धोरण जनतेच्या प्रत्ययास उत्कटत्वानें आलें. सन १९३८ पर्यंत प्रजापरिषद् व रयत असेंब्ली अशा तऱ्हेनें वेळोवेळीं उत्पन्न होणाऱ्या सर्व प्रश्नांचा विचार करीत जास्त हक्काकरितां झगडत होती, असें या कालांतील चळवळीच्या इतिहासावरून स्पष्ट दिसेल.

हा झगडा आतां नव्या वातावरणांत केला जात होता. १९३० च्या नव्या सुधारणानंतर मुद्रणस्वातंत्र्यावरील नियंत्रण कायद्यानें नाहींसें झाल्यानें सांगलीस 'दाक्षिण महाराष्ट्र' व 'विजय' अशीं दोन वर्तमानपत्रें सुरू झालीं. प्रगति व जिनविजय हें वर्तमानपत्र यापूर्वींच निघत असलें, तरी तें बेळगांवास छापून प्रसिद्ध केलें जात असे; तरी पण त्याचे संपादक श्री. पाटील वकील हे सांगलीच्याच कार्यकर्त्यांपैकीं असून या वर्तमानपत्रांतही संस्थानी प्रश्नाबद्दल विचार प्रसिद्ध केले जातात. अगदीं अलीकडे 'विश्वास' व 'वीर भारत' अशीं दोन नवीं साप्ताहिकें सांगलीस निघालीं असून या सर्व वर्तमानपत्रांचा राजकीय जागृतीचे कामीं चांगला उपयोग होत आहे. अखिल भारतीय प्रजापरिषदेच्या व दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेच्या कार्याशीं सांगली संस्थान प्रजापरिषदेच्या कार्याचें ऐक्यच असल्यानें त्या दोन्ही संस्थांमार्फत होणाऱ्या चळवळी सांगलीसही झालेल्या आहेत. संस्थानी सप्ताह, डॉ. पट्टाभिसितारामय्या यांचा संस्थांनातील दौरा वगैरे चळवळींत सांगलीच्या कार्यकर्त्यांचा बराच मोठा भाग असून या सर्व

कार्यक्रमाचा सांगलीच्या राजकीय जीवनावर फार महत्त्वाचा परिणाम झाला आहे. अखिल भारतीय संस्थान प्रजापरिषदेच्या चळवळींत डॉ. पट्टाभिसितारामय्या सारखे काँग्रेसचे पुढारी आल्यानंतर काँग्रेस, संस्थानें व संस्थानी प्रजा यांच्या परस्परसंबंधाचा प्रश्न महत्त्वाला चढला व या काळांतील सांगली संस्थान प्रजापरिषदेंतील ठराव पाहतां फेडरेशन, गोलमेज परिषद वगैरे अखिल भारतीय प्रश्नाबद्दलचे ठराव व या प्रश्नाचे अनुषांगिक निरानिराळया संस्थानचें संयुक्त हायकोर्ट व कांहीं खात्यांचा संयुक्त कारभार याबद्दलचे ठराव झाले आहेत. तसेंच काँग्रेसनें संस्थानी प्रजेच्या चळवळीच्या बाबतींत कोणती भूमिका स्वीकारावी याबद्दलही ठराव प्रजापरिषदेंत झाले आहेत. काँग्रे-सचा लढा ब्रिटिश हद्द व संस्थानें या दोहोंसाठीं आहे ही गोष्ट 'हरिपुरा' येथील काँग्रेसच्या ठरावांत स्पष्ट करणेंत आली, त्याबरोबरच संस्थानांतील अन्तर्गत प्रश्न व कारभाराची सुधारणा हे प्रश्न तेथील प्रजेनें स्वावलंबनानें सोडवावे असें काँग्रेसनें सांगितलें. या दोन्ही गोष्टींचा परिणाम निरानिराळया रूपानें इतर संस्थानांबरोबरच सांगली संस्थानच्या प्रजेच्या चळवळीवर झालेला आहे ही गोष्ट या कालांतील व सांगलीच्या राजकीय चळवळीच्या इति-हासावरून स्पष्ट दिसेल. या सर्व परिस्थितींचीं पूर्व चिन्हें इ. सन. १९३३ सालीं सांगलीस भरलेल्या परिषदेच्या १० व्या व त्यानंतरच्या अधिवेशनांत व सालोसाल भरणाऱ्या सांगली रयत असेंब्लीच्या बैठकींत दिसून येतात. त्यांवरही या विचारांची छाया दिसत होती. या विचारांचे पूर्ण पडसाद सांगली येथें मे १९३८ मध्यें दाक्षिणी संस्थान लोकपरिषदेचें बारावें अधिवेशन सरदार वल्लभभाई पटेल यांचे अध्यक्षतेखालीं भरलें, त्यावेळीं दिसून आले. या संस्थेचें चौथें अधिवेशन कुपवाडास खालसा हद्दींत करावें लागलें व नंतर संस्थान हद्दींत हें अधिवेशन कधींही भरलें नव्हतें. संस्थान हद्दींत असें यशस्वी अधिवेशन भरविण्याचा पहिला मान सांगलीस मिळाला ही राज-कीय चळवळीच्या प्रगतीच्या दृष्टीनें महत्त्वाची व सांगलीस अभिनंदनीय अशीच गोष्ट झाली. यानिमित्त सांगलीस डॉ. पट्टाभिसितारामय्या, सरदार

वल्लभभाई पटेल, दे.भ. गंगाधरराव देशपांडे व दे.भ. शंकरराव देव यांसारखे अखिल भारतीय कॉंग्रेस पुढारी, तसेंच श्री. वामनरावजी पटवर्धन, श्री. श्रीधरपंत वझे, श्री. राघवेंद्र शर्मा वगैरे संस्थानी चळवळींत सतत काम करणारे पुढारी हजर होते. कुडचीची व सांगलीची अशा या परिषदेच्या दोन अधिवेशनाची जबाबदारी पार पाडण्यांत सांगलीच्या कार्यकर्त्यांबरोबर श्री. बाळकृष्णपंत शिखरे यांचे प्रयत्न विशेष कारणीभूत झाले हें नमूद करणें जरूर आहे. सांगलीस भरलेल्या या परिषदेमुळें दाक्षिणी संस्थानांत एकप्रकारें नवचैतन्य निर्माण झालें व कॉंग्रेस कार्यकर्त्यांच्या मध्यस्थीमुळें मिरज, बुधगांव, जमखिंडी वगैरे संस्थानांत शेतकऱ्यांना सवलती व इष्ट सुधारणांचा उपक्रम झाला. अशा सर्वतोपरी खळबळीच्या वातावरणांत सांगली संस्थान प्रजापरिषदेचें उगार येथील तेरावें अधिवेशन ता. १७-७-३८ रोजीं भरविण्यांत आलें.

संस्थानी राजकारणांत नवचैतन्य निर्माण झाल्याचें पाहून त्याचा प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें पुरेपूर फायदा करून घ्यावा याकरितां उगारचें अधिवेशन घाईनें भरविण्याचें ठरविण्यांत आलें. या उगारच्या अधिवेशनास ‘ यशस्वी अधिवेशन ’ असें विशेष प्रकारें म्हणणेचें कारण म्हणजे संस्थानांतील रयत प्रतिनिधींनीं उगारास येऊन ज्या एकमुखानें मागण्या केल्या, त्याचा श्रीमंत राजेसाहेबांनीं सहानुभूतीनें विचार करून त्याबद्दल रयत असेंब्लीपुढें जाहीर घोषणा करून परिषदेच्या मागण्या मान्य केल्या हें होय. या परिषदेला दे. भ. शंकरराव देवांसारखे राष्ट्रीय सभेच्या वर्किंग कमिटीचे सभासद अध्यक्ष लाभले व सत्य, न्याय व एकीचें संघटन या तत्त्वांचा पुरस्कार या परिषदेंत जोरदारपणें झाला. परिषदेच्या यशाला याहि गोष्टी कारणीभूत झाल्या यांत शंका नाहीं. एक तपावर जी चळवळ केली, त्याचें फळ पदरांत पडणेचा समय आला आहे अशीच त्यावेळीं सर्वांची भावना होती; प्रस्तुत लेखकानें त्या सभेचा स्वागताध्यक्ष म्हणून जें भाषण केलें, त्यांत पुढीलप्रमाणें सिंहावलोकन याच भावनेनें केलें :

" आजचें हें अधिवेशन भरण्यापूर्वीं आपल्या परिषदेचीं बारा अधिवेशनें झालीं आहेत. आपल्या संस्थानच्या उद्धाराच्या प्रयत्नाचें हें तपच पुरें झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. या तपाच्या साफल्याचा काळ समीप आला असून या वेळीं पूर्वेतिहासाचें थोडें सिंहावलोकन करणें योग्य आहे असें मला वाटतें. या सर्व बाराहि अधिवेशनांत प्रत्यक्ष भाग मीं घेतला असल्यानें आजपर्यंतच्या आपल्या कार्याचा चित्रपट माझ्या डोळ्यापुढें पूर्णतेनें दिसत आहे, आणि तो आपल्या पुढील कार्याच्या दृष्टीनें स्फूर्तिदायक आहे असें मला वाटतें. खालसा मुलखांत मॉंटेग्यू–चेम्सफर्ड सुधारणा जारी झाल्यापासून त्याचा परिणाम संस्थानी मुलखावर झाला व त्याचें दृश्य स्वरूप म्हणजे श्री. वामनराव पटवर्धन व श्री. तात्यासाहेब केळकर वगैरे संस्थानी प्रश्नांबद्दल आस्थापूर्वक विचार करणाऱ्या गृहस्थांनीं परिश्रमपूर्वक स्थापन केलेली ‘ दक्षिणी संस्थान प्रजापरिषद ’ ही संस्था होय. या संस्थेच्या कार्यांत सांगली संस्थानांतील लोकांनीं महत्त्वाचा भाग घेतला आहे हें आपणांस माहीतच आहे. या चळवळींत आपल्या कै. श्री. अभ्यंकरांचें केवढें महत्त्वाचें स्थान होतें हें आपणांस सांगावयास पाहिजे असें मुळींच नाहीं. या चळवळीच्या इतिहासांत त्यांचें नांव अढळ होऊन राहिलें आहे. या मध्यवर्ती संस्थेच्या स्थापनेबरोबरच सांगली प्रजेमध्यें झालेल्या जागृतीचा व आपल्या हक्कांच्या जाणिवेचा परिणाम म्हणजे प्रत्येक संस्थानांत सुरू झालेली राजकीय चळवळ होय. आपल्या सांगलीपुरतें असें म्हणतां येईल कीं, सन १९२० सालीं लो. टिळकांचें सांगलीस आगमन झालें, त्यामुळें देशसेवेच्या कार्याला जें जोराचें चलन व स्फूर्ति मिळाली, त्यांतून या प्रजापरिषदेच्या कार्याची सुरुवात झाली. आपल्या संस्थानाधिपतींच्या आधिपत्याखालीं जबाबदार राज्यपद्धति सुरू झाली पाहिजे असें ध्येय पुढें ठेवून त्यावेळीं चळवळ सुरू झाली व सांगलीस सन १९२२ सालीं आपल्या अधिवेशनाच्या पहिल्या बैठकीच्या रूपानें ती प्रगट झाली

व तेव्हांपासून सतत ध्येयप्राप्तीचे आपले प्रयत्न सुरू आहेत. या प्रयत्नांना कायावाचामनेंकरून सतत सहाय करणारांस धन्यवाद दिले पाहिजेत. हा मागील इतिहासपट पुढें धरला म्हणजे कितीतरी कर्तृत्ववान् स्नेही मानाच्या स्थानावर दिसतात. कै. गणपतराव अभ्यंकर, कै. विनायकराव माईणकर, कै. आडव्याप्पा मंगसूळी वगैरे गत पुढाऱ्यांची तर आठवण होतेच, पण संस्थानी चळवळीचे प्रणेते श्री. वामनराव पटवर्धन, विद्वान् पुढारी श्री. छापखाने, श्री. आठवले, श्री. महिषी, कर्तृत्वमूर्ति वैद्य गोविंदराव बिनिवाले वगैरे कार्यकर्ते आज आपणांस ठळकपणें दिसतात. सर्वच कार्यकर्ती मंडळी येथें प्रत्यक्ष हजर असली अगर नसली, तरी त्यांचा गौरवपूर्वक उल्लेख आपल्या कार्यास यशदायक आहे. या कार्यकर्त्यांनीं किती अवघड परिस्थितींत कार्याचा आरंभ केला व चळवळीचें सातत्य राखलें याची जाणीव आपणां सर्वांस आहे. वैद्य बिनिवाले तर इतर अनेक लोकहिताच्या कामाप्रमाणेंच प्रजापरिषदेचे प्रमुख सूत्रधार आहेत हें आपणांस माहीत असलें तरी पुन्हां ती गोष्ट नमूद करणें हें मी माझें कर्तव्य समजतों. सर्वच कार्यकर्त्यांचा मी उल्लेख केला नसला, तरी त्यांचें कार्य आपणापुढें आहे. सांगली संस्थानच्या जनतेची सर्वांगीण उन्नति होऊन त्यांना राजकीय हक्कप्राप्ति व्हावी असाच आपला प्रयत्न झाला असें आजपर्यंतच्या सर्व ठरावांचा व कार्याचा आढावा घेऊन आपणांस म्हणतां येईल. मूलभूत हक्कांपैकीं सभास्वातंत्र्याच्या नियंत्रणाच्या कात्रींत पहिली परिषद केली, तर जोरदार चळवळीनें तीं नियंत्रणें सांगलीस आपण लागलींच दूर केलीं. रयत सभेची सुधारणा कायद्यानें झाली असून त्याबरोबरच जबाबदार राज्यपद्धतीच्या हिशेबानें आणखी भरीव हक्काची मागणी आपण करीत आहों. प्रजापरिषदेनें शेतकऱ्यांच्या दुःखनिवारणाचा सतत प्रयत्न केला असून मंगळवेढें तालुक्यांत शेतकऱ्यांच्या हितासाठीं एक कायदा होण्यांतही परिषदेचे प्रयत्न अंशभागी आहेत. ग्रामपंचायती, ग्रामोद्धार व स्थानिक स्वराज्य संस्थांची वाढ या कामींही परिषदेचें कार्य झालें असून

अखिल भारताच्या स्वातंत्र्याच्या व नव्या संघराज्यपद्धतीच्या स्थापनेच्या चळवळींत प्रजापरिषद् आपले परीनें प्रत्यक्ष कार्य करीत आहे हें आपणांस या पूर्वइतिहासांत दिसून येईल. हें कार्य करीत असतां ब्रिटिश मुलखांतील राजकीय चळवळीची जननी जी राष्ट्रीय सभा ती संस्था व इतर देशहिताचें कार्य करणाऱ्या संस्था यांचा व आपल्या परिषदेच्या कार्याचा संबंध आला ही या आंदोलनाच्या इतिहासांत महत्त्वपूर्ण गोष्ट आहे. ”

लेखकानें आपल्या भाषणांतील थोडा लांबलचक उतारा दिला असला, तरी उगार परिषदेच्या यशाचा हिशोब करतांना या पूर्वेतिहासाचें सिंहावलोकन जरूरीचें आहे असें वाटल्यावरून तो तसा देणेंत आला आहे. या उगार परिषदेंत अध्यक्ष दे. भ. देव यांचें भाषण सरकारशीं झालेल्या पुढील विचारविनिमयाला पोषक असेंच झालें. परिषदेनें आपल्या मागण्या निश्चित करून त्या सरकारपुढें मांडणेकरितां अध्यक्ष श्री. शंकरराव देव, स्वागताध्यक्ष प्रस्तुत लेखक, श्री. जंबूआण्णा आरवाडे व श्री. गणपतराव गोडबोले या चौघांचें शिष्टमंडळ नेमलें. यावेळीं श्रीमंतांची स्वारी परदेशांत होती, तरी पण मे. डे साहेबासारखे तज्ञ व शेतकऱ्यांबद्दल सहानुभूति असलेले ॲडमिनिस्ट्रेटर सांगलीस लाभलें होते. शिष्टमंडळानें प्रजापरिषदेचें मागणें दरबारपुढें मांडलें व अनेक दिवसांच्या वाटाघाटीनंतर मे. डे व श्री. देव वगैरेंच्या एकमतानें ज्या न्याय्य मागण्या राजेसाहेबांच्या पुढें गेल्या, त्या श्री. राजेसाहेब यांनीं उदारपणानें मान्य केल्या हें सांगलीच्या राजकीय चळवळीचें मोठेंच यश होय.

## राजेसाहेबांची घोषणा

तारीख २२।१२।३८ रोजीं भरलेल्या रयत असेंब्लींत श्रीमंत राजेसाहेब यांनीं राजकीय सुधारणेची व जनतेच्या इतर मागण्या मान्य करणेची जाहीर घोषणा केली. त्यावेळीं केलेल्या भाषणांत श्रीमंतांनीं राजकीय चळवळीचा संपूर्ण आढावा घेतला असून ब्रिटिश हिंदुस्थानांतील राज-

कारणाचा पूर्ण विचार केला आहे. सांगलींत झालेल्या शैक्षणिक, व्यापार-विषयक व इतर अनेक लोकहिताच्या कार्याचा त्या भाषणांत आढावा घेतला असून त्यांत संस्थाननें किती महत्त्वाचें काम केलें आहे हेंही नमूद केलें आहे. १९३० सालीं स्थापन झालेल्या रयत असेंब्लीच्या कार्याचा तपशील या भाषणांत असून मुद्दाम असें नमूद केलें आहे कीं, मिळविलेल्या हक्काचा भरपूर उपयोग लोकांनीं करून घेण्याची तत्परता दाखविली आहे व यामुळें प्रगतिपथावर आणखी पुढें पाऊल टाकण्याची वेळ आली आहे अशी मान्यता या भाषणांत आहे. याबाबत ते म्हणतात कीं, "रयत असेंब्लीच्या कामकाजापुरतेंच पाहिलें तरी आम्हांला असें म्हणावयास हरकत वाटत नाहीं कीं, मिळालेल्या हक्कांचा भरपूर उपयोग लोकांनीं करून घेण्याची तत्परता दाखविली आहे. असेंब्लीच्या कामांत त्यांनीं मनःपूर्वक सहकार्य केलें आहे. प्रश्न विचारणें, अंदाजपत्रकावर टीका करणें व कायदेकानूंना वळण देणें या बाबतींतील आपल्या हक्कांचा योग्य उपयोग करून लोक-प्रतिनिधींनीं आम्हांस बहुमोल सहाय्य केलें अशी आम्ही पूर्ण ग्वाही देतों. पब्लिक अकौंटस कमिटी व स्टँडिंग फायनॅन्स कमिटी यांतील सभासदांनीं आपल्या पुढील प्रश्नांचा सखोल व पूर्ण अभ्यास व प्रसंगीं मोकळेपणानें व निर्भीडपणें टीका करूनही फार उपयुक्त कामगिरी बजावली आहे. असेंब्लीनें पसंत केलेले कायदे पाहिले तर तिची दृष्टि प्रगतिप्रिय असलेली दिसून येते. हिंदु विधवेच्या दत्तकाचा हक्क विस्तृत करण्याचा कायदा व त्यांना अविभक्त कुटुम्बांत इतरांबरोबर हक्क देणारा कायदा, अल्पवयी मुलामुलींच्या विवाहाला प्रतिबंध करणारा कायदा अशा थोड्याच कायद्यांचीं नांवें घेतलीं तरी आमचें म्हणणें आपणांस पटेल. याबरोबर सांगली संस्थान शेतकरी संरक्षण कायद्याचाही उल्लेख करावयास पाहिजे. कारण त्या कायद्याच्या परिणामाकडे सर्वांचेंच सोत्सुक लक्ष लागलें आहे. याप्रमाणें लोकप्रतिनिधींकडून आमच्या सरकारास बहुमोल मदत झाली आहे." प्रजापरिषदेच्या मागणीवरून दिसून येणारी

प्रजेंतील जागृति ही इष्ट गोष्ट आहे असें आपलें मत नमूद करून संस्थानांत भाषणस्वातंत्र्य, संघटनास्वातंत्र्य असलें पाहिजे ही गोष्टही श्रीमंतांनीं नमूद केली आहे; व दिवसेंदिवस राज्यकारभारांत प्रजेचें सहकार्य मिळविण्याच्या व्यवस्थेंत सुधारणा करणें अवश्य आहे असें नमूद करून श्रीमंतांनीं त्यापुढें आपली जाहीर घोषणा केली आहे. ती जाहीर घोषणा तपशिलानें पाहिल्यास उगार परिषदेंत पास झालेल्या ठरावांतील बहुतेक मागण्या मान्य झाल्या आहेत असें दिसून येईल. त्या घोषणेंतील राजकीय सुधारणेबद्दलचा भाग या राजकीय इतिहासाच्या दृष्टीनें या ठिकाणीं नमूद करणें जरूर असल्यानें तो यापुढें दिला आहे.

घोषणेंतील राजकीय सुधारणेबाबतचें कलम ९ पुढीलप्रमाणें आहेः—

(९) (अ)— सांगली रयत असेंब्लींतील सभासदांची संख्या चाळीस आहे ती वाढवून पंचेचाळीस करणेंत येईल व त्यांपैकीं तीस लोकनियुक्त असतील.

(ब)—पुरेशा लोकनियुक्त सभासदांचा समावेश करून एक कमिटी नेमणेंत येईल. तिनें मतदारसंघांत जागांची फेर वांटणी व मतदानाच्या हक्काकरितां लागणारी लायकी ठरविण्याचे बाबतींत रिपोर्ट करावयाचा आहे.

(क)—लोकांनीं निवडलेल्या सभासदांतील एका सभासदास आम्ही पसंत करून मंत्री म्हणून नेमूं. त्या मंत्र्याकडे शिक्षणखातें, आरोग्य खातें, सहकारी खातें, स्थानिक स्वराज्य खातें व ग्रामोद्धार खातें हीं खातीं राहतील. प. व. खात्यापैकीं जीं कामें सदर मंत्र्यांकडे सोंपविण्यांत येतील, त्यांच्यावरही त्यांचा ताबा राहील (याबद्दलची यादी मागाहून देण्यांत येईल.)

(ड)—लोकनियुक्त मंत्र्यांकडे सोंपविलेल्या खात्यांसंबंधीं जो खर्च अंदाजपत्रकांत असेल, त्यावर मतें देण्याचा

> अधिकार रयत असेंब्लीस असेल. मात्र ठरलेल्या किमान प्रमाणाचा पगार घेणाऱ्या अधिकाऱ्यांचा पगार, प्रवासभत्ता व पेन्शन याबाबत हा मताधिकार असणार नाहीं.

वरील घोषणेंतील तपशील पाहतां श्रीमंतांनीं द्विदल राज्यपद्धति थोड्या फार अंशानें स्वीकारली आहे असें दिसून येईल. इतर मोठमोठ्या संस्थानांत ज्या राजकीय सुधारणा जाहीर झाल्या आहेत, त्यावरून सांगलीच्या राजकीय सुधारणेचें पाऊल इतरांच्या मागें नसून असल्यास थोडें पुढेंच आहे असें दिसून येईल. ब्रिटिश इंडियांत द्विदल राज्यपद्धति विशेषशी यशस्वी झाली नसली, तरी संस्थानांत ती खात्रीनें यशस्वी होईल असा पुष्कळांचा अंदाज आहे; व याच दृष्टीनें दे. भ. शंकरराव देव किंवा श्री. वामनरावजी पटवर्धन वगैरेंनीं या सुधारणांचें व श्रीमंत राजेसाहेबांचें मनःपूर्वक अभिनंदन केलें आहे. श्रीमंत राजेसाहेबांनीं याच अधिवेशनांत आणखी एक महत्त्वाची गोष्ट केली व ती म्हणजे संस्थानी चळवळीचे पुढारी व सांगली संस्थान प्रजापरिषदेचे एक प्रमुख कार्यकर्ते श्री. अश्वत्थराव महिषी यांना पहिले लोकनियुक्त मंत्री नेमून नव्या युगास ताबडतोब प्रारंभ करून दिला ही होय. घोषणेंत नमूद केल्याप्रमाणें प्रि. कर्वे यांचे अध्यक्षतेखालीं, श्री. रघुनाथराव बखले, पंडिताप्पा चिकोडी वगैरे सभासद असलेली मतदान कमिटी नेमून त्या कमिटीनें केलेल्या अधिकारपूर्ण व उत्कृष्ट सूचनांना थोड्या फेरफारानिशीं मान्यता दिली आहे. अशा परिस्थितींत भरलेल्या हनगंडी येथील परिषदेंत या कर्वे कमिटीचा रिपोर्ट व पक्षसंघटना यावरच परिषदेनें विशेष भर दिला हें योग्यच होय. यापुढें सांगलीचें राजकारण हें नव्या जमान्याला अनुसरूनच चाललें पाहिजे. द्विदल राज्यपद्धतीचा हा काल अंतिम ध्येयाच्या दृष्टीनें संक्रमणाचा असून तो काल जितका कमी करतां येईल व अंतिम ध्येयाकडे होणारी प्रगति जास्त जलद करतां येईल अशी खटपट करणें जरूर आहे. संस्थानाधिपति श्रीमंत राजेसाहेब

व लोकपुढारी हें नवें युग किती शीघ्र गतीनें येईल ते समजून घेतील अशी आमची खात्री आहे सांगलीचा लौकिक फार मोठा आहे. सांगलीचे राजे व प्रजा या स्वातन्त्र्यसूर्याच्या उदयकाली चळवळीच्या भरतीच्या लाटेचे स्वागत करतील व सर्वांना स्वराज्यप्राप्तीचें अवभृथ स्नान घडेल अशी मनोमय साक्ष हा उज्ज्वल इतिहास सर्वांस देईल अशी आमची खात्री आहे

---

# कुरुंदवाड (धाकटी पाती) संस्थानांतील राजकीय चळवळ

लेखकः एक प्रजाजन

सन १८१८ सालीं पेशवाई बुडाली त्यावेळीं कुरुंदवाड संस्थानचे अधिपति श्रीमंत केशवराव बाळासाहेब पटवर्धन हे होते. त्यांचेबरोबर त्यावेळच्या ब्रिटिश सरकारांनीं (कंपनी सरकारांनीं) सन १८१९ सालीं तहनामा केला. सदर श्रीमंत केशवराव बाळासाहेब हे सन १८२७ मध्यें निवर्तले; त्यावेळीं त्यांचे रघुनाथराव, हरिहरराव, विनायकराव व त्रिंबकराव असे चौघे मुलगे हयात होते. सदर चौघां राजपुत्रांपैकीं श्रीमंत रघुनाथराव हे वडील असलेमुळें त्यांना ब्रिटिश सरकारांनीं सन १८२७ मध्यें मुखत्यारी देऊन सरंजाम त्यांचे स्वाधीन केला. परंतु सदर श्री. रघुनाथराव हे व्यसनाधीन झाल्यामुळें व त्यांच्या हातून राज्यकारभार सुरळीत होईनासा झाल्यामुळें त्यांनीं आपले राज्यकारभाराचे अधिकार आपले द्वितीय बंधू श्रीमंत हरिहरराव यांना सन १८४५ मध्यें दिले. त्याप्रमाणें सुमारें चार वर्षें श्री. हरिहरराव यांनीं कारभार चालविला; व तो त्यांनीं श्री. विनायकराव यांचे सल्लामसलतीनें केला. पण श्री. रघुनाथराव यांचे चिरंजीव श्रीमंत केशवराव यांना ही व्यवस्था नापसंत पडून त्यांनीं राज्यकारभार आपल्या हातांत घेणेसाठीं प्रयत्न सुरू केले व सन १८४९ मध्यें वडिलांचें मन वळवून त्यांनीं सर्व अधिकार आपल्या चुलत्यांच्या हातांतून काढून आपल्या हातीं घेतले. या अधिकारलालसेनें या घराण्यांत भाऊबंदीस सुरवात झाली व त्यामुळें श्रीमंत हरिहरराव, विनायकराव व त्रिंबकराव यांनीं आपणांस सरंजामामध्यें हिस्सा मिळावा म्हणून प्रयत्न

सुरू केले, व हें सर्व प्रकरण ब्रिटिश सरकारांच्याकडे (कंपनी सरकार-कडे) गेलें. श्री. हरिहरराव हे सन १८५१ मध्यें निवर्तले; व सन १८५२ सालीं कंपनी सरकारच्या बोर्ड ऑफ डायरेक्टर्सचा ठराव होऊन त्यांत या तिघां बंधूंना हिस्सा मिळावा व त्यांची इस्टेट रेग्युलेशन खालीं आणावी असें ठरलें. यावर सदर त्रिवर्ग बंधूंनीं पुन्हां काम चालविलें व त्यामुळें सन १८५४ सालीं कुरुंदवाड थोरली पाती स्वतंत्र संस्थान करण्यांत आलें आणि या त्रिवर्ग बंधूंसाठीं निराळे हिस्से ठरवून देणेंत आले; व त्यांना साध्या जमीनदाराचा दर्जा देण्यांत आला. (But the shares of the younger branches should be in every respect on the footing of ordinary landed estate. ) पोलिटिकल एजंट यांनीं प्रत्येक बंधूच्या हिश्यास अजमासें रु. १८६०० वसूल येईल अशीं खेडीं वांटून दिलीं. याशिवाय कुरुंदवाड गांवाबद्दल प्रत्येकाचे हिश्यास रु. ३००० देणेबद्दलचा ठराव केला. ब्रिटिश सरकारास द्यावयाची खंडणी थोरल्या पातीनें देणेचें ठरलें. त्याचप्रमाणें कुरुंदवाड गांवांतील राजवाडा-थोरल्या पातीच्या मालकीचा ठरवून त्यांत वरिष्ठ घराण्यानें या त्रिवर्ग बंधूंना राहण्याची सोय करून द्यावी असें ठरलें. त्याचप्रमाणें कुरुंदवाड गांवांतील इनाम जमिनी, कुरणें व दागदागिने यांच्याही वांटण्या होऊन सन १८५६ मध्यें थोरल्या पातीपासून धाकट्या पातीचें (त्रिवर्ग बंधूंचें) घराणें विभक्त करण्यांत आलें. अशा प्रकारें सन १८५२–१८५६ पर्यंतच्या कालांत हीं दोन घराणीं निराळीं करण्यांत आलीं, व या धाकट्या पातीच्या घराण्यास पहिल्या वर्गाची सरदारकी सन १८६४ मध्यें देण्यांत आली.

सन १८५२ सालीं जरी या त्रिवर्ग बंधूंचा हिश्याचा हक्क मान्य कर-ण्यांत आला, तरी सन १८५६ पर्यंत त्यांना फक्त जमीनदार असेंच सम-जण्यांत येत असे. या व्यवस्थेस सदर त्रिवर्ग बंधू नाखूष होते, कारण त्यांना थोरल्या पातीप्रमाणें अधिकार पाहिजे होते. म्हणून त्यांनीं

सारखे प्रयत्न चालू ठेविले व त्यामुळें ता. १५।५।१८५६ इ. रोजीं सरकारनें पुढीलप्रमाणें ठराव केला: "That one of the brothers should be invested with civil and criminal powers of the nature provided in Regulation XIII of 1830 and A XIII of 1842 pending the final bringing of these Districts under Regulation (P. 136-37 West Memoirs). तथापि फौजदारी अधिकार तात्पुरते त्यांच्याकडे ठेवून दिवाणी अधिकार थोरल्या पातीकडे ठेविले म्हणून पुन्हा तक्रारी होऊन फौजदारी व दिवाणी अधिकार कायमचे सन १८६० सालीं या घराण्यास देणेंत आले. यानंतर पुढें काम चालून तारीख २१-१०-१८६४ रोजीं एक पांच कलमी ठराव होऊन त्यांत ही जहागीर रेग्युलेशनखालीं आणण्याचें रहित करून स्वतंत्र संस्थान करण्यांत आलें व या बंधूंचें पहिल्या वर्गाचे सरदारांचे यादींत नांव दाखल करण्यांत आलें. यास कारण म्हणजे या बंधूंनीं सन १८५७ च्या बंडांत सरकारास मदत केली हें होय व मेहेरबानीखातर वडील घराण्याप्रमाणें व्यवस्था करण्यांत आली. मात्र इतर संस्थानाप्रमाणें दत्तकाची सनद न देतां प्रसंगविशेषीं सरकारकडे अर्ज करावा; तसेंच कदीम उत्पन्नावद्दल फक्त वारसा-चौकशी करण्याचा हक्क दिला व कदीम उत्पन्नावर नजराणा घेणेचा नाहीं असें यांत ठरलें. याप्रमाणें सन १८५२ ते १८८५ पर्यंतच्या कालांत हें संस्थान स्वतंत्रपणें स्थापलें जाऊन त्यास इतर संस्थानाप्रमाणें बहुतेक सर्व अधिकार देण्यांत आले. यानंतर सन १८९१ मध्यें एक ठराव झाला, त्यांत या संस्थानला अधिकार मेहरबानगी (favour) म्हणून दिले आहेत आणि हे अधिकार योग्य तऱ्हेनें बजावण्याबद्दल हें संस्थान वरिष्ठ सरकारांस पूर्णपणें जबाबदार आहे असें नमूद केलेलें आहे.

सन १८५१ सालीं हरिहरराव वारले, त्यावेळीं त्यांचे चिरंजीव श्री. गणपतराव ऊर्फ बापूसाहेब हे अवघे १५ वर्षांचे होते. या शाखेचे पहिले कारभारी रा. जनार्दन चांगो यांनीं सन १८५५ ते १८८३ पर्यंत कारभार केला व संस्थान निराळें करून त्यांस अधिकार मिळविणेबाबतींत या कारभाऱ्यांचेच खरे प्रयत्न होते. म्हणून त्यांना त्रिवर्ग बंधू आपला चौथा भाऊ असेंच समजत असत व त्यांनीं केलेल्या अमूल्य कामगिरीबद्दल त्यांना मोठें इनामही करून दिलें होतें. श्री. त्रिंबकराव ऊर्फ आबासाहेब हे सन १८६९ मध्यें निपुत्रिक निवर्तले. त्यामुळें थोरली व धाकटी पाती घराण्याच्या भाऊबंदीस पुन्हां एकदां ऊत आला. शेवटीं सरकारचा ठराव होऊन कुरुंदवाड गांवाबद्दलचें श्री. त्रिंबकराव यांच्या हिश्याचें उत्पन्न रु. ३००० थोरल्या पातीस मिळालें व बाकीचें उत्पन्न धाकट्या पातीस मिळालें. श्री. विनायकराव सन १८७६ मध्यें निवर्तल्यावर त्यांचे अधिकार त्यांचे पुतणे श्री. गणपतराव ऊर्फ बापूसाहेब यांना मिळाले. ते सन १८९९ मध्यें वारल्यावर त्यांचे चिरंजीव श्री. माधवराव ऊर्फ भाऊसाहेब व त्यांचे चुलते हरिहरराव ऊर्फ दाजीसाहेब यांच्यांत अधिकाराबद्दल तंटा सुरू झाला व योग्य आणि लायख असेल त्यास अधिकार देण्याचे तत्त्वावर श्री. हरिहरराव ऊर्फ दाजीसाहेब यांना अधिकार मिळाले. त्यांनीं आपल्या कारकीर्दींत पहिली गोष्ट ही केली कीं, कारभाऱ्याचें उच्चाटन करून त्यांच्या वडिलांना दिलेलें इनाम रद्द करून पुन्हा सरकारजमा केलें. यास कारण रा. विष्णु जनार्दन हे श्री. माधवराव ऊर्फ भाऊसाहेब यांचा पक्ष घेतात हा संशय. श्री. दाजीसाहेब यांनीं सन १९०२ ते १९११ पर्यंत राज्यकारभार केला. श्री. दाजीसाहेब हे सन १९११ सालीं वारले. त्या-बरोबर अधिकारांसाठीं त्यांचे चिरंजीव श्री. विनायकराव ऊर्फ नानासाहेब व त्यांचे चुलत बंधु श्री. माधवराव ऊर्फ भाऊसाहेब यांचेमध्यें तंटा सुरू झाला. पण शेवटीं श्री. भाऊसाहेब यांना यश येऊन त्यांनीं सन १९११ ते १९३० पर्यंत राज्यकारभार केला. या कारकीर्दींतच अनेक महत्त्वाच्या घडामोडी झाल्या. त्यांत पहिली म्हणजे थोरली पाती व धाकटी पाती यांच्यांतील

तक्रारीमुळें धाकट्या पातीची राजधानी माधवपूर-वडगांवास सन १९१७ मध्यें आणणेंत आली. दुसरी बाब म्हणजे श्रीमंतांचा खर्च अवाढव्य वाढून कर्ज-बाजारी होणेची पाळी आली. त्यामुळें 'अनेक कदीम उत्पन्नें' जप्त करून मालकी हक्कानें लिलांव करण्यांत आलीं. न्यायदानाविषयीं तर गोष्टच नको. बऱ्याच लोकांचीं घरेंसुद्धां विनामोबदला सरकारजमा झालीं; कारण, श्रीमंतांना व त्यांचे परिवारास राहण्यास त्यांच्या मालकीचे वाडे माधवपुरांत नव्हते. अशा तऱ्हेनें मेटाकुटीस आलेला हा राज्यकारभार श्रीमंतांचे सुशिक्षित चिरंजीव श्री. गणपतराव ऊर्फ बापुसाहेब हेच पहात होते असें म्हणणेस हरकत नाहीं. सन १९३० सालीं या सर्व कारणांमुळें प्रजेंतील असंतोषाला ऊत आला व त्या जोडीस ब्रिटिश हद्दींतील कॉंग्रेसची चळवळ जोरांत होती, त्याची शिकवण मिळाल्यामुळें या हद्दींतील प्रजेनें हजारों सह्यांचा अर्ज करून संस्थानांत चालू असलेले अन्याय दूर करणेस दरबारास विनंति केली; पण त्याचा परिणाम अधिकच जोराची दडपशाही करण्यांत झाला. व त्याचा शेवट ता. २ नोव्हेंबर १९३० रोजीं रात्रौ माधवपूर येथें गोळीबार होण्यांत झाला. त्यामुळें पोलिटिल एजंट यांना चौकशी करणें भाग पडलें. त्यांनीं स्वतः माधवपुर—वडगांव येथें येऊन प्रत्यक्ष हकीकत ऐकून घेतली व परिस्थितीची पाहणी केली. त्यांना लोकांचा कोणताही दोष दिसून आला नाहीं. म्हणून त्यांनीं राज्यकारभार आपल्या हातांत घेऊन खालसामधील मामलेदार मे. पी. बी. हार्टी यांना कारभारी नेमलें. वरील सर्व कारणांनीं श्री. माधवराव ऊर्फ भाऊसाहेब यांना अधिकारसंन्यास घ्यावा लागला. मे. पोलिटिकल एजंट यांच्याकडे अधिकार असतांना त्यांनीं अल्पशा कालावधींत प्रजेच्या बऱ्याचशा तक्रारींची दाद लावून सुधारणाही केल्या.

श्री. माधवराव ऊर्फ भाऊसाहेब यांनीं अधिकारत्याग केल्यानंतर त्यांच्या-नंतर अधिकार कोणास द्यावयाचा याचा वाद श्री. विनायकराव हरिहरराव

ऊर्फ नानासाहेब व भाऊसाहेबांचे चिरंजीव श्री. गणपतराव माधवराव ऊर्फ बापूसाहेब यांचेमध्यें लागला. त्यांत श्री. नानासाहेब यांना फक्त रेव्हिन्यु कमिशनरचे व दिवाणी व फौ. डि. जज्ज आणि सेशन्स जज्ज यांचे अधिकार देणेंत आले व लोकल गव्हर्मेंटचे अधिकार पोलिटिकल एजंटकडे ठेवणेंत आले. पुढें लौकरच नानासाहेब हे सन १९३२ मध्यें निपुत्रिक निवर्तले म्हणून त्यांचे बंधु श्री. त्रिंबकराव हरिहरराव उर्फ आबासाहेब यांनीं आपणास अधिकार मिळावे म्हणून प्रयत्न केला व त्या प्रयत्नास श्री. बापूसाहेब यांनीं विरोध केला. शेवटीं श्री. आबासाहेब हे दुसऱ्या घराण्याचे मुख्य ( non-jurisdictional chief ) हें मान्य होऊन श्री. बापूसाहेब यांस अधिकार देणेंत आले व तेच हल्लीं राज्यकारभार चालवित आहेत. मध्यंतरीं श्री. आबासाहेब मृत्यु पावल्यामुळें त्यांचे चिरंजीव श्री. तात्यासाहेब यांना non-jurisdictional chief चे अधिकार मिळाले आहेत. मि. पी. बी. हार्टी यांचेनंतर मि. निमकर यांना कारभारी नेमलें होतें. ते सन १९३३ मध्यें गेल्यावर संस्थानचे जुने नोकर मि. जे. जी. प्रभावळकर यांना श्री. बापूसाहेब यांनीं कारभारी नेमलें व तेच हल्लीं कामावर आहेत. अशा रितीनें सन १९२५ ते १९३० च्या दरम्यान ज्या व्यक्तींच्या हातीं राज्यकारभार होता, त्याच व्यक्तींच्याकडे सन १९३३ पासून आजतागायत कारभाराचीं सूत्रें आलीं आहेत. राव. प्रभावळकर हे त्या कालीं ( सन १९२५–३० ) हुजूर चिटणीस होते व श्री. बापूसाहेब हेच स्वतः सर्व राज्यकारभार पाहात असत. श्री. बापूसाहेबांना सन १९३८ मध्यें राजा हा किताब मिळाला.

संस्थानचें एकंदर उत्पन्न सन १९३० सालीं रु. २४७००० होतें. त्यांत सन १९३० सालीं पोलिटिकल एजंटांनीं सन १९२७ सालीं वाढविलेल्या साऱ्यापैकीं निम्मा सारा सूट दिला व सन १९३८ मध्यें बाकीचा नाम्मी हल्लींचे श्रीमंतांनीं तूर्त म्हणून सूट दिला आहे. म्हणून सध्यां संस्थानचें उत्पन्न अदमासें रु. २००००० आहे.

या संस्थानांतील लोकांमध्यें जागृति होण्यास सुरवात सन १९१७ पासून झाली. त्यासाली श्री. शंकराचार्य स्वामी यळूरास दिवसा मशाली लावून आले होते, त्यामुळें भर उन्हांत दिवे लावणेचें प्रयोजन काय याबद्दल बराच उहापोह होऊन अशा तऱ्हेचे दांभिकपणाचे चोचले सहन करावयाचे नाहींत असें लोकांनीं ठरविलें व श्री. शंकराचार्य स्वामी यांचेवर बहिष्कार घातला. त्यामुळें चिडून जाऊन श्री. शंकराचार्य स्वामींनीं संस्थानचे अधिकाऱ्यांची मदत मागितली, व अधिकाऱ्यांनीं ती दिली. यामुळें पुढें या चळवळीस सत्यशोधकी स्वरूप प्राप्त झालें व बऱ्याच लोकांवर फौजदारी कज्जे घालण्यांत आले व कांहींना शिक्षाही झाल्या. याप्रमाणें हें प्रकरण चिघळत जाऊन शेवटीं प्युनिटिव्ह पोलिस बसविण्यांत आलें व त्यांचा खर्च गांवचे लोकांची मालमत्ता जप्त करून वसूल करणेंत आला. ही चळवळ सुमारें ९।१० वर्षें चालली होती. पण शेवटीं संस्थानचे अधिकाऱ्यांनीं ती दाबून टाकली. पण लोकांच्या मनांतून त्याबद्दलचा राग नाहींसा झाला नव्हता व संघटित रीतीनें सर्व तालुकाभर चळवळ करण्याचें कार्य चालूच होतें. सन १९३० मध्यें ब्रिटिश हद्दींत काँग्रेसची कायदेभंगाची मोहीम सुरू झाली, त्यामुळें पूर्वींच धुमसत असलेली असंतोषाची आग पेटण्यास उत्तेजन मिळालें. संस्थानांतील बेकायदेशीर दडपशाही व अन्याय चवाट्यावर मांडण्यास लोक तयार झाले. त्याप्रमाणें श्रीमंत माधवराव ऊर्फ भाऊसाहेब यांचेकडे अनेक गाऱ्हाण्यांचा अर्ज पाठविण्यांत आला, व लोकांना न्याय मिळावा अशीही विनंति करण्यांत आली. त्याचप्रमाणें संस्थानांत लोकलबोर्डाची स्थापना करावी अशीही विनंति करण्यांत आली. परंतु त्यावेळचे कारभारी रा. सदाशिवराव देशपांडे व श्रीमंतांचे चिरंजीव बापूसाहेब यांनीं लोकांना धुडकावून लाविलें. श्रीमंत भाऊसाहेब हे लोकांच्या तक्रारी ऐकून घेण्यास तयार होते व त्यांच्या मागण्यासुद्धां त्यांनीं कबूल केल्या असत्या; परंतु त्यांचे

खालचे अधिकारी त्यांच्या इच्छेच्या आड आले असें म्हणतात. असें होण्यास मुख्य कारण म्हणजे श्री. माधवराव हे नामधारी अधिपति झाले होते व सर्व कारभार त्यांचे सुविद्य चिरंजीवच पाहात होते. शेवटीं या प्रकरणास भलतेंच स्वरूप आलें व त्याचें कारणही अगदींच क्षुल्लक होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. माधवपुरचे लोकांनीं आपल्या गांवांतील रस्ते स्वतः करणेस सुरवात केली, पण ही गोष्ट सुद्धां त्या वेळच्या अधिकाऱ्यांस पसंत पडली नाहीं. त्यामुळें प्रकरण चिडीस पेटून माधवपुरच्या १२ लोकांना अटक करण्यासाठीं रात्रीचे वेळीं गांवावर छापा घातला गेला; वडगांवच्या ६०--७० पोलिसांचे मदतीस सांगली संस्थानचे सुमारें ७०--८० पोलीस व पोलीस सुपरिंटेंडंट हेहि आले होते. त्यांनीं गोळीबार केला, पण त्या लोकांपैकीं कोणालाही विशेष दुखापत झाली नाहीं. या कारणामुळें दुसरे दिवशींच मे. पोलिटिकल एजंट व बेळगांवचे डी. एस्. पी. वगैरे आले. त्यांनीं स्वतां लोकांना भेटून विचारपूस केली व लोकांच्या पुढाऱ्यांना विश्वासांत घेतलें. त्यामुळें खरें कारण केवळ दडपशाही आहे हें स्पष्ट दिसून आल्यामुळें लोकांवर कोणत्याही प्रकारचे खटले करणेचे नाहींत व लोकांनींही अधिकाऱ्यांवर व श्री. बापूसाहेब यांच्याविरुद्ध चौकशी मागावयाची नाहीं असा समेट झाला; पण या प्रकरणास कारणीभूत झालेल्यांना मात्र कमी करणेचें ठरलें व त्याप्रमाणें रा. देशपांडे कारभारी व फौजदार रा. दाजीसाहेब यांना कमी केलें व श्री. भाऊसाहेब यांना निष्कारण अधिकारन्यास करावा लागला. या सर्व प्रकरणांत श्री. भाऊसाहेब यांची सहानुभूति लोकांकडे होती, पण प्रत्यक्ष अधिकार दुसऱ्यांकडे सोंपवून दिल्यामुळें व त्यांच्या मनाच्या कमकुवतपणामुळें त्यांच्यावर ही आपत्ति कोसळली. खरोखर पाहिलें तर ज्या दिवशीं गोळीबार झाला, त्या दिवशीं श्री. भाऊसाहेब हे पंढरपूर मुक्कामीं होते.

मे. पोलिटिकल एजंटांनीं आपल्या हातांत कारभार घेतल्यानंतर सन १९२७ सालीं वाढविलेला सारा निम्मा कमी केला, व शिक्षणफंड रु. ७०००

बंद केला. तसेंच मंद्रगी तालुक्यांतील भुईभाडेंही कमी केलें. प्रत्येक गांवास स्वतः भेट देऊन तक्रारी ऐकून घेतल्या व त्यांना मुबलक गायरानें दिलीं. त्याचप्रमाणें तलाव व रस्ते लिलांवानें विकणेचें बंद केलें व तावड-तोब लोकलबोर्ड स्थापन करून त्यांत ½ लोकनियुक्त सभासद दिले; जुलमी अधिकाऱ्यांना काढण्यांत आलें. त्याचप्रमाणें खालमांतील मामलेदार मे. हार्टी यांना कारभारी नेमलें. या सर्व कारणांनीं लोक शांत होऊन सरकारविरुद्ध चळवळ बंद झाली. पुढें थोड्याच दिवसांत श्री. नानासाहेब यांना कमिशनर व डिस्ट्रिक्ट आणि सेशन जज्जाचे अधि-कार दिले. त्यावेळीं खादरवाडीचे लोकांनीं जैतनमल कुरण ज्या किंमतीस मक्तेदाराला दिलें होतें, त्याच किंमतीस रयतांना द्यावें अशी मागणी मे. पोलिटिकल एजंट यांचेकडे केली, पण श्री. नानासाहेब हे कबूल करीनात, म्हणून सदर गांवचे लोकांनीं ३१४ दिवस त्यांचे वाड्यासमोर सत्याग्रह केला व शेवटीं तें कुरण पोलिटिकल एजंट यांचे सहानुभूतीनें मिळविलें. अशा लोकांच्या बहुतेक सर्व तक्रारी संपल्यामुळें चळवळ एकदम बंद करावी अशी एक हुल्लड उठली, व त्यामुळें लोकांत दोन पक्ष झाले. अशा बेकीमुळें सन १९३७ पर्यंत विशेष हालचाल झाली नाहीं. सन १९३७ च्या मार्च १७ तारखेस यळूर शेतकरी संघ या नांवाची संस्था स्थापन झाली व त्या संस्थेमार्फत श्रीमंत गणपतराव माधवराव ऊर्फ बापूसाहेब यांचेकडे जबाबदार राज्यपद्धति वगैरेबाबत ११ मागण्या करण्यांत आल्या. त्यांपैकीं कांहीं मागण्या श्रीमंतांनीं मान्य केल्या व लोकलबोर्डांत ¾ लोकनियुक्त व प्रेसिडेंट, व्हाइस प्रेसिडेंट वगैरे लोकनियुक्त दिले. त्याचप्रमाणें म्युनिसिपालिटीच्या कारभारांतही सुधारणा केली.

ता. ३१-१०-३८ रोजीं सदर शेतकरी संघाची जाहीर सभा वड-गांवास चालू असतां त्या सभेवर नं. २ च्या राजवाड्याच्या आवारांतून दगडफेंक करण्यांत आली ( सदर राजवाड्यांत पोलिस पहारा असतो ).

त्यामुळें कांहीं लोकांना दगड लागून मार लागला. त्याप्रमाणें कांहीं दारु-ड्यांना सभेंत घुसडून दंगा करणेचा प्रयत्न झाला, पण सभा-चालकांनीं लोकांना शांत रहाणेस सांगून सदर सभा अत्यंत यशस्वी रीतीनें पार पाडली. त्यानंतर सदर दगडफेकीची चौकशी एक कमिशन नेमून करावी अशी विनंति श्रीमंतांकडे करणेंत आली पण त्याची दाद लागली नाहीं. म्हणून शेतकरी संघानें ता. २-१-३९ इ. रोजीं एक मोर्चा आणिला, पण त्या दिवशीं श्रीमंत राजधानींत नसल्यामुळें मोर्चा परत न्यावा लागला. म्हणून पुन्हां ता. ३०-१-३९ ला दुसरा मोर्चा श्रीमंतांकडे गेला. त्यावेळीं श्रीमंतांनीं चौकशी करणेचें व जे जबाबदार असतील त्यांना शासन करणेचें अभिवचन दिलें. पुढें चौकशी सुरू झाली व त्यासाठीं मि. हुकेरीकर मामलेदार, मि. शिधोरे मॅजिस्ट्रेट व मि. तवनापा देसाई पोलिस फौजदार यांच्या बदल्या मैंदर्गी तालुक्यास करणेंत आल्या. लोकांतर्फेचा पुरावा संपला असून त्याला आतां ६।७ महिने झाले तरी अजून निकाल झाला नाहीं.

तसेंच शेतकरी संघाच्या मागणीप्रमाणें संस्थानांत विधिमंडळ देणेसाठीं एक घटनाकमिटी नेमलेली असून त्याचें काम चालू झालें आहे. ता. २–१–४० रोजीं यळूर तालुक्यांतील सर्व साक्षीदार घेणेंत आले आहेत व पुढें मैंदर्गीस जाणेचा कमिटीचा विचार चालू आहे.

गेल्या वर्षीं स. १९२७ सालीं वाढविणेंत आलेला शेतसारा संपूर्णपणें कमी करणेंत आला. त्यामुळें संस्थानचें उत्पन्न मूळ स. १८९६ च्या सर्वेप्रमाणें झालें आहे. पण एवढ्यावर प्रजा सर्वस्वी संतुष्ट नसून त्यांना अजून राज्यकारभारांत हक्क, न्यायदानांत निःपक्षपातीपणा, लोकशिक्षण व ग्रामसुधारणा अशा महत्त्वाच्या गोष्टी पाहिजे आहेत व त्यासाठीं संघटित अशी चळवळ यळूर तालुका शेतकरीसंघ करीत आहे.

---

# मुधोळांतील निष्प्रभ राजकीय जीवन

लेखक : सत्यशोधक

दक्षिण महाराष्ट्र व उत्तर कर्नाटकाच्या सीमेवर जमखंडीच्या दक्षिणेस बारा मैलांवर मुधोळ हें लहानसें संस्थान वसलेलें आहे. या संस्थानचें क्षेत्रफळ ३६९ मैल असून सन १९३१ च्या खानेसुमारीप्रमाणें लोकसंख्या ६२८३२ आहे. यांपैकीं शेंकडा ९१·२ हिंदू, ७·१ मुसलमान आणि १·७ इतर जाती आहेत. पांच वर्षांच्या सरासरीनें सर्व बाबींतून संस्थानाचें उत्पन्न सालीना ४९१६६२ रु. चें आहे. संस्थानिकांना वंशपरंपरा नऊ तोफांची सलामी आहे आणि नरेंद्रमंडळाचे ते कायम सभासद आहेत. संस्थानिकांना पूर्ण अधिकार असून हिंदुस्थान सरकाराशीं संबंध असल्यापैकीं हें एक संस्थान आहे. सध्यांचे अधिपति नऊ वर्षं वयाचे असून त्यांच्या मातोश्री रीजंट म्हणून अधिकार चालवितात.

नेमक्या कालखंडांतील हकीकतच तेवढी लिहिण्यास आपण बसलों, तरी थोडें मागें पाहिल्याशिवाय चालत नाहीं. बीज व जमिनीचे गुणावगुण यांचा परिणाम जसा झाडाच्या बाबतींत विचारांत घ्यावा लागतो, त्याचप्रमाणें कोणत्याही व्यक्ति किंवा समूहाच्या सद्यःकृति किंवा स्थितीचा विचार साकल्येंकरून करावयाचा झाला तर, त्याची थोडीशी तरी पूर्वपीठिका पाहणें आवश्यक आहे. सन १९०७ ते १९३७ चें मुधोळ सर्वत्र गाजलेलें असल्यानें सन १९३८ मधील नवचैतन्यानें सजलेल्या मुधोळची हकीकत सांगितली, तर ती कुणास खरीसुद्धां वाटणार नाहीं. सन १९३७ पर्यंत मृतवत् असलेली प्रजा सन १९३८ मध्यें एकदम सजीव उत्साही कशी झाली, हें एक न उलगडणारें कोडेंच आहे.

सन १८९८ ते १९०६ पर्यंतचा कालखंड हल्लींच्या चळवळीला बीजरूप मानण्यास हरकत नाहीं. तेव्हां पुण्या-मुंबईकडे लोकमान्य टिळक वगैरेंनीं एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस लोकजागृतीकरितां श्री शिवाजी उत्सव व गणपति उत्सव सुरू केले. त्यांचें प्रतिबिंब येथेंही त्या सुमारास उमटलें. त्यावेळीं हायस्कूल-कॉलेजच्या शिक्षणाकरितां पुण्यास जाऊन आलेले श्री. देवळे बंधु व त्यांचे स्नेही यांनीं "श्री शिवाजी प्लेइंग क्लब" नांवाचें एक मंडळ स्थापून त्याचे मार्फत ज्ञानप्रसार व लोकजागृतीचीं कामें म्हणजे वाचनालय, मेळे व व्याख्यानें ते करीत. या निरुपद्रवी चळवळीला त्यावेळीं मोकळीक होती आणि श्री. बाळंबे वकील, श्री. मिरजकर मास्तर यांच्या-सारखी मंडळी त्यांत भाग घेत असत. अंमलदार मंडळीही या कार्यक्रमास हजर रहात. याप्रमाणें हा प्रकार माजी अधिपति श्रीमंत मालोजीराव महाराज सन १९०४ सालीं गादीवर आल्यानंतर सुद्धां ३–४ वर्षें चालला होता श्री. महाराजांचे शिक्षक श्री. नारायण गणेश परांजपे हे थिऑसॉफिस्ट व व्याख्यानें वगैरे सार्वजनिक चळवळींत भाग घेणारे असे होते; आणि त्यांचेमुळें श्री. महाराजही कांहीं अंमलदारांकडे खेळ-ण्यास सुद्धां जात-येत व याप्रमाणें उच्चनीचता मनांत न आणतां सर्वांशीं आत्मीय भावनेनें मिळून मिसळून वागत असत.

सन १९०५ च्या बंगालच्या फाळणीनें सारा देश हादरून गेला व त्याचे पडसाद मुधोळांतही उमटले. त्यावेळीं येथें इंग्रजी पांचवीपुढें शिक्ष-णाची सोय नसल्यामुळें त्यापुढील शिक्षणाकरितां बहुतेक मुलें पुणें-विजा-पूरकडे जात असत आणि तेथल्या स्वतंत्र वातावरणाचा परिणाम यांच्या बालमनावर होऊन सुटींत गांवीं आले म्हणजे मुष्टिफंड, पैसाफंड, आणि "वाग्बाण" नांवाचें हस्तलिखित वगैरे चळवळी तात्या तासगांवकर, अनंतराव बेलवडी वगैरे विद्यार्थी मंडळी करीत असत. परंतु पुढें श्रीमंत राजेसाहेब यांनीं साम-दाम-दंड-भेद या चतुःसूत्रीचें धोरण अमलांत आणलें, त्यामुळें सर्वत्र उत्साह ओसरला. खालसांतील दडपशाहीचे सर्वच कायद्

संस्थानांत लागूं करण्यांत आले. राजद्रोही सभांच्या कायद्याचा अंमल भजन, कीर्तन, पुराणापर्यंत करण्यांत आला. चार दोन स्नेही एकीकडे जमून संघटना करतील म्हणून चहाडीचें शस्त्र त्यांचेवर सतत लोंबत ठेवण्यांत आलें.

### दडपशाहीस सुरवात

निःस्पृही व प्रजाहितैषी अशा जुन्या अंमलदारांना पेन्शनींत काढण्यांत आलें व परस्थ अंमलदारांची भरती होऊं लागली. चहाडच्या-चुगल्या ऐकणें हा राजे लोकांचा जन्मसिद्ध हक्क; त्याची बजावणी येथें फार जोरांत सुरू झाली. दडपशाहीची व हम् करेसो करण्याची वृत्ति राजेसाहेबांमध्यें बळावत चालली. दरबारकडून झालेल्या अन्यायाच्या परिमार्जनाकरितां एका देसायास सल्ला दिल्याबद्दल रामदुर्गचे माजी ॲडमिनिस्ट्रेटर श्री. माधवराव मसूरकर यांचे घराण्याकडे चालत असलेली असामी बंद करण्यांत आली. या अन्यायाविषयीं एजंटापर्यंत अर्ज देण्याचा सल्ला देण्याच्या गुन्ह्याकरितां श्री. श्रीपतराव कौजलगी यांचेवर खटला तयार करण्यांत आला. एकंदरींत काय, लोकांतील स्वत्व आणि अन्यायाची चीड येण्याची मनोवृत्ति मारून टाकण्याचें धोरण चालूं झालें. खालसातीप्रमाणें कांहीं वकील मंडळींनीं 'स्वदेशी' वगैरेमध्यें पुढाकार घेतला होता. परंतु राजेसाहेबांच्या या बदलत्या धोरणाविरूद्ध जाण्याची धमक या मंडळींत नसल्यानें या चळवळी थंडावल्या. चळवळ्या लोकांच्या यादींत आपलें नांव येऊं नये, व राजकृपेला कुठेंही धक्का लागूं नये म्हणून या स्वदेशी-भक्तांनीं स्वतःच्या शरीरावर परदेशी कपड्यांचें जणूं प्रदर्शन भरविण्याची चढाओढ सुरू केली असें म्हटल्यास मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. शिकलेले पदवीधर व त्या वेळच्या समजुतीप्रमाणें समाजाचे पुढारी मानलेले वकील ह्यांनींच काढता पाय घेतला, तेव्हां केवळ त्यांच्या-वरील श्रद्धेनें किंवा त्यांच्या भिडेनें पुढें आलेल्या खेडूत मंडळींची पांगापांग झाली असल्यास आश्चर्य कसलें ?

प्रजेवर जरब बसावी म्हणून कांहीं श्रीमंतांवर खटले भरून त्यांना जबर शिक्षा ठोठावण्यांत आल्या. कोल्हापूरप्रमाणें येथेंही वेदोक्ताला सुरु-

वात झाली; व वेदोक्त कबूल नसलेल्या ब्राह्मणांवर राजद्रोहाचा खटला भरून त्यांनाही जबर शिक्षा देण्यांत आली. श्रीमंत छत्रपति व ब्रिटिश सरकार या दोघांच्या मर्जीचें दुहेरी राजकारण साधण्यांत आलें. सन १९२४ मध्यें बेळगांवांत भरलेल्या काँग्रेसकरतां व प्रदर्शनाकरितां गेल्याच्या सबबीवर—परंतु जरब रहावी म्हणून तीन चार जणांना नोकरींतून काढलें.

## जमिनी जप्त करण्याचा सपाटा

दडपशाहीच्या अनुकूल वातावरणांत खासगी उत्पन्न वाढविण्याच्या नव्या नव्या तऱ्हा शोधण्यांत आल्या. वटहुकुमाच्या धिंगाण्यांत पिढ्यानु पिढ्या चालत आलेल्या वतनी जमिनी जप्त करण्याचा सपाटा चालू झाला, आणि हा क्रम भूमितीश्रेणीनें माजी राजेसाहेबांच्या कारकीर्दीच्या अखेर-पर्यंत चालू होता. कागदोपत्रीं दाखवावयाचे कायदे खालसातींतले; परंतु प्रत्यक्ष अंमल मात्र मोंगलाई पद्धतीचा. दडपशाही कारभारामुळें बरीच मंडळी खालसातींत उद्योगाकरितां गेली आणि नव्या पदवीधर मंडळींनीं तोच कित्ता गिरवला. मुधोळांत जी मुस्कुटदाबी झाली, त्याचा परिणाम इतका झाला कीं, चुकून वर्तमानपत्रांतून सुद्धां तक्रार दिसेनाशी झाली. सर्व चळवळी मेल्या, आणि येथील प्रजा गुलाम झाली.

येथें यंग मेन्स असोसिएशन नांवाची एक संस्था सन १९१६ च्या सुमारास कांहीं नोकर व विद्यार्थ्यांनीं स्थापली. सुट्यांमध्यें नाटकें करण्या-पलिकडे यांचें कांहीं ध्येयच दिसलें नाहीं. यापैकींच कांहीं मंडळी फुटून त्यांनीं "मराठा ब्रदरहूड" नांवाची एक संस्था सुरू केली. या संस्थेनें मात्र कांहीं काल रात्रींच्या शाळा चालविल्या होत्या. पुढें या दोन्ही संस्था बंद पडल्या आहेत.

येथील मान्यवर नागरिक श्रीयुत हणमंतराव कौजलगी यांनीं विजापुरांतील चांगल्या प्राप्तीची आपली वकिली असहकारांत सोडून ते सर्वस्वीं कॉंग्रेसच्या कामाला लागले. मुधोळांतील खेड्यांतून चांगल्या हातसुताची निपज पूर्वीं मोठ्या प्रमाणावर होत असे. तिला चालना देण्याकरितां मुधोळ संस्थानांतील खेड्यांतून ते हिंडू लागले आणि हातसुताची निपज वाढविण्याची खटपट त्यांनीं चालू ठेविली. खेड्यांतील फिरतीमध्यें भंटनूरचे श्रीयुत रामण्णा सोन्नद यांना पुष्कळ खटपटीनंतर, त्यांनीं खादीची दीक्षा दिली आणि मुधोळ संस्थानांतील खादीचें काम त्यांचे गळ्यांत टाकून ते विजापूर जिल्ह्यांतील इतर भागाकडे वळले. कॉंग्रेसच्या चळवळींत दिलेल्या एका व्याख्यानाकरितां त्यांचेवर विजापूर डि. मॅजिस्ट्रेटनें राजद्रोहाकरितां खटला भरला. हा खटला चालल्या वेळीं गांधी टोपी काढून कोर्टांत येण्याबद्दल मॅजिस्ट्रेटनें सांगितलें. तें मान्य न केल्यामुळें एकाच दिवशीं त्यांना कोर्टाच्या बेअदबीकरितां दोन वेळां दोनशें रुपये प्रमाणें चारशें रुपये दंड ठोठावण्यांत आला. याचा परिणाम दुसरे दिवशीं बहुतेक सर्व तरुण वकिलांनीं गांधी टोपी घालून कोर्टांत जाण्याचा क्रम ठेवला. राजद्रोहाकरितां एकवर्ष भर त्यांचेकडून जामीन मागण्यांत आला. नातेवाईकांचे भिडेनें त्यांनीं तो दिला परंतु महिन्याभरांत जामीन रद्द करून त्यांनीं तुरुंगवास पत्करला. पुढें ते अधिकच जोमानें कॉंग्रेसच्या कामांत पडले व वकिली सोडून घेतलेली फकीरी आजवर त्यांनीं कॉंग्रेस व चरखा संघाकरितां कायम धरलेली आहे, व त्यांच्याबद्दल मुधोळच्या रयतांस अभिमान वाटत असल्यास तें योग्यच आहे.

श्री. विष्णु अनंत मसूरकर हे मूळ मुधोळचे, परंतु वडिलांच्या नोकरीनिमित्त ते मुधोळांत क्वचितच राहत. विजापुरास वकीली धंद्याकरितां गेले. परंतु तेथें त्यांचा जम बसला नाहीं. कांहीं वर्षें तेथें ते सरकारी वकिलाचे ऑनररी आसिस्टंट होते व मधून मधून मुधोळास एखाद्या दुसऱ्या कामा-

करितां येत असत. हवा पालटण्याकरितां म्हणून ते सन १९२४ सालीं येथें कांहीं महिने येऊन राहिले व त्या अवधींतील अनुभवानें मुधोळांतच धंद्याकरितां राहण्याचें त्यांनीं मुक्रर केलें. साध्या खादी पोषाखांतील या व्यक्तीबद्दल लोकांमध्ये उत्पन्न झालेल्या कुतूहलाचा परिणाम लवकरच त्यांच्याबद्दलच्या भक्तींत झाला. वतनी जमिनीची जप्ती व राजेसाहेबांच्या खासगी जमिनीचा खंड लँड रेव्हेन्यूप्रमाणें वसूल करण्याच्या वहिवाटीमुळें लोक जेरीस आले होते. राजेसाहेबांच्या धोरणाची सबब पुढें करून कोणी वकील अशा कामांत वकीलपत्र घेत नसत. धंद्यामध्यें उच्चनीचता किंवा राजा व प्रजा असा भेदाभेद करण्याचें कारण नाहीं; अशा तत्त्वावर गांजलेल्या प्रत्येक कुळातर्फे वकीलपत्र घेऊन राजेसाहेबांपर्यंत लोण पोंचविण्याचा सपाटा यांनीं सुरू केला. स्वार्थाकरितां कां असेना, परंतु यामुळें लोकांतील सुप्त निर्भयता व अन्यायाची चीड हीं जागीं होऊं लागलीं.

## महालिंगपूरचा लाठीहल्ला

जमखंडी संस्थानांत मुधोळाप्रमाणें बंदी नसल्यानें सन १९३० सालीं बनहट्टी वगैरे ठिकाणीं प्रभात फेऱ्या निघत. याचा परिणाम होऊन कांहीं तरुण कोष्ट्यांनीं महालिंगपूर व मुधोळ येथें प्रभात फेऱ्या काढण्यास सुरवात केली. आपल्या संस्थानांत कसलीही चळवळ नाहीं अशी बडेजाव सांगणाऱ्या राजेसाहेबांना लोकांतील हा उत्साह कसा सहन व्हावा? निरुपद्रवी वाटणाऱ्या या फेऱ्यांतून लोकजागृति होणार व नंतर ती थांबविणें जड जाणार हें राजेसाहेबानीं ताडलें; आणि महालिंगपुरास सभेचें निमित्त करून लोकांना दवाखान्याजवळील चौकांत जमविलें. आणि पोलीस, इन्फंट्री व गांवगुंड यांचेकडून ता. २०।८।१९३९ रोजीं लाठीहल्ला करविण्यांत आला. त्यामुळें लोकांना दहशत वाटूं लागली. या लाठीमाराचा गवगवा होऊं नये व लोकांचीं मनें दुसरीकडे गुंतावीं म्हणून त्यांनीं प्रदर्शन भरवण्याचा बेत केला, आणि कौजलगी बंधूंना त्यांनीं याकरितां मुद्दाम बोलावून घेतलें. लोखंड तापलें होतें; त्याला कांहीं आकार देण्याची ही संधि आहे हें जाणून कौजलगी बंधू, मसूरकर व सोन्नद यांनीं हात

सूत व खादीची योजना राजेसाहेबांपुढें मांडली. चळवळ्या लोकांचीं तोंडें बंद करावयाची ही सुसंधि राजेसाहेब तरी कशी दवडतील? बिनभाड्यानें स्वतःची इमारत, बिन व्याजी चार हजार रुपये आणि मंडळाचे सवाशें भाग (दहा दहा रुपयांचा एक भाग), दरमहा पाऊणशें रुपये प्रमाणें एक वर्षपर्यंत तज्ज्ञाचा पगार याप्रमाणें उदार आश्रय देऊन या योजनेला त्यांनीं सक्रिय आशीर्वाद दिला. राजेसाहेबांचा खुद्द संबंध आल्यामुळें या खादी कार्यास मदत करण्याकरितां जो तो पुढें येऊं लागला, आणि हां हां म्हणतां सहा हजार रुपयांचें भांडवल जमलें. श्रीयुत सोनद यांचे अध्यक्षतेखालीं सन १९३० मध्यें दसऱ्याच्या सुमुहूर्तावर खादीसंघाची रीतसर स्थापना होऊन लपत छपत चाललेली खादीची चळवळ उघड होऊं लागली. प्रारंभापासूनच मंडळास चरखा संघाची मान्यता मिळाल्यानें सर्व सूत चरखा संघ खरेदी करीत असे. खादी विणाविणें, रंगविणें, छापविणें वगैरे कामेंही येथेंच व्हावीं म्हणजे सूत कांतण्याप्रमाणें या कामाची मजूरी संस्थानांतच राहून बेकारांना काम मिळेल म्हणून महालिंगपुरांत मुद्दाम एक शाखा उघडण्यांत आली; परंतु तेथील कोष्टयांनीं याचा फायदा घेतला नाहीं. तेव्हां एक वर्ष भर नुकसान सोसून सदर केंद्र बंद करण्यांत आलें. सूत कांतण्याची मजूरी दरसाल दहा बारा हजार रुपये संस्थानांतील खेडूत बायांना खादी मंडळाकडून मिळूं लागली होती.

याच सुमारास श्री० मसूरकर यांची नेमणूक राजेसाहेबांनीं मुधोळ नगरपालिकेंत केली आणि त्याच वेळीं अध्यक्ष निवडण्याचा अधिकार नगरपालिकेस देण्यांत आला होता. नगरपित्यांनीं श्री. मसूरकर यांना एकमतानें अध्यक्ष म्हणून निवडलें. नगरपालिकेंतील निरुत्साही व भीतीचें वातावरण त्यांनीं आपल्या स्वतंत्र वृत्तीनें नाहींसें केलें. नगरपालिका ही सरकारनियुक्तांची असल्यानें तावडतोब निवडणूक करणेबद्दलचा ठराव मंजूर करून श्रीमंत राजेसाहेबांकडे तो पाठविण्यांत आला. नगरपालिकेचें उत्पन्न जेमतेमच असल्यानें घरपट्टी बसोवण्याकरितां मंजूरी मागण्यांत

आली. गरीबांना लागणाऱ्या जिन्नसावरील कर कमी करून चैनीच्या पदार्थांवरील कर चढविण्यांत आले. उत्पन्नाची वाढ होतांच, ड्रेनेज, रस्ते, वगैरे लोकोपयोगी कामें करविण्यांत येऊं लागलीं. म्युनिसिपालिटीची बाकी वसूलीकरितां योजिलेल्या उपायामुळें गांवांतील प्रतिष्ठितांची इतराजी श्री. मसूरकरांवर झाली. म्युनिसिपालिटीवर रयतअसेंब्लीची सत्ता असल्यानें व असेंब्लीचे अध्यक्ष श्री. गदगकर यांनीं श्री. मसूरकरांची बाजू उचलून धरल्यानें दोघांनाही गोत्यांत आणण्याचे अयशस्वी प्रयत्न झाले. शेवटीं याचा परिणाम म्युनिसिपालिटी असेंब्लीच्या हुकुमती खालून काढून पुन्हां दिवाणांच्या हुकुमतीखालीं देण्यांत झाला.

ब्रिटिश सत्ता कायम झाल्यानंतर संस्थानिक व त्यांचे हद्दींतील इनामदार यांचीं नातीं ब्रिटिश सरकारांनीं तहनाम्यानें ठरवून दिलीं असलीं, तरी अनुकूल वातावरणाचा फायदा घेऊन इनामदार व जहागीरदार यांच्या हक्कांवर अतिक्रमण करण्याची वहिवाट सर्वच संस्थानिकांनीं ठेवली आहे. लोकापूर व मुद्दापूर येथल्या देसगती फार प्राचीन. त्यांचे-कडून शेंकडा पंधरा टक्के जुडी घेण्याबद्दल पोलिटिकल एजंटाचे निकाल व पन्नास वर्षांची तशी वहिवाट. परंतु टाकाच्या एका फटकाऱ्यासरशी ही जुडी शेंकडा ३३ टक्के करण्यांत आली. दरबारकडे अर्ज करून चार-सहा वर्षें त्यांनीं प्रयत्न करून पाहिले; परंतु कांहीं दाद लागेना; तेव्हां मे. पोलिटिकल एजंटकडे त्यांनीं आपिलें केलीं. हे दोघेही देसाई ( मुद्दापूर व लोकापूर ) श्री. मसूरकरांचे नेहमींचे पक्षकार. त्यामुळें श्री. मसूर-करांच्याविरुद्ध कागाळी करण्यास चहाडखोरांना सुवर्णसंधि मिळाली.

सन १९३२ पासून संस्थानांतील वटहुकूम व त्याखालीं चाललेला धिंगाणा व अन्याय यासंबंधीं क्रमशः "संस्थानी स्वराज्यां"तून झणझ-णीत लेख येत असत. या लेखकाचा शोध करण्याचा पुष्कळ प्रयत्न झाला. सर्व सरकारी नोकर, वकील, पिटिशन रायटर्स वगैरेकडून त्यांच्या हस्ताक्षराचे नमुने पोलिसांनीं घेतले. या अपमानाविरुद्ध तक्रार एकानें

सुद्धां केली नाहीं. इतक्या अंशापर्यंत गुलामगिरीचा पारा चढला होता. लेखकाचा तपास लागेना तेव्हां याचें कर्तृत्व श्री. मसूरकरांशीं जोडण्याचा चंग त्यांच्या हितशत्रूंनीं बांधला. राजेसाहेबांनीं आपल्या कांहीं महत्त्वाच्या कामांत श्री. मसूरकरांस वकीली दिली होती, हें त्यांच्या हितशत्रूंना कसें सहन व्हावें? वरील दोघां देसायांविरुद्ध फिर्यादी घेण्यांत आल्या, आणि त्यांनीं जुडी व इतर हक्कांबद्दलचीं आपलीं अपीलें काढून घेतल्यानंतर सदर फिर्यादी निकालांत निघाल्या. दरबारनें सांगितलेल्या कांहीं बाबी कबूल केल्या नाहींत म्हणून चन्नाळ देशपांडे यांच्या जमिनी जप्त करण्यांत आल्या, व त्यांचेवर फिर्याद घेण्यांत आली. हेही मसूरकरांचे पक्षकार; आणि त्यांच्या सल्ल्यामुळेंच पाहिजे तशी कबुली ते देत नाहींत अशी समजूत राजेसाहेबांची करून देण्यांत आली.

वर्तमानपत्रांतून लेख येण्याचा क्रम चालूं होताच; इतकेंच नव्हे तर, मे १९३६ च्या सुमारास "मुधोळ संस्थानच्या प्रजेची करुण कहाणी" नांवाचें पूर्वीच्या कांहीं लेखांच्या संग्रहाचें लहानसें चोपडें प्रसिद्ध करण्यांत आलें. या सर्व कारस्थानाच्या बुडाशीं श्री. मसूरकर व त्यांचे स्नेही आहेत अशी राजेसाहेबांची समजूत करणाऱ्यांच्या प्रयत्नास या सुमारास यश आलें. श्री. मसूरकर व त्यांचे स्नेही श्री. विठ्ठलचंद यांचेवर १९३६ जुलैच्या सुमारास फिर्याद घेण्यांत आली. आणि चहूंकडून नाकेबंदी करण्याकरितां त्यांना मदत करणाऱ्या स्नेह्यांवर सुद्धां फिर्यादी झाल्या. संस्थानांतील वकिलांनीं वकीलपत्र घेण्याचें नाकारलें; आणि या सर्व गोष्टींचा बोभाटा वर्तमानपत्रांतून झाला. याचा परिणाम मात्र श्री. मसूरकरांस जाचक होऊं लागला.

श्री. मसूरकर यांचेवर खटला झाल्यानंतर त्यांनीं राजेसाहेबांची भेट घेतल्यावेळीं खरा न्याय मिळावा असें त्यांनीं राजेसाहेबांना सांगितलें. दयेची याचना न करितां न्याय मागितला हा एक गुन्हा त्यांनीं केला, असें राजेसाहेबांना वाटलें असें म्हणतात. या सर्वांचा परिणाम व्हावयाचा

तोंच झाला. “फोडा व झोडा” तत्त्वाचा उपयोग करून शेटजींना सोडण्यांत आलें, आणि मसूरकर यांस सश्रम कारावासाची दोन वर्षांची शिक्षा ठोठावण्यांत आली. हुजूरकडे तपासणीचें काम चाललें. तुरुंगांत पाठवावें, व जामीनावर सोडावें, असा क्रम चालू होता. एका प्रसंगीं कोर्टानें सांगितलें तरी, त्यांना हातबेड्या ठोकून तुरुंगांत नेण्याचें आणि जामीनावर सोडतांना बेड्यांसहित कैद्याच्या पोषाखांत तुरुंगांतून कोर्टांत आणण्यांत आलें. याशिवाय लोकांवर परिणाम व्हावा कसा व त्यांचेवर जरब बसावी कशी? श्री. मसूरकरांचे घरीं येणाऱ्या जाणाऱ्यांचीं नांवें पोलीस टिपून घेऊं लागले, तेव्हां कोणी त्यांचेकडे जाण्यास धजेना. यामुळें खटला चालल्या वेळेपासून श्री. मसूरकरांस एकांतिक कैदेचा अनुभव येऊं लागला. श्री. मसूरकर व त्यांचे स्नेही यांनीं चालवलेल्या निरुपद्रवी खादीच्या संस्थेमुळें जागृति व संघटना होत आहे आणि खेडेकऱ्यांची सहानुभूति मिळत आहे म्हणून तिचेवरही वक्रदृष्टि झाली आणि कांहीं भागीदारांकडून अर्ज येऊन ही संस्था बंद करण्यांत आली.

श्री. राजेसाहेबांच्या कारकीर्दींतील हा काळ दडपशाहीच्या कडेलोटाचा होता. या श्री. मसूरकरांच्या खटल्याच्या वेळीं बडे लाट व इंडिया ऑफिसपर्यंत प्रजेच्या गाऱ्हाण्यांचें व अन्यायी घटनेचें लोण पोंचविण्यांत आलें होतें. श्री. मसूरकर तुरुंगांत अडकले तरी “संस्थानी स्वराज्यां”तील लेख बंद पडले नाहींत; उलट जास्तच प्रखर येऊं लागले.

सन १९३७ एप्रिल ते नोव्हेंबर या दरम्यान कालचक्राची गति फारच झपाट्यानें चालली होती कीं काय न कळे! ता. ९-११-१९३७ रोजीं राजेसाहेबांनीं राजसंन्यास घेतल्याचें जाहीर केलें. हा राजसंन्यास घेतांना त्यांनीं प्रजजनांस उद्देशून जो जाहीरनामा काढला, त्यांत पुढीलप्रमाणें अर्थपूर्ण वाक्य होतें:—

“मनुष्यमात्रांचे हातून पदोपदीं अपराध हे होतातच; माझ्या या लांबलचक कारकीर्दींत तर पुष्कळच असे प्रसंग येऊन गेले असतील, तरी ते

आतां परस्परांनीं विसरून जाणें बरें. आपण आजवर माझ्यावर दाखविलेला प्रेमा पुढील कारकीर्दींतही मनोभावानें दाखवून त्याचें कार्य व सार्वभौम सरकाराचें ध्येय यशस्वी रीतीनें पार पाडाल अशी उमेद धरून मी आपला निरोप देतों."

आणि ह्या राजसंन्यास घेतल्यावर एका आठवड्याचे आंतच ता. २४-११-१९३७ रोजीं श्री. राजेसाहेब अगदीं अचानकपणें मुंबईस कालवश झाले. श्री. राणीसाहेब यांना रीजंटचे अधिकार दिल्यानें त्या मुधोळांतच होत्या. त्यांचेवर अकाली रीजन्सीची जोखीम पडली नाहीं, तोंच आकाशींची कुऱ्हाडही कोसळली.

श्री. राजेसाहेबांच्या ३२ वर्षांच्या राजवटीचें सिंहावलोकन संपूर्णपणें करणें आज इष्ट व शक्य नसलें, तरी त्याचें वर्णन थोडक्यांत असें करतां येईल कीं, त्यांनीं आपल्या तीक्ष्ण आणि तीव्र बुद्धिवैभवाच्या सामर्थ्याचा उपयोग प्रजेच्या हितासाटीं न करतां, कौशल्यपूर्ण दडपशाही करण्याकडे केला आणि मुधोळांतील राजकीय जीवन मारून टाकलें. मुधोळांतील राजकीय जीवन म्हणजे रखरखीत सहारा वाळवंट; आणि या सहारा वाळवंटांत क्वचित् कोठें दिसणाऱ्या पाण्याप्रमाणें, मुधोळांत एकादा मसुरकर जिवंत मनुष्यत्वानें भासमान होत होता. चहाडी आणि चुगलखोरीला राजाश्रय मिळाल्यामुळें सरळ कायदेशीरपणाच्या नांवाखालीं कोणावर कशी तोहमत येऊन कास्याचा नायटा होऊं शकेल याची सदैव भीति प्रत्येक मुधोळवासीयाच्यामध्यें वसत असे! हिंदुस्थानांत या गेल्या वीस वर्षांत खळबळीचें राजकारण झालें आणि संस्थानी मुलुखांतहि सुराज्याची आणि लोकशाहीची लाट आली. मुधोळापासून १२ मैलांवर असलेल्या जमखंडीस या लाटेनें तडाखा दिला, पण राजेसाहेबांच्या हयातीपर्यंत ही लाट मुधोळास स्पर्श करूं शकली नाहीं, हें आश्चर्याचें नव्हे काय? आणि याच लोकशाहीच्या लाटेनें राजेसाहेबांच्या मृत्यूनंतर तावडतोब सबंध संस्थानांत विलक्षण लोकजागृति व्हावी हाही कालमहात्म्याचा विचित्र खेळ नव्हे काय? इतरत्र संस्थानांप्रमाणें मुधोळांतही ता. २८-८-३० रोजीं

प्रातिनिधिक सभा स्थापण्याचें श्रेय घेतलें आणि या प्रातिनिधिक सभेस अधिकारही पण जास्त दिले. पण राजेसाहेबांनीं या प्रातिनिधिक सभेचें काम कांहींच होऊं नये अशीच एकंदर आंखणी केली होती. दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानांत दोन प्रजासप्ताह साजरे केले, पण त्याची 'विशेष' झळ येथें लागली असें म्हणतां येत नाहीं. 'विशेष' असें म्हणण्याचें कारण हें कीं, या सप्ताहांत नाहीं म्हणावयास कै. वामनराव पटवर्धनांचीं दोनदां व्याख्यानें झालीं. कै. वामनराव पटवर्धन आणि कै. श्री. राजेसाहेब यांचें गुरुशिष्याचें नातें असल्यामुळें ह्या व्याख्यानांस परवानगी दिली गेली; हें जरी खरें असलें, तरी या व्याख्यानास विशेष कोणी हजर रहाणार नाहीं, याबद्दलही सक्त कारवाई केली जाई ! ! असो. श्री. राजेसाहेबांच्या मृत्यूनंतर लोकांना सुटल्यासारखें झालें. चेंडू जितका जोरांत जमिनीवर आपटावा, तितक्या जोरांत तो परत उसळी घेतो, त्याप्रमाणें मुधोळांतील लोकांच्या दाबून धरलेल्या भावना उमाळून आल्या आणि राजेसाहेबांच्या पश्चात् संस्थानांतील प्रजापक्षीय चळवळीनें एकदम इतकें विशाल स्वरूप धारण केलें कीं, या संस्थानांतील चळवळ ही पुष्कळ वर्षें सतत चालू आहे असाच भास कोणासही व्हावा.

पुरुष आणि स्त्री ह्यांसंबंधीं आपण जेव्हां तुलना करितों, तेव्हां दया, वत्सलता वगैरे गुणांचा प्रकर्ष स्त्रियांमध्यें जास्त असल्याचें सांगण्यांत येतें. त्याचा अनुभव श्री. राणीसाहेब यांचे अमदानींत येऊं लागला. राजेसाहेबांच्या कारकीर्दीतील मिरवलेले भाई हे पूर्वसंचयीप्रमाणें सत्तेचें बळ दाखवण्यास गेले; परंतु बाजू अंगावर उलटून त्यांना कारावासाची शिक्षा झाली. रीजंट-पदारूढ होण्यापूर्वींही पुष्कळ बाबींचा भुलेबुरेपणा श्री. राणीसाहेबांना माहीत होता; आणि पदारूढ झाल्यानंतर साहजिकपणणेंच कांहीं गोष्टींबद्दलची माहिती त्यांना होत गेली. तुरुंगांत श्री. मसूरकरांची प्रकृति बिघडल्याचा गवगवा सन १९३७ डिसेंबर मध्यें वर्तमानपत्रांतून झाला व मुदत भरण्यापूर्वींच जानेवारी १९३८ मध्यें त्यांनीं श्री. मसूरकर यांची सुटका केली. सुटून आल्यानंतर मोडलेल्या खादी-

संस्थेचें पुनरुज्जीवन, लोकजागृतीकरितां कांहीं सामाजिक व विधायक कार्यक्रम यांबद्दलच्या वाटाघाटी सुरू झाल्या. प्रदर्शनाच्या निमित्तानें सल्लामसलतीकरितां मसुरकर-मित्रमंडळ बेळगांवास श्री. हणमंतराव कौजलगीकडे जाऊन आलें, परंतु तेथें नक्की कांहीं कार्यक्रम ठरला नाहीं. तथून परत आल्यानंतर नापीक असूनही कांहीं खेड्यांत वसुलीची सक्ती होत असल्याच्या कागाळ्या ऐकूं येऊं लागल्या. काँग्रेस अधिकारारूढ झाल्यामुळें ब्रिटिश हद्दींतील रयतेला मिळणाऱ्या सवलती आणि तेथल्या रयतांची जागृति याचा परिणाम ब्रिटिश हद्दीला लागून असलेल्या मंटूर गांवांतील श्री. बसप्पा तिमसानी, मल्लप्पा उत्तूर, वगैरेंवर झाला, व आपल्या गांवासंबंधीं दरबारकडे त्यांनीं सारातहकुबी मागितली. कांहीं झालें तरी सारा भरावयाचा नाहीं अशा निर्धारानें आपल्या गांवांतील रयतांची संघटनाही पण त्यांनीं केली. श्री. मसूरकर व सोन्नद यांच्या सल्ल्यानें हा प्रश्न त्यांनीं धसास लावला. वसूलीकरितां जप्त्या झाल्या पण त्याला लोक बधले नाहींत. इतक्यांत म्हैसूर व रामदुर्ग कडील प्रजापक्षीय-चळवळींची बातमी येऊं लागली. त्यानें मंटूरच्या रयतांना जास्तच हुरूप चढला. मंटूरची साथ आणखी कांहीं खेड्यांतून पसरली. बदलत्या कालांत दडपशाही उपयोगी नाहीं याची जाणीव असल्यानें मे. रेसिडेंट यांच्या सल्ल्यानें दरबारनें अखेर तहकुबी दिली; आणि जप्त्या खुल्या केल्या. रयतांनीं सामुदायिकपणें व धैर्यानें केलेल्या या चळवळीला पहिला "नैतिक विजय" मिळाला. त्यामुळें लोकांचा हुरूप वाढला. परंतु श्री. उत्तूर व तिमसानी यांना एवढ्यानेंच चैन पडेना. एवढ्यावरच चळवळ सोडावी तर झालेली जूट राहत नाहीं; दुसरें कांहीं काम हातीं घ्यावें अशासंबंधीं त्यांचा तगादा चालू होता. सांगली येथें दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेचें अधिवेशन होणार अशी बातमी प्रसिद्ध झाली. त्या निमित्तानें मुधोळचे वयोवृद्ध नागरिक व बागलकोटचे प्रसिद्ध वकील, गोविंदराव बेळगल यांचे अध्यक्षतेखालीं "लोकसभा" मुधोळांत स्थापण्यांत आली. डॉ. देसाई हे या सभेचे कार्यदर्शी झाले. श्री. सोन्नद,

महादेव घाटगे, लक्ष्मण बेळगांवकर, हणमंताचार्य कट्टी वगैरे मंडळी कार्यकारी मंडळावर होती. या संस्थेचें काम मोठ्या उत्साहानें चाललें, श्री. कणवूर वकील, बागलकोट यांचीं कांहीं खेड्यांतून व्याख्यानें झालीं; आणि लोक-जागृतीस जोरानें चालना मिळत गेली. ज्या मुधोळांत व्याख्यानाकरितां मिनतवारीनें लोकांना जमवावें लागत असे, तेथें आजूबाजूच्या खेड्यांतील लोक शेकड्यांनीं सभेकरितां गोळा होऊं लागले. सभाबंदीचा हुकूम असतांना सभा भरूं लागल्या. श्री. वल्लभभाई पटेल यांचे अध्यक्षतेखालीं भरलेल्या सांगलीच्या परिषदेस या संस्थानांतून बरीच मंडळी गेली. मुधोळ-संबंधींचीं गाऱ्हाणीं विषयनियामक मंडळींत मांडण्यांत आलीं. टीचभर क्षेत्राच्या संस्थानाच्या उत्पन्नाला इन्फंट्रीचा खर्च झेपत नसल्यानें इन्फंट्री काढण्याबद्दलचा ठराव परिषदेपुढें डॉ. देसाई यांनीं मांडला व सौ. सीता-बाई तिमसानी यांनीं त्याला अनुमोदन दिलें. मुधोळची एक स्त्री गाऱ्हाण्याला तोंड फोडते असें कोणी तीन वर्षांपूर्वीं सांगितलें असतें तर कोणी तें स्वप्नांतसुद्धां खरें मानलें नसतें. परंतु "कालमहिमा" कोणास कशी बुद्धि, प्रेरणा, किंवा धैर्य देईल हें सांगणें कोणासही शक्य नाहीं.

सांगली परिषदेच्या अधिवेशनानें लोकसभेच्या शाखा बहुतेक सर्व खेड्यांतून स्थापल्या गेल्या. परंतु वकील व पदवीधर सभासद होण्यास धजले नाहींत. श्री. गदगकर वकील हे यावेळीं रयत असेंब्लीचे अध्यक्ष होते. बदलता काळ व विचार याशीं मिळतें घेऊन काम करण्याचा त्यांचा कल दिसला नाहीं. तेव्हां असेंब्लीच्या ३०–३५ सभासदांनीं त्यांच्यावरील अविश्वासाच्या ठरावाची नोटीस त्यांना दिली. त्यांनीं राजीनामा दिला, आणि लोकहिततत्पर असे उत्साही खेडूत श्री.सोन्नद यांचे गळयांत अध्यक्षपदाची माळ पडली. याप्रमाणें प्रजेची चळवळ चोहोंबाजूंनीं फोफावूं लागली. लोकजागृतीकरितां रयतेच्या गाऱ्हाण्यांची यादी तयार करून खेड्यांतून "जबाबदार राजसत्ता" व "गाऱ्हाणीं-निराकरण" याकरितां प्रचारास सुरुवात झाली. रामदुर्गच्या नजीकतेमुळें लोकापूर व होसकोट या खेड्यांतून प्रभातफेऱ्या व सायंफेऱ्या, चहाबहिष्कार वगैरे कार्यक्रम होऊं

लागले. रामदुर्गची चळवळ शांत करण्याकरितां मे १९३८ मध्यें येथले दिवाण श्री. प्रधान यांची नेमणूक दोन महिन्यांकरितां तेथल्या दिवाणपदावर झाली. येथून रामदुर्गास जातांना थंड असलेलें येथलें वातावरण ते परत जुलैमध्यें आल्यावेळीं लोकजागृतीनें मुसमुसत होतें. वेळींच सामोपचाराचे उपाय केले नाहींत तर अखेर पस्तावण्याची पाळी येईल म्हणून त्यांनीं परत येतांच तावडतोब श्री. मसूरकर व सोन्नद यांचेशीं सामोपचाराच्या वाटाघाटीस सुरुवात केली. लोकापूर व होसकोट कडील प्रभात—सायंफेऱ्या कांहीं दिवस बंद करून वाटाघाटींकरितां शांत वातावरण निर्माण करावें असें त्यांनीं यांना सुचविलें. श्री. कोण्णूर, व मुदिगौडा यांनीं या दोघांच्या सूचनेप्रमाणें अत्यंत शिस्तीनें सर्व फेऱ्या बंद केल्या. श्री. सोन्नद व मसूरकर यांच्याशीं चर्चा करून प्रजेच्या किमान मागण्यांचें स्वरूप दिवाणांनीं समजून घेतलें. रेसिडेंटची मंजूरी मिळविण्याचा प्रयत्न त्यांनीं एकीकडे चालू केला, तर दुसरीकडे दरबारनें भेदनीति सुरू केली आणि त्याचा परिणाम ' शेतकरी संघ ' स्थापन होण्यांत झाला. पण त्यास विशेष पाठिंबा मिळाला नाहीं. याप्रमाणें रस्सीखेचीचा खेळ थोडा काल चालला. लोकसभेकरितां उत्साहानें व अविरत काम करणारे कार्यकर्ते होते; तर शेतकरी संघांत काम करणाऱ्यांचा दुष्काळ होता. दिवाणांनीं पुन्हां सामोपचाराची भाषा लोकसभेशीं करण्यास सुरवात केली. आपल्यास सल्ला देणेकरितां लोकसभेनें जुलै १९३८ च्या अखेरीस श्री. वामनराव पटवर्धन, रंगराव दिवाकर, हणमंतराव कौजलगी व वीरनगौडा पाटील यांना मुद्दाम पाचारण करून बोलावून घेतलें. श्री. कणबूरही यावेळीं येऊन मिळाले. श्री. वीरनगौडांच्या मध्यस्थीनें शेतकरी संघ लोकसभेंत सामील झाला आणि " प्रजासंघ " असें नवें सुटसुटीत नांव देण्यांत आलें. दोन संघांच्या एकरूपतेला बळकटी आणण्याकरितां शेतकरी संघापैकीं श्री. सालीमठ यांची निवड दरबारकडे पाठवावयाच्या शिष्टमंडळांत करण्यांत आली. प्रजासंघाचा याप्रमाणें दर्जा वाढला, तेव्हां

वकील मंडळी भराभर संघाचे सभासद होऊं लागली. तारीख ३१-७-३८ रोजीं लोकापूरकडील मंडळी राष्ट्रध्वज घेऊन गाणीं म्हणत येत असतांना मुधोळजवळ वाटेंत मुधोळच्या इन्फंट्रीनें त्यांना अडविलें; संस्थानच्या ध्वजापुढून राष्ट्रध्वज नेला तर, लष्करी नियमाप्रमाणें गोळीबार करावा लागेल असें सांगण्यांत आलें. सुरळीत चाललेल्या वाटाघाटींत हें एक नवें विघ्न उत्पन्न झालें. युनियन जॅकपुढून जाण्यास ज्या ध्वजाला साम्राज्य सरकार हरकत करीत नाहीं, त्याला एका छोट्या संस्थानांतील शंभर पायदळांच्या पलटणीनें हरकत करावी हें धाष्टर्याचें नव्हे काय? आलेल्या सर्व मंडळींना अडविल्या ठिकाणीं शांतपणें व शिस्तीनें बसून रहाण्यास सांगण्यांत आलें. या कामीं हार खावयाची नाहीं असा लोकांचा निर्धार व तेथें आलेल्या सल्लागारांचा पाठपुरावा दिसल्यावर राष्ट्रध्वज व संस्थानध्वज या दोन्हींचा उपयोग संस्थानी प्रजेनें करावा असें श्री. वल्लभभाईंनीं तेव्हां नुकतेंच म्हैसूरांत ठरवलें होतें, तोच मार्ग येथें मान्य करण्यांत आला; आणि मोठ्या थाटानें राष्ट्रध्वजानें मुधोळांत प्रथम प्रवेश केला. चळवळींतला हा दुसरा विजय होय. विघ्नें यावीं आणि लोकांच्या निर्धारानें तीं लयाला जावीं असाच क्रम चळवळीच्या प्रारंभापासून चालला होता. ता. १-८-३८ रोजीं सर्व खेड्यांतील लोकांना बोलावून घेण्यांत येऊन दरबारपुढें मांडावयाच्या मागण्या दोन दिवसांच्या वाटाघाटींनंतर मुक्रर करण्यांत आल्या. नंतर दरबारकडे पाठवावयाच्या शिष्टमंडळाची निवडणूक झाली, आणि श्री. मसूरकरांना शिष्टमंडळाचा नेतेपणा देण्यांत आला. सल्लागार पाहुण्यांसमवेत शिष्टमंडळानें मे. दिवाणसाहेब यांची भेट घेतली. सारा-कपातीची मागणी मंजूर झाल्याशिवाय इतर बाबींची चर्चा न करण्याची प्रजेची असलेली आज्ञा शिष्टमंडळानें दिवाणांना निवेदन केली. श्रीमंत रीजंट यांच्याशीं वाटाघाट करण्याकरितां मे. दिवाण-साहेबांनीं निरोप घेतला, आणि मंडळींनीं जाहीर सभेकडे प्रयाण केलें. सभा चालल्यावेळीं श्री. रीजंटसाहेबांनीं साराकपात मंजूर केल्याचें मे. दिवाणांनीं जाहीर केलें. चळवळीचा हा तिसरा विजय होय. यानंतर

## मुधोळ संस्थानांतील कार्यकर्ते



डॉ. ह. अ. देसाई, रा. भी. सोन्नद, वि. अ. मसुरकर



रा. त. कट्टी, भी. ह. वेळगल, ह. भी. कट्टी

आजरें तालुका सारावाढींतील कार्यकर्ते



बसलेले:-- श्री. रा. स. जोशी, दि वा. दिवेकर,
बा. वि. शिखरे, केशवराव परुळकर.
उभे:--बाबूराव आपटे.

इतर बाबींची वाटाघाट चालून नागरिक-हक्क तावडतोब मंजूर झाले आणि समेटानें ठरलेल्या इतर बाबींसंबंधीं तारीख ५–८–२८ रोजीं जाहीर सभा भरून जाहीरनामा जाहीर करण्यांत आला. पिकांची आणेवारी करण्याचें तत्त्व मान्य करण्यांत आलें, कानडी भाषा अधिकाऱ्यांनीं शिकावी आणि कोर्ट कचेऱ्यांत ती अनुसरली जावी असें ठरलें. याप्रमाणें देशांतील परिस्थितीमुळें येथील प्रजा-चळवळीला लवकरच गोड फळें आलीं.

अल्पयशानें हुरळून गेल्यानें असो, किंवा सतत कामाचा कंटाळा म्हणून असो, पण ऑगस्ट १९२८ मध्यें असलेला लोकांतील उत्साह व जूट हळूं हळूं कमी होऊं लागली. शिस्त नाहींशी झाली आणि बेकी वाढविण्याकरितां कामगार संघ नांवाचा पुन्हां एक सवता सुभा निर्मिला गेला.

डॉ. देसाई यांनीं अशा प्रतिकूल घटना होत असतांनाही गांधीसप्ताह, टिळक पुण्यतिथि, स्वातंत्र्यदिन, श्री. बाळराजे भैरवसिंह महाराजांचा वाढदिवस वगैरे कार्यक्रम प्रजासंघातर्फे उत्साहानें पार पाडले. संघांतील बेकीचा परिणाम असो अगर इतर कांहीं कारणें असोत, पण ऑगस्ट १९२८ मध्यें दिलेलीं सर्व आश्वासनें पुरीं झालीं नाहींत. असेंब्ली घटनेची दुरुस्ती मागें पडली; इतकेंच नव्हे तर, सन १९२९ मे मध्यें झालेल्या नव्या निवडणुकींत हुकुमी बहुमत मिळविण्याची दरबारी कारवाई करण्यांत आली. प्रजासंघानें श्री. हणमंतराव कौजलगी यांचे नेतेपणाखालीं श्री. सोन्नद व टंकसाली यांचें शिष्टमंडळ मे. रेसिडेंटकडे हें गाऱ्हाणें मांडण्याकरितां पाठविलें होतें.

सन १९३९ सालीं रोडावलेला व शिस्तीस पारखा झालेला संघ सन १९४० सालीं पुन्हां भरदार झाला आहे. संस्थान प्रजापरिषदेचें पहिलें अधिवेशन ता. १८-४-४० रोजीं डॉ. नागनगौडा यांच्या अध्यक्षतेखालीं यशस्वीपणें भरविण्यांत आलें. संघाची ही जूट कायम टिकून संस्थानांत जबाबदार राज्यपद्धतीचा लाभ करून घेण्याचें सुयश त्याला मिळो !

---

# आजरें तालुक्यांतील सारावाढीची चळवळ

लेखकः—आजरें येथील एक रयत.

कोल्हापूर संस्थान हें मराठ्यांस अभिमानास्पद वाटणारें संस्थान! पण आज त्या संस्थानचा दुर्लौकिक कशामुळें झाला आहे! हिंदवी स्वराज्य स्थापन करणाऱ्या पुण्यशाली श्रीशिवाजी महाराजांचे वंशज म्हणून कोल्हापूरचे छत्रपति मिरवितात, पण त्याच राजवटींत लोकांच्या मानवी स्वातंत्र्यावर व जन्मजात हक्कावर छत्रपतींनीं तिलांजलि दिली आहे. अशा छत्रपतींच्या एका पोट संस्थानांत झालेली सारावाढ-प्रतिकाराची चळवळ हीं निःसंशय तेथील जनतेस भूषणावह आहे यांत शंका नाहीं. कोल्हापूर संस्थानांत नऊ जहागिरी असून त्यांपैकीं इचलकरंजीच्या अधिपतींनीं तहकरारानुसार त्यांना मिळालेल्या अधिकारांच्या आणि हक्कांच्या जपवणुकीसाठीं कोल्हापूर दरबारशीं आजन्म केलेला लढा हा कोल्हापूरच्या इतिहासांत चिरकाल नमूद करण्यासारखा आहे. श्री. बाबासाहेब घोरपडे इचलकरंजीकर यांनीं आपली सर्व हयात कोल्हापूर दरबारशीं सामना देण्यांत खर्चली असं म्हटल्यास मुळींच अतिशयोक्ति होणार नाहीं. इचलकरंजीचे अधिपति सुविद्य आणि विद्वत्तेचे भोक्ते! त्यांनीं उच्च शिक्षणासाठीं निरनिराळ्या योजना केल्या आणि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या सार्वजनिक संस्थांना आपल्या दातृत्वानें उपकारबद्ध करून ठेवलें आहे. आपल्या जहागिरीचा कारभार सुधारण्यासाठीं त्यांनीं खूप खटपट केली आणि इचलकरंजीसारख्या गांवाला 'महाराष्ट्राचें मँचेस्टर' असा औद्योगिक क्षेत्रांत दर्जा प्राप्त करून दिला. पण ह्या सर्व गोष्टी करण्यासाठीं लागणाऱ्या पैशाची जेव्हां टंचाई पडली, तेव्हां आपल्या आजरें तालुक्यांत भरमसाट सारावाढ करून त्यांनीं असंतोषाचें बीज रोवलें. आजरें तालुक्याचा मुलूख कोंकण भागांत कोल्हापूरपासून ६० मैलांवर आहे. तेथील लोक अगोदरच गरीब, आणि शेतांतील निकृष्ट नाचणी व

भात हेंच काय तें एक त्यांचें निर्वाहाचें साधन ! त्याच एका साधनावर जेव्हां संस्थानी सत्तेचें आक्रमण झालें, तेव्हां गरीब शेतकरी रयतांत असंतोष निर्माण झाला असल्यास नवल नाहीं. पोटाला चिमटा बसणार असें दिसल्याबरोबर, शेतकऱ्यांना त्यांच्या त्या पैशापासून होणाऱ्या सुखसोयींची मातवरी न वाटली, तर त्यांत अस्वाभाविक तें काय आहे ? इचलकरंजी दरबारनें केलेल्या अन्यायी सारावाढीमुळें शेतकऱ्यांत अस्वस्थता पसरली आणि श्री. रा. स. जोशी यांच्या पुढारीपणाखालीं या शेतकऱ्यांनीं सारावाढीच्या प्रतिकारार्थ निशाण उभारलें. या सारावाढीच्या पूर्वीं दोन वर्षें मिरज संस्थानांत जी 'छोटी बार्डोली' झाली, तिचें विस्मरण श्रीमंत इचलकरंजीकरांना कसें झालें आणि त्यांच्यासारख्या विद्वान् व थोर अधिपतीनें आपल्या प्रजेचा तळतळाट कां घेतला हें एक त्यांच्या मित्रांनाही न उकलणारें कोडें झालें होतें.

इचलकरंजी संस्थानपैकीं आजरें तालुक्यांतील प्रमुख शहर आजरें हें इचलकरंजीपासून सुमारें साठ मैलांच्या अंतरावर आहे. या तालुक्यांत सुमारें ७० खेडीं आहेत. या तालुक्याची लोकसंख्या सन १८९१ मध्यें ३५८३१ होती, व सन १९२१ मध्यें ३२४१२ झाली म्हणजे तीस वर्षांत ३४१९ नें ती कमी झालेली आहे.

या तालुक्याची सारावाढीकरितां पहाणी चालली होती, त्यावेळीं तालुक्यांतील जनावरांची मुद्दाम खानेसुमारी करविण्यांत आली होती. त्यावरून असें आढळून आलें आहे कीं शेतीच्या उपयोगी पडणाऱ्या जनावरांची संख्या कमी झाली आहे. त्याचप्रमाणें घोडीं, तट्टें, मेंढ्या व बकरीं यांची संख्याहि पुष्कळच घटलेली आहे. बैलगाड्यांची संख्या मात्र बरीच वाढलेली आहे. याचा अर्थ असा आहे कीं शेतकरी शेतीचा धंदा सोडून मोलमजुरी किंवा भाडीं करून उपजीविका करण्याच्या मार्गाला विचारपूर्वक लागलेले आहेत. अशा प्रकारें निकृष्ट स्थितीस पोहोंचलेल्या तालुक्यांत १९३० सालीं सारावाढ करण्याचें धोरण जहागिरीनें जाहीर केलें, त्यामुळें शेतकरी व इतर वर्गामध्यें एकदम बरीच खळबळ

उडाली. सारावाढ होण्याचें निश्चित ठरल्यापासून निरनिराळ्या वृत्तपत्रांतून या सारावाढीविरुद्ध लेख येऊं लागले आणि इचलकरंजी दरबारनें सारावाढ करून लोकांचा असंतोष संपादूं नये अशी विनंति करण्यांत येऊं लागली. पण या प्रकट विनंतीचा कांहींच उपयोग झाला नाहीं. सारावाढीच्या समर्थनार्थ कांहीं लेख प्रसिद्ध होऊं लागले आणि वर्तमानपत्रांतून इचल-करंजी सारावाढीचा हा एक प्रमुख विषय होऊन बसला.

या तालुक्याची सारावाढ करणें निव्वळ अन्यायाचें आहे हें कोणीहि सुज्ञ मनुष्य कबूल करील. कारण या तालुक्याची कोणत्याहि प्रकारें भर-भगट झालेली नसून कांहीं ठिकाणीं तर सर्व्हे करून १५ वर्षेहि पुरीं झालेलीं नव्हती. सर्व तालुक्याचे सारावाढीबरोबर याहि ठिकाणची सारा-वाढ होणार आहे अशी दाट वदंता होती.

बागलाण, पालघर, वसई येथील स्थानिक लोकांनीं व रयतेच्या इतर हितचिंतक पुढाऱ्यांनीं तेथें नवीन होणाऱ्या अन्याय्य सारावाढीविरुद्ध जी नेटाची चळवळ चालविली, त्यामुळें मुंबई सरकारला थोडी तरी माघार घेणें भाग पडलें होतें. बार्डोलीची ठेंच चांगलीच लागल्यामुळें यापुढें तरी तशी चूक पुनः होऊं नये म्हणून बार्डोली व चौराशी तालुके खेरीज करून इतर तालुक्यांत सारावाढ अमलांत आलेली नाहीं. त्याठिकाणीं 'नवीन कायद्याच्या अनुरोधानें वाढविलेल्या साऱ्याची फेर-तपासणी होईपर्यंत नवीन वाढ अमलांत येणार नाहीं' असें मुंबई सरकार-कडून जाहीर करण्यांत आलें होतें. हें आश्वासन देण्यांत आलेलें असलें तरी अखेरीस सरकार काय करणार याची कल्पना या आश्वासनावरून करतां येण्याजोगी नसल्यामुळें, सारावाढीविरुद्ध पद्धतशीर चळवळ करणेसाठीं, ता. २३–७–२९ रोजीं पुणें येथें 'मुंबई इलाखा शेती संघ' स्थापन करण्यांत आलेला होता. या सर्व बाहेरील घडामोडींचा परिणाम आजऱ्यांतील रयतांवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. आजऱ्यांतील रयतहि अस्वस्थ झाले होते. आजरें तालुका संस्थान हद्दींत असल्यामुळें 'मुंबई इलाखा शेती संघा'च्या कार्यक्षेत्रांत त्याचा समावेश होऊं शकला नाहीं.

आजऱ्याच्या सारावाढीविषयीं इतकी वाटाघाट व चर्चा वर्तमानपत्रांतून चालूं असतांहि, संस्थानची आजऱ्यावर सारावाढ लादण्याची तयारी सुरूं होतीच. आजऱ्याच्या सारावाढीच्या चौकशीचें काम पुरें झालें असून, थोडक्याच दिवसांत रिपोर्ट बाहेर पडावयाचा होता. चळवळ करून दाद लावून घेण्याची वेळ हीच होती.

म्हणून या सारावाढीविरुद्ध चळवळ करण्यास सुरवातीपासून स्वार्थ-त्यागपूर्वक खटपट करणारे रयतांचे पुढारी श्री. रामचंद्र सखाराम जोशी यांनीं एक अर्ज तयार करून, त्यावर रयत लोकांच्या सह्या घेऊन, तो अर्ज श्रीमंतांकडे पाठवावा व दाद लावून घ्यावी असा निश्चय ठरविला. सत्याग्रहाच्या तत्त्वाला अनुसरून आपल्या लोकबलाच्या कुवतीप्रमाणें अगदीं किमान मागणी त्या अर्जामध्यें केलेली होती. ही साधी मागणी श्रीमंतांनीं कबूल केली असती. तर लोकांचा विश्वास व प्रेम संपादन करण्याची सुवर्णसंधि त्यांना मिळाली असती. विजयादशमीच्या सुमुहूर्तानें जो हा अर्ज श्रीमंतांकडे पाठविण्यास तयार झाला तो असा:—

"आजरें तालुक्याच्या रि० सेटलमेंटची मुदत १९३० सालीं पुरी होत असून त्यानंतर नवीन वाढ अमलांत येणार असल्याचें समजतें, व त्याप्रमाणें चौकशीचें कामही पुरें होत आलें आहे. सध्यां बऱ्याच ठिकाणीं सारावाढीचें काम सुरूं आहे. बार्डोली, बागलाण, पालघर, वगैरे ठिकाण-च्या सारावाढीविरुद्ध लोकांनीं जी चळवळ केली, त्यामुळें त्यांतील बऱ्याचशा अन्यायाच्या गोष्टी पुढें येऊन मुंबई सरकारलाही आपलें धोरण बदलणें भाग पडलें आहे. पालघरचे श्री. छोटालाल ऑफ व मुंबई सरकार यांचेमध्यें जो पत्रव्यवहार झाला त्यांतील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे.

**श्री. छोटालाल यांचे पत्रांतील सारांश**

'मुंबई इलाख्यांत विशेषतः ठाणें व नाशीक या जिल्ह्यांत सारावाढी-संबंधीं चळवळ चालूं आहे. सरकारचें अन्याय्य धोरण व बेफिकीरपणा यांमुळें ही चळवळ उत्पन्न झाली आहे.........सरकारनें शेतकऱ्यांवर

डोईजड सारा बसविण्याचें धोरण चालविलें आहे. त्यायोगें शेतकरीवर्ग नामशेष होऊन सर्व शेतकरीवर्ग मजूर बनेल. बागलाण, मालेगांव, पालघर, देवगड, व वसई या तालुक्यांतील सेटलमेंट रिपोर्ट गव्हर्नरांनीं पाहिले तर ते एकाच धर्तीवर व आधारावर तयार केले आहेत असें आढळून येईल. हे आधार अगदींच पोरकट आहेत व त्याकरतां गोळा केलेली माहिती अपूर्ण व अविश्वसनीय आहे. ब्रूमफील्ड कमिटीच्या रिपोर्टांत हीच गोष्ट दर्शविलेली आहे. ब्रूमफील्ड कमिटीनें कांहीं नवीन शोध लावला असें नाहीं. कारण बार्डोलींत जी पद्धत अमलांत आली तीच सर्वत्र आहे. बार्डोलीप्रमाणें इतरत्र सत्याग्रह होत नाहीं, येवढ्यावरून तेथल्या फेरपाहण्या बरोबर आहेत असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. पण बार्डोलीसारखा झगडा करतां येत नाहीं या त्यांच्या दुर्बलतेचा सरकारनें फायदा घेऊं नये व त्यांच्यावर जबर आकारणी करूं नये. या धोरणानें तेही सत्याग्रहास प्रवृत्त होतील.........लँड रे० कोडांत लोकांच्या इच्छेप्रमाणें फेरबदल करून सरकार व लोक यांच्यांत सलोखा उत्पन्न करण्याची हीच वेळ आहे.'

## वरील पत्रास गव्हर्नरांनीं पाठविलेलें उत्तर

'......तूर्त या परिस्थितीसंबंधानें सरकारचे हेतु काय आहेत हें आपल्याला व इतरांना कळविण्यांत येत आहे. पुढें कौन्सिलांत या संबंधाच्या धोरणाचा सविस्तर खुलासा होईलच.........( जमीन महसुलासंबंधीं ) नवीन बिल अजून तयार झालें नाहीं. येत्या कौन्सिलाच्या बैठकीपुढें तें मांडण्याचा शक्य तितका प्रयत्न करण्यांत येत आहे. मात्र योग्य व प्रगतीपर धोरणावर हें बिल तयार झालें अशी सरकारची खात्री होईपर्यंत तें कौन्सिलापुढें मांडण्यांत येणार नाहीं......दरम्यान बार्डोली व चौराशी तालुक्यांखेरीज इतर ज्या तालुक्यांत साऱ्याची वाढ जाहीर करण्यांत आली नाहीं, त्या तालुक्यांच्या रि. सेटलमेंट्स अमलांत आणाण्याचा सरकारचा विचार नाहीं. या सेटलमेंट्सचा आतां पुढें येणाऱ्या

नव्या तत्त्वानुसार पुन्हां विचार होईल; आणि ज्या तत्त्वांवर व आधारावर या सेटलमेंट्स करण्यांत आल्या तीं तत्त्वें व आधार नव्या बिलास अनुसरून नसतील तर तेवढ्यापुरती पुन्हां पाहणी करण्यांत येईल व तोंपर्यंत वाढ आकारण्यांत येणार नाहीं. कायदा लवकर पुढें न आल्यानें हल्लीं सुरूं असलेल्या सेटलमेंटसूचे बाबतींत लोकांना जी चिंता वाटत आहे ती दूर होईल असें गव्हर्नरांस वाटतें.'

"वरील पत्रांत व ता. २२ जुलै रोजीं केलेल्या मुंबई कौन्सिलांतील भाषणांत ना. गव्हर्नरांनीं जमीनमहसुलाबाबतचा प्रचलित कायदा व पद्धति सदोष असल्याचें स्पष्ट कबूल केलें असून मुंबई कौन्सिलमध्यें नवीन निर्दोष असें बिल लोकांच्या म्हणण्याप्रमाणें पास होईपर्यंत ठिकठिकाणची सारावाढ तहकूब करण्यांत आल्याचें जाहीर केलें आहे; व नवीन कायद्याप्रमाणें फेरपाहणी करण्याचें आश्वासनही दिलें आहे.

"ज़मीनमहसुलाबाबतचा सध्याचा कायदा, पद्धति, व मूलभूत तत्त्वें सदोष आहेत ही गोष्ट मुंबई सरकारनें कबूल केली असल्यामुळें, व जमीन महसुलाबाबतचा कायदा ब्रिटिश हद्द व संस्थान हद्द या दोन्ही ठिकाणीं सारखाच लागूं असल्यामुळें, सध्यां सुरूं असलेली आजरें तालुक्याची फेरपहाणी ही सदोषच असणार हें उघड आहे. मुंबई कौन्सिलमध्यें जे कायदे पास होतील व वेळोवेळीं त्यांत जे फेरफार होतील ते तसेच संस्थानमध्येंही लागूं करावयाचें असल्यामुळें पुढें मुंबई कौन्सिलमध्यें जमीनमहसुलाचें जें नवें बिल येणार आहे, तें पास होऊन तिकडे त्याची अंमलबजाणी होईपर्यंत सध्यां सुरू असलेली आजरें तालुक्याची सारावाढ तहकून ठेवण्यांत यावी व तसें जाहीर करण्यांत यावें आणि नवीन कायदा लोकमतानें पास झाल्यानंतर त्या नवीन कायद्याच्या अनुरोधानें आजरें तालुक्याची फेरपाहणी करण्यांत यावी अशी नम्र विनंति आहे."

लोकांनीं या अर्जावर सह्या करूं नयेत म्हणून अधिकाऱ्यांनीं आटोकाट प्रयत्न केले तथापि या अर्जावर दोनशेंपेक्षां अधिक सह्या झाल्या, व तो अर्ज श्रीमंतांकडे रवाना झाला.

रयतांच्या किमान मागणीचा व महाराष्ट्रांतील प्रमुख वर्तमानपत्रांच्या अशाच प्रकारच्या प्रेमळ व हितपरिणामी विनंतीचा परिणाम श्रीमंतांच्या मनावर मुळींच झाला नाहीं. उलट अर्जावर सह्या वगैरे कशा होणार नाहींत याचीच काळजी घेण्यास अधिकारी चुकले नाहींत. यासंबंधी 'केसरी'नें पुनः एकवार श्रीमंत बाबासाहेब यांना इषारा दिला. केसरीनें ता. २२-२-३० च्या अंकांत म्हटलें आहे कीं:

"रयतेच्या अर्जाचा विचार करण्याचा श्रीमंतांचा मानस नाहीं, इतकेंच नाहीं तर त्या अर्जाविरुद्ध संस्थानचे कारभारी, फौजदार, पोलीस यांच्यामार्फत खटपट करून, गरीब लोकांना धाकदपटशा दाखवून क्वचित् प्रसंगीं कोंडून ठेवून, झालेली सारावाढ योग्य आहे, आमची तिला संमति आहे अशा आशयाचे अर्ज करवून घेण्यांत येत आहेत असें खात्रीलायक माहितीवरून समजतें. वास्तविक पाहिलें तर प्रजेची मागणी एवढीच आहे कीं, मुंबई सरकारनें नवीन धारावाढ तहकूब केली आहे, त्याप्रमाणें ती संस्थानांतहि थांबविण्यांत यावी. परंतु स्वतःच्या भलत्याच इज्जतीस वळी पडल्याकारणानें ही साधी, आपल्या प्रजेचीच विनंति मान्य न करितां, धारावाढ आतांच कायम करून टाकण्याची मनीषा श्रीमंतांनीं कां धरावी हें समजत नाहीं. कांहीं हजार रुपये श्रीमंतांच्या तिजोरींत पडतील हें खरें असलें, तरी त्याकरितां सदैव एकनिष्ठ असलेल्या प्रजेच्या डोक्यावर जास्त कर लादून व प्रजेचा तळतळाट घेऊन श्रीमंत आपल्या वृद्धपणांत कोणचें हित साधणार आहेत याचा त्यांनींच अजून एकवार शांत चित्तानें विचार करावा."

एकंदर परिस्थितीचा विचार करितां यापुढें आजरें तालुक्यांतील सारावाढीचें भवितव्य काय होणार आहे हें सर्वांना सहज समजण्यासारखें होतें. रयत वर्ग निराश न होतां, चळवळीचा उत्साह त्यांच्यामध्यें शिरून, शिस्त, संघटना व हाल सोसण्याची तयारी हे गुण त्यांच्या ठिकाणीं प्रादूर्भुत होऊं लागले होते. याच संधीस आजऱ्याचे

मामलेदार सेवानिवृत्त झाले व त्यांच्या जागीं रा. सा. कापशीकर यांची नेमणूक झाली. आपल्या अर्जांचा विचार होत नाहीं असें पाहून आपलें गाऱ्हाणें श्रीमंतांच्या कानापर्यंत घालण्याकरितां व बाहेरच्या जगांतहि तें वेशीवर टांगण्याकरितां जाहीर सभेंतून आपल्या मागणीचा पुनरुच्चार करीत रहाण्याचें लोकांनीं ठरविलें. त्याप्रमाणें बेळगुंदी येथें तेथील शेतकऱ्यांची जाहीर सभा श्री. रामचंद्र सखाराम जोशी यांच्या अध्यक्षतेखालीं भरून खालील ठराव पास करण्यांत आला:—

" सध्यां आजरें तालुक्याच्या फेरतपासणीचें काम सुरू असल्याचें दिसून येतें. वार्डोलींतील शेतकऱ्यांच्या मागणीवरून मुंबई सरकारनें जी चौकशी कमिटी नेमिली होती, त्या कमिटीच्या शिफारसीवरून जमीन-महसुलाचा प्रचलित कायदा सदोष असल्याचें दिसून आल्यानें, नवीन कायदा करण्याचें ठरवून तो मुंबई कौन्सिलमध्यें पास होईपर्यंत ठिक-ठिकाणच्या फेरपहाण्या तहकूब ठेवण्यांत आल्या आहेत. तरी श्रीमंत सरकारनींहि मुंबई सरकारप्रमाणेंच सध्या सुरुं असलेली आजरें तालु-क्याची फेरतपासणी तहकूब ठेवावी व तसें जाहीर करण्यांत यावें, आणि मुंबई सरकारचा नवीन कायदा पास होऊन तिकडे त्याची अंमल-बजावणी झाल्यानंतर त्या कायद्याच्या अनुरोधानें आजरें तालुक्याची फेर-तपासणी करावी अशी श्रीमंत सरकार नारायणराव बाबासाहेब घोरपडे जहागिरदार, इचलकरंजी यांचे चरणीं या सभेची नम्र विनंति आहे."

हा ठराव श्रीमंतांकडे पाठविण्यांत आला, पण लोकांच्या अर्जांची जी वाट लागली, त्याच दिशेनें हा ठरावहि गेला असल्यास नवल नाहीं. शेंकडों लोकांच्या सह्यांचे अर्ज, जाहीर सभा व त्यांत पास झालेले ठराव, वर्तमानपत्रांच्या सूचना, संस्थानाबाहेरील थोर लोकांच्या विनंत्या, आणि अनेक तज्ञ गृहस्थांचा सल्ला या सर्वांस धाब्यावर बसवून, श्रीमंतांनीं धारा-वाढ करण्याचें शेवटीं ठरविलेंच. रयतांच्या पुढाऱ्यांशीं चार गोड शब्द बोलण्याच्या दृष्टीनेंच श्रीमंत बाबासाहेब यांनीं श्री. रामचंद्र सखाराम

जोशी यांना मुलाखत दिली. पण त्याचा उपयोग दोन्ही पक्षांना फारसा झाला नाहीं.

या सारावाढीच्या बाबतींत श्रीमंतांनीं पहिली गोष्ट जर कोठली केली असली, तर ती म्हणजे सारावाढ शें. ३३ टक्क्यांवर जाऊं दिली नाहीं ही होय. लँड रेव्हेन्यु कोडानें कमाल मर्यादा ३३ टक्के घालून दिलेली आहे, त्याच्या आंतच आपली सारावाढ असली तर टीकेला पात्र होण्यापासून तितकेच वांचलों, असा विचार करून श्रीमंतांनीं २१·५ टक्के सारावाढ केल्याचें प्रथम ता. १९-२-३० रोजीं जाहीर केलें.

संस्थानकडून सारावाढ जाहीर झाल्यानंतर लोकपक्षानें आजरा तालुक्याच्या रयतांची प्रजापरिषद् बोलावून आपली मागणी त्या परिषदेच्या द्वारें एकमुखानें व जबाबदारीनें करावी असा प्रयत्न सुरू झाला. आपल्याच प्रजेची आपल्याच तालुक्यांत प्रजापरिषद् भरविण्यास संस्थानिक कशा अडचणी उत्पन्न करितात हें सर्वांना विदित आहेच. अशा अटी घालून परवानगी द्यावयाची कीं, त्यामुळें परिषद् भरवूनहि ती निरुपयोगी व्हावी ! आजरे तालुक्यांतील रयतेच्या पुढाऱ्यांनीं प्रजापरिषद् भरविण्यास परवानगी मागण्याचें ठरवून तसा अर्जहि गुदरला. त्या अर्जास जें नमुनेदार परवानगीवजा उत्तर आलें आहे, त्यावरून अधिकाऱ्यांच्या धोरणाची कल्पना करतां येईल. तें उत्तर ता. २०-२-१९३० चें पुढीलप्रमाणें होतें:—

"तुम्ही आजरे तालुक्यांतील रयत, वतनदार, इनामदार लोकांचे पुढारी म्हणवून घेत आहां; त्याबाबतींत आजरें तालुक्यांतील निरनिराळे भागांतील लोकांचे जाबजबाब होऊन आले आहेत, त्यावरून पहातां तुमचेवर रयत व इतर लोकांचा विश्वास असल्याचें अगर तुम्हीं आरंभिलेल्या प्रयत्नास त्यांचा पाठिंबा आहे, असें झालेल्या तपासावरून दिसून येत नाहीं. तथापि रयत लोक व इतर प्रजाजन यांच्या कांहीं तक्रारी असतील, तर त्या सनदशीर मार्गानें कळविणेबद्दल सभा भरविण्यास संतोषानें परवानगी देण्यांत येत आहे. मात्र सभेमध्यें ब्रिटिश सर-

कार, करवीर सरकार आणि इचलकरंजी संस्थान यांच्या विरुद्ध अप्रीति, द्वेष, तिरस्कार, अगर असंतोष उत्पन्न होईल अथवा जातीजातींमध्यें वैमनस्य उत्पन्न होईल अशीं भाषणें करणेचीं नाहींत व सभेला अध्यक्ष संस्थानचा प्रजाजन असावा असे शर्तीवर परवानगी देण्यांत येत आहे. तुम्ही अर्जीत राजकीय सभेस परवानगीची जरूर नाहीं असें लिहिलें आहे. परंतु सदरहू बाबतींत १९२१ सालीं जाहीरनामा प्रसिद्ध झालेला आहे. कळावें. ”

अशा या जहागिरीच्या विचित्र हुकुमाप्रमाणें परिषद भरविणें व तीहि संस्थानी हद्दींत भरविणें रयतांना इष्ट वाटेना. इचलकरंजी संस्थानांतील प्रतिष्ठित लोकपुढाऱ्यांना संस्थान कोणत्या तऱ्हेनें वागवितें याचा नमुना किंवा प्रत्यंतर वरील हुकमामध्यें दिसून येण्यासारखें आहे. पुण्याच्या ‘संस्थानी स्वराज्या’नें या अरेरावी हुकमावर ता. २८-२-१९३० च्या अंकांत मार्मिक टीका केली आहे. सदर पत्र म्हणतें कीं, “या तऱ्हेचा जबाब इचलकरंजी संस्थानच्या जबाबदार अधिकाऱ्यांकडून लोकांस देण्यांत यावा ही मात्र मोठी शरमेची गोष्ट आहे. डि. मॅजिस्ट्रेट यांनीं परिषदेची परवानगी मागणाऱ्या लोकांना ‘तुम्ही लोकांचे पुढारी म्हणवून घेत आहां’ असें वर्णन आपल्या उत्तरांत करावें ही अत्यंत गैरशिस्त गोष्ट आहे. प्रजापरिषद भरविणाऱ्या लोकांवर रयतेचा विश्वास नसल्यास ते परिषदेस हजर रहाणार नाहींत, हें उघडच आहे. असें असतां संस्थानच्या अधिकाऱ्यांना प्रजापरिषद भरविणारे लोक हे लोकांच्या विश्वासाचे पुढारी आहेत किंवा नाहींत याची चौकशी करण्याचा लांडा कारभार करण्याचें मुळींच कारण नव्हतें. हा नसता कारभार करून त्याची जाहिरात इचलकरंजीच्या अधिकाऱ्यांनीं द्यावी ही मात्र चमत्कारिक गोष्ट आहे. इचलकरंजी संस्थानांत इंडियन पिनल कोड लागू आहे, तेव्हां प्रजापरिषद भरविणाऱ्या लोकांस डि. मॅजिस्ट्रेट यांच्या उत्तरांत इं. पि. कोडांतील १२४ अ व १५३ अ या कलमांची जाणीव करून देण्याचें कारण होतें असें आम्हांस मुळींच वाटत नाहीं. संस्थानच्या प्रजापरिषदेचा अध्यक्ष संस्थानचा प्रजाजन असावा अशी एक शर्त

इचलकरंजी संस्थानच्या डि. मॅजिस्ट्रेटच्या उत्तरांत आहे. श्री. बाबासाहेब यांच्या गेल्या तीस वर्षांच्या खटपटीनंतर सुद्धां अद्याप त्यांना संस्थानी प्रजाजनांपैकींच लोक संस्थानांतील सर्व अधिकाराचे जागीं नेमण्यास मिळत नाहींत व इचलकरंजी संस्थानच्या अशा जाहिराती—अशा जागां-करितां अर्ज मागविण्याच्या—वर्तमानपत्रांतून अद्याप वारंवार प्रसिद्ध केल्या जात आहेत. संस्थानच्या हक्कांचीं भांडणें भांडण्याकरितां श्रीमंतांना हजारों रुपये फी भरून इचलकरंजी संस्थानांबाहेरील अनेक काळ्या-गोऱ्या लोकांची मदत घ्यावी लागत आहे; असें असतां इचलकरंजी संस्थान प्रजापरिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारून मोफत मार्गदर्शकाची जबाबदारी शिरावर घेणारा एकादा दयार्द्र अंतःकरणाचा परस्थ गृहस्थ इचलकरंजी संस्थानच्या प्रजेस मिळाल्यास त्याची मदत प्रजेनें घेऊं नये अशी अट अधिकाराच्या जोरावर गरीब प्रजेवर लादणें हें श्री. बाबासाहेब यांना किंवा विलायतेची सफर करून आलेल्या तरण्याबांड 'परस्थ' डि. मॅजिस्ट्रेटास कसें शोभतें हें आम्हांस समजत नाहीं."

डि. मॅजिस्ट्रेटनें घातलेल्या अटींमुळें, रयतांच्या पुढाऱ्यांना प्रजापरिषद् भरविणें योग्य होईल असें वाटलें नाहीं. कारण एरव्हीं साधी एकादी सार्वजनिक सभा भरविण्याचा प्रयत्न केल्यास अधिकाऱ्यांच्या गुंडगिरीची मजल कोठपर्यंत जाऊं शकेल याचा अनुभव पुढाऱ्यांना चांगला आलेला होता. त्या बाबतींत महाशिवरात्रीच्या मुहूर्तावर जो प्रकार लोकांना पहावयास मिळाला, तो या ठिकाणीं सांगितल्यास अनाठायीं होणार नाहीं. रामतीर्थ नांवाच्या देवालयाच्या ठिकाणीं शिवरात्रीला यात्रा जमते. तेथें रयतेच्या तक्रारी लोकांना समजून सांगण्यासाठीं सर-कारी परवानगीप्रमाणें सभा भरविण्याचा कांहीं मंडळींचा विचार होता. त्याप्रमाणें मॅजिस्ट्रेट वर्ग १ ला कळवूनहि ठेविलें होतें. सरकारी रीतीनें रयतेची ही सभा लोकांच्याकडूनच उधळून लावण्याचा प्रयत्न सुरू असल्याचें पुढाऱ्यांना कळलें होतें. त्यामुळें दूरवर विचार करून त्या

दिवशीं ती सभा भरविण्याचा विचार त्यांनीं रहित केला होता. पण ही गोष्ट सभा मोडूं पहाणाऱ्यांना माहीत नसल्यामुळें त्यांनीं त्या कामासाठीं झपाट्यानें रिक्रूट-भरती केली. आसपासच्या गांवांना स्पेशल मोटारी पाठवून जबाबदार व बेजबाबदार लोकांच्या टोळया जमविल्या; स्थानिक वक ‍ , व्यापारी वर्गालाहि सक्तीच्या राजीखुषीचीं आमंत्रणें गेलीं. लोकांची जमवाजमव करण्याचे कामीं माजी मामलेदार आपटे व सध्यांचे फौजदार मे. देसाई यांनीं विशेष खटपट केली. अशी सर्व तयारी सरकारी रीतीनें झाल्यामुळें पांच-सातशें लोक तेथें शेतकऱ्यांची सभा उधळण्यासाठीं सहज जमूं शकले. शेवटीं शेतकऱ्यांचे पुढारी सभा भरवीत नाहींत असें पाहून निराश झालेले गुंड, सारावाढ त्यांना योग्य व मान्य आहे अशा अर्थाच्या आरोळ्या मारूं लागले. इतक्यांत सारा-वाढीच्या विरुद्ध तक्रारी करण्यासाठीं भरून पाठवावयाचे छापील अर्ज श्री. जोशी हे वांटूं लागतांच त्यांचा दंड धरून त्यांना अचकटविचकट बोलण्यास गुंडांनीं कमी केलें नाहीं. श्री. जोशी यांच्याशीं झालेली वाग-णूक अत्यंत उपमर्दकारक व कोणाहि सभ्य माणसास चीड आणणारी होती. त्या ठिकाणीं सभेचा देखावा करून सारावाढ कशी योग्य आहे या विषयीं कांहीं गृहस्थांचीं व्याख्यानें सुरू झालीं. अशा विषम परिस्थितींत देखील आपल्याला बोलावयास मिळाल्यास व आपलें बोलणें शांतपणें लोकांना ऐकतां आल्यास, श्री. जोशी यांना वाटलें कीं, आपल्या कार्याच्या न्याय्यपणामुळें व सात्त्विकतेमुळें लोकांचीं मनें आपल्याकडे आकर्षित करणें कठीण नाहीं. त्याप्रमाणें रा.जोशी यानीं बोलण्यास सुरवात केली व त्यांच्या बोलण्याचा योग्य तो सुपरिणाम श्रोत्यांच्या मनावर होऊं लागला. हें पहातांच गुंडांनीं आरडाओरडा सुरूं केला व जमलेल्या लोकांची निराशा झाल्यामुळें ती सभा उधळली गेली.

अधिकाऱ्यांनीं अशा प्रकारचें विचित्र धोरण स्वीकारलें, तरी तक्रारी-अर्ज लोकांपर्यंत पोंचवून त्यांना ते समजावून देऊन त्यांच्या सह्या त्या

अर्जावर घेण्याचें काम लोकपुढारी व त्यांचे मदतनीस यांनीं नेटानें चालूं ठेविलें होतें. आणि या तक्रारी-अर्जावर लोकांनीं सह्या देऊं नयेत अशाबद्दल बऱ्यावाईट सर्व उपायांचा अवलंब अधिकाऱ्यांनीं केला.

नवीन एक तक्रार-अर्ज तयार करून त्याच्यावर सुमारें ७००-८०० लोकांच्या सह्या झाल्या व तो अर्ज अधिकाऱ्यांकडे पाठविण्यांत आला. या अर्जाला अधिकारी काय उत्तर देतील याची कल्पना रयतांना नव्हती असें नाहीं. तथापि, सर्व सनदशीर मार्ग आपल्याकडून आपण चोखाळावेत, अमुक एक करावयाचें राहून गेलें अशी मळमळ आपल्या मनांत राहूं नये एवढ्याकरितां हा सर्व खटाटोप रयतांनीं केला होता. सारावाढ जाहीर झाल्यानंतर नियमाप्रमाणें तक्रारी करण्यास वगैरे ज्या मुदती व सवलती लोकांना मिळावयाच्या असतात, त्याबाबतचा हा अर्ज असल्यामुळें कायदा उगाळून प्याल्याशिवाय, हा असा फेटाळून लावून भागणार नाहीं, त्याप्रमाणें कांहीं तरी तजवीज करावीच लागेल अशा कल्पनेनें हें पाऊल पुढें टाकलेलें होतें. हा अर्ज खालीलप्रमाणें होता—

( १ ) "मुंबई इलाख्यांतील जमीन महसुलाची पद्धतीच आजरें तालुक्यांतही अंमलांत आहे. मदरहू पद्धती सदोष असल्याचें मुंबई सरकारनें स्पष्ट कबूल केलें असून निर्दोष अशी एक नवीन पद्धती तयार करणेचें ठरविलें आहे. व ती तयार होईपर्यंत ठिकठिकाणच्या फेरपाहण्या तहकूब ठेवण्यांत आल्याचें जाहीर केलें आहे.

"मुंबई सरकारप्रमाणेंच श्रीमंत बाबासाहेबांचेकडून आजरे तालुक्याची फेरपाहणी तहकूब ठेवली जाणें न्याय, नीति व सद्सद्विवेकबुद्धि यांस धरून आहे व अशी त्यांना विनंतिही करण्यांत आली आहे. पण त्याचा अद्याप कांहीं विचार झाल्याचें दिसून येत नाहीं; तरी त्याचा विचार होईपर्यंत यापुढील सर्व काम तहकूब ठेवण्यांत यावें. शिवाय ज्या पद्धतीप्रमाणें आजरें तालुक्याची फेरपाहणी करणेंत आलेली आहे, ती पद्धतिच सदोष ठरलेली असल्यामुळें ही फेरपाहणी उघडच चुकीची ठरत

आहे. अशा चुकीच्या फेरपाहणीचा अंमल करणें न्यायाचें होणार नाहीं. तरी केलेली फेरपाहणी रद्द करून मुंबई सरकारची जमीनमहसुलाची नवीन पद्धति तयार झाल्यानंतर तिच्या अनुरोधानें पुनः फेरपाहणी करण्यांत यावी.

"आमची वरील तक्रार अगदीं कायदेशीर आहे. तशी ती नाहीं, असें थोडा वेळ जरी मानलें तरी आजरें तालुक्याच्या सांप्रतच्या स्थितीच्या दृष्टीनें विचार करतांही आतां सारावाढ करणें वाजवी होणार नाहीं. कारणः—

( २ ) आजरे तालुक्यांतील जमिनीवरील सध्यांचाच आकार जमिनींतील उत्पन्नाचे मानानें वाजवीपेक्षां फार जास्ती आहे. त्यांत वाढ झाल्यास ती असह्य होणार आहे.

( ३ ) तारीख १९-२-३० रोजीं प्रसिद्ध झालेल्या प्राथमिक जाहीरनाम्यांत सुचविण्यांत आलेले दर इतके जबर आहेत कीं, तितके जबर दर सर्व कोल्हापूर इलाखा, बेळगांव जिल्हा, व सर्व दक्षिणी संस्थानें यांमध्यें कोठेंही नाहींत, हें सुचविण्यांत आलेल्या दराची तेथील दराशीं तुलना करून पाहिल्यास सहज दिसून येणार आहे. सुचविण्यांत आलेले दर अमलांत आल्यास आमची अगदीं भयंकर स्थिति होणार आहे.

( ४ ) सेकंड रिव्हिजन सेटलमेंटसाठीं जमिनीची मोजणी करण्यांत आलेली नाहीं, त्यामुळें जमिनीच्या पूर्वीच्याच प्रती यापुढेंही तशाच कायम राहणार आहेत. पूर्वीच्या मोजणीचे वेळीं प्रती लावतांना कैक ठिकाणीं कमी प्रतीच्या जमिनीची जास्त प्रत लावण्यांत आलेली आहे. वास्तविक कमी प्रतीच्या जमिनीची जास्त प्रत लावण्यांत आल्यामुळें जो जबर आकार सध्यां निष्कारण द्यावा लागत आहे तसाच तो यापुढेंहि द्यावा लागणार आहे. अशानें कैक लोकांची कायमची नुकसान होणार आहे. तरी जमिनीची प्रत्यक्ष मोजणी करण्यांत यावी.

( ५ ) आजरें तालुक्यांतील सर्व व्यवहार मराठीमध्यें चालतो. बहुजनसमाज अडाणी व निरक्षर असून इंग्रजी भाषेचें ज्ञान असणारे लोक तर

फारच कमी आहेत; असें असतांना सेटलमेंट ऑफिसरसाहेबांचा रिपोर्ट मात्र इंग्रजीमध्यें आहे. त्यामुळें बहुतेक लोकांना त्यांत काय लिहिलें आहे हें मुळींच माहिती नाहीं. तरी तो रिपोर्ट मराठी भाषेंत छापवून लोकांचे माहितीसाठीं प्रसिद्ध करण्यांत यावा व रिपोर्ट मराठी भाषेंत प्रसिद्ध झाल्या तारखेपासून दोन महिनेपर्यंत तक्रारी करणेस मुदत देण्यांत यावी.”

वास्तविक या अर्जाचा कायदेशीर विचार होऊन लोकांच्या तक्रारींचा विचार अधिकाऱ्यांनीं केला असता तर चळवळीस एका प्रकारें निराळीच दिशा लागली असती. पण या अर्जाचा विचार झाला नाहीं. उलट दडपशाही करण्याची तयारीच मात्र झाली होती.

तक्रारी अर्ज रयतांना समजावून सांगून त्यावर सह्या घेण्याचें काम लोकपक्षाचे पुढारी करीत होते व त्यांच्या मागोमाग अधिकारी व कांहीं गुंड लोक गांवोगांव फिरत होते. ज्यांनीं ज्यांनीं तक्रारी अर्जावर सह्या केल्या आहेत त्यांच्याकडून उलटे अर्ज करून घेण्याचें काम करीत मामलेदारसाहेब गांवोगांवीं भटकूं लागले होते. त्यांच्या अर्जांत पुढील आशयाचा मजकूर असे : ‘श्री. जोशी आमचे गांवीं येऊन एका छापील अर्जावर सह्या घेऊन गेले. अर्ज आम्हांस वाचून दाखविण्यांत आला नाहीं. हा अर्ज गांवास शाळा मिळण्याबद्दलचा व पाण्याची सोय करण्याबद्दलचा आहे असें ते म्हणाले. म्हणून आम्हीं सह्या केल्या. सारावाढ करण्यास आमची संमति आहे.” अर्जावर सह्या घेतांना मामलेदारसाहेबांना पोलीसची मदत घ्यावी लागली.

जागृत झालेले शेतकरी, तोंड आ पसरून पुढें उभें असलेलें आर्थिक संकट आणि अधिकाऱ्यांचें दडपशाहीचे धोरण या तीन गोष्टी एकत्र झाल्यानंतर त्यांतून रयतांची एक संघटना निर्माण होण्यास किती वेळ लागणार आहे ? एकदां ही संघटना निर्माण झाली तर दडपशाहीच्या

आघातामुळें ती संघटना अधिकाधिक वाढेल व दृढतर होत जाईल अशी पुढाऱ्यांची अटकळ होती व ती अगदीं बरोबरच होती.

ता. १९-४-३० रोजीं आजरें येथें श्री. रामचंद्र सखाराम जोशी यांचे घरीं गांवांतील प्रमुख मंडळींची सभा भरून 'आजरें तालुका प्रजा-सभा' स्थापन करण्यांत आली. सभेच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष श्री. केशव सीताराम परुळेकर व चिटणीस श्री. रामचंद्र सखाराम जोशी यांना सभेनें निवडून दिलें. त्याशिवाय कार्यकारी मंडळाचे आणखी पांच साधारण सभासद म्हणून निवडले गेले होते. यापुढील सर्व चळवळ आजरें तालुका प्रजासभेच्या या कार्यकारी मंडळाच्यामार्फत चालविली गेली आहे. श्री. दि. वा. दिवेकर, संपादक 'मराठा' पुणें व मिरजेचे सुप्रसिद्ध पुढारी श्री. बा. वि. शिखरे यांच्यासारखी विद्वान् व अनुभवी मंडळी प्रजासभेच्या सल्लागार मंडळाला लाभली. या दोन पुढाऱ्यांना प्रजासभेनें निमंत्रण दिलें व त्यांच्या व्याख्यानाकरितां परवानगीचा अर्ज अधिकाऱ्यांकडे गुदरला. त्याचप्रमाणें आजरें तालुक्याच्या सारावाढीचा लढा सनदशीर मार्गानें अखेरपर्यंत लढविणेचा उद्देश असल्याचेंहि जाहीर करण्यांत आलें.

प्रजासभेच्या निमंत्रणाप्रमाणें श्री. बा. वि. शिखरे हे ता. २६-४-३० रोजीं आजऱ्यास येऊन दाखल झाले. परंतु त्यांच्या व्याख्यानास अधि-काऱ्यांनीं बंदी केली. व्याख्यानास बंदी झाली असली तरी त्यांच्याशीं खाजगी स्वरूपांत वाटाघाट करण्यासाठीं आजऱ्याहून दोन मैल अंतरावर असलेल्या मुरुडे गांवीं आजूबाजूच्या ४।५ गांवचे लोक जमणार होते. ही बातमी अधिकाऱ्यांना समजतांच रातोरात शिपाई पाठवून सर्व गांवची नाकेबंदी करण्यांत आली व श्री. शिखरे यांना भेटणेकरितां कोणीहि जाऊं नये अशी सक्त ताकीद देण्यांत आली. परंतु अधिकाऱ्यांच्या ताकिदीला न जुमानतां सुमारें १०० मंडळी तेथें जमली होती. श्री. शिखरे हे तेथें जातांच वरील मंडळी त्यांचे सभोंवती गोळा झाली व

त्यांच्याशीं बोलण्यास सुरवात करणार तोंच फौजदारसाहेब दहाबारा पोलिसांसह दौडत तेथें आले व सर्व लोकांना तेथन निघून जाण्याबद्दल सांगूं लागले. त्यावेळीं श्री. बापट इनामदार यांनीं आपण सभा भरविणार नसून फक्त खाजगी चर्चा करणार आहोंत असें सांगितलें. परंतु 'कोण-त्याहि प्रकारें श्री. शिखरे यांना मी बोलूं देणार नाहीं, तुम्हांस जरूर पडल्यास परवानगी काढा व नंतर बोला' असें फौजदारानें सांगितलें. यावर श्री. शिखरे यांनीं 'खाजगी जागेंत खाजगी रीतीनें वाटाघाट कर-णेस तर आपली हरकत नाहीं ना ?' असा प्रश्न केला. त्याला '१०–५ मंडळीपेक्षां जास्त मंडळी आपण कोठेंहि जमूं देणार नाहीं; कारण तसा मला हुकूम आहे' असें फौजदारांनीं उत्तर दिलें. श्री. शिखरे यांनीं फौजदारकडे तसा लेखी हुकूम मागितला. लेखी हुकूम देतां येत नाहीं असें उत्तर देऊन पुनः जमलेल्या लोकांना निघून जाण्याबद्दल फौज-दारांनीं सांगितल्यामुळें सर्व मंडळी तेथून उठून दुसरीकडे गेली. श्री. शिखरे आजरें येथें येणार आहेत, ही हकीकत हस्तपत्रकांच्या द्वारें आगाऊ जाहीर करण्यांत आलेली होती, त्यामुळें त्यांना भेटणेसाठीं निर-निराळ्या खेड्यांतून सुमारें १५०–२०० मंडळी आली होती. परंतु गांवचे चारी बाजूंस नाकेबंदी करण्यांत आलेली असल्यामुळें त्यांना श्री. शिखरे यांची भेट घेतां आली नाहीं. गांवाबाहेरूनच पोलिसांकडून सर्व लोकांना परत पाठविण्यांत आलें. एकदोन गांवच्या सुमारें ४०-५० मंडळींनीं श्री. शिखरे यांना भेटण्याचा फारच हट्ट धरला, परंतु त्यांना पोलिसांनीं गांवांत येऊं दिलें नाहीं. श्री. शिखरे यांना भेटण्याकरितां ही मंडळी तास दीडतास उन्हांत बसून राहिली होती. ही हकीकत श्री. शिखरे यांना समजतांच ते स्वतः तेथें गेले आणि सभेस किंवा खाजगी वाटाघाटीस परवानगी नसल्यामुळें आतां आपापल्या घरीं निघून जाण्यास त्यांनीं लोकांना सांगितल्यावर लोक निघून गेले.

ता. २९-४-३० रोजीं रवळनाथच्या मंदिरांत एका व्यापारी जमिनदा-राच्या अध्यक्षतेखालीं सभा भरवून त्यांत ( १ ) ब्रि. इंडियामध्यें चालू

असलेल्या मिठाचा सत्याग्रह वगैरे चळवळीबद्दल निषेध व्यक्त करण्याचा, (२) सारावाढ तहकूब व्हावी म्हणून प्रयत्न करणाऱ्या पुढाऱ्यांवर व त्यांनीं 'आजरे तालुका प्रजा सभा' म्हणून जी सभा स्थापन केली आहे त्यावर आमचा विश्वास नसल्याचा, आणि (३) सारावाढीविषयीं तक्रारी असतील त्या योग्य अधिकाऱ्यामार्फत श्रीमंत सरकारपुढें मांडणेबद्दल व श्रीमंतांनीं त्याचा सहानुभूतिपूर्वक विचार करावा अशी विनंति करणेबद्दलचा, वगैरे ठराव पास करून घेतले. या सभेची हकिकत जहागिरीच्या सेक्रेटरींनीं प्रमुख वृत्तपत्रांचेकडे पाठविली, या एकाच गोष्टीवरून ही सभा लोकमत-निदर्शक कशी नाहीं तें उघड होत आहे.

आतांपर्यंत झालेली चळवळ चळवळे लोकांनीं घडवून आणलेली आहे, त्यांत रयतांचा खरा भाग नाहीं, रयतांना सारावाढ कबूल आहे, अशा प्रकारची समजूत श्रीमंतांची करून देण्याचा प्रयत्न अधिकारी वर्गाचा चालूं आहे असें कानावर आल्यामुळें त्याबद्दल श्रीमंतांना भेटून खुलासा केला पाहिजे असें रयतांच्या पुढाऱ्यांना वाटूं लागलें. रयत व त्यांचे पुढारी यांनीं वाटाघाट करून असें ठरविलें कीं सवड असेल त्या सर्वच रयतांनीं श्रीमंतांच्या भेटीस जावें. त्याप्रमाणें 'आजरें तालुका प्रजासभे'चे चिटणीस श्री. रामचंद्र सखाराम जोशी यांच्या सहीनें 'जाहीर विनंति' प्रसिद्ध करून सर्व रयतांना निमंत्रण केलें गेलें.

श्रीमंतांची भेट रयतांना मिळूं नये असा प्रयत्न अधिकारीवर्गाकडून होण्याचा संभव आहे हें जाणूनच प्रजासभेच्या चिटणीसांनीं रयतांना दोन दिवसांच्या अन्नसामुग्रीसहित येण्यास विनंति केली होती. प्रजासभेच्या ऑफीसमध्यें ठरलेल्या दिवशीं कोणत्याहि गांवच्या रयतांनीं जमूं नये अशी खटपट अधिकाऱ्यांनीं करण्यास कमी केलें नाहीं. ज्या त्या गांवचे लोक जेथल्या तेथेंच अडकवून ठेवण्याचा प्रयत्न तर झालाच, पण त्याशिवाय आजरें गांवाची नाकेबंदीहि व्यवस्थित केली गेली होती. सरकारी बंदोबस्त इतका झाला तरी रयत लोक श्रीमंतांच्या भेटीकरितां एकत्रित

झालेच. एका जमावानें रयत लोक माधवगिरीकडे कूच करूं लागले. या एकजमावानें जाणाऱ्या रयतांशिवाय आणखी कित्येक गांवचे लोक पोलिसांना चुकवून स्वतंत्रपणें टोळयाटोळयांनीं माधवगिरीचा रस्ता चालूं लागले होते. आघाडीच्या एका टोळीनें आगाऊ जेथें जाऊन मक्काम केला होता. तेथें श्रीमंतांची स्वारी आली व त्यांनीं त्यांना परतविण्याचा प्रयत्न करून पाहिला, पण तो व्यर्थ गेला. माधवगिरीपासून सुमारें दोन मैलांपर्यंत आलेल्या रयतांच्या जमावाला तेथेंच वाटेंत भेट देऊन मागें परतवावें या बुद्धीनें श्रीमंतांनीं तेथपर्यंत जाऊन भेट दिली व 'मी तुम्हांला झेपेल इतकीच सारावाढ करितों. तुम्ही काळजी करूं नका, तुम्ही परत जा, चळवळे लोकांच्या नादाला तुम्ही लागूं नका,' वगैरे उपदेश केला; पण रयतांनीं सरळ जवाब दिला कीं, "महाराज, हल्लीं आहे हा साराच आम्हांला डोईजड झाला आहे, तोच कमी झाला तर बरें होईल. अशा परिस्थितींत नवीन सारावाढ आपण कां करीत आहां? आमची दैना एकदां समक्ष पाहून आपण समजून तरी घ्या."

श्रीमंतांनीं परत थोडासा खुलासा करून तेथून प्रयाण केलें. आपली मागणी खरोखर अंतःकरणापासूनची आहे, केवळ चळवळे लोकांच्या चिथावणीनें ती उभारलेली नाहीं आणि आपले पुढारीहि खरोखर आपल्या कल्याणाकरितां झटत आहेत, एवढें एकदां समक्ष श्रीमंतांना सांगण्याचा हेतु साध्य झाल्यामुळें लोक तेथून परत फिरले.

एकंदरींत आजरा तालुक्यांतील सारावाढीविरुद्ध रयतांनीं उभारलेलें निशाण फडफडूं लागलेलें श्रीमंतांनीं नीट ओळखलें; व दडपशाहीनें तें निशाण खालीं वांकविलें जाणार नाहीं, या गोष्टी श्रीमंतांना स्पष्ट दिसल्यावर आपल्या संस्थानची शक्ति व बुद्धि व एक प्रकारची अधिक विकट अथवा नाजुक परिस्थिति लक्षांत घेऊन त्यांनीं एकदम ५० टक्के सारावाढ उतरविण्याचें ठरविलें.

पण सारावाढ ५० टक्के कमी करतांना श्रीमंत इचलकरंजीकर यांचें मन हेलकावे खात होतें आण त्या आंदोलनाच्या परिस्थितींत त्यांना या

चळवळीच्या पुरस्कर्त्यांवर टीका करण्याचा मोह आवरला नाहीं. सारावाढ कमी करण्याच्या या हुकुमांत त्यांनीं ३० वर्षांत सारावसुलीला कधीं त्रास पडला नाहीं हें सारावाढीच्या समर्थनार्थ श्रीमंतांनीं दिलेलें कारण कोणासही मान्य होण्यासारखें नाहीं. आजऱ्याच्या पुढाऱ्यांबद्दल तक्रार करून परस्थ कार्यकर्त्यांचा आणि वृत्तपत्रांचा पाठिंबा मिळाल्याबद्दल त्यांनीं तक्रार केली. ५० टक्के सारावाढ रद्द करतांना कोर्ट-फी स्टॅम्प, प्राप्तीवरील कर, व इतर रयतेवर न पडणारे कर बसवावे लागतील अशी भीति त्यांनीं घातली. त्यामुळें ही सारावाढ कमी करण्याच्या औदार्यांतील स्वारस्य त्यांनीं कमी केलें असें नाईलाजानें म्हणावें लागतें.

सारावाढीच्या मूळ शिफारसीनें ५३ खालसा खेड्यांमध्यें रु. १५७००. अथवा २१·७ टक्के उत्पन्न वाढणार होतें, तें आतां या पन्नास टक्के सुटीनें रु. ७७३२–११–० वाढणार आहे. त्याचप्रमाणें १७ इनाम खेड्यांमध्यें एकंदर सारावाढ रु. ३९९२ अथवा २०·९ टक्के झाली होती, ती आतां या घटीनंतर रु. १८८१-३-० किंवा ९·८ टक्के होण्याचें ठरलें.

श्रीमंतांच्या या जाहीरनाम्यानंतर चळवळीला आतां कोणतें वळण लागतें याकडे सर्वांचे डोळे लागून राहिले होते. शेतकऱ्यांमधील असंतोष कमी होणें तर शक्य नव्हतेंच, कारण ही सारावाढ देखील त्यांना डोई-जडच होती. पण संस्थानाबाहेरील लोकांना असें वाटणें सहाजिक होतें कीं, आठ आणे सारा कमी झाला, आतां शेतकऱ्यांनींहि समजंस-पणा दाखविला पाहिजे. परंतु मुळींच सारावाढ न करण्यासारखी किंब-हुना पूर्वींचा सारा थोडा कमी करावयास पाहिजे, अशी आर्थिक स्थिति असतांना इतकी तरी सारावाढ कशी सहन होईल ? प्रत्यक्ष पोटाला चिमटा बसत असला तर समेटाचा असला साळसूद उपदेश लोकांना कसा रुचावा ? तथापि रयतांनीं व रयतांच्या पुढाऱ्यांनीं दूरवर विचार करून व बखेडा न माजावा या शुद्ध हेतूनें ही १०॥ टक्के वाढीची योजना तूर्त मान्य करून त्या वर्षीचा सारा भरण्याची तत्परता

दाखविण्याचें जाहीर केलें. मात्र जमीनमहसुलाची नवीन पद्धति मुंबई सरकारकडे तयार झाल्यास तिच्या आधारानें आजरें तालुक्याची फेरपाहणी करण्याचें आश्वासन श्रीमंतांकडून आगाऊ जाहीर करण्यांत यावें असें मागणें केलें. त्यांतहि कांहीं अडचण उत्पन्न झाल्यास स्वतंत्र चौकशी कमिटी नेमून फेरतपासणी व्हावी अशी मोकळीकहि ठेवण्यास रयत विसरले नाहींत.

वरील नवीन अर्जावर सुमारें एक हजार सह्या झालेल्या होत्या. हा अर्ज श्रीमंतांकडे ता. २-११-३० रोजीं रवाना झाला. या अर्जाच्या उत्तराची वाट पहाण्यांत एक महिना गमवावा लागला. मुंबई सरकारच्या भावी विलाप्रमाणें आजरें तालुक्याची फेरपहाणी करण्याचें अथवा त्या विलास अक्षम्य विलंब लागण्याचा संभव दिसल्यास स्वतंत्र चौकशी कमिटी नेमून तिच्यामार्फत फेरतपासणी करण्याचें आश्वासन श्रीमंतांनीं दिलें असतें तर हा झगडा तात्पुरता व कदाचित् पुढें कायमचाहि थांबला असता, असें आम्हांस वाटतें. पण गरीब रयतेवर विजय मिळविण्याची महत्त्वाकांक्षा व हौस पूर्ण झाल्याचें समाधान श्रीमंतांना मिळालें नसतें! वरील अर्जाचें उत्तर ता. १ डिसेंबरचे आंत जाहीर व्हावें अशी जी मागणी त्यांत केली गेली, त्यानें हा सत्याग्रहाचा 'हरिः ॐ' आहे अशी जहागिरीस भीति वाटूं लागली.

या संधीस रयतांवर दुसरें एक संकट उत्पन्न झालें. धान्याचे भाव एकदम चोहोंकडेच निम्यानें उतरले. आतां या नवीन परिस्थितीमुळें श्रीमंत आमच्या दैन्याचा विचार केल्याशिवाय कसे रहातील अशी आशा रयतांना उत्पन्न झाली. या आशेमुळें रयतांनीं ता. १०-१२-३० रोजीं पुनः आणखी एक अर्ज श्रीमंतांकडे पाठविला. श्रीमंतांच्या हातापाया पडून आपलें भक्काळ गेलेलें पोट अर्जाच्या द्वारें श्रीमंतांना दाखविण्याचा हा रयतांचा शेवटचा प्रयत्न होता असेंच म्हणावें लागतें. अर्ज तयार झाला व तो सर्व खेड्यांतून सह्या होऊन येण्यास फिरूं लागला, त्यावेळींच

प्रजासभेच्या संघटनेचें जिवंत दृश्य श्रीमंत व अधिकारी यांच्या दृष्टीस पडलें. या नवीन अर्जावर १२०० लोकांनीं सह्या केलेल्या होत्या. या अर्जांत ' सर्व्यां धान्यांचे भाव जवळजवळ निम्यानें उतरलेले असल्यामुळें जुना आकारही दरसालप्रमाणें चालूं ( डिसेंबर ) महिन्यांत भरणें आम्हांस सर्वस्वी अशक्य झालेलें आहे. तरी नवीन वाढीचा अंमल चालू सालीं करण्यांत येऊं नये व जुना आकार मार्च १९३१ पर्यंत भरणेस मुदत देण्यांत यावी ' अशी विनंति करण्यांत आली होती.

आजऱ्याच्या परिस्थितीचें वर्णन ज्ञानप्रकाशच्या वातमीदारानें कर-तांना आजरें तालुक्यांतील सात आठ गांवें करबंदीपर्यंत चळवळ नेतील अशी शंका प्रदर्शित करून नवीन पोलिसचौक्या स्थापन करण्याच्या योजना संस्थाननें हातीं घेतल्या आहेत असें लिहिलें होतें. पुढें श्री. वा. वि. राजवाडे, कारभारी, यांनीं ता. १५-१२-३० रोजीं पुढील जाहीरनामा प्रसिद्ध केला:—

"चालू सालचा जमीन महसूल देण्याचा हप्ता सुरू झाला असून कांहीं चळवळे लोकांचे शिकवणीवरून मौजे मजकूर येथील लोकांनीं गांव कामगार यांजकडे सरकारी सारा जमा न करणेचा कट केला आहे असें आमचे नजरेस आलें आहे. सबब सदरहू गांवांतील, सरकारास महसूल देणाऱ्या जमिनीच्या सर्वसाधारण कसणारांस कळविण्यांत येतें कीं, आपापल्या ताब्यांत असलेल्या जमिनीचा सरकारी सारा गांव कामगार यांजकडे अगर आजरे मामलेदार यांचे कचेरींस जमा केल्याखेरीज त्यांनीं आपले जमिनींत उभें असलेलें पीक ( अद्याप कापलें नाहीं त्यांनीं ) रा. रा. मामलेदार ता. आजरे यांस लेखी सूचना देऊन ती पोंचल्याची पावती मिळाल्याखेरीज तें कोणी काढूं नये अगर त्याची मळणी करूं नये.

"(२) ज्यांनीं यापूर्वी पीक कापलें असेल त्यांनीं तें आपल्या जमिनींतून अगर ज्या दुसरे ठिकाणीं तें ठेविलें असेल त्या ठिकाणांहून रा. रा. आजरे

मामलेदार यांची लेखी परवानगी घेतल्याखेरीज नेऊं नये अगर दुसरी-कडे विकूं नये.

( ३ ) सदरहू प्रकारचें कोणतेंहि पीक गैरकायदेशीर रीतीनें कापण्याची किंवा काढून नेण्याची मनाई करण्यासाठीं जरूर तितके रखवालदार ठेविण्यांत येतील व त्यांचा पगार जमीनमहसुलाप्रमाणें तुमचेकडून वसूल करण्यांत येईल."

या वरील नोटिसीमुळें आजऱ्यांतील परिस्थिति निराळेंच वळण घेईल अशीं चिन्हें दिसूं लागलीं. पण कदाचित् परिस्थिति जास्त बिघडेल, अशी भीति जहागिरीस वाटूं लागून समेटाची कारवाई सुरू होऊन आजरें तालुका प्रजासभेच्या चिटणिसांची मदत घेण्याची खटपट केली. श्रीमंतांच्या चिटणिसांनीं प्रजासभेच्या चिटणिसांना विनंति करून रयतांना कोवाडी गांवीं जमविण्याची मसलत दिली. प्रजासभेच्या चिटणिसांना वाटलें कीं, श्रीमंतांनीं कांहीं समारोपचाराचें धोरण स्वीकारलें असावें आणि, म्हणूनच त्यांनीं सुमारें १९ खेड्यांतील रयतांना एकत्रित बोलावून आणिलें. श्रीमंतांचे चिटणीस, कारभारी, मामलेदार, फौजदार व इतर कांहीं अधिकारी कोवाडी गांवीं हजर होते. त्या ठिकाणीं श्रीमंतांच्या चिटणिसांनीं लोकांना जाहीरपणें सांगितलें कीं सारावसुलीची मुदत पुढें ढकलली जाणार नाहीं आणि वाढीसहित सारावसूल केला जाईल. आणि त्याच सभेमध्यें सदर चिटणिसांनीं जाहीर केलें कीं येथें ज्या ज्या खेड्यांतून लोक आले आहेत त्यांना लँ. रे. कोडचें कलम १४१ लागूं केलें आहे असें समजावें. आपण या ठिकाणीं जमल्याचा हा प्रसाद लोकांना कळून आल्यानंतर ते अत्यंत भयभीत झाले व लागलीच श्रीमंतांना या बाबतींत जाऊन भेटण्याचा निश्चय त्यांनीं आपल्या मनाशीं केला आणि त्याप्रमाणें ते ता. १९-१२-३० रोजीं इचलकरंजीस पोहोंचले.

त्याच दिवशीं रयतांच्या पुढाऱ्यांना गिरफदार करण्यांत आलें. तेहि इचलकरंजीसच चाललेले होते. त्याचप्रमाणें प्रजासभेचे अध्यक्ष व चिटणीस इचलकरंजीस जाण्याकरितां निघाले असतां त्यांनाहि अधिकाऱ्यांनीं अटक

केलीं. त्याच दिवशीं सायंकाळीं श्रीमंतांनीं रयतांना भेट दिली व 'दुसरे दिवशीं सकाळीं त्यांच्या गाऱ्हाण्याचा विचार करूं' असें सांगितलें; आणि रात्रीं त्यांच्यापैकीं कांहीं रयत पुढाऱ्यांना अटक करून पहाटेच्या आंत आजऱ्याला पाठवून दिलें व अटकेंतील लोकांना पोलिसांनीं चांगलाच मार दिला असें म्हणतात. हा झालेला सर्व प्रकार पहांटे लोकांना ज्या वेळीं समजला, त्यावेळीं त्यांनीं भीतीनें तेथून पाय काढला असल्यास नवल नाहीं. त्याचवेळीं कांहीं लोकांनीं कोल्हापूरचा रस्ता सुधारला. सुमारें १८ मैल अंतरावर असलेलें कोल्हापूर पायीं गांठून श्रीमंत महाराजसाहेब मुंबईस चालले असतां वाटेंतच त्यांना रयतांनीं भेटून आपल्या गाऱ्हाण्यांचा अर्ज सादर केला. इचलकरंजींत उरलेल्या ५७१ लोकांचीं नांवें अधिकाऱ्यांनीं विचारून घेतलीं. ता. २०-१२-३० रोजीं त्या लोकांनींहि एक दिवस नदीतीरावर ब्रिटिश हद्दींत मुक्काम केला व तेथून सरळ कोल्हापूरचा रस्ता सुधारला. त्या ठिकाणीं दिवाणसाहेबांचीं त्यांनीं भेट घेतली व सुमारें ८०० सह्यांचा एक अर्ज हुजुरास सादर केला. या अर्जाचा योग्य तो विचार केला जाईल असें आश्वासन देऊन दिवाणसाहेबांनीं लोकांना ता. २२-१२-३० ला परत पाठविलें.

इकडे असा प्रकार चालला असतांना कारभारीसाहेबांनीं ता. २० डिसेंबर १९३० रोजीं हुकूम काढून वसुलाचे दोन्ही हप्ते मागील बाकीसह वसूल करण्यांत यावे असा हुकूम काढला. रा. केशवराव परुळेकर यांना ता. १९ रोजीं अटक करण्यांत आली. रा. जोशी यांना त्याच दिवशीं शिपूर येथें अटक करण्यांत आली. 'रा. जोशी हे मोटारीनें कोल्हापुरास जात असतां वाटेंत पेट्रोल संपलें आहे या सबबीवर कणंगले येथें मोटार थांबविण्यांत येऊन नंतर आडमार्गानें मोटार नेण्यांत येऊन संस्थानच्या हद्दींत मोटार आल्यावर रा. जोशी यांना पोलिसांनीं अटक केली व मोटार नंतर आपल्या पूर्वस्थळीं गेली. जहागिरीच्या जबाबदार अधिकाऱ्यांनीं मोटारवाल्याशीं संगनमत करून अशा तऱ्हेच्या वाममार्गाचा अवलंब करून एका पुढाऱ्यास पकडण्यास प्रवृत्त व्हावें यापेक्षां जहागिरीला लाजिरवाणी गोष्ट कोणती ? जहागिरीचे

अधिकारी एवढेंच करून थांबले नाहींत, तर शिपूर येथील बंगल्यांत पोलिसाकडून रा. जोशी यांना बेदम मार दिला. वरीलप्रमाणें मारहाण करून झाल्यावर रा. जोशी यांना आजऱ्यास आणण्यांत आलें. इचलकरंजीस श्रीमंतांना भेटण्यास गेलेल्या लोकांपैकीं १०।१२ लोकांस इचलकरंजीहून अटक करून आजऱ्यास आणण्यांत आलें व त्यांनाहि मार देण्यांत आला. त्या लोकांचा अपराध काय तर त्यांनीं श्रीमंतांची-आपल्या प्रभूची-भेट घेण्याची इच्छा धरली हाच होय. रा. जोशी वगैरेंना अधिकाऱ्यांनीं अतिशय कटकट केल्यावर जामिनावर सोडलें होतें; परंतु रा. जोशी यांना परत ता. २२ रोजीं अटक करण्यांत आली. रा. परुळेकर व रा. जोशी यांचेवर इं. पी. कोड १४२, १४९ व ५०६ या कलमाखालीं आरोप ठेवण्यांत आले.

सारावसुलीच्या बाबतींत इचलकरंजी दरबारनें एकदम दडपशाहीचें धोरण स्वीकारून, जी बेहद्द दडपशाही केली व आपल्या प्रजेवर हात चालविला, त्यांत न्यायनीतीला झुगारून दिलें, एवढेंच नव्हे तर, सामान्य सौजन्यालाहि धाब्यावर बसविलें. इचलकरंजी व आजरें येथील सर्व कचेऱ्या बंद करून श्रीमंतांनीं आपले बहुतेक सर्व नोकरलोक आजरें तालुक्यांत गांवोगांव सारावाढ वसुलीवर ठेविले होते. फाळा न भरणाऱ्या शेतकऱ्यांच्या जप्तीचा माल नेण्याकरितां बऱ्याच वेठीच्या गाड्या धरून ठेविल्या होत्या; खेड्यापाड्यांतून जरब बसविण्याकरितां मारहाण करण्यासहि कमी केलें नाहीं म्हणे. जप्तींत पडलेल्या पिकाचे संरक्षणार्थ २०० बेरड नेमले होते. इतर खेड्यांतील लोकांच्या हालचालीवर करडी नजर असून, गांवांतून बाहेर गेलेल्या लोकांची यादी तयार केली जात होती; फाळा वसूल करण्याची पद्धत तर अत्यंत उद्दामपणाची व जुलमी होती. पहांटे ४ वाजतां आजरेहून मोटारींतून अधिकारी घोडेस्वार, पोलिस, बेरड संत्री वगैरेंचें लटांबर घेऊन खेड्यास जात असत. एकदां खेड्याची नाकेबंदी झाली म्हणजे लोकांना बाहेर सोडीत नसत. मिळेल तो माल, जनावरेंहि,

[illegible] शिल्लक जप्त करून दोन्हीं हप्ते, चौथाई दंड, नोटिस फी, वगैरे सर्व वसूल करीत असत. ही सर्व दडपशाही करणाऱ्या बेरडांचा पगार गांवांवर बसविला जात असे. अधिकाऱ्यांनीं व पोलिसांनीं बेरडांच्या मदतीनें आजरा तालुक्यांत चार दिवस कां होईना जी धुळवड केली, त्यावेळीं रयतांनीं अत्याचार केले नाहींत, आणि अहिंसा तत्त्व आपल्या नजरेपुढें टेकून होणारा छळ व अपमान निमूटपणें गिळून टाकिला.

'सुधारणांकरितां सारावाढ' हा एक मुद्दा विचारांत घेतला पाहिजे. सारावाढ करण्याच्या योजनेपासून तों ती अंमलांत येईपर्यंत, रयतांची चळवळ सुधारणांकरितां नव्हती किंवा सुधारणा करण्याचें जाहीर केल्यावरोबर त्यांच्यावरील असह्य सारावाढ एकदम सह्य होईल असेंही मुळींच नाहीं. पतपेढ्या किंवा बँका काढून अन्याय्य सारावाढ न्याय्य होऊं शकत नाहीं. रयतांची परिस्थिति जोंपर्यंत निकृष्ट आहे आणि ती सुधारण्याचें जोंपर्यंत कार्य होऊं शकत नाहीं किंवा कांहीं योजना शक्य नाहीं, तोंपर्यंत सारावाढीला कितीहि सुधारणांचा मुलामा चढविला तरी ती शेतकऱ्यांच्या गळीं उतरणें शक्य नाहीं. शेतकऱ्यांमधील असंतोष कायमचा काढून टाकावयाचा असेल आणि त्यांची स्थिति सुधारावयाची असेल—अशी परिस्थिति फक्त आजऱ्याची नसून सर्वत्र तोच नमुना आहे—तर शेतीसुधारणा व्यतिरिक्त इतर सुधारणा देणें हा टिकाऊ उपाय नव्हे.

इचलकरंजी जहागिरीच्या अधिकाऱ्यांनीं निराश केल्यामुळें रयत कोल्हापूरच्या रस्त्याला लागली; आणि त्यांतून 'कोल्हापूर आणि इचलकरंजी' हा विषय वर्तमानपत्रांतून चर्चेस निघाला. कोल्हापूर संस्थानकडून इचलकरंजीस कोणतेहि कर बसविण्यास परवानगी मिळत नाहीं, आणि इचलकरंजी जहागिरीस कोल्हापूरच्या संमतिशिवाय शेतसाऱ्याशिवाय इतर कोणतेहि कर बसवितां येत नाहींत म्हणून आम्हांला सारावाढ केल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें जहागिरीचें म्हणणें आहे.

ही चळवळ अथपासून इतिपर्यंत कोल्हापूरच्या प्रेरणेनें सुरू झाली आहे असें दुर्दैवानें खरें वाटण्यासारखे कोल्हापूर व इचलकरंजी यांच्यामधील आजपर्यंतचे संबंध आहेत. परंतु या चळवळीच्या सुरवातीपासून आतांपर्यंत कोणतीहि गोष्ट पुढाऱ्यांनीं किंवा रयतांनीं कोल्हापूर दरबारच्या चिथावणीनें केलेली नाहीं, एवढेंच नव्हे तर, संस्थानासंस्थानांतील तंट्यास आपण कारण होऊं नये, निदान आपला उपयोग तरी त्यांत होऊं देऊं नये, अशी काळजी पुढाऱ्यांनीं घेतलेली होती. या बाबतींत 'संस्थानी स्वराज्या'नें स्पष्टपणें वेळींच नमूद करून ठेविलें आहे कीं, "आजरें तालुक्यांत होणाऱ्या सारावाढीची कल्पना तेथील रयतांना आल्या दिवसापासून इचलकरंजी संस्थानच्या वरिष्ठांकडे तक्रारी करण्याचा आपमतलबी सल्ला त्यांना फार दिवसांपासून मिळत असूनहि आजरें तालुक्यांतील रयतांनीं आपल्या तक्रारी इचलकरंजी संस्थानच्या वरिष्ठाकडे नेण्याची भावना केव्हांहि ठेविली नव्हती. आजरें तालुक्यांतील रयतांची मनोवृत्ति अशी असूनहि तेथील रयतांना कोल्हापुराकडे जी अखेर धांव घ्यावी लागली, त्याचा विचार केला असतां, इचलकरंजींत दाद मागण्याचे सर्व उपाय थकल्यानंतरच त्यांनीं वाट दिसेल तिकडे जाण्यास सुरवात केली असें स्पष्ट होत आहे."

नंतर आजपर्यंतच्या सर्व हकीकतींचा त्रोटक इतिहास देऊन मुंबई सरकारकडे एक लेखी अर्ज पाठविण्यांत आला. पण त्याचाही उपयोग झाला नाहीं.

श्रीमंतांनीं २१ टक्यांची सारावाढ १०॥ टक्के केली हा झालें तरी चळवळीचा विजय होय. मूळचाच सारा डोईजड असल्यामुळें ही वाढही असह्य होणें साहजिक होतें. शिवाय धान्याचे दर सारखे उतरत होते व जागतिक मंदीचा तडाखा या तालुक्यालाही बसत होताच. कांहीं प्रगतिपर संस्थानिकांनीं आपल्या रयतांना कांहीं सूट व तहकुबी दिल्याचें जाहीर केलें, तेव्हां श्री. जोशी-परुळकर-आपटे-इत्यादि कार्यकर्त्यांनीं पुन्हां हा विषय

हातीं घेण्याचें ठरवून ता. ३०।९।३८ रोजीं आजरें येथें श्री. जोशी यांचे घरीं कार्यकर्त्यांची सभा करून रीतसर परिषद् भरवून हा विषय हातीं घेण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें परिषदेस परवानगी मागण्यांत आली. या सभेस श्री. वा. वि. शिखरे, मिरज व श्री. पुंडलीकजी कातगडे हे हजर होते. त्यांनीं जहागिरीच्या जबाबदार अधिकाऱ्यांच्या गांठी घेऊन परिस्थितीची वाटाघाट केली. या वेळीं मात्र श्रीमंतांनीं अभिनंदनीय मुत्सद्देगिरी व दूरदर्शीपणा दाखविला. वरील आजऱ्याचे सभेनंतर लगेच इचलकरंजीस दसऱ्यानिमित्त भरलेल्या दरबारांत श्रीमंतांनीं ही राहिलेली १०॥ टक्के सारावाढही रद्द केल्याचें जाहीर केलें. याबद्दल त्यांचें अभिनंदन करावें तेवढें थोडेंच आहे. अशा रीतीनें संस्थानी चळवळीस अभिमानास्पद ठरलेला १९२९ सालीं सुरू झालेला सारावाढीचा लढा १९३८ सालीं यशस्वी रीतीनें परिपूर्ण झाला.



# जंजिऱ्यांतील गेलीं दोन दशकें



लेखकः—एक संस्थानी प्रजाजन

जंजिरा संस्थान हें एकच दक्षिण महाराष्ट्रांतील बंदरी संस्थान आहे. संस्थानचें उत्पन्न ११ लक्ष असून लोकसंख्या १,१०००० आहे. या संस्थानांत एका काळीं बरीच मोठी चळवळ होऊन गेली, पण आतां मात्र स्मशानशांतता आहे. येथील सार्वजनिक कार्याचा ओनामा ४४ वर्षांपूर्वी एका वाणेदार इसमानें घातला.

सन १८९५।९६ सालीं जंजिरा संस्थानांत ओरिजिनल सर्व्हे सेटलमेंट झाली, त्यावेळीं लगतच्या खालसा हद्दींपैकीं कुलाबा व रत्नागिरी जिल्ह्यांतील रिव्हिजन सर्व्हेच्या दरापेक्षां सवाई दिढीनें साऱ्याची आकारणी करण्यांत आली. याच सुमारास स्वाभिमानी व करारी स्वभावामुळें नोकरीस मुकलेले रा. सखारामपंत घैसास यांनीं पुढाकार घेऊन श्रीवर्धन तालुक्यांतील हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांच्या सहाय्यानें श्रीवर्धन येथें 'लोकसभा' या नांवाची संस्था स्थापन केली. सभेमार्फत मुद्देसूद सरकारी कोटिक्रम खोडून काढणारा असा छापील अर्ज हजारों सह्या घेऊन त्यांनीं दरबारकडे पाठविला. हा अर्ज छापण्याचे कामीं रा. घैसास यांना अत्यंत परिश्रम करावे लागले. रा. भिकाजी अनंत प्रधान हे लोकसभेचे चिटणीस असून त्यांची रा. घैसास यांना फार मदत झाली. या अर्जाचा दरबारकडून जरी सहानुभूतिपूर्वक विचार झाला नाहीं, तरी पुढील चळवळींत माहितीच्या दृष्टीनें व रिव्हिजन सर्व्हेंत तिन्ही तालुक्यांतील रयतेला त्याचा फार उपयोग झाला. फक्त सारावाढीविरुद्ध चळवळ करण्याकरितांच लोकसभेचा जन्म असल्यामुळें ती फार दिवस टिकली नाहीं. अशा रीतीनें सभेचा अंत जरी लौकर झालेला असला तरी तिनें केलेली जागृति मात्र बरेच दिवस टिकून राहिली हें निश्चित.

पुढील वीस वर्षांचा काळ मात्र संस्थानांत चळवळीशिवाय गेला. गेल्या महायुद्धाच्या काळांत खालसा हद्दींत स्वराज्याची चळवळ होऊन मँटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा अमलांत येऊं घातल्यामुळें संस्थानी प्रजेलाही आपल्या हक्कांची जाणीव होऊं लागली होती. अशा वेळीं नोकरी-धंद्या-निमित्त संस्थानांतील मुंबईत असणाऱ्या लोकांनीं १९१८ सालीं "जंजिरा रयत सभा" या नांवाची संस्था स्थापन केली. ही संस्था स्थापन कर-ण्यांत रा. भास्कर यादव पेंडसे यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता. सभेचे सेक्रेटरी रा. भास्कर यादव पेंडसे व केशव महादेव दांडेकर यांनीं रयतेच्या अडचणी व तक्रारी 'इंदुप्रकाश' पत्रांत वारंवार प्रसिद्ध केल्या. संस्थानच्या राज्यकारभारावर व अधिकारीवर्गावर टीकाशस्त्र सुरूं झाल्यामुळें संस्थानांत सभेबद्दल सहानुभूति वाढूं लागली. आणि त्यामुळें वरिष्ठ अधिकाऱ्यांची तारांबळ उडाली. राजनिष्ठेचें प्रदर्शन दाखविण्याकरितां एका सरकारी नोकरानें 'जमीनदार' हें टोपणनांव घेऊन " रयत सभा दुसरी बाजू " हा लेख इंदुप्रकाश पत्रांत प्रसिद्ध केला. सदरहू लेखांत सभा संस्थानांत स्थापन झालेली नाहीं,त्यामुळें संस्थानांतील रयतेचा पाठिंबा नाहीं, सभेची जागा फार लहान आहे,वगैरे वाष्कळ विधानें केलीं होतीं.तें वर्ष दुष्काळी असल्यामुळें नामदार नबाबसाहेबांनीं मुंबईस बरेच तांदूळ खरेदी करवून त्यावर नफा न घेतां मूळ किंमतीस संस्थानांत विकले होते. याचा उल्लेखही या जमीनदारानें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करून मरहूम नबाबसाहेबांचा चांगुलपणा दाखविण्याचा प्रयत्न केला होता. नामदार नबाबसाहेबांविषयीं सभेच्या चालकांच्या मनांत अनादर नव्हता व असण्याचें कारणही नव्हतें. तांदुळाविषयींच्या हकीगतीची परिस्फुटता 'जमीनदारा'नें करतांच "तांदु-ळाच्या खरेदीपासून तों ते लोकांच्या पदरांत पाडेपर्यंत कसा खेळसंडोबा झाला आहे या गोष्टीवर लौकरच प्रकाश पाडणार आहों." असें सभे-मार्फत उत्तर देण्यांत आल्यावर अधिकारीवर्ग फारच चिडून गेला. सभेच्या या विधानानें सभेवर खटला भरण्याच्या वल्गना सुरू झाल्या

होत्या, पण त्या थंड पडल्या. सभेच्या कार्याच्या दृष्टीनें खटला होणेंच श्रेयस्कर होतें. सभेनें सर्व साक्षीपुरावा आपल्या ताब्यांत घेऊनच हें विधान केलें होतें. पण अधिकारीवर्गही पुढील उपद्यापांत पडला नाहीं व सभेनेंही त्याबद्दल पुढें कांहीं खुलासा केला नाहीं.

दरबारपुढें निश्चित मागण्या मांडणें व संस्थानांत कोणत्या मुद्यावर चळवळीस तोंड पाडणें याबद्दल निश्चित योजना सभेजवळ नसल्यामुळें इतर प्रागतिक संस्थानांतील सुधारणा पाहून त्याप्रमाणें चळवळ करण्याचें ठरलें. संस्थानांचे ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्ट हे राज्यकारभार पहाण्यास एक साधन असल्यामुळें भावनगर, सांगली व औंध या संस्थानांच्या दिवाण-साहेबांकडे तेथील ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्टांची सभेनें मागणी केली. मागणी-प्रमाणें औंध व भावनगर संस्थानांचे रिपोर्ट आले; पण सांगली संस्थानाचे दिवाणसाहेबांनीं सभा दरबारनें मान्य केलेली आहे किंवा नाहीं याची पृच्छा केली. त्यावर सभेनें दरबारकडे सभा मान्य करण्याबद्दल विनंति केली नाहीं व तिची तशी इच्छाही नाहीं असें कळविलें. “ सांगली हें प्रागतिक संस्थान आहे, अशी सभेची समजूत असल्यामुळें व त्या संस्थानां-तील सुधारणा पाहून तशा प्रकारच्या सुधारणा संस्थानांत जारी करण्या-बद्दल जंजिरा दरबारास विनंति करणें हा सभेचा हेतु आहे ” असें कळ-विल्यावर पुन्हां कांहीं खुलासा न मागतां सांगलीच्या दिवाणसाहेबांकडून रिपोर्ट पाठविण्यांत आला.

सभेचा वर्तमानपत्रांतून होणारा प्रसार थांबविण्याचा प्रयत्न करण्या-करितां स्वत: दिवाणसाहेब, पोलीस इन्स्पेक्टर दामाद व जमीनदार हें टोपण नांव धारण करून रयत सभेवर डुगाण्या झाडणारे गृहस्थ असें त्रिकूट मुंबईस आलें होतें. पण त्यांना त्यांत यश न येतां विन्मुख होऊन परत जावें लागलें. वर्तमानपत्रांतील लेखांच्या ओरडीचा जो थोडाबहुत उपयोग झाला त्याचें श्रेय त्या वेळचे ‘इंदुप्रकाश’चे संपादक श्री. नरहर

रघुनाथ फाटक यांच्याकडे आहे. कोणाच्या कसल्याही भिडेला बळी न पडतां सभेचे सर्व लेखांस त्यांनी आनंदानें जागा दिली.

जंजिरा मुरूड येथील मुंबईंत रहाणाऱ्या कांहीं इसमांचा संस्थेशीं संबंध असल्याचा संशय संस्थानच्या अधिकाऱ्यांना आला होता. त्या मुंबईंत रहाणाऱ्या इसमांचे आप्त व नातेवाईक यांना मुंबईंतील सभेचा संबंध सोडण्यास तुमच्या नातेवाईकांना सांगा, नाहीं तर तुम्हांस नोकरींतून काढूं अशी दमदाटी देण्यांत आली. ज्यांच्याबद्दल अधिकाऱ्यांना संशय होता अशा इसमांना सभेशीं कोणत्याही प्रकारचा संबंध नाहीं अशीं सर्टिफिकिटें त्यांच्या मागणीवरून सभेनें दिलीं.

खालसा मुलुखांत मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणा अमलांत येण्याचे सुमारास म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्ड यांतून निम्मे सभासद घेण्याचें व दरसाल जमीनदार सभा भरवून रयतेच्या तक्रारी ऐकून घेण्याचें दरबारनें जाहिर केलें. पहिली जमीनदार सभा मोठ्या थाटाची भरली व आपण मांडलेल्या तक्रारी व सूचनांचा दरबारकडून विचार होईल अशी पुष्कळ निमंत्रित जमीनदारांना आशा वाटली, पण ती व्यर्थ ठरली. या वेळीं दरबारपुढें कोणत्या मागण्या किंवा तक्रारी मांडाव्या याबद्दलची माहिती पुष्कळ निमंत्रित जमीनदारांकडे सभेनें पाठवून दिवाणसाहेबांकडेही सूचना पाठविल्या होत्या. लोकनियुक्त कौन्सिल स्थापण्याबद्दल त्याचवेळीं दरबारकडे सभेनें मागणी केली होती. याच सुमारास दरबारनें दर महिन्यास जंजिरा दरबार गॅझेट प्रसिद्ध करण्यास सुरवात केली. दरबार गॅझेटची प्रसिद्धि, जमीनदार सभेची स्थापना व म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्ड यांतून निम्मे सभासद नेमणें या गोष्टी रयतसभेच्या चळवळीमुळें झाल्या अशी लोकांना खात्री वाटून सभेबद्दल जास्त सहानुभूति वाटूं लागली.

मुंबईंतील वर्तमानपत्रांतील होणारी ओरड बंद करण्याचा जसा अधिकारीवर्गानें प्रयत्न करून पाहिला, तसा संस्थानांतही अधिकाराच्या जोरावर करून पाहिला. मुंबईंतील सभा आम्हांस मान्य नाहीं,

अशा अर्थाच्या अर्जावर सह्या घेऊन तो नामदार सरकारकडे पाठविण्याचा बूट निघाला व तो अर्ज घेऊन पोलीस इन्स्पेक्टरसाहेब स्वतः संस्थानभर घेऊन हिंडले. कांहीं विशेष राजनिष्ठांच्या सह्या त्यांना मिळाल्या असल्या, तरी सर्व ठिकाणीं त्यांच्यावर टीकेचा भडिमार होऊन रयतसभेला भरपूर पाठिंबा असल्याचा अनुभव त्यांना आला. या कृत्यानें रयतसभेचा स्वाभाविक प्रचार होऊन अधिकाऱ्यांचें मात्र हंसें झालें.

संस्थानांतील खोती गांव हे सरकारांतून चतुःसीमापूर्वक लोकांनीं खरेदी केलेले असून चतुःसीमेच्या आंतील झाडोऱ्यावर खोतांची पूर्ण मालकी असते. असें असतां सनदेप्रमाणें वर्तन न करतां सरकारनें यावेळीं खोती गांवांतील जंगलें विकलीं व यामुळें रयतेंत असंतोष पसरण्यास आणखी एक कारण झालें. श्री. पेंडसे हे श्रीवर्धन तालुक्यांतील नावेगांवचे खोत असून त्यांच्या मालकी जंगलाचाही लिलांव झाल्यामुळें या सरकारी अन्यायाविरुद्ध चळवळ करण्याचें ठरवून व मुंबईतील सभेची कामगिरी आपल्या सहकाऱ्यांवर सोंपवून ते आपल्या गांवीं दाखल झाले. प्रारंभीं त्यांनीं जंगलतोडीचें काम करणाऱ्या मजुरांचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. पण त्यांत चांगलेंसें यश न आल्यामुळें, मजूर झाड तोडूं लागल्यावर त्यांच्या कुऱ्हाडीचा घाव आपल्या अंगावर पडेल अशा बेतानें ते उभे राहूं लागले; किंवा थोडक्यांत सांगावयाचें झालें तर त्यांनीं 'सत्याग्रहास' सुरवात केली. सरकारी कामास अडथळा झाल्यामुळें तेथें जंजिऱ्याहून पोलीस पार्टीही येऊन दाखल झाली. इतकेंही करून न थांबतां पेंडसे यांनीं आपला मालकीहक्क गाजविण्याकरितां त्या जंगलांतील झाडेंही तोडलीं. श्री. पेंडसे यांच्या या कृत्यानें संस्थानभर त्यांची वाहवा होऊन सरकारच्या इभ्रतीस धक्का बसला. श्री. पेंडसे यांचा दिवसेंदिवस वाढत असलेला लोकप्रियतेचा पारा सरकारास सहन होणें अर्थातच शक्य नव्हतें.

जंगलांतील लांकडें चोरल्याच्या आरोपावरून त्यांना पकडून त्यांच्यावर खटला भरण्यांत आला. श्री. पेंडसे हे चोर नसून लोकांच्या हक्कांकरतां

सरकारजवळ भांडत आहेत याची लोकांना जाणीव असल्यामुळें त्यांना पकडतांच सर्वत्र खळबळ उडून गेली. श्री. पेंढसे यांना पकडल्यानंतर रयतसभेचें अस्तित्व संपेल असें नोकरशाहीला वाटलें होतें. पण रयतसभा पूर्वीपेक्षां जोरदारपणानें काम करूं लागली. संस्थानांतील वकील श्री. पेंडसे यांचें वकीलपत्र घेण्यास धजावणार नाहींत म्हणून मुंबईहून नामांकित वकील पाठविण्याचा व फंड जमविण्याचा ठराव सभेनें केला. खोती हक्काकरितां श्री. पेंडसे यांचें हें भांडण असल्या-मुळें पुष्कळ खोतांकडून व बऱ्याच लोकांकडून मदतीचीं आश्वासनें सभेकडे आलीं. रा. पेंढसे यांचे थोरले बंधु रा. पांडुरंग यादव पेंडसे हे नाणावलेले वकील होते. सरकारदरबारची भीति सोडून ते वकीलपत्र घेण्यास पुढें आले व तसें त्यांनीं सभेलाही कळविलें. श्री. पेंडसे वकील यांचा संस्थानांत चांगला दरारा, व अधिकारीवर्गांतही चांगलें वजन व पूर्वी सार्वजनिक कार्यांत पुढारीपणानें ते भाग घेत असल्यामुळें त्यांनीं वकीलपत्र दाखल करतांच संस्थानांतील लोकांची भीति जाऊन तेही या खटल्यास मदत करण्यास उद्युक्त झाले. श्री. पेंडसे वकील पुढें आल्यामुळें अर्थातच मुंबईहून वकील पाठविणें व फंड जमविणें या गोष्टी सभेस कराव्या लागल्या नाहींत. श्री. पेंडसे यांना पकडून त्यांची संस्थानांत धिंड काढण्यांत आली. पण या कृत्यानें श्री. पेंडसे यांच्याबद्दल सहानुभूति मात्र जास्त वाढली. श्री. पेंडसे यांना पकडल्यानंतर त्यांच्यावरील खटला न चालविण्याकडेच अधिकारीवर्गाचा कल होता. कारण त्यावेळीं रा. राजाराम रामचंद्र चिट-णीस यांच्या तंत्रानेंच राज्यकारभार चालत असल्यामुळें दिवाणसाहेबांच्या इभ्रतीपेक्षां त्यांच्याच इभ्रतीला धक्का बसलेला होता. पोलिस इन्स्पेक्टर दामाद हे त्यांच्याकडून वाटेल तेव्हां श्री. पेंडसे यांना जेलमधून आपल्या घरीं नेत असत. "लोकांच्या नादीं लागून तूं ही सभा काढण्यांत फसलास आतां तुला कोणीही मदतीला नाहींत" अशा अर्थाची श्री. पेंडसे यांच्या मनांत उद्वेग उत्पन्न करणारी, कधीं नोकरी लावून देण्याचें आमिष दाखवि-

णारी भाषा वापरून चळवळीपासून परावृत्त करण्याचा त्यांचा नेहमीं प्रयत्न चालू असे. श्री. दामाद साहेबांनीं तर 'वर्तमानपत्रांत लेख लिहिण्यांत चूक केली, माझ्याकडून असें वर्तन होणार नाहीं, सरकारनें दयाळू होऊन मला सोडून द्यावें' अशा अर्थाची लिहिलेली माफीपत्रिका पेंडसे यांच्या स्वाधीन केली होती. व त्यावर सही करतांच तुमची सुटका होईल असे श्री. पेंडसे यांना सांगितलें होतें. पेंडसे यांचा खटला चालण्याच्या दिवशीं कोर्टांतही पेंडसे यांची मनधरणी करण्याचा प्रयत्न सारखा सुरूच होता. पण त्यांत यश आलें नाहीं व शेवटीं खटला चालून श्री. पेंडसे यांना पंचवीस रुपये दंडाची शिक्षा ठोठावण्यांत आली. श्री. पेंडसे यांनीं सुटका झाल्यानंतर सरकारनें खोतीहक्कांत केलेल्या या ढवळाढवळीविरुद्ध चळवळ करण्याचें ठरविलें. सरकारच्या कानावर ही गोष्ट जातांच श्री. पेंडसे वकील यांना खुद्द नामदारसरकारनीं बोलावून घेऊन तुटलेल्या जंगलाबद्दल रयतेस पैसे देण्याचा आपला हेतु असल्याबद्दल त्यांना सांगून श्रीवर्धन येथें जाऊन त्या तालुक्यांतील लोकांना हा हेतु कळविण्याचा हुकूमही केला. श्री. पेंडसे वकीलांनीं सभा भरवून सरकारचें म्हणणें लेखी वाचून दाखविलें, परंतु श्री. पेंडसे यांनीं ही कामगिरी स्वीकारल्याबद्दल लोक फार चिडून गेले होते. त्यांचा शब्दही कोणी ऐकण्यास तयार होईना. श्री. पेंडसे वकील यांनीं आपलें वाचन संपवून सभेंतून पाय काढला. श्री. पेंडसे उठून जातांच आम्हांला सरकारनें रा. पेंडसे वकीलांच्या मार्फत सुचविलेली आणेवारी मान्य नसून आम्हांला जंगलाचा मालकीहक्क पाहिजे असा ठराव जमलेल्या लोकांनीं पास करून तो सरकारकडे पाठविण्यांत आला.

पुढें जानेवारी १९२० मध्यें श्रीवर्धन येथील बागवान मशिदीजवळ मोठी सभा भरवून तालुकासभेची स्थापना करण्यांत आली. मे. अलिमियासाहेब घणसार यांना अध्यक्ष व श्री. पेंडसे व मे. हादी यांना सभेचे चिटणीस नेमण्यांत आलें. पहिल्याच सभेंत लोकनियुक्त कौन्सिल

नेमण्याबद्दल ठराव करण्यांत आले. त्यावेळचे दिवाण रा. वि. अ. गुप्ते यांनीं तालुकासभेशीं चांगल्या प्रकारचें धोरण ठेवून सभेनें निदर्शनास आणलेल्या बऱ्याच तक्रारी त्यांनीं दूर केल्या. ते संस्थानांत बरेच दिवस दिवाणपदावर राहिले असते, तर बऱ्याच लोकोपयोगी सुधारणा झालेल्या पहावयास सांपडल्या असत्या. दक्षिण महाराष्ट्रांतील चळवळ योग्य प्रकारें चालविण्याकरितां पुणें येथें जी प्राथमिक चर्चा करण्याकरितां सभा श्री. तात्यासाहेब केळकर व कै. श्री. वामनरावजी पटवर्धन यांनीं पुणें येथें ता. २४-५-१९२१ रोजीं भरविली होती, त्या सभेस रा. सखारामपंत घैसास, पेंडसे व मे. हादी हे तालुकासभेमार्फत हजर राहिले होते. दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेचीं जीं अधिवेशनें बेळगांव, सांगली, पुणें वगैरे ठिकाणीं भरविण्यांत आलीं, त्यांस श्री. पेंडसे व श्री. विष्णु चिंतामण जोशी हे जांजिरा संस्थानचे प्रतिनिधी म्हणून हजर रहात असत.

श्रीवर्धन तालुका सभेच्या स्थापनेनंतर दोन वर्षांनीं म्हणजे १९२२ सालीं ॲडव्होकेट श्री. सि. चिं. जोशी व पांडुरंग यादव पेंडसे यांनीं मुरुड तालुकासभेची स्थापना केली. तालुक्यांतील हिंदु-मुसलमान, शेठसावकार, व्यापारी व वकीलवर्गही त्यांत उत्साहानें सामील झाला. संस्थानांत रिव्हिजन सर्व्हे सेटलमेंट करून आधींच डोईजड झालेल्या साऱ्यांत जिरायतीवर दोन आणे व बागायतीस चार आणे प्रमाणें वाढ करण्यांत आली. याविरुद्ध संस्थानांतील तिन्ही तालुक्यांनीं सुसंघटितपणें चळवळ केली व त्याचा परिणाम होऊन हल्लींचे संस्थानाधिपति सज्ञान होऊन राज्यकारभाराचीं सूत्रें हातीं घेईपर्यंत सारावाढ करण्याचें तहकूब केल्याचें संस्थानचे दिवाण मि. पी. आर. कपाडिया यांनीं जाहीर केलें.

श्रीवर्धन तालुकासभेची स्थापना झाल्यानंतर म्हसळें तालुक्यांतील रयतेनेंही तालुका सभा स्थापून आपल्या तालुक्यांतील तक्रारी व गैरसोयी दरबारचे कानीं घालून चळवळीस प्रारंभ केला. संस्थानांतील तिन्ही तालुक्यांत तालुकासभा स्थापन झाल्या असल्या, तरी एका मध्यवर्ति सभेची

जरूरी होती. ॲ. जोशी, रा. साठ्ये, देशपांडे, प्रधान वगैरे वकील मंडळींनीं संस्थानांत दौरे काढून लोकजागृति करून जंजिरा-मुरूड येथें ‘ जंजिरा लोकसभा ” स्थापन केली. या सभेंत तिन्ही तालुक्यांतील निवडून गेलेले सभासद गेल्यामुळें सभेचें काम व्यवस्थितपणें चालूं लागलें.

याच सुमारास ॲ. जोशी यांची सरकारनियुक्त सभासद म्हणून मुंबई सरकारनें कायदेकौन्सिलांत नेमणूक केली. या नेमणुकीनें संस्थानांत सर्वांना आनंद होऊन पुष्कळांनीं त्यांच्याकडे अभिनंदपर संदेश पाठविले. त्यावेळीं संस्थानचे दिवाण मि. पी. आर. कपाडिया यांनींही संदेश पाठवून ॲ. जोशी यांचें अभिनंदन केलें. मुरूड येथें तिन्ही तालुक्यांतील रयतेतर्फे जाहीर सभा भरून त्यांचा सन्मान करण्यांत आला. त्याचवेळीं श्रीवर्धन येथेंही त्यांना आमंत्रण देऊन व सभा भरून त्यांचें अभिनंदन करण्यांत आलें.

१९२६सालीं मे महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत म्हशेळें येथें श्रीवर्धनचे नागरिक व यावलचे सुप्रसिद्ध वकील रा. गो. ह. साठ्ये यांच्या अध्यक्षतेखालीं जंजिरा संस्थान प्रजापरिषदेचें पहिलें अधिवेशन झालें. त्यांनीं संस्थानांत कांहीं वर्षे मुनसफीचे जागेवर काम केलेलें असल्यामुळें व त्यावेळीं अज्ञान कारकीर्द असल्यामुळें वाहेरचा अध्यक्ष आणण्यापेक्षां रा. साठ्ये यांची जाणूनबुजूनच निवड करण्यांत आली होती. परिषदेंत कायदे कौन्सिलची स्थापना, डोईजड सारा कमी करणें, खोती व जंगलचे हक्कांची मागणी वगैरे ठराव पास करण्यांत आले.

१९२७ सालीं तारीख ८ मे रोजीं श्रीमंत थोरले बाजीरावसाहेब पेशवे यांच्या जन्मस्थानीं ॲ.जोशी यांचे अध्यक्षतेखालीं परिषदेचें दुसरें अधिवेशन झालें. परिषदेच्या अधिवेशनापूर्वी बरेच दिवस काम करण्यास संधि सांपडल्यामुळें व काम करणारी मंडळीही चांगली असल्यामुळें परिषद यशस्वी रितीनें पार पडली. जबाबदार राज्यपद्धतीचें ध्येय, खोती हक्क, मालकी नंबरांतील झाडोऱ्यावरील हक्क, सरकार सारा, ‘संस्थानी स्वराज्य’ पत्रास मदत करणें वगैरे महत्त्वाचे ठराव पास करण्यांत आले.

डॉ. जोशी यांना संस्थानांतील सर्व परिस्थितीची जाणीव असल्यामुळें त्यांचें अध्यक्षीय भाषण फारच चांगलें झालें. तसेंच अज्ञान कारकीर्द ध्यानीं घेऊन दरबारला कांहीं विधायक सूचनाही त्यांनीं सुचविल्या. कै. प्रो. गणपतराव अभ्यंकर व कै. श्री. वामनराव पटवर्धन यांचीं जबाबदार राज्यपद्धतीच्या ठरावावरील भाषणें मुद्देसूद व मननीय झालीं. दिवेआगर येथील दानशूर गृहस्थ रा. बळवंतराव आवळसकर यांनीं 'संस्थानी स्वराज्य' पत्रास एक हजार रुपये देणगी दिली. रा. वामनरावजी पटवर्धन यांनीं घस सोसून हें पत्र चालविलें असल्यामुळें या देणगीबद्दल सर्वांना आनंद झाला.

श्रीवर्धन येथील परिषदेनंतर मुरुड तालुकासभेचें अधिवेशन रा. देशपांडे वकील यांचे अध्यक्षतेखालीं झालें. त्यांत श्रीवर्धन परिषदेंत पास झालेल्या जबाबदार राज्यपद्धतीच्या ठरावाबद्दल उल्लेख केल्यामुळें त्यावेळचे दिवाण कपाडियासाहेब यांचें पित्त भडकून गेलें. त्यांनीं वर्तमानपत्रांतून श्रीवर्धनच्या परिषदेवर व जबाबदार राज्यपद्धतीच्या ठरावावर भाषण करणारे रा. गणपतराव अभ्यंकर व वामनराव पटवर्धन यांच्यावर तोंडसुख घेतलें. जबाबदार राज्यपद्धति म्हणजे बेगमसाहेबांनीं राज्यकारभार सोडून देऊन तो चार उपद्व्यापी चळवळ्यांच्या स्वाधीन करणें असा या दिवाणसाहेबांनीं त्याचा अर्थ जाहीरपणानें प्रसिद्ध केला.

दिवाणसाहेबांच्या या वक्तव्यावर रा. पटवर्धन यांनीं संस्थानी स्वराज्यांतून झोड उठविल्यामुळें दिवाणसाहेब आणखी भडकले आणि श्रीवर्धन तालुकासभेचे प्रेसिडेंट यांना पत्र पाठवून रा. पटवर्धन व अभ्यंकर यांचा निषेध करण्याबद्दल कळविलें. शिवाय, असें न कराल तर संस्था नोंदणीचा कायदा करून मी तुमची चळवळ दडपून टाकीन असाही धाक घातला. दिवाणसाहेबांच्या या पत्रानें श्रीवर्धनाच्या पुढारी मंडळींना चीड आली आणि त्यांनीं रा. पटवर्धन व अभ्यंकर यांच्यावर आपला विश्वास असल्याचें जाहीर करून उलट दिवाणसाहेबांनीं हें कळविल्याबद्दल उलट त्यांचा निषेध केला. दिवाणसाहेबांच्या मनाप्रमाणें गोष्ट

घडून न आल्यामुळें त्यांनीं पत्रांत कळविल्याप्रमाणें १९२७ जुलैच्या १ तारखेपासून प्रेस ॲक्ट व संस्थानोंदीचा कायदा संस्थानांत जारी केला. त्यावेळीं कपाडियासोहेबांनीं दरबारचे केलेले गैरसमज दूर व्हावे म्हणून ॲ. जोशी यांनीं प्रयत्न केले, पण त्यांत यश आलें नाहीं. संस्थानांत हे जुलमी कायदे अंमलांत येतांच जंजिरा लोकसभा ही मध्यवर्ति सभा आणि संस्थानांतील तिन्ही तालुकासभा बंद झाल्या व चळवळ थंडावली.

श्रीवर्धनाच्या परिषदेंत रा. पांडुरंग यादव पेंडसे यांनीं मुरूड तालुक्यांतील रयतेतर्फे पुढील सालच्या अधिवेशनास मुरूड येथें आमंत्रण दिलें होतें. पण या जुलमी कायद्यांमुळें तें तेथें भरूं शकलें नाहीं.

ॲ. जोशी यांच्या खटपटीनें मुंबईस सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीच्या इमारतींत बॅ. जमनादास मेथा यांच्या अध्यक्षतेखालीं ता. २७ मे १९२८ रोजीं जंजिरा संस्थान प्रजापरिषदेचें तिसरें अधिवेशन भरलें. परिषदेस मुंबईंतील व संस्थानांतील बरेच प्रतिनिधी आले होते. बॅ. जमनादास मेथा यांनीं मे. कपाडियासाहेबांनीं संस्थानांत जुलमी कायदे जारी केल्यामुळें त्यांच्यावर बरीच टीका केली. श्रीवर्धन परिषदेंत पसार झालेले बहुतेक ठराव या परिषदेंत पास झाले. परिषद समाप्त झाल्यावर मे. कपाडियासाहेबांनीं श्रीवर्धनच्या परिषदेप्रमाणें बॅ. मेथा यांच्यावर शिष्टाचार सोडून अयोग्य तोंडसुख घेतलें. त्यांच्या प्रलापांस बॅ. मेथा यांनींही खरमरीत उत्तर देऊन त्यांना चूप बसविलें.

श्रीवर्धन येथील परिषदेनंतर संस्थानांतील जारी झालेल्या कायद्यांमुळें संस्थानांतील चळवळ थंडावली असें दिवाणसाहेबांना वाटलें होतें. पण पुनः परिषद मुंबईस भरल्यामुळें त्यांचें मन अस्वस्थ झालें. हिंदु-मुसलमानांत फूट पाडण्याचा त्यांनीं प्रयत्न केला व त्यांत त्यांना सोळा आणे यशही आलें. श्रीवर्धनास यापूर्वी दोनतीन वेळां हिंदु व मुसलमान यांच्यांत कबरस्थानाबद्दल वाद उत्पन्न झाला होता. पण त्यावेळच्या अधिकाऱ्यांनीं नसतें महत्त्व या वादाला न देतां, तो सामोपचारानें

मिटविला होता. दिवाणसाहेब यावेळीं मुसलमानांना अनुकूल आहेत असें समजतांच श्रीवर्धनच्या कांहीं मुसलमानांनीं कबरस्थानास तार मारण्याची परवानगी मागितली व दिवाणांनीं ती देऊन टाकली. ज्या कबरस्थानास तारा मारण्यांत आल्या, त्यांतून रहदारीचा रस्ता जात असून त्या रस्त्यानें शिमग्यांत देवाच्या होळीचे हळकुंडे नेण्याचा हिंदूंचा रिवाज होता. बंद झालेला रस्ता मोकळा करून मिळण्याबद्दल दरबारकडे विनंति केली, पण दरबारनें तिकडे दुर्लक्ष केल्यामुळें हिंदूंनीं देवांच्या होळ्या लावल्या नाहींत. एक महिनाभर सर्व सनदशीर मार्ग केले, पण यश न आल्यामुळें तारा तोडून व बंद झालेल्या रस्त्यानें वहिवाटीप्रमाणें हळकुंडे नेऊन होळ्या लावण्यांत आल्या.

होळ्या राहिल्यामुळें हिंदूंनीं मुसलमान लोकांवर कडकडीत बहिष्कार घातला. त्याचा परिणाम मुसलमानांना फार जाणवला. मुसलमानांनीं ठिकठिकाणीं हिंदूंच्या खोड्या काढण्यास सुरवात केली, यामुळें हिंदूंना चीड येऊन कांहीं मुसलमान गुंडांना चांगलाच चोप देण्यांत आला. त्यामुळें मुसलमान लोक व दरबारही भिऊन गेले. मे. कपाडियासाहेबांना परिषदेबद्दल सूड उगवून घ्यावयाचा होता. ही संधि साधून राव. दामाद साहेबांकडून पुढारी मंडळींना तडजोडीला म्हणून बोलावून गिरफदार केलें. मुसलमानांवरील बहिष्कार मोडावा म्हणून रा. दामादसाहेबांचे सारखे प्रयत्न चालू होते. त्यांच्या प्रयत्नास कोणी अडथळा केल्यास त्याला पकडून नेत असत. ७०।७५ इसमांना अटक झाल्यानंतर त्यांनीं हें काम बंद केलें. हिंदूंच्या बचावाकरितां कोणी पुढें येणार नाहीं अशी कपाडियांना खात्री होती, पण ती खोटी ठरली. श्री. पां. या. पेंडसे यांनीं तुरुंगांत जाऊन सर्व हिंदूंना धीर देऊन त्यांच्या वतीनें वकीलपत्र दाखल केलें व मुंबईंत जाऊन कमिटी स्थापन करून बचावाकरितां फंड जमविण्यास सुरवात केली. अॅ. जोशी यांनीं कमिटीचे अध्यक्ष म्हणून पोलिटिकल एजंट, गव्हर्नरसाहेब व बेगमसाहेब यांच्या भेटी घेऊन त्यांच्यापुढें सर्व हकीकती मांडल्या. मुरुड

यथील सर्व वकिलांनीं हिंदूंच्या वतीनें वकीलपत्रें दाखल केलीं. संस्थानां-तून व बाहेरून फंडास चांगली मदत झाली. बॅ. आंबेडकरांसारखे कायदे-पंडित खटला चालविण्यास उभे राहिले. हिंदूंच्या वतीनेंही चांगली तयारी झाल्यामुळें व बाहेरील वर्तमानपत्रांनीं टीकेची झोड उडविल्या-मुळें दिवाण गांगरून गेले. अॅ. जोशी, बॅ. आंबेडकर व रावबहादूर बोले यांनीं हिंदूंची न्याय्य बाजू व कपाडियांची अन्यायी वागणूक गव्हर्नर-साहेबांपुढें मांडल्यामुळें हिंदूंना सोडून देण्याबद्दल गव्हर्नरसाहेबांकडून दरबारला लिहून आलें. यामुळें तर दिवाणसाहेब फारच चिडून गेले. त्यांनीं आपल्या हस्तकांकरवीं तुरुंगांतील कांहीं लोकांना भेदनीतीनें फसवून माफीपत्रकें लिहून घेतलीं व त्यांची सुटका केली. त्यांची सुटका होतांच बाकीच्या लोकांनाही बाहेर पडण्याचा मोह पडून सर्वांनीं आपली सुटका करून घेतली. या माफीप्रकरणानें जरी हिंदूंच्या लढ्यास थोडेंसें गालबोट लागलें असलें, तरी कपाडिया साहेबांच्या या कृत्यामुळें दरबारला कमीपणा आला. कपाडियासाहेबांच्या अरेरावीपणाची बेगमसाहेबांनाही चीड आलेली असल्यामुळें त्यांनीं त्यांना १९३२ मध्यें नोकरींतून मोकळें केलें. कपाडियासाहेबांच्या मागून हल्लींचे दिवाण रावबहादूर कोटक यांची नेमणूक करून बेगमसाहेबांनीं त्यांना श्रीवर्धनास पाठवून दिलें व हिंदु मागत असलेला रस्ता त्यांना देववून व झालेल्या प्रकाराबद्दल योग्य त्या शब्दांनीं हिंदूंची समजूत घालून मुसलमानांवरील बहिष्कार काढण्यास सांगितलें. हा लढा खरें पाहिल्यास मे. कपाडियासाहेबांनीं चळवळ्या लोकांना दहशत बसविण्याकरितां जाणूनबुजून उत्पन्न केला होता; पण त्यांत त्यांनाच फजित पावावें लागलें. कपाडिया साहेबांच्या मागून १९३२ सालीं आलेले हल्लींचे दिवाण रा. ब. कोटक हे संस्थानांतील सभा-बंदीचा कायदा रद्द करतील असें वाटत होतें. पण ती आशा व्यर्थ ठरली. आणि श्रीवर्धनच्या लढ्यानंतर संस्थानांतील सर्व चळवळ विराम पावली.



कै. पां. मा. पंडसे



ॲ. सि. चिं. जोशी



श्री. चि. चिं. जोशी



श्री. म. गो. कालेकर.



श्री. भा. या. पंडसे



कै. श्री. देशपांडे.

त्यानंतर जवळजवळ सात वर्षांनीं ता. ३०।३।१९३९ रोजीं श्री. दिघे यांच्या खटपटीनें मुंबईस "जंजिरा संस्थान प्रजा मंडळ" या नांवाची संस्था निघाली असून तिनें थोडेंबहुत लोकजागृतीचें काम चालविलें आहे. राजघराण्याच्या भाईबंदांपैकीं सरदार सिद्दी महमूद हे अध्यक्ष असल्यामुळें सभेचें काम जोरानें चालेल असें म्हणावयास हरकत नाहीं. मुंबईस या संस्थेनें चळवळ करतांच दिवाणसाहेबांनीं संस्थानांत कोणत्या सुधारणा कराव्या हें ठरविण्याकरितां एक कमिटी नेमली होती. पण ही कमिटी नेमण्यापलीकडे कांहींही कार्य झालेलें नाहीं असें कष्टानें म्हणावें लागतें. जंजिरा प्रजामंडळाच्या कार्यास पूर्ववत् केव्हां जोर येईल, तो भाग्याचा दिवस होय !

---

# सावंतवाडींतील प्रगमनशील कारभार

लेखकः—एक संस्थानी प्रजाजन

सावंतवाडी संस्थान एकोणिसाव्या शतकाच्या प्रथमपादापासून जवळ जवळ एक शतक प्रत्यक्ष ब्रिटिश सत्तेखालीं होतें. ब्रिटिश सरकारच्या ट्रस्टी-शिपखालीं असल्यामुळें म्हणा, किंवा ज्याला ‘ संस्थानी अंमल ’ म्हणतात, तशा प्रकारच्या कारभाराचा परिचय नसल्यामुळें म्हणा, अगदीं अलीकडेपर्यंत संस्थानांत राजकीय चळवळ मुळींच नव्हती असें म्हटलें तरी चालेल. सावंतवाडी संस्थान हें बेळगांव जिल्ह्याला लागून असून संस्थानचें उत्पन्न साडेसहा लाख रुपये व संस्थानची लोकसंख्या सध्यां दोन लाख आहे.

१९२४ सालच्या आक्टोबर महिन्यांत सावंतवाडी संस्थानचे अधिपति कै. श्री. खेमसावंत बापूसाहेब महाराज यांच्या हातीं राज्यकारभाराचीं सूत्रें आलीं. महाराज तरुण, सुशिक्षित, व कर्तव्यतत्पर असल्यामुळें प्रजेच्या आशेस नवे अंकुर फुटले. सावंतवाडी शहरांत म्युनिसिपालिटी स्थापन करण्यापासून प्रातिनिधिक संस्थांची सुरवात झाली. इतर संस्थानांच्या मानानें सावंतवाडी संस्थान शिक्षणांत बरेंच पुढें होतें. श्री. महाराजांच्या कारकीर्दींत तर शिक्षणाची झालेली प्रगति ब्रिटिश हिंदुस्थानच्या प्रजेलाही हेवा वाटेल इतकी झाली. व्यसनें व उधळेपणा यांपासून दूर रहाण्याची प्रवृत्ति, धार्मिकपणा, साधी राहाणी, व न्याय करण्याची इच्छा इत्यादि सद्गुणांमुळें महाराजांची कारकीर्द प्रजेला सुखावह झाली. परंतु महाराजांच्या याच सद्गुणांमुळें संस्थानांतील राजकीय चळवळीस जोर येण्याचें कारण पडलें नाहीं. अशा प्रकारच्या चळवळीस लागणाऱ्या जुलूम-जबरदस्तीसारख्या पार्श्वभूमीचा संस्थानांत अभाव होता. दुसऱ्या संस्थानांत ज्या गोष्टींमुळें राजकयि चळवळ तरारते, त्या गोष्टीच संस्थानांत नव्हत्या. यामुळें स्वतःच्या अधिकारांची जनतेस आठवणच झाली नाहीं असें म्हटलें तरी चालेल.

कै. महाराजांची दृष्टि ब्रिटिश हिंदुस्थानांतील राजकीय चळवळीकडे सहानुभूतीची होती. १९२७ सालीं महात्मा गांधी आपल्या दौऱ्यांत मध्येंच आजारी पडल्यामुळें सुमारें एक महिनाभर हवा बदलण्यासाठीं संस्थानांत महाराजांचे पाहुणे म्हणून त्यांच्या आंबोली येथील वाड्यांत होते. या दौऱ्यांत महात्माजी सावंतवाडी येथें आले असतां कै. महाराजांनीं त्यांच्या कार्यास १००० रु. ची देणगीहि दिली होती. कै. महाराजांना स्वदेशीविषयीं विशेष अगत्य असे व खादीकार्याविषयींहि त्यांची सहानुभूति होती. महात्माजींच्या भेटीनंतर त्यांनीं श्री. अप्पा-साहेब पटवर्धन यांना आपल्या संस्थानांत बोलावून त्यांच्या नेतृत्वाखालीं सरदेसाई चरकालय सुरू करविलें व त्याला वार्षिक ९०० रु. ची देणगी चालू केली. शाळांतून चरख्याचा प्रसार होण्यासही त्यांनीं प्रोत्साहन दिलें. १९३० सालच्या सत्याग्रहांत सावंतवाडीच्या प्रजेपैकीं पुष्कळांनीं भाग घेतला. परंतु राजकीय मतांसाठीं कोणालाही त्रास झाला नाहीं. शिरोडा सत्याग्रहांतील कांहीं सत्याग्रही, मोटारींची सोय होईना म्हणून, खालसांतील पोलिसखात्यानें सावंतवाडीस ठेविले होते. त्यांना येथील अधिकाऱ्यांच्या सौजन्याबद्दल इतका आदर वाटला कीं, त्यांनीं इकडून जातांना त्यांना सुताचे हार घालून त्यांच्याविषयींची आपली सद्भावना व्यक्त केली. शिरोडें सत्याग्रहानंतर १९३२ सालीं डॉ. आ. कृ. भागवत यांनीं येथें २००० रु. निधि जमवून खादीभांडार सुरूं केलें व तें आजतागायत चांगलें चाललें आहे. डॉ. भागवत यांच्या-सारख्या सत्याग्रह्याला सावंतवाडी दरबारनें निसर्गोपचाराचें केंद्र चालवि-ण्यासाठीं सरकारी इमारती व लागवडीसाठीं भोंवतालची जमीनही दिली. गेल्याच वर्षीं डॉ. भागवत हे इकडून प्रथम सातारा जिल्ह्यांत व पुढें औंध संस्थानांत आटपाडी येथें गेले.

सावंतवाडी संस्थानांत सभा आणि संस्था यांच्या बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य आहे. याचें एक कारण सुरवातीला म्हटल्याप्रमाणें येथील

कारभार इतर संस्थानांच्या मानानें बराच प्रगमनशील स्वरूपाचा व खालसांतील वळणावर आहे. शिवाय तीव्र स्वरूपाच्या कोणत्याच चळवळी येथें नसल्यामुळें त्यांच्या नियंत्रणाचे प्रसंगही येथें उद्भवूं शकत नाहींत. सावंतवाडींत कॉंग्रेस कमिटी बऱ्याच वर्षांपासून आहे व तिला दरबारचा अडथळाही नाहीं. पण राष्ट्रीय सभेच्या संस्थान-विषयक धोरणामुळें या कमिटीलाही संस्थानी प्रश्नांबाबत तटस्थतेचेंच धोरण ठेवावें लागत असल्यामुळें जिव्हाळ्याच्याही स्थानिक प्रश्नांत तिचें फारसें सहाय्य होऊं शकत नाहीं व त्यामुळें तिच्याविषयीं लोकांत आस्थाही एकंदरींत कमीच आढळून येते.

एकतंत्री कारभार सुखावह असला, तरी तो लोकशाहीची जागा भरून काढूं शकत नाहीं. पण आपणांस कारभारांत कांहीं हक्क नाहींत व ते असावेत याची जाणीव खुद्द रयतेलाच झाली पाहिजे. दुर्दैवानें सावंतवाडीच्या प्रजाजनांत ही जाणीव फार विलंबानें होऊं लागली आहे. सावंतवाडी संस्थान लहानसेंच असल्यामुळें येथील शिकलेल्या व महत्त्वाकांक्षी लोकांना पोटासाठीं संस्थानाबाहेर जावें लागतें. संस्थानांत मागें राहाणारीं माणसें नाइलाजानें राहिलेलीं असतात. ही बाहेर जाणारी मंडळी पोटा-साठीं मुंबईंत अगर इतर कुठेंही राहिली, तरी तिचा आपल्या मायभूमी-कडे ओढा असतो व संस्थानच्या उन्नतीची ही मंडळी यथाशक्ति खटप-टही करीत असतात. मुंबईंत सावंतवाडीकरांच्या अनेक संस्था असून त्या संस्थानांतील लोककार्यास वेळोवेळीं मदत करीत असतात. आपल्या गांवच्या लोकांच्या तक्रारींना सभा व वर्तमानपत्रें यांतून वाचा फोडतात, व सावंतवाडीच्या राज्यकारभारावरील आपलें मतही प्रसंगीं व्यक्त करि-तात. या संस्थांपैकीं बऱ्याचशा ज्ञातिविषयक असल्या, तरी सावंतवाडी संस्थान हितवर्धक सभेसारखी एखादीदुसरी संस्था ज्ञातिनिरपेक्षतेनें संस्थानांतील सार्वजनिक प्रश्नांचा परामर्ष घेणारीही आहे. या हितवर्धक सभेमार्फत मुंबईंत ता. ७ व ८ जानेवारी १९२८ रोजीं एक प्रजा-

परिषद् श्री. नारायण मल्हार जोशी, एम्. एल. ए. ( मध्यवर्ति ) यांचे अध्यक्षतेखालीं भरली होती व त्या परिषदेनें कांहीं ठराव पास केले होते. परंतु या उपक्रमास संस्थानांतील लोकांकडून अपेक्षित पाठिंबा न मिळाल्यामुळें ही परिषद् शेवटचीच ठरली. तत्पूर्वी व त्यानंतरही दाक्षिणी संस्थान हितवर्धक सभेमार्फत ज्या संस्थानांतील प्रजेच्या परिषदा भरविल्या जात असत, त्यांत संस्थानांतील गृहस्थ प्रतिनिधि म्हणन भाग घेत असत आणि त्या चळवळीविषयीं सहानुभूति व्यक्त करीत असत. १९२४ सालीं सावंतवाडी संस्थानांतच एक शेतकऱ्यांची परिषद् आमदार सुर्वे यांचे अध्यक्षतेखालीं झाली होती. परंतु शेतकरी ऊर्फ मराठा समाजाच्या कांहीं गाऱ्हाण्यांचें प्रदर्शन करण्यापलीकडे या परिषदेनें कांहीं केलें नाहीं. सन १९३५ सालीं डॉ. पट्टाभिसीतारामय्या यांचें येथें एक व्याख्यान झालें.

सावंतवाडी संस्थान प्रजापरिषदेचें दुसरें अधिवेशन गेल्या १२ वर्षांत भरलेलें नसलें आणि राजकीय चळवळ चालविणारी कायम स्वरूपाची संस्था सावंतवाडींत नसली, तरी लोकशाही चळवळीचे बाहेर वाहणारे वारे सावंतवाडीला स्पर्श केल्याशिवाय राहणें शक्य कसें होईल ? कै. बापुसाहेबमहाराजांच्या राज्यारोहणाच्या दिवशीं सुरू झालेल्या "वैनतेय" पत्रानें संस्थानांत राजकीय आकांक्षा निर्माण करण्याचें आणि निर्भीडपणें लोकमत व्यक्त करण्याचें कार्य गेलीं १५।१६ वर्षें यशस्वी रीतीनें चालविलें असून कालमानानुसार सावंतवाडीच्या प्रजाजनांतही जबाबदार राज्यपद्धतीची अपेक्षा निर्माण होऊं लागली आहे. १९३८ सालीं सावंतवाडी येथें भाई बाटलीवाला यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या सावंतवाडी कॉंग्रेस संमेलनांत सावंतवाडी संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति सुरू करण्यांत यावी अशी स्पष्ट मागणी करण्यांत आली व त्यानंतर १९३९ च्या डिसेंबरमध्यें आमदार केशवराव जेधे यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या द्वितीय संमेलनानें प्रत्यक्ष

कोणताही ठराव केला नसला, तरी त्या संमेलनाचा एकंदर सूर मागच्या वर्षीं संमेलनानें केलेल्या मागणीला पाठिंबा देण्याचाच होता.

१९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टनंतर व तत्पूर्वी गोलमेज परिषदा चालू असतांना संस्थानें जर ब्रिटिश हिंदुस्थानच्या प्रजेबरोबर फेडरेशनचे सभासद झालीं पाहिजेत, तर त्यांतील लोकांस प्रातिनिधिक संस्थांची ओळख असली पाहिजे अशी कल्पना निघाली व त्यामुळेंच कांहीं कांहीं संस्थानिकांनीं आपल्या संस्थानांत प्रातिनिधिक मंडळें स्थापन केलीं आहेत. फेडरेशनची कल्पना रूढ होते न होते तों, राजे बापूसाहेब १९३७ च्या जुलै महिन्यांत कैलासवासी झाले. श्री. शिवराम महाराज हे १० वर्षांचे असल्यामुळें श्री. महाराणी रीजंट साहेबांचा कारभार सुरू झाला आहे. कै. बापूसाहेब महाराजांच्या कारकीर्दींत जातीय वाद उपस्थित करण्याचे आपमतलबी लोकांचे प्रयत्न सफल झाले नव्हते. त्यांनीं असल्या संकुचित व ज्ञातिनिष्ठ दृष्टीचा अधिकारग्रहणप्रसंगींच स्पष्ट निषेध केला होता व पुढेंही त्या वादाला कधीं डोकें वर करूं दिलें नव्हतें. पण बदलत्या राजवटीचा फायदा घेऊन ज्ञातिनिष्ठांनीं ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद निर्माण करण्याचा अलीकडे प्रयत्न चालविला आहे. ‘सावंतवाडी बहुजन समाजाची’ स्थापना हा अशापैकींच एक प्रयत्न होय. अशा ज्ञातिविषयक चळवळीची दृष्टि केवळ स्वार्थपर नसते, तर राजकीय प्रगतीलाच तिचा विरोध होतो ही जास्त शोचनीय गोष्ट होय. ‘बहुजन समाज’ केवळ ब्राह्मणेतरांना विशिष्ट जादा सवलती मिळाव्या एवढाच प्रयत्न करीत नाहीं, तर दरबारला खूप करण्यासाठीं ‘प्रजा जबाबदारीचे अधिकार चालवण्यास अपात्र आहे, सबब संस्थानांत प्रातिनिधिक संस्थाच स्थापन करूं नये.’ असें प्रतिपादन करतो! सावंतवाडी संस्थानांतील रयतेच्या जंगलविषयक तक्रारींना वाचा फोडण्यासाठीं रा.मुद्रस नांवाच्या गृहस्थानें गेल्या वर्षीं जंगल सत्याग्रह करण्याचें ठरवितांच, हा ‘समाज’ एकाएकीं अवतीर्ण झाला व आपल्या सहाय्याला धांवून आल्याचें पारितोषिक म्हणून दरबारनें या संस्थेस

मान्यता देऊन सरकारी नोकरांनींहि तिचे सभासद होण्यास हरकत नाहीं असें फर्मान काढलें! या सरकारी पाठिंब्यानंतर राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांची एखादी सभा भरली कीं, लगेच तेथें प्रतिगामी विचाराच्या लोकांनीं दुसरी सभा भरवावी, तिरंगी झेंड्याची मिरवणूक निघाली कीं, भगव्या झेंड्याची मिरवणूक काढावी, इत्यादि कार्यक्रम 'बहुजन समाजा' नें सुरू केले व अलीकडे सहा महिन्यांपूर्वी या समाजानें आपलें मुखपत्र म्हणून एक साप्ताहिकही सुरू केलें आहे.

जनतेंतील वाढत्या राजकीय जागृतीला विरोध करण्यासाठीं अशा सरकारजमा संस्था जन्मास घालण्याचा प्रयोग नवीन नाहीं. कोल्हापूर संस्थानांत त्याचा प्रयोग पूर्वींच होऊन चुकला आहे आणि किंचित्काल हा प्रयोग फायद्याचा वाटला, तरी तो चिरपरिणामी होऊं शकत नाहीं हा अनुभवही तेथें आलेला आहे. सावंतवाडीचें असें कोल्हापूर बनविणें सावंतवाडीच्या पूर्व लौकिकास शोभेसें नाहीं आणि २५।३० वर्षांपूर्वी कोल्हापुरांत ज्या गोष्टी तात्पुरत्या कां होईना यशस्वी झाल्या, त्या १९४० सालीं सावंतवाडींत होणें अशक्य आहे ही गोष्ट, सावंतवाडीच्या बुद्धिमान व चाणाक्ष महाराणीसाहेब राज्यकारभाराचा जसजसा जास्त अनुभव घेतील, तसतशी त्यांना पटल्यावांचून राहाणार नाहीं.

विशेष तीव्र स्वरूपाची कोणतीही चळवळ येथें न चालतांही प्रातिनिधिक संस्थांची मागणी लोकांकडून होऊं लागली आहे. कै. बापूसाहेब महाराजांच्या निधनोत्तर भरलेल्या कांहीं सभांतून रीजंटसाहेबांनीं लोकप्रतिनिधींचें सल्लागार मंडळ नेमावें अशी सूचना केली होती व राज्याधिकारग्रहणानंतर त्यांनीं काढलेल्या दौऱ्यांच्या प्रसंगींही कित्येक गांवांतून जबाबदार राज्यपद्धतीची मागणी करण्यांत आली. बदलतें कालमान पाहून रीजंट महाराणीसाहेबांनींही, सावंतवाडी संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति सुरू करणें हें आपलें ध्येय असल्याचें निःसंदिग्ध रीतीनें जाहीर केलें आहे. राज्याधिकारी व्यक्तीची बाल्यावस्था ही

प्रजेला राजकीय सुधारणा देण्याच्या आड येण्याचें कारण नाहीं व रीजन्सी कालांतही जबाबदार राज्यपद्धतीचा उपक्रम करण्यास प्रत्यवाय नाहीं ही गोष्ट वरिष्ठ सरकारनेंही मान्य केलेली असल्यामुळें सावंतवाडीचे अल्पवयी राजे श्री. शिवराममहाराज यांची बाल्यावस्था सावंतवाडी संस्थानांत राजकीय सुधारणा सुरू करण्याच्या आड येऊं नये हेंच रास्त होय. सावंतवाडी दरबारचे सल्लागार हें समत्व ओळखून श्री. रीजंट महाराणीसाहेबांना योग्य तो सल्ला देतील तर विशेष तीव्र स्वरूपाची चळवळ होण्याशिवाय देखील येथील प्रश्न सुटणें फारसें अवघड नाहीं.

---

# भोर संस्थानांतील तेजस्वी लढा

लेखक : द. शं. वाळिंबे, पुणें

सातारा जहागिरींपैकीं भोर संस्थानांतील प्रजाजनांनीं आपल्या हक्कासाठीं जो लढा लढविला, त्याला दक्षिण महाराष्ट्रीय संस्थानी चळवळीच्या लढ्यांत काय, पण अखिल हिंदुस्थानांतील खालसा अगर संस्थानी लोकपक्षीय चळवळींत तोड सांपडणार नाहीं अशी आमची समजूत आहे. भोर संस्थानांतील प्रजेनें आपला लढा लढवितांना जो निर्भयपणा दाखविला, लढावू वृत्ति दाखविली, तिची बरोबरी झाल्याचें क्वचितच दिसून येईल. करबंदी अगर सत्याग्रह केल्याशिवाय भोरच्या प्रजेवरील अन्यायांचें निराकरण झालेंच नाहीं असें म्हणावयास हरकत नाहीं. भोर संस्थानांतील प्रजा ही विशेष सुशिक्षित होती, असेंही समजण्याचें कारण नाहीं. तिचे पुढारीही विद्वान् आणि भारतीय कीर्ति मिळविलेले होते असेंही नाहीं. पण अन्यायाविषयीं उत्पन्न झालेली चीड, आणि त्यासाठीं करावा लागणारा आत्मयज्ञ, पुढाऱ्यांवर असलेला अढळ विश्वास आणि पुढाऱ्यांची आपल्या अनुयायांबद्दल असलेली आत्यंतिक आस्था आणि त्यांची विलक्षण खटपट, या गुणांच्या जोरावर भोर संस्थानांतील अशिक्षित मावळ्यांनीं शेटे आणि पोतनीस बंधू यांच्या पुढारीपणाखालीं करबंदी आणि सत्याग्रहासारख्या आत्यंतिक चळवळी करून आपली शक्ति संस्थान सरकारांस दाखवून आपल्या मागण्या मान्य करून घेतल्या. ज्या संस्थानांत या चळवळी झाल्या, तें भोर संस्थान तरी असें कितीसें मोठें आहे? सहा लाख उत्पन्नाचें आणि १,४१००० लोकवस्ती असलेलें भोर संस्थान पुण्यापासून ३४ मैलांवर असून या संस्थानचा सर्व मुलूख डोंगराळ आहे. भाताशिवाय दुसरें पीक नाहीं; रस्त्यांचा अभाव आणि कोंकणांतील दारिद्र्य. भोर संस्थानांतील मावळा हा पैशानें गरीब असला, तरी त्यानें राजकीय चळवळींत निर्भय व उच्च वृत्तीचें असल्याचें दाखवून दिलें आहे.

## विकट परिस्थिति

सन १९२० चे सुमारास खालसा हद्दींत असहकाराची चळवळ सुरू होऊन लोकांत विलक्षण उत्साह व जागृति उत्पन्न झाली होती. स्वातंत्र्य-प्राप्तीसाठीं चाललेल्या चळवळींत धडाडीनें भाग घेऊन कष्ट व कारागृहवास सोसण्यास लोक अहमहमिकेनें पुढें येत होते. पण याच वेळीं हिंदी संस्थानांत मात्र याच्या अगदीं उलट परिस्थिति होती. दक्षिण महाराष्ट्रांतील बहुतेक सर्व संस्थानांतून एकतंत्री कारभार सुरू असल्यामुळें राजकीय हक्क संपादनासाठीं चळवळ करणें जवळ जवळ अशक्य झालें होतें. सभाबंदी-सारखे कायदे उघड उघड अगर गुप्तपणें जारी होते. जाहीर सभा भरविणें अगर जाहीर भाषणें करणें सर्वस्वी अवघड होऊन बसलेलें होतें. वर्तमान-पत्रासारखें साधन उपलब्ध नसल्यानें संस्थानी प्रजेला त्यांच्या असहाय्य परिस्थितीची जाणीव करून देणें अगर त्यांच्या हालअपेष्टा जगापुढें मांडून त्या दूर करून घेण्याचें काम करणें फारच अवघड झालेलें होतें. खालसा हद्दींतील पत्रकारांचा संस्थानी कारभाराकडे पाहण्याचा दृष्टिकोनच निराळा असल्या-मुळें व संस्थानांतील बेबंद कारभाराची खरी माहिती मिळत नसल्यामुळें संस्थानी प्रजेवरील अन्यायास खालसा हद्दींतील वृत्तपत्रांतून सहसा प्रसिद्धी-ही मिळत नसे. अशा परिस्थितींत भोर संस्थानांत माजी कारकीर्दीमध्यें "तोंड धरून वर बुक्क्यांचा मार" अशी परिस्थिति उत्पन्न होऊन रयतेची सर्व बाजूंनीं व सर्व प्रकारें कुचंबणा झालेली होती. इनामदार, हक्कदार वगैरे लोकांच्या हक्कांचे बाबतींत दरबारकडून अतिक्रमण झालेलें होतें. संस्थानांत सर्व्हे सेटलमेंट व फॉरेस्ट सेटलमेंट लागू करतेवेळीं रयतेच्या हक्कांचे बाबतींत फारच अन्याय झालेला होता. रयतेच्या मालकी नंबरां-तील हिरडे फळावर निर्बंध ठेवण्यांत आल्यामुळें मावळ भागांतील शेतकरी-वर्गाचे निर्वाहाचें असलेलें एकच साधन नष्ट झालें होतें. लग्न टक्का, पाटदाम, म्हैसपट्टी यांसारखे हास्यास्पद व जुलमी कर अंमलांत होते. नोकरशाहीच्या लांचलुचपतीमुळें व गांवगुंडांच्या त्रासामुळें संस्थानचे कारभाराविषयीं लोकांत



श्री. वाळिंबे, दामुअण्णा पोतनीस, ज्ञानराव देशमुख,
शंकरराव ढोर, शेटचे, गोपिनाथपंत पोतनीस.



श्री. द. शं. वाळिंबे.

एकसारखा असंतोष वाढत चालला होता. भोर संस्थानांतील चळवळीचा प्रारंभ बरोबर वीस वर्षांपूर्वी झाला आहे. भोर संस्थानांतील चळवळीची मुहूर्तमेढ शिरवळांतील पाण्याच्या गैरसोईबाबत ज्या तक्रारी होत्या, त्यामुळें सन १९२० मध्यें रोंवली गेली असें म्हणण्यास हरकत नाहीं.

भोर संस्थानांतील शिरवळ गांव हें त्या तालुक्याचें मुख्य ठिकाण होतें, तरी उद्योगधंद्याची व पाण्याची सोय तेथें नसल्यामुळें त्या गांवची लोकसंख्या दिवसेंदिवस कमी होत चालली होती. पिण्याचे पाण्यासाठीं गांवकरी लोकांनीं अर्ज विनंत्या करणें, शिष्टमंडळें नेणें वगैरे सर्व सनदशीर प्रयत्न केले, परंतु त्यांचा कांहींच उपयोग झाला नाहीं. यामुळें गांवांतील कांहीं उत्साही मंडळींनीं एक गांवसभा स्थापन करून त्या सभेमार्फत तक्रारींची दाद लावून घेण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें कै. भाऊसाहेब शेटे, श्री. माधवराव सुभेदार, हरिभाऊ देशपांडे, शंकर रघुनाथ वाळिंबे वगैरे मंडळींनीं कै. बा. बापूसाहेब निगडे देशमुख यांच्या अध्यक्षतेखालीं सभा भरवून ता. ३०-१२-२० रोजीं गांव-सभा स्थापन केली. ता. २-१-१९२१ रोजीं माजी पंतसाहेबांची स्वारी शिरवळास आल्यावेळीं या गांवसभेच्या शिष्टमंडळानें आपले पाण्याबाबतचें गाऱ्हाणें त्यांच्यापुढें मांडलें. शिरवळच्या पाण्याचा निकाल जर समाधानकारकरित्या लागला नाहीं, तर सारा दिला जाणार नाहीं असें दरबारास सांगण्यांत आलें. पण या खटपटीचा परिणाम पाण्याची गैरसोय दूर होण्यात झाला नाहीं. हा प्रकार होण्याचे आधींच भोर संस्थानांतील सुधागड तालुक्यांतील कांहीं लोकांनीं सुधागड तालुका सभा मुंबई येथें भरविली होती. त्याबद्दलचाही रोष श्रीमंतांचे मनांत होताच. तेवढ्याकरतां भोर संस्थानांतील श्री. आबासाहेब चांदोरकर व श्री. आबासाहेब आठवले यांच्याकडून जामीन घेतले होते. शिरवळच्या या चळवळींत पडल्याबरोबर श्री. शेटे यांना जो अनुभव आला आणि संस्थान हद्दींतील लांचलुचपत, जुलूम, त्याचप्रमाणें अतिशय जुन्यापद्धतीची राज्यकारभार चालविण्याची पद्धत यांची चीड येऊन त्यांनीं पुणें

म्युनिसिपालिटीची एक वर्ष हक्काची रजा प्रथम घेऊन पुढें नोकरीला रामराम ठोकला. व पुढील सर्व काळ त्यांनीं व त्यांचे सहकारी पोतनीस बंधू यांनीं भोर संस्थानांत अपूर्व जागृति करण्यांत घालविला व त्याचा पुढील प्रजासभेच्या कार्यास अतिशय उपयोग झालेला आहे. भोर चळवळीचे हे तिघे प्राणच होते असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## सभाबंदी

शिरवळचे उत्साही व स्वार्थत्यागी कार्यकर्ते कै. शेटे व श्री. दत्तोपंत वाळिंबे यांनीं पुणें येथें असलेल्या भोर संस्थानांतील रहिवाशांच्या मदतीनें पुणें येथें ता. ६-२-२१ रोजीं "विचित्रगड तालुका सभा" स्थापन् केली. सदर तालुका सभेचें पहिलें अधिवेशन शिरवळ येथें नदीचे कांठीं ता. २७ व २८ मार्च १९२१ रोजीं पुण्याचे रावब. ल. ज. आपटे यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आलें. अधिवेशन गांवांत भरविण्याचें प्रथम ठरलें होतें, परंतु स्थानिक अधिकाऱ्यांनीं त्यास प्रतिबंध केल्यामुळें अधिवेशन नदीकांठीं खालसामध्यें भरवावें लागलें. या विचित्रगड तालुका सभेचें शिष्टमंडळ घेऊन कै. रावब. ल. ज. आपटे पुण्यांतील वाड्यांत श्रीमंतांचे भेटीस गेले; पण श्रीमंतांना एवढा अहंकार होता कीं, पुण्याच्या म्युनिसिपालिटीचे नगराध्यक्ष असलेल्या व इंग्रज सरकारनें ज्यांना 'रावबहादूर' ही पदवी देऊन सन्मानिलें आहे, अशा या सन्माननीय सद्गृहस्थाची गांठभेट सुद्धां श्रीमंतांनीं घेतली नाहीं. या अधिवेशनामुळें संस्थानांत राजकीय हक्क संपादनाची चळवळ सुरूं होत असलेली पाहून सर्व संस्थानास ता. १ मे १९२१ पासून सभाबंदीचा कायदा लागू करण्यांत आला.

## सभाबंदीचा कायदा मोडला

अशा रीतीनें सुरवातीच्या चळवळीस दरबारकडून जोराचा विरोध होऊं लागल्यामुळें चळवळीच्या कार्यकर्त्यांस मोठी अडचण उत्पन्न झाली. याच सुमारास दक्षिणी संस्थानांतील प्रजेंत जागृति उत्पन्न करण्यासाठीं

व राजकीय हक्क संपादन करण्यासाठीं "दक्षिणी संस्थान हितवर्धक सभा" पुणें येथें ता. २४ मे १९२१ रोजीं स्थापन होऊन तिचें पहिलें अधिवेशन ता. २४ व २५ मे १९२१ रोजीं पुणें येथें भरलें. या सभेच्या कार्यकारी मंडळामध्यें भोरतर्फे कै. भाऊसाहेब शेटे यांची निवड झाली. त्यांनीं दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेच्या प्रमुख कार्यकर्त्यांची भेट घेऊन व भोर संस्थानांतील परिस्थिति त्यांना समजावून देऊन या सभेमार्फत संस्थानांतून दौरा काढणेबद्दल त्यांना आग्रहाची विनंति केली. त्याप्रमाणें श्री. तात्यासाहेब केळकर व कै. वामनरावजी पटवर्धन यांच्या नेतृत्वा-खालीं भोरवर कायदेभंगाची मोहीम सुरू झाली. या मोहिमेंत देशभक्त तात्यासाहेब केळकर, कै. वामनरावजी पटवर्धन, श्री. वालचंद रामचंद कोठारी, डॉ. शिरोडकर, अष्टपुत्रे, डॉ. नाईक व डॉ. सौ. इंदुमतीबाई नाईक वगैरे संस्थानाबाहेरच्या देशभक्तांनीं प्रत्यक्ष भाग घेतला होता. ता. १२-१०-१९२१ रोजीं शिरवळास सभा झाली व ही मंडळी ता. १३-१०-२१ रोजीं भोरास आल्यावर त्यांना तेथें उतरण्यास कोणी जागाही देईना. पण कै. बाबासाहेब पाटणकर हे सरकारी नोकर असतांनाही त्यांनीं जागा दिली. वरील पुढारी मंडळींनीं सभेसाठीं परवानगी मागितली, पण कोणत्याही अटीवर सभा भरविण्यास परवानगी न मिळाल्यामुळें शेवटीं सभाबंदीचा कायदा मोडून श्री. केळकर, पटवर्धन वगैरेंनीं भाषणें केलीं आणि चळवळीची पहिली ठिणगी उडाली. संस्थानहद्दींतील कै. शेटे, श्री. वाळिंबे व भाऊराव जगताप यांच्याबरोबर दे. भ. तात्यासाहेब केळकर, वामनरावजी पटवर्धन, डॉ. शिरोडकर, रा. कोठारी व श्री. नारायणराव गुंजाळ यांचेवरही वॉरंटें सुटून खटले भरले गेले. केवळ सभाबंदीचा कायदा मोडून खटले भरवून घेणें अथवा कैदेंत जाणें हें कार्य आतां मागें पडून प्रजापरिषद भरवावी व प्रजासभेची स्थापना करावी असें वाटूं लागून भोर संस्थानांतील कार्यकर्ते कै. वामनरावजी पटवर्धन यांच्या नेतृत्वाखालीं त्या कार्याला लागले. नंतर ता. १३-११-१९२१ रोजीं पुणें येथील सार्वजनिक सभेच्या हॉल-

म्युनिसिपालिटीची एक वर्ष हक्काची रजा प्रथम घेऊन पुढें नोकरीला राम-राम ठोकला. व पुढील सर्व काळ त्यांनीं व त्यांचे सहकारी पोतनीस बंधू यांनीं भोर संस्थानांत अपूर्व जागृति करण्यांत घालविला व त्याचा पुढील प्रजासभेच्या कार्यास अतिशय उपयोग झालेला आहे. भोर चळवळीचे हे तिघे प्राणच होते असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## सभाबंदी

शिरवळचे उत्साही व स्वार्थत्यागी कार्यकर्ते कै. शेटे व श्री. दत्तोपंत वाळिंबे यांनीं पुणें येथें असलेल्या भोर संस्थानांतील रहिवाशांच्या मदतीनें पुणें येथें ता. ६-२-२१ रोजीं "विचित्रगड तालुका सभा" स्थापन केली. सदर तालुका सभेचें पहिलें अधिवेशन शिरवळ येथें नदीचे कांठीं ता. २७ व २८ मार्च १९२१ रोजीं पुण्याचे रावब. ल. ज. आपटे यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आलें. अधिवेशन गांवांत भरविण्याचें प्रथम ठरलें होतें, परंतु स्थानिक अधिकाऱ्यांनीं त्यास प्रतिबंध केल्यामुळें अधिवेशन नदीकांठीं खालसामध्यें भरवावें लागलें. या विचित्रगड तालुका सभेचें शिष्टमंडळ घेऊन कै. रावब. ल. ज. आपटे पुण्यांतील वाड्यांत श्रीमंतांचे भेटीस गेले; पण श्रीमंतांना एवढा अहंकार होता कीं, पुण्याच्या म्युनिसिपालिटीचे नगराध्यक्ष असलेल्या व इंग्रज सरकारनें ज्यांना 'रावबहादूर' ही पदवी देऊन सन्मानिलें आहे, अशा या सन्माननीय सद्गृहस्थाची गांठभेट सुद्धां श्रीमंतांनीं घेतली नाहीं. या अधिवेशनामुळें संस्थानांत राजकीय हक्क संपादनाची चळवळ सुरू होत असलेली पाहून सर्व संस्थानास ता. १ मे १९२१ पासून सभाबंदीचा कायदा लागू करण्यांत आला.

## सभाबंदीचा कायदा मोडला

अशा रीतीनें सुरवातीच्या चळवळीस दरबारकडून जोराचा विरोध होऊं लागल्यामुळें चळवळीच्या कार्यकर्त्यांस मोठी अडचण उत्पन्न झाली. याच सुमारास दक्षिणी संस्थानांतील प्रजेंत जागृति उत्पन्न करण्यासाठीं

व राजकीय हक्क संपादन करण्यासाठीं "दक्षिणी संस्थान हितवर्धक सभा" पुणें येथें ता. २४ मे १९२१ रोजीं स्थापन होऊन तिचें पहिलें अधिवेशन ता. २४ व २५ मे १९२१ रोजीं पुणें येथें भरलें. या सभेच्या कार्यकारी मंडळामध्यें भोरतर्फे कै. भाऊसाहेब शेटे यांची निवड झाली. त्यांनीं दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेच्या प्रमुख कार्यकर्त्यांची भेट घेऊन व भोर संस्थानांतील परिस्थिति त्यांना समजावून देऊन या सभेमार्फत संस्थानांतून दौरा काढणेबद्दल त्यांना आग्रहाची विनंति केली. त्याप्रमाणें श्री. तात्यासाहेब केळकर व कै. वामनरावजी पटवर्धन यांच्या नेतृत्वाखालीं भोरवर कायदेभंगाची मोहीम सुरू झाली. या मोहिमेंत देशभक्त तात्यासाहेब केळकर, कै. वामनरावजी पटवर्धन, श्री. वालचंद रामचंद कोठारी, डॉ. शिरोडकर, अष्टपुत्रे, डॉ. नाईक व डॉ. सौ. इंदुमतीबाई नाईक वगैरे संस्थानाबाहेरच्या देशभक्तांनीं प्रत्यक्ष भाग घेतला होता. ता. १२-१०-१९२१ रोजीं शिरवळास सभा झाली व ही मंडळी ता. १३-१०-२१ रोजीं भोरास आल्यावर त्यांना तेथें उतरण्यास कोणी जागाही देईना. पण कै. बाबासाहेब पाटणकर हे सरकारी नोकर असतांनाही त्यांनीं जागा दिली. वरील पुढारी मंडळींनीं सभेसाठीं परवानगी मागितली, पण कोणत्याही अटीवर सभा भरविण्यास परवानगी न मिळाल्यामुळें शेवटीं सभाबंदीचा कायदा मोडून श्री. केळकर, पटवर्धन वगैरेंनीं भाषणें केलीं आणि चळवळीची पहिली ठिणगी उडाली. संस्थानहद्दींतील कै. शेटे, श्री. वाळिंबे व भाऊराव जगताप यांच्याबरोबर दे. भ. तात्यासाहेब केळकर, वामनरावजी पटवर्धन, डॉ. शिरोडकर, रा. कोठारी व श्री. नारायणराव गुंजाळ यांचेवरही वॉरंटें सुटून खटले भरले गेले. केवळ सभाबंदीचा कायदा मोडून खटले भरवून घेणें अथवा कैदेंत जाणें हें कार्य आतां मागें पडून प्रजापरिषद भरवावी व प्रजासभेची स्थापना करावी असें वाटूं लागून भोर संस्थानांतील कार्यकर्ते कै. वामनरावजी पटवर्धन यांच्या नेतृत्वाखालीं त्या कार्याला लागले. नंतर ता. १३-११-१९२१ रोजीं पुणें येथील सार्वजनिक सभेच्या हॉल-

मध्यें प्रजासभेची स्थापना होऊन तात्पुरतें कार्यकारी मंडळ, अध्यक्ष, उपाध्यक्ष, सेक्रेटरी निवडण्यांत येऊन अखिल भोर संस्थान प्रजापरिषद् भरविण्याचें निश्चित ठरलें.

प्रजापरिषदेचा प्रचार करण्यासाठीं श्री. पोतनीस बंधु, वाळिंबे, कै. शेटे यांनीं संस्थानचे पांचही तालुक्यांतून दौरा काढून लोकांत विलक्षण जागृति उत्पन्न केली. प्रजापरिषदेचें पहिलें अधिवेशन भोर येथें ता. २५ व २६ जानेवारी १९२२ रोजीं श्री. तात्यासाहेब केळकर यांचे अध्यक्षतेखालीं भरलें. या अधिवेशनाच्या अगोदर पुढाऱ्यांवरील खटल्याचा निकाल लागून त्यांना दोषमुक्त करून सोडून देण्यांत आलें. भोर प्रजापरिषदेच्या पहिल्या आधिवेशनाचा जो संस्थानभर प्रचार करण्यांत आला, तो सभाबंदीचा कायदा मोडूनच करण्यांत आला. संस्थानांत कायदेभंग करण्याचा पहिला मान भोरसारख्या छोट्या संस्थाननें संपादला. पहिलें अधिवेशन यशस्वी करण्याच्या कामीं श्री. शेटे, पोतनीस व इतर कार्यकर्त्यांना दरबारशीं सतत झगडा करावा लागला व ही परिषद पोलिसांच्या पहाऱ्यांत मोठ्या यशस्वीपणें पार पडली. या अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष पुण्याचे सुप्रसिद्ध डॉ. वि. दा. फाटक हे होते. या परिषदेला १०००० मावळे उपस्थित होते. परिषदेच्या या यशानें माजी पंतसाहेब नरमले, अधिकाऱ्यांचा विरोध हिणकस ठरला, आणि त्यावेळचे युवराज श्री. बाबासाहेब यांनीं परिषदेच्या अध्यक्षांना पानसुपारी करून भोर दरबारचें वर्तन किती हास्यास्पद आणि मूर्खपणाचें आहे तें दाखवून दिलें. या परिषदेला श्री. शंकरराव देव, डॉ. शिरोडकर, श्री. वा. रा. कोठारी, वामनराव पटवर्धन वगैरे मंडळी उपस्थित होती. या परिषदेंत श्री. तात्यासाहेब केळकरांनीं संस्थानचा ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्ट आपल्या पायाखालीं तुडविला इतका भोर कारभाराचा तिरस्कार त्यांना आला होता.

प्रजापरिषदेचीं आजपर्यंत एकंदर बारा अधिवेशनें भरविण्यांत आलीं. प्रजा-सभा स्थापन झाल्यापासून निरनिराळ्या संकटांस व

आपत्तीस तोंड देऊन लोकांच्या राजकीय हक्कासाठीं सारखी झगडत राहिल्यामुळें प्रजा-सभा हीच आज सर्व संस्थानची प्रातिनिधिक स्वरूपाची एकमेव संस्था आहे.

यानंतर प्रचंडगड तालुक्याची सभा मोसे खोऱ्यांत कुरण मुक्कामीं श्री. ल. ब. ऊर्फ अण्णासाहेब भोपटकर यांच्या अध्यक्षतेखालीं पोलिसांच्या गराड्यांत ता. २५-५-१९२२ रोजीं यशस्वी रीतीनें पार पडली. संस्थानांत अशा सररहा सभा भरत जात असल्यामुळें सभाबंदीचा कायदा बोथट स्वरूपांतच राहिला असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रजासभा स्थापन झाल्यापासून अवघ्या एक वर्षाच्या आंतच तिच्या शाखा म्हणून तालुका सभा स्थापन करून चळवळ खेड्यापर्यंत नेण्याचें महत्त्वाचें कार्य कै. शेटे, श्री. दामूअण्णा व गोपिनाथपंत पोतनीस यांनीं केलें. श्री. दत्तोपंत वाळिंबे, राजारामशेट गुजर, जानराव देशमुख, कै. बाबासाहेब पाटणकर यांनीं विचित्रगड तालुक्यांत दौरा काढून सभा-बंदीचा कायदा मोडून ठिकठिकाणीं जाहीर भाषणें करून लोकांमध्यें जागृति उत्पन्न केली. कै. शेटे, शंकरराव ढोर, श्री. पोतनीस बंधु वगैरे मंडळींनीं वेळवंड खोरें, प्रचंडगड व पवनमावळ भागांत दौरा काढून ठिकठिकाणीं जाहीर सभा व भाषणें करून लोकांत निर्भयता उत्पन्न केली. यामुळें लोकांना त्यांचेवर होत असलेल्या अन्यायाची व जुलमाची जाणीव होऊं लागली. पहिल्या प्रजापरिषदेनें पास केलेल्या ठरावाप्रमाणें संस्थानांत चालू असलेले जुलमी कर व सभाबंदीचा कायदा रद्द करण्याची दरबारनें कांहींच तजवीज न केल्यामुळें जुलमी कर रद्द होईपर्यंत शेतसारा द्यावयाचा नाहीं असें लोकांनीं ठरविलें व त्याप्रमाणें हिरडस मावळ, वेळवंड खोरें, प्रचंडगड व पवनमावळ तालुक्यांतील लोकांनीं जुलमी कर रद्द होईपर्यंत शेतसारा देण्याचें तहकूब केलें.

माजी पंतसाहेब हे ता. १७-७-१९२२ रोजीं देवाधीन झाले आणि सध्यांचे अधिपति श्री. बाबासाहेब हे राज्यारूढ झाले. कायदेभंग

करणाऱ्या श्री. केळकरांना पानसुपारी देऊन त्यांनीं आपली प्रजापक्षीय चळवळीबद्दलची सहानुभूतिपर दृष्टि व्यक्त केली होती आणि त्यांनीं राज्यसूत्रें हातीं घेतल्याबरोबर शेतकऱ्यांवरील लग्नटक्का, पाटदाव, घरवण आणि म्हैसपट्टी हे कर रद्द केले, सभाबंदीचा कायदा रद्द केला आणि आपल्या राजवटीस शुभशकून करून घेतला. पवनमावळ तालुक्यांतील साराबंदी श्रीमंतांनीं स्वीकारलेल्या नवीन धोरणामुळें प्रजासभेच्या लोकांनीं माघारी घेतली आणि उरलेली जमीनधाऱ्याची पट्टी भरावी अशी लोकांना विनंति करण्याकरतां सदर तालुक्यांत कोळवण येथें सभा करून लोकांना पट्टया भरणेस आदेशिलें. या एकंदर घडामोडीमुळें लोकांना प्रजासभेच्या चळवळीविषयीं विश्वास वाटूं लागला व चळवळींत ते मोठ्या प्रमाणावर सामील होऊं लागले. प्रजासभा स्थापन झाल्यापासून अवघ्या एक वर्षाच्या आंतच करबंदी करण्याइतकी जागृति व विश्वास लोकांचे ठिकाणीं उत्पन्न करून करबंदीची चळवळ यशस्वी करून दाखविण्याचें सर्व श्रेय कै. शेटे व श्री. पोतनीसबंधु यांनाच आहे. त्यांनीं सतत परिश्रम करून सारख्या सभा भरवून, लोकांना परिस्थिति नीट समजावून दिली. दरबारच्या रोषाची व भोगाव्या लागलेल्या कष्टाची बिलकूल पर्वा न करतां त्यांनीं अत्यंत धैर्यानें, चिकाटीनें व स्वार्थत्यागपूर्वक चळवळ चालूं ठेवली व त्यामुळें त्यांना करबंदीची चळवळ यशस्वी करून दाखवितां आली. श्रीमंत बाबासाहेबांनीं राज्यारोहणप्रसंगीं जे कर माफ केले, व जंगलाचें गाऱ्हाणें दूर करण्याचें जें आश्वासन दिलें, त्याबद्दल कृतज्ञता दर्शविण्यासाठीं श्रीमंतांना प्रजासभेनें मानपत्र दिलें.

## भाटघर–सत्याग्रह

भाटघर धरणाचें नवीन बांधकाम सुरूं झालें, त्यावेळीं धरणासाठीं लागणारा दगड वेळवंड खोऱ्यांतील लोकांच्या मालकी जमिनींतून काढून त्याबद्दल एक पैही मोबदला न देतां नेण्यांत येत होते. या अन्यायाची दाद लागण्यासाठीं त्या लोकांनीं भोर दरबार व ब्रिटिश सरकार यांचेकडे बरीच

खटपट केली. परंतु त्याचा कांहींही उपयोग झाला नाहीं. प्रजासभेनें ही बाब हातीं घेऊन वरील अन्यायाची दाद लावून घेण्यासाठीं स्थानिक लोकांच्या मदतीनें वेळवंड खोरें हक्कसंरक्षण मंडळ स्थापन करून त्या मंडळामार्फत त्यावेळीं मुंबई कायदेमंडळांत असलेल्या सभासदांपैकीं श्री. भोपटकर, गुंजाळ, काळभोर, वासुदेवराव गुप्ते वगैरे सभासदांना तेथें नेऊन तेथील परिस्थिति त्यांना समक्ष दाखविण्यांत आली. त्याप्रमाणेंच दे. भ. शंकरराव देव, काकासाहेब गाडगीळ, प्रो. घारपुरे, कै. वामनरावजी पटवर्धन वगैरे मंडळींना तेथील परिस्थिति समक्ष दाखविण्यांत आली. त्यांचीं ठिकठिकाणीं जाहीर भाषणें करणेंत आलीं. दगड काढून नेलेल्या जागेचे फोटोही घेण्यांत आले. धरणासाठीं नेलेल्या दगडांची किंमत लोकांना देण्याची तजवीज ब्रिटिश सरकारकडून न झाल्यामुळें अखेर लोकांनीं निरुपाय म्हणून सन १९२२ सालीं सत्याग्रह करून दगडाचा मोबदला मिळेपर्यंत दगड काढून नेणेस हरकत घेतली. इतक्या थरावर गोष्टी गेल्यानंतर भाटघर धरणावरील अधिकारी व हक्कसंरक्षक मंडळांतील प्रमुख मंडळी यांच्यांत विचारविनिमय होऊन दगडांची योग्य किंमत ठरविणेसाठीं मुंबई सरकारनें एक कमिटी नेमली. सदर कमिटीवर रयतेतर्फे श्री. गोपिनाथपंत पोतनीस यांची पंच म्हणून नेमणूक झाली. त्यांनीं स्थानिक कार्यकर्त्यांच्या मदतीनें धरणासाठीं नेलेल्या दगडांचा गांववार तक्ता तयार करून कमिटीस सादर केला; व आतांपर्यंत ज्या जमिनी अक्वायर केल्या नव्हत्या, त्या जमिनींतील पिकांच्या नुकसानीची माहिती मिळवून ती कमिटीस सादर केली. अशा रीतीनें श्री. गोपिनाथराव पोतनीस वगैरे कार्यकर्त्या पुढाऱ्यांचे प्रयत्नामुळें धरणासाठीं नेलेल्या दगडांची किंमत म्हणून सुमारें रु. १२००० त्या खोऱ्यांतील लोकांना मुंबई सरकारकडून मिळाले. कांहीं लोकांनीं रोख नुकसानभरपाई न घेतां, धरणाखालच्या जमिनी घेतल्या.

## हिरडा-सत्याग्रह

भोर संस्थानचा मुलूख बहुतेक डोंगरी असून या संस्थानांतील जंगलांत हिरड्याचें उत्पन्न फार मोठ्या प्रमाणावर येतें. सात आठ हजार खंडी हिरडा दरसाल या संस्थानांतून निर्गत होतो. सचीव सरकार आणि इंग्रज सरकार यांच्यांत जे तहनामे झालेले आहेत, त्यांत रयतेला दुबार कर बसूं नये म्हणून सचीव सरकारचा आयात व निर्यात कर घेण्याचा हक्क ब्रिटिश सरकारनें सार्वभौम सरकार या नात्यानें काढून घेतलेला आहे. पण सचीव सरकार हिरड्याच्या बाबतींत हा आयात-निर्यात कर अन्य रीतीनें घेत होते व अजूनही घेतात. या निर्यात कराला, ही चळवळ सुरू झाल्यावर, दरबारनें रॉयल्टी असें नांव दिलें आहे. एक्सपोर्ट ड्यूटी ते वसूल करीत होते, एवढेंच नव्हे तर, या एक्सपोर्ट ड्यूटीचा ते एका व्यापारी कंपनीला मक्ता देत होते. याचा अर्थ असा कीं, या कंपनीशिवाय कोणालाही संस्थानांत हिरडा खरेदी करतां येत नव्हता व या कंपनीशिवाय दुसऱ्या कोणालाही आपल्याजवळील हिरडा विकत देतां येत नव्हता. हीं दोन्ही कृत्यें भोर संस्थानांत गुन्हा मानलीं जात होती. मक्ता दिलेल्या व्यापारी कंपनीस भोर दरबार निरख बांधून देत असे. या ठराविक निरखाप्रमाणें कंपनीनें माल खरेदी करावा, व लोकांनीं कंपनीस द्यावा. अशा तऱ्हेचा मक्ता बरींच वर्षें मुंबईची पुरुषोत्तम मथुरादास कंपनी घेत असे. महायुद्धानंतरच्या काळांत जर्मन मालाशीं चढाओढ करण्याच्या निमित्तानें हिरडा परदेशीं भयंकर तेजीनें जात होता. पुण्यांत पांचपासून तीन पायलीपर्यंत दर असला, तरी कंपनीला संस्थान हद्दींत गाडी-मार्गावर दहा पायली व इतर मार्गावर तेरा पायली सरकारी निरखानें देणें रयतेला भाग पडे. या कंपनीच्या मक्तेदारांच्या इतर व्यवहाराबद्दलही फार तक्रार होती. ही कायदेशीर नुकसानी भोर संस्थानांतील चळवळ्या लोकांनीं चालू दिली नाहीं ही त्यांना अत्यंत भूषणावह गोष्ट आहे. या हिरडा-विक्रीच्या जुलमी पद्धतीला कंटाळून सन १९२२ सालीं लोकांनीं हिरडा गोळा करण्याचें

तहकूब केलें. त्यामुळें मक्ता झाला तरी मक्तेदारास हिरडा मिळाला नाहीं. त्यामुळें सन १९२३ सालीं कोणीही मक्ता घेतला नाहीं. १९२३-२४ सालीं भोर दरबारनें प्रजासभेच्या पुढाऱ्यांबरोबर वाटाघाट करून एक वर्षापुरती तडजोड ठरवून माल निर्गत करणेस लोकांना परवानगी दिली. परंतु १९२४-२५ सालीं पुन्हां पूर्वीच्याच कंपनीस हिरड्याचा मक्ता देण्यांत आला. मक्तेदारास माल न घालतां संस्थान-हद्दीबाहेर माल नेऊन विकल्यास लोकांना चांगला भाव मिळत असल्या-मुळें खंडीस दोन रुपये ड्यूटी घेऊन माल निर्गत करणेची परवानगी मिळावी म्हणून मोसे खोऱ्यांतील हजारों लोकांनीं सामुदायिकपणें व व्यक्तिशः श्रीमंतांकडे अर्ज केले. प्रजासभेच्या प्रमुख पुढाऱ्यांनीं वेल्हे मुक्कामीं श्रीमंत बाबासाहेब यांची भेट घेऊन संस्थानचे हद्दीबाहेर बाजा-रांत हिरडे फळास चांगला भाव मिळत असल्यामुळें ड्यूटी घेऊन माल निर्गत करणेस लोकांना परवानगी देणेबद्दल विनंति केली. परंतु त्याचाही कांहीं उपयोग झाला नाहीं. मक्तेदार बाजारभावानें माल घेण्यास तयार नसून अगदीं स्वस्त भावानें तो माल घेत होता. हिरड्याचा माल संस्थान हद्दीबाहेर लोकांनीं नेऊं नये यासाठीं कुरण येथें मोठी शिबंदी ठेवण्यांत आली; परंतु रीतसर परवानगी न दिल्यास सत्याग्रह करून माल निर्गत कराव-याचा असा लोकांनीं निर्धार करून तसा निर्वाणीचा खलिता ता. १५-१-२५ रोजीं दरबारकडे पाठविण्यांत आला व ठरल्याप्रमाणें श्री. नारायणराव देशपांडे यांचे नेतृत्वाखालीं सुमारें तीन हजार मावळे स्त्री-पुरुषांनीं हिरडे फळाचीं लहान लहान ओझीं कुरण येथें आणून त्याची ड्यूटी घेणेबद्दल नाकेदारास सांगितलें; परंतु त्यानें ड्यूटी घेण्याचें नाकारल्यामुळें वरील लोकांनीं सत्याग्रह करून हिरड्याचीं ओझीं पुण्यास ता. ४-२-१९२५ रोजीं आणलीं. तीन हजार मावळे स्त्री-पुरुषांची मिरवणूक निघाल्यास वाहतुकीस अड-थळा होऊं नये यासाठीं पांच पांच लोकांची रांग करून लकडी पुलापासून वरील लोकांची मिरवणूक निघून ती मंगळदास रोडवरील श्रीमंतांचे

बंगल्यावर गेली. तेथें त्यावेळचे स्टेट कारभारी यांनीं पुढाऱ्यांची गांठ घेऊन लोकांच्या तक्रारीचा विचार करण्याचें आश्वासन दिलें, पण तें केवळ शाब्दिक ठरलें. नंतर सर्व मंडळी ओझीं घेऊन मंडईमध्यें परत आली. लोकांनीं पुण्यास आणलेलीं हिरड्याचीं ओझीं पुण्यांतील फॉरेस्ट खात्याकडून जप्त करण्यांत आलीं. त्याच दिवशीं सायंकाळीं श्री. अण्णासाहेब भोपटकर यांचे अध्यक्षतेखालीं जाहीर सभा भरून श्रीमंत बाबासाहेब यांचेकडे एक शिष्टमंडळ पाठविण्याचें ठरलें. त्याप्रमाणें शिष्टमंडळानें स्टेट कारभारी व इतर मंत्री यांची मुलाखत पुणें येथें घेतली. त्यांत वाटाघाटी होऊन जो समेट झाला, त्यांत ठरल्याप्रमाणें पोतनीस बंधु वगैरे लोकांवर १४४ कलमाखालीं काढलेल्या नोटिसा रद्द करण्यांत येऊन हिरडेबाबीचा कायमचा निकाल लावण्यासाठीं कै. वामनरावजी पटवर्धन यांचे अध्यक्षतेखालीं एक मिश्र कमिटी दरबारतर्फें नेमण्यांत आली. या बाबतींत एक नमूद करण्यासारखी गोष्ट घडली. कै. वामनराव पटवर्धनांच्या नांवास दरबारचा विरोध होता. पण लोकांना तेच पाहिजे होते. कमिटींत सर्वच जहाल सभासद असूं नये असें दरबारचें म्हणणें. शेवटीं तडजोड अशी झाली कीं, कमिटींत श्री. गोपिनाथपंतांच्या ऐवजीं श्री. दादासाहेब साने यांना घ्यावें आणि श्री. वामनरावांच्या नांवास घेतलेली हरकत दरबारनें माघारी घ्यावी. या कमिटीनें सर्व संस्थानभर दौरा काढून बहुमोल कामगिरी केली आहे. पण या कमिटीचें काम अनिर्णीत राहिलें. पुढें भोर दरबार व प्रजासभा यांचे संबंध बरे राहिले नाहींत व दे. भ. शेटे व गोपीनाथराव पोतनीस वगैरे मंडळी भोर संस्थानच्या तुरुंगांत असतांना या कमिटीची अखेरची बैठक होऊन प्रजासभेच्या कमिटीवरील सभासदांनीं आपला रिपोर्ट अध्यक्षांच्या हवालीं केला. यावेळीं हुल्याळशाही सुरू झालेली होती व रयतेच्या पुढाऱ्यांच्या तुरुंगवासांतच ही भोर संस्थान हिरडा-कमिटी व त्या कमिटीचें काम अंतर्धान पावलें. तात्पुरती म्हणून एक योजना

दरबार व प्रजासभेतर्फे श्री. गोपिनाथपंत पोतनीस व जानराव ढोर यांच्यांत चर्चिली जाऊन शेवटीं हिरडेफळावर निर्गत कर न घेतां रॉयल्टीबद्दल दीड रुपया फी घेण्याचें ठरलें. पण ही फी दोन रुपये जरी घेतली, तरी त्या मुद्यावर चळवळ करणार नाहीं असें आश्वासन वरील पुढाऱ्यांनीं दिलें. दोन रुपये फी देऊन हिरडा विकण्याचा रयतांचा हक्क आजही प्रचारांत आहे. या तडजोडीनंतर एखाद्या कंपनीला अगर पुरुषोत्तम मथुरादास आणि कंपनीस मक्ता देण्याचा मोह दरबारास आवरला नाहीं आणि त्यामुळें परत रयतेंत क्षोभ उत्पन्न झाला.

श्रीमंत बाबासाहेब पंतसचीव वेल्याच्या पेठेस देवदर्शनास गेले असतांना तीन चार हजार रयतांनीं त्यांना अडवून व त्यांचेपुढें हात जोडून व उभें राहून त्यांच्यापुढें आपलें गाऱ्हाणें मांडलें. श्रीमंतांनीं एक महिनाभर रयतेनें सत्याग्रह बंद ठेवावा व कंपनीनें हिरडा खरेदी करूं नये, असा पर्याय सुचविला व त्या अवधींत दरबारचा अखेरचा निर्णय जाहीर करण्यांत येईल असें आश्वासन त्यांनीं दिलें. रयतेनें ही गोष्ट मान्य केली. पण मक्तेवाल्या पुरुषोत्तम मथुरादास कंपनीचे लोक हिरडा गोळा करीतच राहिले व त्यांनीं लोकांच्या संपास न जुमानतां कोंकणांतून सात आठशें कातकरी आणवून व पठाण लोक नोकरीस ठेवून सरकारी म्हणवल्या जाणाऱ्या रानांतील ( हीं रानें पूर्वीं रयतेच्या मालकीचीं असून त्याबद्दल कोणतीही नुकसानभरपाई न देतां सरकारनें तीं फॉरेस्टकडे दिलीं होतीं ) व लोकांच्या खाजगी मालकी नंबरांतील हिरड्यांचीं फळेंसुद्धां गोळा करण्याचा सपाटा चालविला. श्रीमंतांनीं दिलेलें आश्वासन बाजूस ठेवून या गोष्टी घडत होत्या, त्यामुळें मोसे खोऱ्यांतील आंत्रेगांव मुक्कामीं कंपनीचे लोक व रयतेचे लोक यांच्यांत मारामारी झाली व दुकानांची व हिरडा-डेपोची नासधूस झाली. कंपनीनें नोकरीस ठेवलेले पठाण यांनीं कुऱ्हाडी चालविल्यामुळें मारामारीस प्रथम सुरुवात झाली. भोर संस्थानांतील सशस्त्र पोलिसांची मोसे

खोऱ्यांत रवानगी झाली. धरपकड, अटक, वॉरंटें वगैरे भोर संस्थानांतील लोकांना चिरपरिचित असलेल्या सर्व दडपशाहीच्या गोष्टी घडल्या.

## कादवे सत्याग्रह

कादवे गांवांतील जमिनी सरदार नातू यांनीं लिलांवांत विकत घेतल्या, परंतु त्यांनीं त्या जमिनी कायमधारे भरणाऱ्या शेतकऱ्याकडे वहिवाटीस न ठेवतां दुसऱ्या लोकांस लागणीसाठीं देण्याची पद्धत सुरू केल्यामुळें कित्येक वर्षें जमिनी वहिवाटीस आणणाऱ्या धारेकऱ्यांच्या जमिनी नाहींशा होऊं लागल्या. या अन्याय्य पद्धतीविरुद्ध त्या गांवच्या लोकांनीं श्रीमंताकडे सारख्या तक्रारी केल्या, परंतु त्यांचा कांहींही उपयोग झाला नाहीं. जमिनी नाहींशा झाल्यामुळें पिढ्यान्‌पिढ्या त्या गांवांत रहाणाऱ्या शेतकऱ्यांवर उपाशीं मरण्याची अगर परागंदा होण्याची पाळी आली. ज्या शेतकऱ्यांनीं आपली वहिवाट सोडण्याला हरकत घेतली, त्यांचेवर खटले भरण्यांत आले. अखेर या त्रासास कंटाळून या अन्यायाची तावडतोब दाद लागावी म्हणून सन १९२६ सालीं कादवे गांवच्या लोकांनीं सरदार नातू यांचा कोळसा अडवून ठेवून निर्गतीस बंदी केली. याचा योग्य तो परिणाम होऊन भोर दरबारला या बाबतींत लक्ष घालणें भाग पडलें व लोकांच्या तक्रारी अल्पांशानें कां होईना पण दूर झाल्या.

## जंगल सत्याग्रह

भोर संस्थानांतील चळवळीचें एक प्रमुख अंग म्हणजे या संस्थानांत झालेला जंगल सत्याग्रह हें होय. भोर संस्थानांत केवळ सरकारी मालकीचीं, उदाहरणार्थ, निरनिराळ्या किल्ल्यांच्या घेरांचीं रानें अशीं थोडीं जंगलें होतीं व संस्थान हद्दींत निरनिराळ्या कारणाकरतां म्हणजे निश्चित पाऊस पडावा म्हणून, इमारती लाकडांचें उत्पन्न वाढावें म्हणून व अस्तित्वांत असलेल्या व पुढें होणाऱ्या निरनिराळ्या धरणांत गाळ न जावा म्हणून राखीव जंगलें ठेवून डोंगरांतील शेतीस बंदी करावी, एतदर्थ मुंबई सरकार व संस्थानी दरबार यांच्यामध्यें पत्रव्यवहार सुरू झाला व त्याचा परिणाम सक्तीची खुषी म्हणून दरबारकडून फॉरेस्टाची आंखणी

होऊन हद्द ठरविण्यांत आली. या हद्दीच्या आंत भोर संस्थानांतील रयतेच्या मालकीच्या जमिनी आहेत. त्याची नुकसानभरपाई दरबारनें दिलेली नाहीं. ही हद्द मारल्यानंतरही व त्या जमिनी जंगलामधील आहेत असें जाहीर केल्यानंतरही भोर दरबार पंधरा वीस वर्षें या जमिनींचे धारे वसूल करीत होतें. पुढें यासंबंधीं तक्रारी फारच वाढल्या, तेव्हां दरबारनें ही जंगलांतील जमिनींचे धारे घेण्याची पद्धत बंद केली. तेव्हांपासून सरकार या जमिनी फॉरेस्टच्या आहेत असें सांगत आहे व रयत त्यावरील आपली मालकी सोडण्यास तयार नाहीं. हा वाद जवळजवळ साठ वर्षें चालू आहे. प्रथम इनामदार, दुमालदार व हक्कदार लोकांनीं वाद करून पाहिला, पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. प्रजासभेच्या प्रारंभींच विचित्रगड तालुक्यांत माजी पंतसाहेब यांच्या कारकीर्दींत हीं जंगलें तोडून सत्याग्रह करण्यास प्रारंभ झाला होता; व या सत्याग्रहींचें भोर मुक्कामीं दे. भ. तात्यासाहेब केळकर यांचे अध्यक्षतेखालीं भरलेल्या दुसऱ्या अधिवेशनांत जाहीर अभिनंदनही करण्यांत आलें होतें. याशिवाय हल्लींचे श्रीमंत राजेसाहेब यांच्या राज्यारोहणसमारंभाच्या वेळच्या भाषणांत हा जंगलच्या बाबतींत सरकारकडून झालेला अन्याय दूर करण्याबद्दल जाहीर आश्वासन मिळालेलें होतें. शिवाय हल्लींचे श्री. राजेसाहेब युवराज असतांना त्यांना विचित्रगड तालुक्याचा कारभार सुपूर्त केला होता, त्यावेळींही हा जंगलच्या बाबतींतील अन्याय त्यांना पटलेला होता असें म्हणतात. म्हणून या जंगलसत्याग्रहास भोर संस्थानांत फारच जोर लागला. माजी स्टेट कारभारी मे. घायगुडे यांचे कारकीर्दींत हिरडोशी मुक्कामीं सरकारी अधिकारी व रयतेचे पुढारी यांच्यांत पुष्कळ विचारविनिमय होऊन कांहीं तडजोडी ठरल्या. रयतेनें आपल्या तक्रारी पुढाऱ्यांच्या म्हणजे दे. भ. शेटे व गोपीनाथराव पोतनीस यांच्या सह्यांनिशीं त्यांना सादर केल्या. तडजोडीच्या मसुद्यावर कारभारीसाहेब व रयतेचे पुढारी यांच्या सह्या झाल्या. या जंगलच्या बाबतींत हिरडा कमिटीसारखी एक चौकशी कमिटी नेमावी व त्या

कमिटीच्या शिफारसी सरकारनें मान्य कराव्यात अशी रयतांची मुख्य मागणी होती. सरकारी अधिकाऱ्यांच्या सूचनेंत एक कमिशन नेमावें असें होतें. कमिशन मान्य केल्यास इनाम कामिशनसारखा कांहीं तरी विचित्र घोटाळा उत्पन्न होईल म्हणून रयत पक्षाचा या गोष्टीस विरोध होता. पण दरबारनें मे. रावब. अंजनगांवकर यांची चौकशी अधिकारी म्हणून सन १९३४ मध्यें भोर संस्थानांत नेमणूक केली. रयतेच्या जंगल कमिटीच्या मागणीच्या ऐवजीं एक वडा अधिकारी रयतेच्या बोकांडी येऊन बसला हें पाहून सर्व लोक खवळले व प्रजा सभेच्या सर्व लोकांनीं रावब. अंजनगांवकर यांच्या चौकशीच्या कामावर पुरेपुर बहिष्कार घातला. अखेरला दे. भ. तात्यासाहेब केळकर व कै. वामनरावजी पटवर्धन यांच्या मध्यस्तीनें पुणें येथें रावब. अंजनगांवकर यांचे घरीं भोर संस्थानांतील भोर दरबारचे अधिकारी, भोर संस्थानचे सर्व रयतेचे पुढारी व महाराष्ट्रांतील निरानिराळ्या पक्षांतील राजकीय पुढारी यांची एक सभा भरली. भोर दरबारचे प्रतिनिधि म्हणून रा. ब. भाऊसाहेब जोशी, नरहरपंत आंबेकर, रा. ब. अंजनगांवकर हजर होते. दे. भ. तात्यासाहेब केळकर, कै. वामनरावजी पटवर्धन, दे. भ. अण्णासहिब भोपटकर, श्री. नारायणराव गुंजाळ हे महाराष्ट्रांतील पुढारी म्हणून निमंत्रित होते. भोर संस्थानच्या रयतेतर्फे दे. भ. गोपिनाथराव पोतनीस, दामुअण्णा पोतनीस, शेटे, वाळिंत्रे, दादासाहेब साने, वाग्भटराव देशपांडे, माधवराव सुभेदार, जानराव ढोर, शंकरराव ढोर, धोंडुबुवा अंबिके, नारायणराव देशपांडे, राजाराम शेट गुजर वगैरे लोक हजर होते. पुष्कळ कडाक्याचा वादविवाद होऊन अखेर रावब. अंजनगांवकर यांच्या चौकशीवरील बहिष्कार काढून रयतेनें सहाय्य करावें असें ठरविण्यांत आलें. वेळवण खोऱ्यांतील नऱ्हे गांवीं घाटावरील चारही तालुक्यांची जाहीर सभा बोलावण्यांत आली. अध्यक्षस्थान दे. भ. अण्णासाहेब भोपटकर यांनीं मंडित केलें होतें. जनसमुदाय अफाट

जमलेला होता. अध्यक्षांनीं व इतर लोकांनीं जंगलच्या बाबतींत चालू परिस्थिति काय आहे हें लोकांना समजावून सांगितलें. रयतेनेंही आपल्या तक्रारी काय आहेत त्या सांगितल्या व आमच्या तक्रारी निर्भीडपणानें सरकारपुढें मांडणारा एकच एक मनुष्य आम्हांस दिसत आहे व तो आमच्या तक्रारी चौकशी अधिकाऱ्यांचे पुढें मांडील व त्याला आम्ही निवडून देतों असें स्पष्ट सांगून सर्व लोकांनीं एकमतानें व एक-मुखानें दे. भ. गोपिनाथराव पोतनीस यांना आपलीं गाऱ्हाणीं सरकारपुढें मांडण्याकरितां निवडून दिलें व त्याप्रमाणें दे. भ. गोपिनाथराव पोतनीस यांनीं चारही तालुक्यांतील रयतांच्या तक्रारी, अडचणी व मागण्या, त्यांचे हक्क व अन्यायांची कहाणी राबत्र. अंजनगांवकर यांचेपुढें मांडली होती.

यानंतर राबत्र. अंजनगांवकर यांची चौकशी पुरी होऊन त्यांनीं आपला रिपोर्ट श्री. बाबासाहेब पंतसचीव यांना सादर केला. तो रयतेला बराचसा अनुकूल आहे असें समजतें; पण भोर दरबारच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें अभिवचनें, घोषणा या जशा गुलदस्तांत असतात, तसा हाही रिपोर्ट अद्यापि गुलदस्तांत आहे. हिरडा कमिटी जेव्हां नेमली गेली तेव्हां जंगलसंबंधींच्या तक्रारींची चौकशी करण्याचें कामही या कमिटीकडे सोंपवावें अशी भोर दरबारला तेव्हांच विनंति करण्यांत आली होती; परंतु तिचा कांहींही विचार झाला नाहीं. आपल्या तक्रारींचा निकाल भोर दरबारकडून होत नाहीं अशी लोकांची समजूत होऊन सन १९२९ सालीं मोसेखोऱ्यांतील लोकांनीं सत्याग्रह करून जंगल तोडलें. इतक्या थराला गोष्ट गेल्यानंतर मग सन १९३० सालीं भोर कायदेमंडळाच्या ठरावाप्रमाणें भोर दरबारनें जंगलसंबंधींच्या तक्रारींची चौकशी करण्याकरितां कमिटी नेमली. सदर कमिटीचा दौरा हिर्डोशीस गेल्या वेळीं तेथें जमलेल्या लोकांनीं कै. शेटेप्रभृति पुढाऱ्यांना दिलेल्या जबर शिक्षेचा निषेध म्हणून व कमिटीपुढें आपलें म्हणणें मांडण्याच्या कामीं या पुढाऱ्यांची मदत

असल्याशिवाय रयतेची बाजू व्यवस्थितपणें पुढें येणार नाहीं असें सांगून, सदर मुक्कामीं कमिटीशीं सहकार्य करण्याचें नाकारलें. कमिटीनें आपलें काम पुरें करावयाचें ठरविलें होतें, परंतु दरबारनें हा दौरा पुरा पाडला नाहीं. यावरून जंगलसंबंधीं तक्रारींचा निकाल करण्याचे कामीं भोर दरबारकडून अक्षम्य अशी दिरंगाई होत असल्याबद्दल निषेध करून सदरबाबत समाधानकारक निकाल सत्वर लावून घेण्यासाठीं भुतोंडे येथें ता. ११-१-३४ रोजीं भरलेल्या जाहीर सभेंत श्री. वामनराव पटवर्धन, पोतनीस बंधू व वाळिंबे यांची एक कमिटी नेमण्यांत येऊन सदर बाबतींत सरकारशीं सहकार्य करण्याची लोकांनीं तयारी दाखविली. सदर कमिटीशीं सहकार्य करून जंगलच्या तक्रारींचा निकाल लावण्याचें मुत्सद्दे-गिरीचें धोरण भोर दरबारनें स्वीकारलें असतें, तर सदर प्रश्नाचा समाधान-कारक निकाल लागण्यास लोकांकडून योग्य मदत झाली असती. पण दरबारनें रा. नेर्लेकर या अधिकाऱ्यांस या कामीं नेमलें, पण असल्या चौकशीवर रयतेचा विश्वास बसला नाहीं हें साहजिकच आहे. रावब. धायगुडे, अंजनगांवकर, हुल्याळ वगैरे दिवाणांच्या कारकीर्दी संपल्या पण हा प्रश्न मिटूं शकला नाहीं. हल्लींचे दिवाण रावब. कुमठेकर यांच्या कारकीर्दींत प्रजासभेच्या पुण्याईनें, प्रजासभेची फार दिवसांची मागणी मान्य झाली. श्री. राजेसाहेबांच्या षष्ट्यब्दिसमारंभाच्या वेळीं सन १९३८ मध्यें प्रजासभेच्या पुढाऱ्यांबरोबर दरबारनें जो समेट केला, त्यावेळीं जंगलाच्या गाऱ्हाण्यांची चौकशी करण्यासाठीं कमिटी नेमण्याचें एक प्रमुख कलम होतें आणि तें शेवटीं दरबारनें मान्य करून तशी कमिटी नेम-ण्याचें ता. १६-१२-१९३८ रोजीं जाहीर केलें आणि सदरचे कमिटीचे काम श्री. श्री. ग. वझे यांच्या अध्यक्षतेखालीं चालू आहे.

## पालीची परिषद

ता. १२व १३ जानेवारी १९३० रोजीं पाली येथें भरलेल्या परिषदेचें अध्यक्षस्थान कै. प्रो. गणपतरावजी अभ्यंकर यांना देण्यांत आलें होतें. या

परिषदेचें अध्यक्षस्थान नुकतेच तुरुंगांतून सुटून आलेले दे. भ. शंकरराव देव यांना देण्याचें ठरलें होतें. भोर दरबारला व श्रीमंतांना राजद्रोहाच्या आरोपाखालीं शिक्षा भोगीत असलेला मनुष्य सुटल्याबरोबर आपल्या संस्थानांतील चालू असलेल्या चळवळीचा अध्वर्यू व्हावा व त्याच्या हातांत सर्व सूत्रें जावींत ही गोष्ट नको होती. पण दे. भ. शंकरराव देव यांनीं आपण होऊनच अध्यक्ष होण्याचें नाकारलें हा भाग निराळा. पण त्यावेळीं उठलेल्या वादाच्या समयीं दे. भ. शेटे व पोतनीस यांच्याबरोबर चार पांच हजार मावळे पायीं घाट उतरून सुधागड तालुक्यांत पाली येथें येऊन त्यांनीं शेटे व पोतनीसांवरील आपला विश्वास व्यक्त केला! याच वेळीं भोर संस्थानला श्रीमंत राजेसाहेब पंतसचीव यांनीं कायदेकौन्सिल दिलें होतें. या कायदेकौन्सिलांत रयतेचे दहा प्रतिनिधि सरकारी नेमणुकीनें घेतले होते व दहा सरकारी अधिकारी व संस्थानचे दिवाण या कौन्सिलचे अध्यक्ष अशी या कौन्सिलची रचना होती. श्रीमंत पंतसाहेब सचीव यांनीं जीं माणसें रयतपक्षाचीं म्हणून नियुक्त केलीं, तीं चांगल्यापैकीं असल्यामुळें प्रजासभेंतील लोकांनीं या कौन्सिलमध्यें भाग घेणेचें ठरविलें. या कौन्सिलमध्यें कै. वामनरावजी पटवर्धन, कै. धोंडो अमृत शेटे, रा. दामुअण्णा पोतनीस, श्री. दादासाहेब साने, रा. नानासाहेब शिंदकर, कै. वाग्भटराव देशपांडे, रा. बापूसाहेब लिमये, शिरवळचे रा. हरीभाऊ देशपांडे व राजेवाडीचे राजे मोहिते हे होते. रा. वाग्भटराव देशपांडे यांनीं विधवेच्या वारसा हक्काचें व हिंदू लॉ प्रमाणें मुलीच्या मुलाला व बहिणीच्या मुलाला दत्तक घेतां येत नाहीं असा जो निर्बंध आहे तो निर्बंध बंद करण्याचें अशीं दोन बिलें कायदे कौन्सिलपुढें ठेवलेलीं होतीं. या दोन बिलांच्यामुळें पालीच्या सनातनी लोकांत मोठी खळबळ उडालेली होती. त्याचप्रमाणें पालीच्या परिषदेंत या बिलांना भोर संस्थानांतील रयतेचा पाठिंबा आहे हें दाखविण्यांत येणार म्हणूनही सुधागड तालुका सभेंतील सनातनी लोक कसून विरोध करणार होते. त्याचप्रमाणें दे. भ. गोपीनाथ-

राव पोतनीस यांचा पालीच्या सभेंत भोर संस्थानांतील अनिष्ट सावकारी पद्धतीस आळा घालणारा व नियंत्रण करणारा कायदा मागण्याचा ठराव येणार, यामुळेंही सावकारीवर उदरनिर्वाह करणारे हे सर्व विरोधाकरतां या सभेस उपस्थित होते. परिषदेच्या खुल्या बैठकींत रा. गोपीनाथराव पोतनीस व शेटे यांच्या परिषदेस हजर असलेल्या प्रचंड अनुयायांच्या जोरावर कै. वाग्भटराव देशपांडे यांच्या बिलांनाही परिषदेनें पूर्ण पाठिंबा दिला. त्याचप्रमाणें दे. भ. गोपीनाथराव पोतनीस यांच्या सावकार-नियंत्रण ठरावालाही पूर्ण पाठिंबा मिळून तो एकमतानें पास झाला. या ठरावाचें वैशिष्ट्य असें कीं, दे. भ. गोपीनाथराव पोतनीस यांनीं नुसत्या साक्षी घातलेले असे कोरे स्टँप्स सावकार लोक कसे प्रचारांत आणतात तें दाखविलें.

भाटघरच्या धरणांत ज्या अस्पृश्यांच्या जमिनी गेल्या, त्यांना जमिनींचा मोबदला जमिनीच्या रूपानें देण्यास दरबारनें विरोध केला. या बाबतींत श्री. बाळुकाका कानिटकर यांच्या अध्यक्षतेखालीं सन १९३० मध्यें भोर येथें भरलेल्या या अस्पृश्य परिषदेंत खूप चर्चा झाली. प्रजासभेनें अस्पृश्यांना न्याय मिळावा म्हणून खूप खटपट केली पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

## प्रजासभेवर गंडांतर

प्रजासभेच्या कार्याचा माधान्ह काळ उलटून गेला आणि प्रजासभेस सन १९३० पासून वाईट दिवस यावयास सुरवात झाली. सावकाराविरुद्ध प्रजासभेनें शस्त्र उपसल्यामुळें सावकार वर्ग नाखुष झाला; जमीनदार वर्गही प्रजासभेच्या विरुद्ध होता; अस्पृश्य परिषदेमुळें सनातनी बिथरले; ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादास सुरवात झाली आणि या सर्वांचा परिणाम प्रजासभेच्या विरुद्ध दिशेनें होऊं लागला. ता. २७-९-१९३० रोजीं श्री. वामनराव पटवर्धन यांच्या अध्यक्षतेखालीं भोरास सभा होऊन ब्राह्मण-ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनीं विरुद्ध पक्षीयांवर यथेच्छ गालिप्रदान केलें. त्यावेळीं ब्राह्मण वर्ग

एक गोष्ट विसरला होता कीं, भोरांतील चळवळ ही सर्वस्वी ब्राह्मणेतरांनीं केलेली आहे आणि ब्राह्मण वर्ग तटस्थ राहिला होता. मोसे खोऱ्यांतील आंबेगांव येथील एका गुजरानें आपली सर्व मालमत्ता विकून तेथून प्रयाण केल्यावर भूमिगत द्रव्य सांपडण्याच्या इच्छेनें घराची जमीन खणली जात असतां, सह्या साक्षी घातलेले कोरे स्टँप सांपडले आणि ही बातमी कळतांच श्री. गोपिनाथपंत पोतनीस तेथें गेले. त्यांच्यावर स्टँम्प असणाऱ्या इसमानें वाटेल तो आरोप केला, त्यामुळें त्यांना पुढें शिक्षा झाली. भोर येथील गणेशोत्सवांत अस्पृश्य मेळयाच्या पानसुपारीच्या वेळीं आणि गणपतिविसर्जनाच्या वेळीं फारच दंगल माजली. एकंदर प्रक्षुब्ध झालेलें वातावरण पाहून दिवाणांनीं श्री. वामनराव पटवर्धन व श्री.दादासाहेब साने यांना भोरास बोलावून घेतलें व त्यांनीं सनातन्यांना बदलत्या काळास धरून वागण्याचा उपदेश केला.

पुढें श्री. राजेसाहेब ता. २-५-१९३० रोजीं विलायतेस गेले होते, ते ता. ९-११-३० रोजीं परत स्वदेशीं आले. ते येथें नसतांना खालसांत सविनय कायदेभंगाची चळवळ सुरूं झाली आणि त्याचे पडसाद भोरांत उठून महाडहून आणलेलें बेकायदा मीठ विकण्यांत आलें, पण उगाच लोकक्षोभ होऊं नये म्हणून त्या वेळचे दिवाण रावब. अंजनगांवकर यांनीं तिकडे दुर्लक्ष्य केलें. पण भोरांत अस्वस्थता करूं इच्छिणाऱ्या तरुणांनीं मग दारूदुकानावर निरोधन सुरूं केल्यावर पुण्याचे कलेक्टर व भोरचे पोलिटिकल एजंट यांनीं भोर दरबारास या बाबतींत लिहून दारू-निरोधनाबाबत योग्य ती खबरदारी घेण्यास सुचविलें. रावब. अंजनगांवकर यांनीं सर्व परिस्थिति भोर कायदेमंडळाचे सभासद श्री. वामनराव पटवर्धन, शेट्ये, दामूअण्णा पोतनीस, वाग्भटराव देशपांडे, शिंदकर, साने यांच्यापुढें मांडून दारू-निरोधकांना पकडण्याचा प्रसंग आणून न देण्याबद्दल विनंति केली. वरील पुढाऱ्यांनीं प्रजा-सभेच्या कार्यकारी मंडळाच्या संमतीनें दारू-निरोधन करणें कसें अनिष्ट आहे तें लोकांना पटवून दिलें व त्यामुळें

ही चळवळ थांबविण्यांत आली. अशा प्रकारें सलोख्याचें वातावरण निर्माण करणारांची खटपट, कारी येथें अनपेक्षित प्रकार घडून आल्यामुळें, अयशस्वी ठरली आणि भोर संस्थानांतील चळवळीवर गंडांतर आले.

भोर संस्थानांतील कारी गांवीं एका हुकुमनाम्याची बजावणी ऋणकोवर करण्याकरितां धनको, कोर्टाचे बेलिफास घेऊन सन १९३०च्या आक्टोबरच्या दुसऱ्या आठवड्यांत गेल्या वेळीं, तेथें कांहीं गुंडांनीं दिवसाढवळ्या तोंडास काळें फासून येऊन बेलिफ व धनको यांचेवर हल्ला केला व त्यांना मार देऊन त्यांचे डोळयांत तिखट टाकून व त्यांना वस्त्रविहीन करून गांवा-बाहेर हांकून दिलें. या प्रकाराची बातमी कळतांच संस्थानचे दिवाण रा. ब. अंजनगांवकर यांनीं सशस्त्र शिपाई पोलिस अधिकाऱ्यांबरोबर देऊन व त्यांचेबरोबर मॅजिस्ट्रेट देऊन बेलिफानें नांवें घेतलेल्या लोकांस पकड-ण्याकरितां कारी गांवाकडे पाठविलें. सदर अधिकारी कारी गांवीं न जातां त्यापासून कांहीं अंतरावरच्या गांवीं थांबून त्यांनीं कारी गांवीं खास इसमास पाठविलें. सदर बातमीदारानें गांवांतील लोक धरपकडीच्या भीतीनें गांव सोडून गेले असल्याची बातमी आणल्यावरून अधिकारी शिपायांसह कोणास न पकडतां भोरास परत आले.

ता. १८।११।३० रोजीं भोर येथील बाजारांत कारीच्या गुन्ह्यांत भाग घेतलेले कांहीं लोक आले आहेत असें पोलिसांना कळलें. त्या संशयित इसमांना बेलिफानें ओळखल्यावरून पकडण्यांत आलें व त्यांना मॅजिस्ट्रेटपुढें हजर करून जास्त तपासाकरितां मुदत मागून संशयित लोकांना आपल्या अटकेंत ठेवलें. या अटकेची बातमी बाजारास आलेल्या लोकांकडून व अन्य मार्गांनीं विकृत स्वरूपांत गांवोगांव गेल्यामुळें लोक भोरास जमा होऊं लागले व भोरास जमा झालेल्या लोकांनीं पकडलेले लोक सोडून दिल्यावांचून आपण गांव सोडून जाणार नाहीं अशा तऱ्हेचीं धमकीचीं भाषणें करण्यास सुरुवात केली. ता. २०-११-३० रोजीं या लोकांची एक मिरवणूक तिरंगी निशाण घेऊन व महात्माजी वगैरे नांवांचा जयघोष करीत शहरांतून काढण्यांत

झाली. सरकारी नोकर आपलें कायदेशीर काम करीत असतां त्यांचेवर हल्ला केल्याचा आरोप असल्यामुळें व तदनुषंगिक इतरही आरोप पकडलेल्या लोकांवर असल्यामुळें पोलीस तपास पुरा झाल्यावांचून त्यांना सोडणें केव्हांही शक्य नव्हतें. दरबारनें लोकसमाज गांवांत वाढत आहे हें पाहून शहरांत योग्य तो बंदोबस्त ठेवला होता व लोकांचें शांतवन करण्याची शक्य ती तजवीज केली होती.

येथील चळवळींत प्रारंभापासून असलेले श्री. वामनराव पटवर्धन यांना पुण्याहून मुद्दाम ता. २०-११-३० रोजीं बोलावून आणून लोकांचा गैरसमज दूर करण्याबद्दल सांगण्यांत आलें. तारीख २१ रोजीं सकाळीं भोर येथें असलेले श्री. नानासाहेब शिंदकर, श्री. पटवर्धन व श्री. वाळिंबे यांनीं श्री. शेटे व निरनिराळया गांवचे रयतांचे सुमारें पन्नास पुढारी यांच्याशीं उत्पन्न झालेल्या परिस्थितीबद्दल पुष्कळ चर्चा करून सदरहू परिस्थितींत काय करणें योग्य आहे याबद्दल वाटाघाट केली. या चर्चेत पकडलेल्या लोकांची सुटका झाल्यावांचून लोक परत जाण्यास तयार नाहींत असें दिसून आल्यावर लोकांची ही मागणी सर्वस्वी अयोग्य आहे असें त्यांच्या पुढाऱ्यांस स्पष्टपणें सांगण्यांत आलें व जमलेल्या लोकांस तसें सांगण्याचें ठरलें. लोकांचीं जेवणें खाणें झाल्यावर हें सांगण्याचें ठरलें होतें, परंतु लोक गांवांत येऊन राजवाड्यापुढें बसणार अशी बातमी येतांच चौपाटीवर जमलेल्या सर्व रयत लोकांच्या सभेमध्यें भाषण करून श्री. पटवर्धन यांनीं लोकांचा गैरसमज कसा झाला आहे व कारी येथील अत्याचाराबाबत फिर्यादीच्या म्हणण्याप्रमाणें अपराधी लोकांस संशयावरून पकडून ठेवलेल्या आरोपींच्या गुन्ह्याची चौकशी करणें दरबारचें कर्तव्य कसें आहे हें सविस्तरपणें समजावून सांगितलें. सदर सभेंत श्री. पटवर्धन यांनीं लोकांना आपलें म्हणणें श्रीमंत बाबासाहेब पंतसचीव व दरबारचे अधिकारी यांचेपुढें मांडण्यासाठीं आपले प्रतिनिधि सुचविण्यास सांगितलें.

लोकांचेतर्फे ८।१० इसम श्रीमंतांची मुलाखत घेण्याकरतां आले; परंतु पुढें त्यांनीं रा. शेटे व रा. वाळिंबे यांनाच श्रीमंतांकडे जाऊन लोकांचें

म्हणणें त्यांच्यापुढें मांडण्याची विनंति केली. श्रीमंत बाबासाहेब यांनीं या दोघां गृहस्थांची गांठ घेतली. त्यावेळीं त्यांनीं संस्थानचे प्रमुख अधिकारी व रा. शिंदकर व रा. पटवर्धन यांनाही बोलविलें होतें. रा. वाळिंबे यांनीं लोकांचें म्हणणें सांगितल्यावर रा. शेटे यांनीं त्यांना माहीत असलेल्या कांहीं गोष्टी सांगून सावकारांच्या जुलमाविरुद्ध चालू असलेली चळवळ हाणून पाडण्याकरितां हा प्रस्तुतचा आरोप आणण्यांत आला आहे वगैरे सांगितलें, व श्रीमंतांनीं एकदां लोकांस दर्शन देऊन लोकांची खातरजमा केल्यास सर्व लोकांचें समाधान होईल अशी सूचना केली. श्री. बाबासाहेब यांनीं तात्काळ उत्तर दिलें कीं, 'जमलेली प्रजा भोर संस्थानची प्रजा असल्यामुळें चौपाटीवर जाऊनसुद्धां मीं तुम्हांस सांगितलें, तसेच आश्वासनपर शब्द सांगण्यास माझी हरकत नाहीं; परंतु पकडलेले लोक कायद्याप्रमाणें चौकशी झाल्याशिवाय सोडणें केव्हांहि योग्य होणार नाहीं. पकडलेले लोक तसेच सोडल्यास जमलेल्या लोकांचें समाधान होईल असें जें तुम्ही म्हणतां तें खरें असलें, तरी तसें करणें बरोबर होणार नाहीं. लोकांचें म्हणणें मला कळलें आहे व योग्य तेंच होईल एवढेंच मी आतां सांगू शकेन.' वरीलप्रमाणें मुलाखत झाल्यावर सर्व मंडळी आपापल्या ठिकाणीं गेली. जमलेल्या लोकांचें त्यांच्या प्रतिनिधींना मिळालेल्या उत्तरानें समाधान झाल्यामुळें त्यांतील कांहीं लोक गांवोगांव निघून गेले; परंतु सुमारें ५००-६०० लोक वाड्यापुढें येऊन बसलेच.

श्री. बाबासाहेब यांनीं फिरून परत आल्यावर वाड्यापुढें उभें राहून दिवाणातर्फें खुलासा केला. त्याप्रमाणेंच रा. वामनराव पटवर्धन यांनींही लोकांना सांगितलें व चळवळींतील बऱ्याच पुढाऱ्यांना श्रीमंतांचा उपदेश मानवला व त्याप्रमाणें लोक रवाना झाले. पण भोरमधील हकीकत कर्णोपकर्णीं ऐकल्यावरून भोरांत जमलेल्या लोकांचें मागणें गैरशिस्त आहे असें वाटणाऱ्या लोकांच्या निरोपावरून तारीख २२।११।३० रोजीं शिवापूर वगैरे संस्थानांतील निरनिराळ्या

गांवचे लोक सकाळपासून भोरास येऊं लागले. या लोकांचा जमाव सुमारें ४।५ हजारांचा झाला. या लोकांची जेवणाखाण्याची व्यवस्था येथील कांहीं लोकांनीं केली होती. परंतु या लोकांस बोलावण्याच्या वेळीं ज्या गोष्टी सांगण्यांत आल्या होत्या त्यांत, व भोरांत आलेवर त्यांस कळून आलेल्या गोष्टींत अंतर पडलेलें पाहून व भोरमध्यें दोनतीन दिवस येऊन बसलेले लोक आदले दिवशीं श्रीमंतांची भेट झाल्यावर परत गेल्याचें कळल्यावरून या आलेल्या लोकांत फुटाफूट पडली. परंतु भोर गांवांतील पांढरपेशे व बाहेरून आलेले रयत लोकांपैकीं कांहीं लोक यांची एक सभा हायस्कूलपुढील मैदानांत ता. २२ रोजीं होऊन कोणत्या चळवळी करणें इष्ट नाहीं याबद्दल भाषणें झालीं, व शेवटीं मिरवणूक निघाली होती.

## पुण्याच्या पोलिसांचें आगमन

भोर येथें ता. १८–११–३० पासून जमूं लागलेले लोक पाहून बंदोबस्त करण्याचे दृष्टीनें दरबारनें पुण्याहून २५।३० पोलिसांची तुकडी भोर संस्थानच्या पोलिसांच्या मदतीकरतां तारीख २२ रोजीं भोर येथें आणविली. भोर संस्थानचे पोलिटिकल एजंट व पुण्याचे कलेक्टर हे ता. २३-११-३० रोजीं अचानक भोर येथें आले व पोलिटिकल एजंट परत गेल्यावर पोलीस पार्टीहि परत गेली. भोर येथील सावकारांनीं भोर संस्थानांतील अस्वस्थतेचें भयंकर चित्र रेखाटलेलीं पत्रें, तारा, अर्ज पोलिटिकल एजंटकडे गेल्यामुळें त्यांना भोरमधील स्थितीबद्दल भय वाटून ते प्रत्यक्ष स्थिति पहाण्यास आले असावेत अशी तेव्हां बातमी होती.

या एकंदर प्रकारापासून दरबारचें धोरण बदललें व दडपशाहीस सुरवात झाली. ता. २६।११।३० रोजीं भोर येथील शेट राजाराम गुजर, रा. कृष्णाजी सोनार व रा. अप्पाराव मुकादम यांना इं. पि. कोडमधील निरनिराळ्या कलमांखालीं भोर पोलिसनें अटक करून त्यांना येरवड्याच्या तुरुंगांत पोहोंचविण्यांत आलें.

याचवेळीं ब्राह्मण–ब्राह्मणेतर वादाच्या भुतानें भोरांत संचार केल्यामुळें भोरांत खासगी ब्राह्मणेतर नोकरांनीं संप केला आणि त्यामुळें परिस्थिति फारच चिघळली. कारी प्रकरणाचा सामोपचारानें शेवट होईल अशासाठीं प्रयत्न करण्यांत आले. दरबारशीं झालेल्या वाटाघाटींत दरबारनें कोती वृत्ति स्वीकारून प्रजापुढाऱ्यांची अवहेलना करण्याचा आणि त्यांची मान-खंडना ज्या तऱ्हेनें होईल अशा अटी घातल्या. आजवर चळवळ व आत्म-त्याग करून जे अधिकार मिळविले, त्यांवर तिलांजलि दिली जावी अशी दरबारची इच्छा होती. पण आपलें मरण आपल्या हातून कोण ओढवून घेणार? दरबारनें अकरा कलमी मसुदा तयार केला होता, व त्यावर पोतनीस बंधू व वाळिंबे यांनीं सह्या कराव्या, वामनराव पटवर्धन, शिंदकर यांनीं साक्षीदार म्हणून सह्या कराव्या अशी दरबारची इच्छा होती. सभा भरविण्याची झाल्यास अगोदर पंधरा दिवस परवानगी घेऊन सभेचे अध्यक्ष, विषय व वक्ते वगैरे माहिती पुरविणें; २७ लोकांच्या भाषणास बंदी करणें, सरकार मागेल ते लोक सरकारच्या स्वाधीन करणें; शेटये यांनीं दोन वर्षे स्थानबद्ध होऊन कांहींही चळवळ न करणें वगैरे अयोग्य घातलेल्या अटी लोकपुढाऱ्यांनीं फेटाळल्या असल्यास नवल नाहीं. प्रजासभेची बारा वर्षांची तपश्चर्या नष्ट करण्याची कल्पना प्रजासभेचे जनक कसे सहन करतील हा साधा विचारसुद्धां या अटी घालतांना दरबारच्या डोक्यांत आला नाहीं. शेवटीं समेट फिसकटल्यामुळें लगेच भोर दरबारनें दडपशाहीस जोरांत सुरवात केली.

## पुढाऱ्यांना शिक्षा

श्री.सोनार, मुकादम व राजारामशेट यांना पकडण्यांत आलें होतेंच. पुढें पंधरा दिवसांत श्री. अंबिके व शेटे यांना अटक करण्यांत आली. प्रभात फेरी काढल्याच्या आरोपावरून १८ तरुणांस अटक झाली; भोर संपांत लाकडाची गाडी जाळण्याच्या आरोपावरून ५ लोकांस तुरुंगांत पाठविण्यांत आलें. अशा बिकट परिस्थितींत सुद्धां श्री. गोपिनाथपंत पोतनीस यांनीं

त्यांच्यावर खटले चालू असतां, संस्थानांत झंझावाती दौरा काढून चळ-वळ जोरांत ठेवली आणि ता. ७-५-१९३१ रोजीं पाथरशेतची प्रजापरिषद कर्मवीर वि. रा. शिंदे यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. पुढाऱ्यांच्यावरील खटले चालविण्यासाठीं मोठा फंड उभारून रयतांनीं कृतज्ञता व्यक्त केली. श्री. शेट्ये व त्यांचे सहकारी रा. कृ. भा. पाटणकर, राजारामशेट गुजर, अंबिके, मुकादम यांना २०० रु. दंड व दोन वर्षांची शिक्षा ता.२-३-३१ रोजीं झाली. नंतर श्री. गोपिनाथपंत पोतनीस यांनाही दोन वर्षांची शिक्षा ता. २३-६-३१ रोजीं झाली. त्यांचे सहकारी रा. देशपांडे, भरेकर, कादवेकर यांना कमीजास्त मुदतीच्या शिक्षा झाल्या. नंतर रावब. हुल्याळ या ‘ करड्या ’ अधिकाऱ्याची योजना दिवाणपदावर झाली आणि रावब. अंजनगावकर हे दिवाणपदावरून ता. १४-३-३१ रोजीं निवाले. रावब. अजंनगावकर हे सरळ वृत्तीचे गृहस्थ होते. श्री. राजेसाहेब विलायतेस गेल्यावेळीं लोकक्षोभाचा वणवा सर्वत्र पेटला असतांना, त्यांनीं सामो-पचाराचें धोरण स्वीकारून संस्थानांत बखेडा न माजण्याची दक्षता घेतली होती. पण याचें पारितोषक त्यांना काय मिळालें ? ‘ कमकुवत ’ दिवाण असा शेरा श्री. राजेसाहेबांनीं त्यांना दिला.

भोर संस्थानांतील कांहीं भागांतील प्रजाजनांना व रा. शेट्ये वगैरे मंड-ळींना दरबारनें ज्या शिक्षा केल्या, त्या अयोग्य वाटून त्यांनीं सदर गोष्टींच्या निषेधार्थ सारा न भरण्याचें ठरविलें व सन १९३१ मे महिन्यांत पाथरशेत-भेंवटमाळ येथें रा. विठ्ठलराव शिंदे यांचे अध्यक्षतेखालीं जी भोर संस्थान-प्रजापरिषदेची बैठक झाली. त्या परिषदेपुढें हा ‘ जमीनसारावंदीचा ’ प्रश्न येऊन या बाबतींत दरबारशीं तडजोड करण्याकरतां एक ‘ तडजोड-कमिटी ’ नेमण्यांत आली. या तडजोड-कमिटीनें दरबारशीं वाटाघाट करण्याची कामगिरी संस्थानी चळवळींतील कांहीं मंडळींकडे सोंप-विली होती व या मंडळींनीं दरबार अधिकाऱ्यांशीं अनेक तऱ्हेची वाटाघाट करून रयतांनीं बंद केलेला सारा त्यांनीं दिल्यावर, दरबारनें

शेख्ये–पोतनीस वगैरे मंडळींना बिनशर्त सोडावें, अशी तडजोड ठरविली; व त्याप्रमाणें पत्रकेंही प्रसिद्ध केलीं. लोक–पुढाऱ्यांच्या सल्ल्याबरहुकूम रयतांनीं आपआपला सारा क्रमाक्रमानें देऊन टाकला; परंतु भोर दरबारनें मात्र शेख्ये प्रभृतींची सुटका ठरल्याप्रमाणें केली नाहीं. १९३२ मध्यें फिरून हप्ता भरण्याचे दिवस आल्यावर साहजिकपणें रयतांनीं दरबारनें वचनाची पाळणूक केली नाहीं या सबबीवर फिरून सारावंदीच्या चळवळीस प्रारंभ केला. या गोष्टी दरबारच्या व जनतेच्या दृष्टीनें इष्ट नाहींत, सबब समेटाच्या अटींत ठरल्याप्रमाणें शेख्ये प्रभृतींची मुक्तता करून संस्थानांत सलोख्याचें वातावरण निर्माण करणें इष्ट आहे आहे असें दरबार अधिकाऱ्यांना खालसा मुलुखांतील कांहीं प्रमुख पुढाऱ्यांनीं समजावून सांगितल्यानंतर, कांहीं वाटाघाटीनंतर ता. १२–५–३२ रोजीं रा. गोपीनाथपंत पोतनीस, शेख्ये, अंबिके, राजाराम शेट आदि मंडळींची सुटका करण्यांत आली.

## समेटाची वाटाघाट

ता. २–९–३३ रोजीं श्री. शेटचे देवाधीन झाले. श्री. गोपीनाथपंत पोतनीस त्यांना ता. २५–१–१९३४ रोजीं कोरे स्टँप मिळविण्याबाबतच्या तक्रारीवरून दोन वर्षांची शिक्षा झाली होती. ते नोव्हेंबर १९३५ मध्यें मुक्त झाले. संस्थानांत झालेल्या दडपशाहीमुळें जी स्मशानशांतता पसरली, ती सन १९३८ पर्यंत तशीच टिकली. सन १९३८ मध्यें श्री. राजेसाहेबांचा षष्ठ्यब्दि समारंभ व्हावयाचा असल्यानें प्रजासभेच्या सहकार्याची आवश्यकता दरबारला वाटूं लागली; कारण, प्रजासभेनें जर या समारंभावर बहिष्कार पुकारला, अगर भाग घेतला नाहीं तर त्याचें वैशिष्ट्य तें काय रहाणार होतें ? शेवटीं बऱ्याच वाटाघाटीनंतर श्री. वामनराव पटवर्धन आणि श्री. न. चिं. केळकर यांच्या मध्यस्थीनें प्रजासभा आणि दरबार यांच्यामध्यें समेट झाला. रावब. हुल्याळ दिवाण-

पदावरून गेले आणि त्यांचे जागीं रावब. कुमठेकर आले आणि ता. १६ डिसेंबर १९३८ रोजीं श्री. राजेसाहेबांचा षष्ठ्यब्दिपूर्तिसमारंभ मोठ्या थाटानें भोरास साजरा होऊन त्यांनीं कायदेमंडळाची सुधारणा करण्याचें जाहीर केलें. या जाहीर घोषणेनें कायदेमंडळांत १२ लोकनियुक्त व ९ सरकारनियुक्त सभासद रहावयाचे असून जंगल कमिटी नेमून त्याबद्दलचीं गाऱ्हाणीं दूर करण्याचें आश्वासन जाहीर करण्यांत आलें. या कायदे-मंडळाचा पांच वर्षें अनुभव घेतल्यावर मग लोकनियुक्त मंत्री घेण्याचें आश्वासन या जाहीर घोषणेंत दिलेलें आहे. यानंतर श्री. वामनराव पटवर्धन ता. १४-२-१९३९ रोजीं देवाधीन झाल्यामुळें या सुधारणा-कमिटी नेमण्याचें काम लांबणीवर पडलें. शेवटीं भोर संस्थान प्रजापरिषदेचें १२ वें अधिवेशन भारत सेवक समाजाचे सदस्य श्री. श्रीधरपंत वझे यांच्या अध्यक्षतेखालीं झाल्यावर, त्यांच्याच अध्यक्षतेखालीं मतदान कमिटी आणि जंगल कमिटी नेमण्यांत येऊन त्यांचें काम हल्लीं चाललेलें आहे.

## सुधागड तालुका सभा

सुधागड तालुका घाटावरील चार तालुक्यांपासून जरा अलग आहे. घाटावरील चार तालुक्यांत राजकीय हक्कांसाठीं चळवळ सुरू होणेपूर्वीं सुधागड तालुक्यांत चळवळ सुरू झाली होती. या तालुक्यांतील लोक सुशिक्षित व सधन असल्याकारणानें त्यांनीं मुंबई येथें सन १९२० सालीं सुधागड तालुका सभा स्थापन केली. या तालुका सभेचीं आतांपर्यंत बारा अधिवेशनें झालीं. या तालुका सभेचें काम तालुक्यापुरतें स्वतंत्रपणें चालू असलें तरी या तालुक्यांतील कार्यकर्त्या लोकांनीं प्रजासभेशीं असलेला संबंध कधींच सोडला नाहीं. या तालुका सभेंतील प्रमुख कार्यकर्ते श्री. दादासाहेब साने, बापूसाहेब लिमये, आबासाहेब आठवले प्रजासभेच्या कार्यकारी मंडळांत असून त्यांची वेळोवेळीं प्रजासभेस फार मदत झाली आहे.

## प्रजापरिषद

भोर संस्थान प्रजापरिषदेचीं आजवर पुढीलप्रमाणें बारा अधिवेशनें झालीं.

| | वर्ष | अध्यक्ष | ठिकाण |
|---|---|---|---|
| (१) | २५–१–१९२२ | श्री. न. चिं. केळकर | भोर |
| (२) | ६–६–१९२३ | „ | „ |
| (३) | २–३–१९२४ | कै. वामनराव पटवर्धन | नसरापूर |
| (४) | ७–४–१९२६ | „ | वेल्हे |
| (५) | १०–४–१९२७ | प्रो. ल. व. भोपटकर | उरवडे |
| (६) | ७–५–१९२८ | कै. चिंतामणराव वैद्य | हिर्डोशी |
| (७) | १२–१–१९३० | कै. ग. र. अभ्यंकर | पाली |
| (८) | ७–५–१९३१ | कर्मवीर वि. रा. शिंदे | पाथरशेत-भेंबटमाळ |
| (९) | ११-१२ १९३२ | प्रि. टी. ए. कुलकर्णी व श्री. व. वा. पासळकर | शिरवळ |
| (१०) | २–२–१९३५ | श्री. श्री. ग. वझे | पुणें |
| (११) | १५–५–१९३७ | श्री. रा. ग. प्रधान | पुणें |
| (१२) | २९–४–१९३९ | श्री. श्री. ग. वझे | भोर |

भोर प्रजापरिषदांचीं आजवर बारा अधिवेशनें झालीं, त्यापैकीं दोन अधिवेशनें संस्थान हद्दीबाहेर पुणें येथें संस्थानांतील दडपशाहीच्या परिस्थितीमुळें भरवावीं लागलीं. पाली व पाथरशेतच्या दोन अधिवेशनांचें वैशिष्ट्य मागें दिलेंच आहे. नवव्या सन १९३२ मधील शिरवळच्या प्रजापरिषदेच्या वेळीं दरबारनें रचलेला व्युह प्रजासभेच्या पुढाऱ्यांच्या चातुर्यानें ढासळला. या शिरवळ परिषदेंत दरबारच्या प्रोत्साहनानें निघालेल्या देशमुखसंघानें पुष्कळ लोक जमा केले होते. पण हें अधिवेशन कांहींही बखेडा न होतां पार पडलें. फक्त परिषदेचें अध्यक्षस्थान दोन व्यक्तींनीं, प्रि. टी. ए. कुलकर्णी व बाळासाहेब पासलकर, यांनीं मंडित केलें होतें. पण देशमुखसंघास दरबारच्या कुटिल राजनीतीचा अनुभव आल्यानें

पुण्याची १० वी परिषद् प्रजासभा आणि देशमुख संघाची एकी होऊन यशस्वीपणें पार पडली. देशमूख संघाचे श्री. चं. गो. आगाशे हे या परिषदेचे स्वागताध्यक्षच होते. या प्रजापरिषदांस शेंकडों नव्हे हजारों मावळे उपस्थित होत असतात हें भोर परिषदांचें वैशिष्टच आहे. या प्रजापरिषदांच्या द्वारें संस्थानांत जी जागृति झाली, त्याच्या जोरावरच संस्थानांतील वर वर्णिलेल्या चळवळी झाल्या.

भोर संस्थान प्रजासभेनें ज्या अनेकविध चळवळी चालविल्या होत्या, त्यांपैकीं एक म्हणजे दोन तीन वर्षें पुण्यांतील वसंत व्याख्यान-मालेच्या धर्तीवर श्री. गोपीनाथराव पोतनीस यांनीं भोर व शिरवळ येथें बोधामृत व्याख्यानमाला चालविली होती. पुण्याहून रोज अध्यक्ष व वक्ते आणवून सायंकाळीं शिरवळ येथें व रात्रौ भोर येथें नियमानें अनेकविध विषयांवर वक्त्यांचीं भाषणें होत असत. हा उपक्रम द्रव्याच्या अभावीं व कार्यकर्त्या माणसांच्या अभावीं बंद पडला. तसेंच रा. गोपिनाथराव पोतनीस यांनीं "मावळा" नांवाचें वर्तमानपत्र कांहीं दिवस चालविलें होतें व पुढें ते तुरुंगांत गेल्यावर बंद पडलें.

भोर संस्थानांतील प्रजा-सभेप्रमाणेंच आणखी एका स्थापन झालेल्या संस्थेचीं अधिवेशनें कांहीं काल नियमानें भरलीं होतीं व तिला एक प्रकारचें महत्त्व प्राप्त झालें होतें. ती संस्था म्हणजे भोर संस्थानांतील इनामदार-हक्कदार लोकांची होय. भोर संस्थानांतील इनामदार व हक्कदार लोकांनीं या इनामदार-हक्कदार सभेची स्थापना पुणें येथील सार्वजनिक सभेच्या हॉलमध्यें ता. २०-९-१९२५ रोजीं केली. या सभेचीं कांहीं अधिवेशनें प्रजासभेच्या अधिवेशनांच्यावरोबर प्रजासभेच्या मंडपांतच भरलीं व कांहीं कालपर्यंत या सभेची कामगिरी बरी चालली होती.

भोर कायदेमंडळाची पहिली बैठक ता. १९-८-१९२८ रोजीं झाल्यावेळीं सर्व सभासद जरी सरकारनियुक्त होते, तर त्यांत प्रजापुढाऱ्यांचा समावेश झाल्यामुळें कायदेमंडळाचें कामकाज उत्तम प्रकारें पार पडलें. पुढें प्रजा-

सभेशीं दरबारनें गडी फुः केल्यानंतर देशमुख संघानें त्यांत पुढाकार घेतला, पण त्यास सुद्धां शेवटीं दरबारी धोरणाचा वीट येऊन कायदेमंडळाकडे पाठ फिरविणें भाग झालें. या कायदेमंडळामुळें संस्थानांतील लोकशाहीची प्रगति झाली असें मुळींच नाहीं. उलट, श्री. राजेसाहेबांनीं पुढें स्वीकारलेल्या प्रतिगामी धोरणामुळें त्याची पिछेहाटच झाली. सध्यांचें कायदेमंडळाचें कामकाज हें जिवंतपणाच्या अभावीं प्रजेला मुळींच आकर्षक वाटत नाहीं.

## कै. श्री. वामनराव पटवर्धन

भोर संस्थानांतील प्रजासभेची चळवळ उत्तम प्रकारें वाढीस लागून ती इतरांस आदर्शभूत होण्याचें सर्व श्रेय कै. वामनरावजी पटवर्धन यांना आहे. चळवळीच्या सुरवातीपासून तींत त्यांनीं लक्ष घालून, वेळोवेळीं कार्यकर्त्या लोकांस सल्ला देऊन जरूरीच्या वेळीं आर्थिक मदतही केली आहे. भोर दरबार व भोर प्रजासभा यांचे संबंध सलोख्याचे रहावेत यासाठीं त्यांनीं फारच प्रयत्न केले. हिरडा कमिटी नेमण्याचे बाबतींत व संस्थानांत कायदेमंडळ स्थापन होण्याचे बाबतींत त्यांचेच प्रयत्न कारणीभूत झालेले आहेत. त्यांना येथील चळवळीची संपूर्ण माहिती असल्यामुळें पुढाऱ्यांवर घातलेले खटले ‘खोटे’ आहेत असें ते नेहमीं म्हणत असत. श्रीमंतांच्या षष्ठ्यब्दिपूर्तीच्या वेळीं त्यांनीं जी जाहीर घोषणा केली व लोकांस अल्प प्रमाणावर कां होईना जे राजकीय हक्क दिले त्याचें सर्व श्रेय कै. वामनरावजी पटवर्धन यांनाच देणें जरूर आहे. कै. वामनरावजी पटवर्धन यांनीं प्रजासभेची चळवळ कायम टिकविणेसाठीं जे परिश्रम घेतले, कष्ट सोसले व प्रसंगीं आर्थिक मदत केली, त्याबद्दल प्रजासभेचे कार्यकर्ते त्यांचे सदैव ऋणी आहेत. कै. वामनराव पटवर्धनांचा ६१ वा वाढदिवस समारंभ ता. २६–२–३३ रोजीं मार्गास्नी येथें साजरा करून थैली अर्पण केली होती.

प्रजासभेची चळवळ सुरू झाल्यापासून ती आजतागायत कायम टिकविणेसाठीं ज्यांचे परिश्रम सर्वस्वीं कारणीभूत झाले त्यांचा येथें नामनिर्देश केल्याशिवाय चळवळींचा इतिहास पूर्ण होणार नाहीं. प्रजासभेच्या चळवळीस जें यश लाभलेलें दिसत आहे, त्याचें सर्व श्रेय कै. वामनरावजी पटवर्धन, शेटे व श्री. पोतनीस बंधू यांनाच आहे. निरनिराळ्या संकटांचे वेळीं धैर्यानें तोंड देऊन त्यांनीं कारागृहवासांतील खडतर कष्ट सोसून चळवळ कायम टिकविली. इतकेंच नव्हे तर, ही चळवळ लोकजागृतीच्या दृष्टीनें इतरांस आदर्शभूत अशी करून दाखविली. त्यांच्या कार्याबद्दल शेवटीं कृतज्ञता व्यक्त करणें हें माझें कर्तव्य आहे.

# फलटणांतील राजकीय प्रगति

लेखक : फलटणचा एक रहिवासी

निर्जन प्रदेशांतून प्रवास करणाऱ्या प्रवाशास एकादा मनुष्य दिसल्यानें जसा आनंद होतो, ओसाड क्षेत्रांतील पाणपोयीमुळें मनुष्याला जसें समाधान वाटतें, तद्वत् बेबंद आणि सुराज्यास पारख्या असलेल्या संस्थानी स्वराज्यांत कोठें सुराज्याचा अंश दिसला, तर संस्थानी सुराज्यासाठीं धडपड करणाऱ्या कार्यकर्त्यांस कितीतरी आनंद वाटेल! आणि या सुराज्याबरोबर लोकशाहीच्या राज्यपद्धतीस आस्थेवाईकपणें कोणी मदत करीत आहे असें दिसलें तर त्याबद्दल त्यांना सात्त्विक आनंद व उल्हास वाटल्यावांचून राहणार नाहीं. दक्षिण महाराष्ट्रांतील ज्या संस्थानांत अशा तऱ्हेचा लोकशाही राज्यपद्धतीचा प्रयोग करण्यास आपण होऊन ज्यांनीं सुरुवात केली, त्यांत फलटण संस्थानची गणना अवश्य करणें भाग पडेल. यापूर्वीं फक्त औंधच्या अधिपतींनीं आपल्या संस्थानांत प्रातिनिधिक संस्था स्थापण्याचें श्रेय संपादलें होतें. सन १९२९ सालींच लोकपक्षीय मंत्री नेमण्याची जी आघाडी सर्व संस्थानांत फलटण संस्थाननें मारली, ती निःसंशय संस्थानाधिपतीच्या लोकशाहीच्या प्रेमाचें द्योतक होती असें म्हणण्यास हरकत नाहीं. प्रजापक्षीय चळवळीचा मागमूसहि ज्या वेळीं संस्थानांत नव्हता, त्या वेळीं संस्थानांत विधिमंडळाची स्थापना करून संस्थानाधिपति श्री. नानासाहेब नाईक निंबाळकर यांनीं लोकशाहीची मुहूर्तमेढ रोवली ही फलटणच्या प्रजेला अभिमानास्पद गोष्ट आहे.

फलटण संस्थान मुंबई इलाख्यांत सातारा जिल्ह्याच्या ईशान्येस वसलेलें आहे. संस्थानचा सर्व प्रदेश सलग असून निरा खोऱ्यांत वसलेला आहे. संस्थानचें क्षेत्रफळ सुमारें ३९७ चौरस मैल असून त्यांत ७२ गांवें आहेत. संस्थानची लोकसंख्या ५८,७६१ असून संस्थानचें वार्षिक उत्पन्न सुमारें १५

लाखांचें आहे. फलटण हें संस्थानच्या राजधानीचें शहर असून तें महाड-पंढरपूर रस्त्यावर महाडापासून ८२ मैलांवर वाणगंगा नदीच्या तीरावर वसलेलें आहे. तें पुण्यापासून आग्नेयीस ६५ मैल व सातार्‍यापासून ईशान्येस ४७ मैल आहे. मद्रास व सदर्न मराठा रेल्वेचें लोणंद स्टेशन फलटणपासून १७ मैलांवर आहे. रेल्वेचें दळणवळण सुरू होण्यापूर्वी कोंकण व देश यांमधील उतारपेठ म्हणून या शहराला फार महत्त्व होतें. ५ मैलांवरून ४० फूट खोल झर्‍यांचें शुद्ध पाणी नैसर्गिक प्रवाहानें नळांतून आणलें असून शहरास पाण्याचा मुबलक पुरवठा केला आहे. फलटण येथील म्युनिसिपॅलिटी १८६८ सालीं स्थापन झाली आहे. शहरास विजेचा पुरवठाहि करण्यांत आला आहे.

फलटणपासून १२ मैलांवर मौजे होळ या गांवानजीक साखरवाडी येथें फलटण शुगर वर्क्स लि. चा साखरेचा कारखाना आहे. कंपनीनें कारखान्यांत सुमारें ३५ लक्ष रुपयांचें भांडवल गुंतविलें असून दरसाल सुमारें १२,५०० टन म्हणजे सुमारें सव्वा लाख पोतीं साखर तयार होते. या साखर-कारखान्यामुळें संस्थानची आर्थिक परिस्थिति पुष्कळच सुधारली. संस्थानच्या इतर उत्पन्नाच्या बाबीपेक्षां साखरेच्या जकातीचेंच उत्पन्न जास्त आहे आणि हा साखर-कारखाना काढण्याच्या कामीं श्री. राजेसाहेबांनीं जें दूरदर्शी धोरण स्वीकारलें, त्याचीं गोड फळें त्यांना चाखावयास मिळत असून संस्थानांत लोकोपयोगी सुधारणा करण्यास संस्थानला भरपूर वाव मिळत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं आर्थिक सुस्थिति झाल्यामुळें सन १९३५–३६ सालापासून दरसाल रुपये २०,००० याप्रमाणें पांच वर्षे वेगळी रकम काढून एक लाख रुपयांचा "शेती सुधारणा फंड" श्री. राजेसाहेबांनीं स्थापन केला आहे. या फंडाच्या व्याजाची रकम केवळ शेतकर्‍यांच्या हितासाठीं खर्च व्हावयाची आहे. तसेंच उद्योगधंद्याच्या मदतीसाठीं सन १९३५–३६ सालापासून दरसाल रु. २,००० प्रमाणें पांच वर्षांत रु. १०,०००चा "औद्योगिक सुधारणा फंड" स्थापन केलेला आहे.

## थोडी ऐतिहासिक माहिती

इ. सन १२७० च्या सुमारास राजपुतान्यांतील सुप्रसिद्ध परमार (पवार) या रजपूत घराण्यांतील निंबराज नांवाचा पुरुष दाक्षिणेंत आला व शंभू महादेवाच्या डोंगराच्या पायथ्याशीं कांहीं काळ राहून तेथून फलटणच्या पूर्वेस ९ मैलांवर असलेल्या निंबळक गांवीं राहूं लागला. इ. स. १२८४ मध्यें त्यानें स्वपराक्रमानें आसपासच्या मुलुखांत स्वतंत्र राज्य स्थापन केलें. निंबळक गांवावरूनच या घराण्याचें नांव निंबाळकर पडलें. इ. स. १५७० मध्यें या घराण्यांतील १४ वा राजपुरुष दुसरा वणगोजी ऊर्फ जगपाळराव (१५७०–१६३०) हा गादीवर आला. मराठ्यांच्या साम्राज्याचे संस्थापक श्रीमच्छत्रपति शिवाजी महाराज यांचे आजे मालोजी भोंसले व त्यांचे बंधू विठोजी हे वेरूळहून दाक्षिणेंत येऊन निंबाळकरांच्या पदरीं नोकरीस राहिले होते. पुढें त्यांचा पराक्रम ऐकून अहमदनगरच्या निजामशहानें, ते त्याच्या राज्यांतील असल्यामुळें, त्यांस बोलावून घेऊन मनसबदारी दिली. यानंतर थोड्याच दिवसांनीं जगपाळरावानें आपली बहीण दीपाबाई मालोजी रावांना दिली.

जगपाळरावानंतर त्याचा मुलगा दुसरा मुधोजी (१६३०–१६४४) गादीवर आला. त्याची कन्या सईबाई इचा विवाह श्रीमच्छत्रपति शिवाजी महाराज यांच्याशीं झाला. इ. स. १६४४ मध्यें मुधोजीला विजापूरच्या बादशहानें ठार मारलें व त्याचा मुलगा पहिला बजाजी (१६४४–१६७४) यास विजापूर येथें कैदेंत ठेवलें. पुढें तेथें त्यास मुसलमानी धर्माची दीक्षा देऊन बादशहानें आपली कन्या त्यास दिली. इ. स. १६५१ मध्यें बजाजी फलटणला परत आला व थोड्याच दिवसांत विजापूरला त्याची मुसलमान पत्नी निवर्तली. यानंतर शिवाजी महाराज आणि त्यांच्या मातुःश्री जिजाबाई यांच्या प्रयत्नामुळें बजाजीस शिखर-शिंगणापूर येथें शुद्ध करून परत हिंदुधर्मांत घेण्यांत आलें. त्यानंतर शिवाजी महाराजांनीं आपली कन्या सखुबाई ही बजाजीचा थोरला मुलगा महादजी यास दिली.

१९ वा राजपुरुष तिसरा मालोजी १७७७ मध्यें निवर्तल्यानंतर त्याचा दत्तकपुत्र जानराव ( १७७७-१८२५ ) गादीवर आला व तो अज्ञान असल्यामुळें राणी सगुणाबाईनें इ. स. १७९१ पर्यंत संस्थानचा राज्य-कारभार केला. धर्मशीलपणा व उत्कृष्ट राज्यकारभार या गुणांबद्दल श्री. सगुणाबाई ऊर्फ आईसाहेब यांची ख्याति आजतागायत फलटण येथील आबालवृद्धांच्या तोंडीं आहे. पेशव्यांचें राज्य १८१८ मध्यें नष्ट झाल्या-नंतर कंपनी सरकारनें जानराव नाईकाशीं ता. २२ एप्रिल १८२० रोजीं मित्रत्वाचा करार करून फलटणचें राज्य कायम राखण्याची हमी घेतली.

जानराव १८२५ मध्यें निपुत्रिक मरण पावल्यानंतर सातारच्या महा-राजांनीं संस्थान जप्त केलें. परंतु पुढें १८२७ मध्यें बजाजी यास गादी देण्यांत आली. तो मे १८२८ मध्यें मरण पावल्यानंतर पुन्हां सातारच्या महाराजांनीं संस्थान जप्त केलें. शेवटीं डिसेंबर १८४१ मध्यें जानरावाची पत्नी साहेबजीबाई ऊर्फ बयासाहेब हिला दत्तक घेण्याची परवानगी मिळाली. तिनें जानरावाच्या भावाचा नातू महादजी याला दत्तक घेऊन त्याचें नांव मुधोजी ठेवलें व तो अज्ञान असल्यामुळें साहेबजीबाईनें उत्तम रीतीनें राज्य-कारभार चालविला. ती १८५३ मध्यें मृत्यु पावल्यानंतर ब्रिटिश सरका-रतर्फे संस्थानचा कारभार चालविण्यांत येऊन तारीख १०-२-१८६० रोजीं मुधोजीराव ऊर्फ बापूसाहेब यांना गादीचे अधिकार देण्यांत आले. त्यांनीं तारीख १७ माहे आक्टोबर १९१६ पर्यंत राज्य केलें. त्यांची दीर्घ व प्रगमनशील कारकीर्द प्रजेस फार सुखावह झाली. आज फलटण येथें दृष्टीस पडत असलेलीं बरींच सार्वजनिक उपयोगाचीं कामें त्यांच्या लोकहिततत्परतेची साक्ष देत आहेत. १८८७ सालीं मुंबई सरकारनें त्यांना मुंबईच्या कायदेमंडळांत सभासद नेमलें होतें. मुधोजीरावांचे चिरंजीव श्रीमंत व्यंकटराव ऊर्फ नाईकसाहेब हे १८८७ सालीं मरण पावले. त्यांच्या मृत्यूनंतर गादीस कोणी वारस नसल्यामुळें मुधोजीरावांनी ता. २८-१२-१८९९ रोजीं सध्यांचे अधिपति श्रीमंत मालोजीराव नानासाहेब यांस दत्तक घेतलें.

ता. १८–१०–१९१६ रोजीं श्रीमंत नानासाहेब गादीवर आले. या वेळीं ते अल्पवयीन असल्यामुळें संस्थानचा राज्यकारभार ब्रिटिश सरकारनें नेमलेल्या ॲड्मिनिस्ट्रेटरमार्फत चालू होता. ता. १५ नोव्हेंबर १९१७ रोजीं श्रीमंतांना संस्थानच्या राज्यकारभाराचे संपूर्ण अधिकार देण्यांत आले. सदर दिवशीं झालेल्या दरबारांत भाषण करतांना संस्थानचा राज्यकारभार प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें उत्तरोत्तर सुधारण्याचा आपला निश्चय श्रीमंतांनीं जाहीर केला आणि तो अंमलांतहि आणला. ता. १–१–१९३६ रोजीं सार्वभौम सरकारांकडून श्रीमंतांना "राजा" हा वंशपरंपरा किताब देण्यांत आला.

श्री. सौ. लक्ष्मीदेवी राणीसाहेब यांनीं श्री. राजेसाहेबांच्या प्रोत्साहनावरून राज्यारोहणाच्या दिवशींच मोठ्या धैर्यानें पूर्वापार चालत आलेली पडद्याची अनिष्ट चाल मोडून टाकली. श्रीमंत राजे नानासाहेब १९३२ मध्यें विलायतेस गेले असतांना त्यांच्या गैरहजेरींत कार्यकारी मंडळाच्या मदतीनें श्रीमंत सौ. राणीसाहेबांनीं उत्तम रीतीनें संस्थानचा राज्यकारभार पाहिला व त्याबद्दल त्यांना ता. १८-४-१९३४ रोजीं मानपत्र देण्यांत आलें. श्रीमंत सौ. राणीसाहेब या संस्थानांतील प्रजाजनांच्या व विशेषतः स्त्रियांच्या उन्नतीप्रीत्यर्थ जातीनें लक्ष घालीत असतात. त्यांच्या पुढाकारामुळेंच स्त्रियांनीं कायदेमंडळाच्या निवडणुकींत मत देणें, कायदेमंडळाचे सभासद होणें याबाबत असलेले सर्व कायदेशीर निर्बंध दूर करण्याचें अभिवचन श्रीमंत राजेसाहेबांनीं ता. २७-७-१९३६ रोजीं कायदेमंडळापुढें केलेल्या भाषणांत दिलें व अशा रीतीनें श्री. सौ. राणीसाहेबांनीं संस्थानांतील स्त्रियांना महत्त्वाचे हक्क प्राप्त करून दिले.

## राजकीय सुधारणा

श्री. राजेसाहेबांचा कल प्रथमपासूनच एकतंत्री राज्यकारभाराला प्रतिकूल असल्यामुळें राज्यकारभाराच्या कामीं प्रजाजनांकडून उपयुक्त सूचना मिळाव्यात व प्रजाजनांना राज्यकारभाराची माहिती होऊन त्यांत भाग

घेण्याची महत्त्वाकांक्षा त्यांच्यांत उत्पन्न व्हावी या हेतूनें श्रीमंतांनीं एप्रिल १९२० मध्यें अधिकारी व प्रजेचे पुढारी यांचें एक मिश्र सल्लागार मंडळ स्थापन केलें. सल्लागारमंडळाच्या कामाचा ७-८ वर्षें अनुभव घेतल्यानंतर ता. १७–९–१९२८ रोजीं श्रीमंतांनीं आपल्या ३२ व्या वाढदिवशीं काढलेल्या जाहीरनाम्यांत संस्थानच्या राज्यकारभाराचें धोरण खालील-प्रमाणें जाहीर केलें:—

" संस्थानचा राज्यकारभार लोकमतानुवर्ती व लोकप्रातिनिधींस जबा-बदार असा करणें हेंच आमचें संस्थानच्या राज्यकारणाचें अंतिम ध्येय आहे व संस्थानच्या राज्यकारभारांत यापुढें होणाऱ्या सुधारणा व बदल हें ध्येय गांठण्याच्या दृष्टीनेंच मुख्यतः करण्यांत येतील असें आम्ही या प्रसंगीं जाहीर आश्वासन देत आहों; मात्र हें ध्येय हळूहळू व पायरी-पायरीनेंच साध्य होणें इष्ट व हितावह आहे असें आमचें मत आहे."

यानंतर वरील ध्येय साध्य करण्याच्या मार्गांतील पहिला टप्पा म्हणून श्रीमंतांनीं पुढील वर्षी तारीख ७-९-१९२९ रोजीं फलटण संस्थानच्या राज्यकारभाराबाबतचा कायदा करून संस्थानांत कार्यकारी मंडळ व कायदेमंडळ यांची स्थापना केली. या वेळीं ते म्हणाले कीं, " अनियं-त्रित अगर एकसत्ताक राज्यपद्धति, मग ती कितीहि सद्बुद्धिप्रेरित असो, तिचें युग आतां संपलें आहे. तसेंच जी लाट सर्व जगभर आक्रमण करीत आलेली होती व आमच्या संस्थानच्या सरहद्दीजवळ येऊन पोंचली होती, ती आमच्या संस्थानच्या लोकांना स्पर्श न करतां जाईल हें शक्य नव्हतें. म्हणून ही लाट आदळण्यापूर्वीच तिचे दुष्परिणाम टाळण्यासाठीं तिला इष्ट वळण देऊन ती सुमार्गगामी होईल अशी तजवीज करणें यांतच खरा शहाणपणा आहे असा आम्हीं विचार केला.... कोण-त्याहि संस्थानचा दर्जा, मानमरातब व अधिकार हे तहनाम्यांवर जितके अवलंबून आहेत, तितकेच ते संस्थानांतील उदार व सनदशीर राज्य-पद्धतीवरहि अवलंबून आहेत." हे उद्गार सर्व संस्थानिकांनीं लक्षांत

ठेवणेजोगे नाहींत असें कोण म्हणेल? संस्थानची सुधारणा करण्याच्य वेळीं तहनाम्यांचें जें अवडंबर माजविण्यांत येतें, तें किती चुकीचें आहे हें एका संस्थानिकांच्या वरील भाषणावरून दिसून येणार आहे. आणि विधिमंडळाच्या कक्षेबाहेर तहनाम्याची बाब जी ठेवली जाते, त्याचेंहि खरोखर प्रयोजन नाहीं असेंच यावरून म्हणणें भाग पडतें.

श्रीमंतांनीं कार्यकारीमंडळ व कायदेमंडळ यांची स्थापना केल्याबद्दल प्रजाजनांनीं ता. २७-९-२९ रोजीं श्रीमंतांना मानपत्र देऊन आपला आनंद व्यक्त केला. नवीन स्थापन केलेल्या कार्यकारी मंडळांत संस्थानचे दिवाण व न्यायमंत्री असे दोघे सभासद असून श्रीमंत स्वतः कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष होते. कार्यकारी मंडळाचे दुसरे सभासद म्हणून फलटण येथील प्रसिद्ध वकील श्री. दाणी यांची योजना करण्यांत आली आणि लोकपक्षीय मंत्री संस्थानच्या राज्ययंत्रांत घेण्याची सुधारणा श्री. राजेसाहेबांनीं सर्वांअगोदर केली असें म्हणण्यास हरकत नाहीं. कायदेमंडळांत कार्यकारीमंडळाचे दोघे सभासद असून शिवाय, २ अधिकारी सभासद, ५ सरकारानियुक्त बिनअधिकारी सभासद व ८ लोकनियुक्त सभासद असे १७ सभासद होते. कायदेमंडळाचे अध्यक्ष सरकारनियुक्त व उपाध्यक्ष मंडळानें निवडलेला असावा अशी तरतूद कायद्यांत करण्यांत आली होती. पुणें येथील भारतसेवक समाजाचे एक संस्थापक सदस्य व "संस्थानी स्वराज्य" वर्तमानपत्राचे संस्थापक व आद्य संपादक कै. अनंत विनायक उर्फ वामनरावजी पटवर्धन, बी. ए., संस्थानचे पूर्वींचे कारभारी व मुंबई इलाख्यांतील सेवानिवृत्त मामलेदार श्री. शंकर भालचंद्र बापट, बी. ए., डॉ. रामकृष्ण हरी भडकमकर, एम. ए., एम. डी. अशा सुविद्य सद्गृहस्थांना कायदेमंडळाचे बिन-अधिकारी सभासद नेमण्यांत आलें होतें. या कायदेमंडळांत एक हरिजन सभासदहि नेमण्यांत आला होता. या पहिल्या कायदेमंडळाचे अध्यक्ष श्री. शं. भा. बापट यांना नेमण्यांत आलें व उपाध्यक्षाच्या जागीं

कै. वामनराव पटवर्धन यांची कायदेमंडळानें निवडणूक केली. नवीन कायद्याप्रमाणें केलेल्या नियमान्वयें निवडणूक करण्यास अवधि नसल्यामुळें संस्थानांतील प्रत्येक खेडेगांवांतून एकेक असे प्रतिनिधि बोलावून त्यांचेकडून कायदेमंडळांतील लोकनियुक्त सभासद निवडण्यांत आले होते. यामुळें या कायदेमंडळाची मुदत मुद्दाम एक वर्षाची ठेवण्यांत आली होती. या कायदेमंडळाचीं एका वर्षांत ४ अधिवेशनें झालीं. या कायदेमंडळाच्या कामकाजांत लोकांनीं फारसें लक्ष्य घातलें नाहीं असें दिसून आल्यामुळें ता. २६-८-१९३० रोजीं कायदेमंडळापुढें केलेल्या भाषणांत श्री. राजेसाहेबांनीं " बाहेरील सभासद कामांत जितकें लक्ष घालतात तितकें स्थानिक सभासद, एक दोन अपवाद खेरीज करून, घालीत नाहींत असें आम्हांस मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें " असे उद्गार काढले व हें औदासीन्य झाडून टाकण्याचा त्यांनीं लोकांना सल्ला दिला.

यानंतर जानेवारी १९३१ मध्यें राज्यकारभाराच्या कायद्यानुसार कायदेमंडळ बनविण्यांत आलें. कै. वामनरावजी पटवर्धन यांनाच या कायदेमंडळाचे अध्यक्ष श्रीमंतांकडून नेमण्यांत आलें. या कायदेमंडळाचें पहिलें अधिवेशन तारीख २३-२-३१ रोजीं होऊन त्यांत उपाध्यक्षांच्या जागीं डॉ. रा. ह. भडकमकर यांना निवडण्यांत आलें. या बैठकीच्या शेवटीं अध्यक्ष या नात्यानें समारोपाचें भाषण करितांना लोकनियुक्त सभासदांना " ज्या गोष्टींत सुधारणा व्हावी असें वाटत असेल त्याबाबत त्यांनीं प्रश्न विचारून, ठराव मांडून व बिलें आणून अधिकारी सभासदांना अगदीं भंडावून सोडलें पाहिजे व इष्ट ती सुधारणा घडवून आणली पाहिजे......त्यांनीं खरी लोकसेवा केली पाहिजे...... अशा कामामुळें अधिकारीवर्गाचा आपणांवर रोष होईल किंवा कसें या गोष्टीकडे लक्ष न देतां त्यांनीं निर्भीडपणें कामगिरी केली पाहिजे, " असा कळकळीचा उपदेश कै. वामनरावजींनीं सभासदांना केला होता. तारीख २८-३-३१ रोजीं श्रीमंतांनीं १९२९ च्या राज्यकारभाराच्या

कायद्यांत सुधारणा करून कार्यकारी मंडळांत ३ सभासद नेमले व आपण कार्यकारी मंडळाच्या अध्यक्षाचें काम सोडून देऊन दिवाणांना कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष नेमलें. कार्यकारी मंत्र्याची एक जागा वाढविल्यामुळें कायदेमंडळांत लोकनियुक्त सभासदांचें प्रमाण शेंकडा ४५ चे वर राहण्यासाठीं लोकनियुक्त सभासदाची एक जागा वाढविण्यांत येऊन सभासदांची एकूण संख्या १७ची १९ करण्यांत आली. या कायदे-मंडळाचीं आठ अधिवेशनें झालीं.

सन १९३० मध्यें अखिल हिंदुस्थान कायदेभंगाच्या चळवळीनें दुमदुमून गेलें, तरी फलटण संस्थान त्यापासून अगदीं अलिप्त राहिलें यावद्दल संतोष प्रदर्शित करतांना ता. २३-२-३१ रोजीं कायदेमंडळापुढें केलेल्या भाषणांत श्रीमंत राजेसाहेब म्हणतातः—"संस्थानावाहेरच्या चळवळीचा:संसर्ग आपल्या या संस्थानास बाधेल कीं काय अशी सारखी काळजी वाटत होती. परंतु तसें कांहीं न होतां येथील शांततेचा भंग झाला नाहीं ही मोठी सुदैवाची गोष्ट होय. यावरून संस्थानाधिपति व प्रजाजन यांच्यामधील सलोख्याची प्रतीति येते. योग्य वेळीं नवीन सुधारणा दिल्या गेल्यानें प्रजाजनांच्या आत्मविश्वासास बळकटी येऊन त्यायोगें ते पूर्ववत् राजनिष्ठ व शांतताप्रिय राहण्यास मदत झाली आहे."

जुलै १९३४ मध्यें कायदेमंडळाच्या नियमानुसार तृतीय कायदेमंडळ अस्तित्वांत आलें. नुकतीच सप्टेंबर १९३९ मध्यें या कायदेमंडळाची मुदत संपली व नवीन कायदेमंडळाच्या निवडणुकी जून १९४० मध्यें व्हावयाच्या आहेत. तिसऱ्या कायदेमंडळाच्या अध्यक्षाच्या जागीं संस्थानांत पूर्वीं हायकोर्ट जज्जाचें काम केलेले मुंबई इलाख्यांतील रिटायर्ड सब-जज्ज श्री. बाळकृष्ण गोविंद फाटक, बी. ए., एलूएल् बी., यांना श्रीमंतांकडून नेमण्यांत आलें. तारीख ९–७–१९३४ रोजीं झालेल्या कायदेमंडळाच्या बैठकींत कै. अ. वि. पटवर्धन यांना उपाध्यक्ष निवड-ण्यांत आलें. तिसऱ्या कायदेमंडळाची एकूण ७ अधिवेशनें झालीं.

सन १९३८ साल हें संस्थानांच्या इतिहासांत बरेंच धामधुमीचें गेलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. कांहीं ठिकाणीं तर परिस्थिति इतकी बिघडली कीं, तिची झळ सर्व संस्थानांना सारखीच लागूं लागली होती. पण फलटण संस्थानांत मात्र त्याची झळ विशेष लागली नाहीं, ही आनंदाची गोष्ट होय.

सन १९२९ सालीं दिलेल्या राजकीय सुधारणांना १० वर्षें पुरीं झालीं असें पहातांच स्वयंप्रेरणेनें श्रीमंत राजेसाहेबांनीं ता. १२ नोव्हेंबर १९३९ रोजीं राजकीय हक्कदानाची महत्त्वाची घोषणा केली. या नवीन सुधारणा स्थूलमानानें पुढीलप्रमाणें आहेत:—

( १ ) कायदेमंडळांत लोकनियुक्त सभासदांचें निर्विवाद बहुमत राहावें यासाठीं एकंदर सभासदांपैकीं दोन तृतीयांश सभासद लोकनियुक्त राहून सभासदांची एकूण संख्या १५ राहील.

( २ ) लोकनियुक्त सभासदांपैकीं एका सभासदास श्री. राजेसाहेबांच्या पसंतीनें दरबार कार्यकारी मंडळांत नेमण्यांत येईल.

( ३ ) मतदानाचा हक्क अधिक विस्तृत करण्यांत येईल; व

( ४ ) कायदेमंडळाचे आधिकार वाढविण्यांत येतील.

सदर दिवशीं प्रसिद्ध केलेल्या जाहीरनाम्यांत श्रीमंत राजेसाहेब म्हणतातः—

" सन १९२९ चा राज्यकारभाराबाबतचा कायदा जारी करून १० वर्षें झाल्यानंतर त्यांत सुधारणा करण्याचा आमचा हेतु प्रथमपासूनच होता. परंतु कायदेमंडळाबाबत किंबहुना संस्थानांतील सर्वच प्रातिनिधिक संस्थांबाबत लोकांत विशेष आस्था अगर उत्साह दिसून आला नाहीं असें मोठ्या कष्टानें नमूद करणें यापूर्वीं अनेक वेळां आम्हांला भाग पडलें आहे. तथापि अधिक सुधारणा व अधिकार कायदेमंडळास देण्यास विलंब करण्यास परिस्थिति ही सबब म्हणून पुढें करणें आम्हांस योग्य वाटत

नाहीं. तसेंच वरीलप्रमाणें कांहीं अंशानें परिस्थिति असली, तरी गेल्या दहा वर्षांत कायदेमंडळांत विधायक कामगिरी पुष्कळच झाली हें नाकबूल करतां येणार नाहीं....शिवाय प्रातिनिधिक संस्थांबाबत प्रथम दिसून आलेलें औदासीन्य नाहींसें होऊन अलीकडे त्या संस्थांत मनःपूर्वक भाग घेण्याची इच्छा दिसून आली आहे. या गोष्टी लक्षांत घेतां दहा वर्षांनीं अधिक सुधारणा देण्याचा आमचा मूळचा संकल्प अंमलांत आणण्यास योग्य व अनुकूल अशीच हल्लींची परिस्थिति आहे असें आम्हांस वाटत आहे, म्हणून वर निर्दिष्ट केलेल्या सुधारणा व अधिकार देण्यास आम्ही आनंदानें प्रवृत्त झालों आहों."

वरील सुधारणा ग्रथित करून राज्यकारभाराच्या कायद्यांत, त्याखालील कानूंत व नियमांत फरक करण्यास अवधि लागणार असल्यामुळें वरील सुधारणांपैकीं पहिल्या दोन सुधारणा म्हणजे कायदेमंडळांत लोकनियुक्त सभासदांचें निर्विवाद बहुमत व लोकनियुक्त प्रतिनिधींपैकीं एकास दरबार कार्यकारी मंडळांत नेमणें या सुधारणांची अंमलबारी कायदेमंडळाच्या पुढील बैठकीपासून करण्यांत येईल असेंहि श्रीमंत राजेसाहेबांनीं सदर प्रसंगीं जाहीर केलें.

## इतर सुधारणा

१९३१ सालीं फलटण संस्थान कायदेमंडळानें लोकल बोर्डाचा कायदा पसार करितांच श्रीमंतांनीं त्यास तावडतोब मंजुरी दिली व ता. १-६-१९३१ पासून लोकलबोर्ड अस्तित्वांत आलें. संस्थानांत ग्रामपंचायतींचा कायदा लागू करण्यांत आला असून त्याअन्वयें तरडगांव येथें एक ग्रामपंचायत स्थापन झाली आहे.

न्याय व अंमलबजावणी या खात्यांची फारकत करण्यांत आली असून डिस्ट्रिक्ट जज्जांकडील व हायकोर्टाकडील अपिलें संस्थानाबाहेरील अनुभवी न्यायाधिशाकडे अगर कायदेपंडितांकडे सोंपविण्याचें धोरण श्री. राजेसाहेबांनीं गादीवर आल्यापासून सुरू ठेविलें आहे. दरसाल नवीन

इसमाची नेमणूक होत असल्यामुळें संस्थानहद्दींत त्यांचे कोणत्याच प्रकारचे हितसंबंध नसतात. या उपक्रमाची उपयुक्तता व यशस्विता पाहून या पद्धतीचें अनुकरण दक्षिणेंतील इतर संस्थानांतूनहि करण्यांत येऊं लागलें आहे.

## अखिल भारतीय संयुक्त राज्यघटना व फलटण संस्थान

श्री. राजेसाहेबांनीं संस्थानांतील प्रजेच्या अभ्युदयार्थ जशा गोष्टी केल्या, त्याप्रमाणेंच त्यांनीं आपल्या संस्थानिक बंधूंच्यासाठीं केलेली सेवाहि दृष्टिआड करून चालत नाहीं. भावी संघटनेंत फलटण व दक्षिणेंतील संस्थानांना योग्य तें स्थान मिळावें म्हणून श्री. राजेसाहेबांनीं आपले कर्तबगार दिवाण राव. के. वि. गोडबोले यांच्या मदतीनें जी कामगिरी केली, त्याबद्दल त्यांच्या संस्थानिक बंधूंनीं त्यांचे ऋणीच राहिलें पाहिजे. आपल्या संस्थानच्या दर्जानुरूप त्याला योग्य तें स्थान फेडरल विधिमंडळांत मिळावें म्हणून श्री. राजेसाहेबांनीं केलेली खटपट बहुतांशीं यशस्वी झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. असें करतांना संस्थानाचा पैसा जरी बराचसा खर्च झालेला असला, तरी तो अनाठायीं झाला असें म्हणतां येणार नाहीं. संस्थानांची इभ्रत, दर्जा व हक्क यांच्या जपवणुकीसाठीं केलेली ही खटपट होती.

सन १९३० च्या अखेरीस श्रीमंत राजेसाहेब यांना सातारा संस्थानां-तर्फें नरेंद्रमंडळांत प्रतिनिधि निवडून देण्यांत आलें व मार्च १९३१ मध्यें भरलेल्या नरेंद्रमंडळाच्या बैठकीस ते प्रतिनिधि म्हणून हजर राहिले. ही बैठक विशेष महत्त्वाची होती. नरेंद्रमंडळातर्फें लंडन येथें गोलमेज परिषदेला गेलेले प्रतिनिधि नुकतेच परत आले होते व एतद्देशीय संस्थानांना समाविष्ट करून तयार व्हावयाच्या अखिल भारतीय संयुक्त राज्यघटनेला मान्यता द्यावयाची किंवा नाहीं हा प्रश्न या बैठकीपुढें होता. हिंदुस्थानच्या भावी संयुक्त राज्यघटनेंत लहान संस्थानांचें स्थान कोणतें राहणार, मध्यवर्ती कायदेमंडळांत त्यांना किती प्रमाणांत प्रतिनिधित्व मिळणार व

त्यांचे कोणकोणते हक्क संयुक्त सरकारकडे सुपूर्त करावे लागणार, या गोष्टींकडे त्यांचें लक्ष गेलें व या प्रश्नाचा अभ्यास करण्यासाठीं व लहान संस्थानांचा प्रश्न गोलमेज परिषदेंत निघाल्यास त्यांच्या हक्कांस बाध न येईल अशी योजना हस्तेंपरहस्तें सुचविण्याच्या उद्देशानें त्यांनीं ऑगस्ट १९३१ मध्यें आपले दिवाण रा. सा. के. वि. गोडबोले यांना लंडन येथें सप्टेंबर १९३१ मध्यें भरणाऱ्या दुसऱ्या गोलमेज परिषदेस हजर राहण्यासाठीं पाठविलें. याबद्दल ता. १४-३-३२ रोजीं कायदेमंडळांत भाषण करतांना श्री. राजेसाहेब म्हणाले " या प्रश्नाला अशी एक बाजू आहे कीं, या संस्थाननेंच या बाबतींत इतकी खटपट व खर्च कां करावा ? जें सगळ्यांचें होईल तेंच आपलेंही होईल. आम्ही स्पष्ट सांगतों कीं, आम्ही या निवृत्तिपर व परावलंबी वृत्तीचे नाहीं व आमच्या प्रजेनेंही तसें असूं नये अशी आमची इच्छा आहे. आमची उलट अशी भावना आहे कीं ' केल्यावांचून कांहीं होत नाहीं. ' दुसरी गोष्ट अशी कीं इतर संस्थानें हीं आपलीं भावंडें आहेत. आपण स्वतः खटपट करून शिवाय आपल्या या भावंडांशीं सहकार्य करून त्यांचीही सेवा करण्याची संधि मिळाल्यास ती साधावी अशी आमची सात्विक मनीषा आहे. " यानंतर नोव्हेंबर १९३२ मध्यें तिसऱ्या गोलमेज परिषदेला हजर राहण्याकरतां श्रीमंतांनीं दिवाण रा. सा. गोडबोले यांना दुसऱ्यांदा लंडन येथें पाठविलें, व त्यांनीं श्रीमंत राजेसाहेब जत यांच्या सहकार्यानें भावी राज्यघटनेंतील वरिष्ठ विधिमंडळांत संस्थानांच्या वांटणीला येणाऱ्या प्रतिनिधींची संख्या लहानमोठ्या संस्थानांमध्यें आपसांत कशी वांटून द्यावी हा प्रश्न लहान संस्थानांचे प्रतिनिधि श्रीमंत राजेसाहेब सरिला, यांचेमार्फत परिषदे-पुढें मांडला. यानंतर तारीख ११-५-१९३३ रोजीं श्रीमंत राजे-साहेबांनीं रा. सा. गोडबोले यांना तिसऱ्यांदा विलायतेस पाठविलें. यावेळीं दाक्षिणेंतील अक्कलकोट, औंध, भोर, जमखंडी, जत, कुरुंदवाड सीनियर, मिरज ज्यूनिअर, फलटण व रामदुर्ग या संस्थानांच्या वतीनें

रा. सा. गोडबोले यांनीं जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढें महत्त्वाची साक्ष दिली. रा. सा. गोडबोले यांची जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढें साक्ष होण्याचें नक्की समजल्यानंतर या सुमारास आपण स्वतः विलायतेंत असण्यापासून रा. सा. गोडबोले यांच्या कामाला मदत होईल असें वाटल्यावरून श्री. राजेसाहेब ता. २७-५-१९३३ रोजीं निघून जून महिन्यांत विलायतेस गेले. वरील दहा संस्थानांची बाजू प्रथम त्यावेळचे अंडर सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया मि. आर. ए. बटलर यांच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या कमिटीपुढें मांडावी असें ठरल्यावरून रा. सा. गोडबोले यांनीं ती श्रीमंत राजेसाहेबांसमक्ष सदर कमिटीपुढें मांडली.

रा. सा. गोडबोले यांच्या जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढील साक्षीमुळें फार चांगलें वातावरण त्यावेळीं निर्माण झालें व त्यांची सर्वत्र वाहवा झाली. सदर साक्षीच्या वेळीं हिंदुस्थानचे माजी व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज यांनीं संयुक्त राज्यघटनेंत सामील होण्यांत ब्रिटिश हिंदुस्थानासाठीं तुम्ही ( संस्थानें ) कोणता स्वार्थत्याग करण्यास तयार आहां असा खुबीदार प्रश्न रा. सा. गोडबोले यांना विचारला होता. त्यावर रा. सा. गोडबोले यांनीं ताबडतोब " संयुक्त सरकारकडे सोंपविलेल्या बाबींपुरते संस्थानांचे स्वयंपूर्ण हक्क (Sovereignty) " असें उत्तर दिलें व या अनपेक्षित उत्तराची सर्वांकडून फार प्रशंसा झाली. संयुक्त राज्यघटना अस्तित्वांत आल्यावर कनिष्ठ विधिमंडळांत सभासद पाठविण्याचा फलटण संस्थानला जो अपूर्णांकात्मक हक्क आहे तो बजाविण्याच्या कामीं कायदेमंडळाचा सल्ला घेण्याचें आश्वासन श्रीमंत राजेसाहेबांनीं आपल्या कायदेमंडळाला दिलें आहे. दक्षिणेंतील संस्थानें हीं अधिकाराच्या दृष्टीनें जवळजवळ पूर्ण स्वयंसत्ताक असल्यामुळें त्यांना नरेंद्रमंडळांत स्वहक्कानें सभासद होण्याच्या कामींहि श्रीमंत राजेसाहेबांनीं व इतर संस्थानिकांनीं बरींच वर्षें खटपट केली व याहि खटपटीस आतां यश येईल अशी आशा वाटूं लागली आहे.

## फलटण संस्थान लोकसभा व इतर राजकीय पक्ष

श्री. राजेसाहेबांनीं सन १९२९ सालीं राजकीय सुधारणांचा पहिला हप्ता प्रजाजनांना दिल्यानंतर त्यांचा विशेषसा उपयोग करून घेण्याची वृत्ति प्रजेमध्यें उत्पन्न झाली नव्हती. या औदासीन्याचीं प्रमुख कारणें म्हणजे संस्थानांत अनेक वर्षांपासून सुराज्य नांदत होतें व राजकीय आकांक्षा उत्पन्न होण्यास संस्थानांतून अद्याप कोठेंच सुरवात झाली नव्हती हीं असावींत. फलटण संस्थान कायदेमंडळाचे प्रथमपासून सभासद असलेले कै. अनंत विनायक ऊर्फ वामनरावजी पटवर्धन यांनीं फलटण येथें लोकपुढाऱ्यांना सुधारणांचा योग्य तो उपयोग करून घेण्याविषयीं अनेकवार सांगितलें. अखेर त्यांच्याच प्रयत्नांना यश येऊन ता. २४-४-१९३८ रोजीं " दक्षिणी संस्थान लोकसभा, केंद्र फलटण " या नांवाची संस्था स्थापन होऊन ब्रिटिश हिंदुस्थानांतील दक्षिणी संस्थान लोकसभेस ती जोडण्यांत आली. परंतु ता. ११-१२-३९ रोजीं भरलेल्या साधारण सभेंत ठराव पास करून ब्रिटिश हिंदुस्थानांतील संस्थेचा संबंध तोडण्यांत आला व संस्थेचें नांव " फलटण संस्थान लोकसभा " असें ठेवण्यांत आलें. या लोकसभेचें ध्येय व उद्देश "संस्थानाधिपतींच्या आधिपत्याखालीं व शांततेच्या व न्याय्य मार्गांनीं संपूर्ण जबाबदार राज्यपद्धति प्राप्त करून घेणें, तसेंच फलटण संस्थानच्या प्रजेच्या आर्थिक, राजकीय, सामाजिक अशा सर्वांगीण उन्नतीसाठीं प्रयत्न करणें " अशीं आहेत.

ता. ३०-७-१९३८ रोजीं लोकसभेनें फलटण येथें सभा भरवून लोकसभेच्या कार्याची माहिती लोकांस सांगितली व सभेच्या शेवटीं ( १ ) सन १९२४-२५ सालच्या रिव्हिजन सेटलमेंटच्या योगानें जमीन बाबींत झालेली वाढ रद्द करणें, ( २ ) साऱ्याबद्दल व पाणीपट्टीबद्दल सरकारनें खालसा केलेल्या व सरकारच्या ताब्यांत असलेल्या जमिनी मालकांस परत करणें, ( ३ ) पाणीपट्टीबद्दल खालसा होऊन ज्या जमिनींची विक्री झाली

असेल त्याच्या विक्रीच्या रकमेंतून पाणीपट्टीची बाकी वजा जाता बाकीची रक्कम मालकास परत देणें, व ( ४ ) शेतीच्या उपयोगी असलेल्या जनावरासाठीं वनचराई-फी माफ करणें याबाबत ठराव करून दरबारकडे मागणी केली व सदर ठरावाबाबत लोकसभेचें म्हणणें श्री. राजेसाहेबापुढें व दरबारपुढें योग्य रीतीनें माडण्यासाठीं शिष्टमडळाची नेमणूक केली शिष्टमडळानें ता ४-१०-१९३८ रोजीं दरबारची मुलाखत घेतली. वरील पहिल्या ठरावासबंधानें माहिती हातीं आल्यानंतर विचार करण्यात येईल असें सांगितलें. श्रीमतानीं ज्या वेळीं १९३६-३७ अखेरच्या जमीनखावीच्या थकबाकीची माफी देण्यात आली, त्याच वेळीं सरकार ताब्यात असलेल्या खालसा जमिनी परत देण्याचें ठरविण्यात आलें होतें व त्याप्रमाणें त्या लौकरच परत देण्यांत येतील असें ठराव नंबर २ बाबत सांगण्यात आलें. आता त्याप्रमाणें बऱ्याचशा जामिनी परतहि देण्यात आल्या आहेत ठराव नबर ३ बाबत या ठरावातील मागणीप्रमाणेंच दरबारचें धोरण असल्याचें दरबार ठराव नंबर ११७ ता. ६।१२।३३ मध्यें नमूद आहे असें सागितलें. व चौथ्या ठरावाबावत पूर्वीं कायदेमडळाच्या बैठकीत आश्वासन दिल्याप्रमाणें जाहीरनामा प्रसिद्ध करून ता १-६-३९ पासून लोकाच्या मागणीप्रमाणें शेतीच्या उपयोगी असणाऱ्या जनावरानाच नव्हे तर सर्वच जनावराना वनचराई-फी माफ करण्यात आली असल्याचे सागितले. अशा रीतीनें "मागितलेलें सर्व दिल्यानतर पुढें बोलण्याचेंच कारण नाहीं, हें उघड आहे" असेंच शिष्टमडळाच्या सर्व सभासदाचें मत पडलें

वरील पहिल्या ठरावातील माहिती हातीं आल्यानतर ता १०-२-३९ रोजीं दरबारनें शिष्टमडळाची पुन्हा मुलाखत घेतली. सदर मुलाखतींत सस्थानच्या हद्दींतील शेतसारा लगतच्या ब्रिटिश हद्दींतील शेतसाऱ्याइतका असावा हें तत्त्व उभयपक्षीं मान्य करण्यात आलें दरबारनें नेमलेल्या तज्ज्ञाच्या मतें सस्थानातील शेतसारा लगतच्या

ब्रिटिश दरांपेक्षां दर रुपयास ८ पै अधिक आहे असें आढळून आलें. तथापि लोकसभेच्या शिष्टमंडळानें शेतसाऱ्यांत पुष्कळच अधिक प्रमाणांत कपात व्हावी असा आग्रह धरला. परंतु शेवटीं हा प्रश्न एकदम अनपेक्षित रीतीनें सुटला. त्याबद्दल श्रीमंत राजेसाहेब ता. ११-९-३९ रोजीं कायदेमंडळापुढें केलेल्या भाषणांत म्हणतात:

" शेजारच्या ब्रिटिश हद्दींशीं तुलना केली असतां येथील साऱ्याच्या दराचें प्रमाण सरासरी दृष्टीनें फारच अल्प प्रमाणांत अधिक होतें अशी दरबारची समजूत होती व आहे. म्हणून ही गोष्ट तज्ज्ञ इसमाकडे सोंपवून ठरवून घ्यावी व मग त्या प्रमाणांत सूट द्यावी असा आमचा विचार होता; परंतु प्रजेचें आमच्यावर इतकें प्रेम व निष्ठा दिसून आली कीं हें प्रमाण तज्ज्ञाकडून ठरवून न घेतां आम्हीं जातीनें ठरवून योग्य वाटेल तेवढी सूट द्यावी व आम्हांस कांहींच सूट देणें इष्ट न वाटल्यास ती न दिली तरी चालेल असेंहि आम्हांस शिष्टमंडळाकडून स्पष्ट सांगण्यांत आलें. प्रजेनें आमच्यावर इतका विश्वास दर्शविल्यावर जितक्या प्रमाणांत सारा जास्त होता असें आम्हांस वाटत होतें तितकीच सूट देणें आम्हांस इष्ट वाटेना. प्रजेच्या विश्वासाचा मोबदला जास्तींत जास्त सवलतीच्या रूपानेंच देणें आम्हांस इष्ट वाटलें. म्हणून साऱ्याचें प्रमाण सरासरी ब्रिटिश हद्दीपेक्षां फक्त रुपयास ८ पै इतकेंच जास्त आहे अशी आमची समजूत असूनहि रुपयास तीन आणे इतकी सूट चालू सेंटलमेंटच्या मुदतीअखेर आम्हीं देण्याचें ठरविलें. "

संस्थानांतील शेतकऱ्यांची परिस्थिति सुधारण्यासाठीं शेतकऱ्यावरील अनेक वर्षांचे मागील बोजे कमी केल्याखेरीज तो वर डोकें काढूं शकणार नाहीं ही गोष्ट जाणून व अलीकडे ३-४ वर्षांत संस्थानच्या सांपत्तिक परिस्थितींत पडलेला फरक लक्षांत घेऊन दरबारनें संस्थानांतील सर्व शेतकऱ्यांकडून ता. ३१ मे १९३७ अखेर जमीनबाबीची राहिलेली सर्व थकबाकी रुपये ५१,२४९ एकदम माफ केली असल्याचें श्रीमंत

राजेसाहेबांनीं ता. ४-७-१९३८ रोजीं कायदेमंडळापुढें केलेल्या भाषणांत जाहीर केलें. या सुटीचा फायदा सर्वांना कसा मिळेल याचा विचार करतां कांहीं अडचणीहि आल्या. त्यांतील पहिली अडचण म्हणजे सदर बाकीपैकीं सुमारें रु. २१,६८८ वसूल आलेला होता. परंतु ज्या कुळांनीं सरळपणानें व बिनतक्रार मागील बाकीचा वसूल दिला होता, त्यांना सुटीचा फायदा न मिळाल्यास त्यांना तें त्यांच्या चांगुलपणाचें एक प्रकारें प्रायश्चित्तच मिळाल्यासारखें होणार होतें. म्हणून श्रीमंतांनीं सदर रक्कम बाकीदारांच्या पुढील येण्यामध्यें जमा धरण्यांत येईल असें ठरविलें.

आपल्या मागण्यांबाबत वरीलप्रमाणें यश संपादन केल्यानंतर लोकसभेनें आपलें लक्ष म्युनिसिपॅलिटीच्या निवडणुकीकडे लाविलें. फलटण म्युनिसिपॅलिटीची त्रैवार्षिक मुदत ता. ३१–५–३९ अखेर संपत असल्यामुळें ता. २०–५–३९ रोजीं म्युनिसिपॅलिटीची निवडणूक झाली. या निवडणुकीपूर्वीच म्युनिसिपॅलिटीच्या १६ सभासदांपैकीं १२ सभासद निवडण्याचा हक्क दरबारनें म्युनिसिपॅलिटीस दिला होता. या निवडणुकींत १२ पैकीं ८ जागांवर लोकसभेचे उमेदवार निवडून आले व स्वतंत्र निवडून आलेला हरिजन उमेदवारहि लोकसभेचा सभासद झाल्यामुळें म्युनिसिपॅलिटींत लोकसभेचें हुकमी बहुमत झालें. म्युनिसिपॅलिटीच्या इतिहासांत संघटित रूपानें व चुरशीनें निवडणुकी लढविल्याचा हा पहिलाच प्रसंग होता असें म्हणण्यास हरकत नाहीं. लोकसभेच्या या विजयानंतर लौकरच दरबारनें म्युनिसिपॅलिटीस आपला अध्यक्ष निवडण्याचा अधिकार दिला व लोकसभेचे चिटणीस श्री. नागेश विश्वनाथ बावडेकर, बी. ए., एलएल. बी., वकील हे नवीन म्युनिसिपॅलिटीचे पहिले लोकनियुक्त अध्यक्ष निवडून आले.

सुधारणावादी स्वतंत्रपक्ष हा फलटण येथील दुसरा महत्त्वाचा राजकीय पक्ष होय. सदर पक्षाचे सभासद फलटण संस्थान कायदेमंडळ, फलटण

म्युनिसिपॅलिटी, फलटण संस्थान लोकलबोर्ड, श्रीलक्ष्मी सेंट्रल को-ऑपरेटि बँक, लि. वगैरे संस्थांमधून लोकोपयोगी कामें करीत आहेत. म्युनिसिप निवडणुकींत या पक्षानें ३ जागा संपादन केल्या.

फलटण संस्थान कायदेमंडळाच्या नवीन निवडणुकी लौकरच होण्या प्रसिद्ध झाल्यापासून " शेतकरी संघ " या नांवाचा तिसरा एक नवी राजकीय पक्ष नुकताच ता. २५ फेब्रुवारी १९४० रोजीं स्थापन झा आहे. शेतकऱ्यांची शैक्षणिक, सामाजिक व आर्थिक सुधारणा घडवू आणून त्यांच्या अडचणी व गाऱ्हाणीं दूर करणें हे या संघाचे प्रमु उद्देश आहेत.

फलटण संस्थानांत किती तरी वर्षेपर्यंत प्रजाजनांची एकही संस् नव्हती आणि आतां तीन संघ निघालेले आहेत, हें साहजिकच आश्च वाटणारें आहे. पण लोकपक्षीय राजकारणाचा प्रभावच असा आहे कीं लोकांना राज्यकारभारांत भाग घेण्याची स्फूर्ति व्हावी. हे तिन्ही प संस्थानची उन्नति करण्याचेंच धोरण केवळ ठेवून वागतील, तर हे भि पक्ष परस्परांस पूरक होतील आणि तसे ते होवोत अशी इच्छा प्रदर्शि करणें इष्ट वाटतें.

---

# रामदुर्गांतील अत्याचारी चळवळ



कर्नाटक प्रांतांत असलेल्या रामदुर्ग संस्थानांत १९३८ च्या मार्च महिन्यांत जी चळवळ सुरू झाली आणि पुढें तिनें जें उग्र स्वरूप धारण केलें, त्यायोगें संस्थानिकांना काय पण संस्थानी प्रजेलाही चांगली अद्दल घडल्याशिवाय राहिली नाहीं. पुढें ही जी चळवळ इतकी वाढली, त्याची पार्श्वभूमिका पाहणें थोडेसें चिंतनीय खास आहे. रामदुर्ग संस्थानांत सन १९३८ च्या मार्च महिन्यापर्यंत कसल्याही तऱ्हेची चळवळ नव्हती. दक्षिण महाराष्ट्रांतील इतर संस्थानी मुलुखांत गेलीं वीस वर्षे चळवळी झाल्या, पण त्यापासून रामदुर्ग अलिप्तच राहिलें होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. सन १९३१ व १९३४ मध्यें दोनदां संस्थानी प्रजासप्ताह साजरे करण्यांत आले, आणि त्यासाठीं श्री. ग. वि. केतकर आणि कै. वामनराव पटवर्धन यांचीं व्याख्यानें झालीं. १९३६ मध्यें डॉ. पट्टाभि सीतारामय्या व श्री. बलवंतराय मेथा हे आपल्या दौऱ्यांत येथें आले होते. हीच काय ती येथली चळवळ. रामदुर्ग हें रेल्वे स्टेशनपासून बरेच आंत एका बाजूला पडलेलें संस्थान आहे. रामदुर्गची बहुसंख्य प्रजा अशिक्षित आणि गरीब आहे. तिनें आजवर दरबारच्या जुलुमाविरुद्ध अगर निरनिराळ्या डोईजड करांबद्दल तक्रारसुद्धां केली नव्हती. पण गेलीं पांचसात वर्षे रामदुर्ग संस्थानांत अवर्षणाचीं गेल्यामुळें शेतकऱ्यांची स्थिति खालावत चालली; शेतकऱ्यांना सारासूट अगर तहकुबी देण्यास श्रीमंत राजेसाहेब तयार नसल्यामुळें आणि जेव्हां शेतकऱ्यांना उपाशीं मरण्याची पाळी आली, तेव्हांच त्यांनीं राज्यकारभाराबद्दल आपली नापसंती दर्शविण्यास सुरवात केली. त्यांचें भांडण हक्कासाठीं नसून पोटासाठीं होतें. रामदुर्ग संस्थानांतील शेतसारा शेजारील खालसा मुलुखापेक्षां फार जास्त होता. सध्यांचे संस्थानाधिपति सन १९१५ मध्यें गादीवर आले, त्यावेळीं संस्थानचें उत्पन्न पाऊण लाखाचें होतें व त्याची वाढ गेल्या

२३ वर्षांच्या अवधींत सव्वा दोन लाखांपर्यंत गेली आहे आणि या वाढीचें कारण म्हणजे शेतसाऱ्यांत वाढ, व निरनिराळे कर बसविणें हें होय. प्राप्तीवरील कराची मर्यादा ५०० रु. होती, आणि परडें, गायरान व धंदे करणारांवर निरनिराळे कर बसविलेले होते. अवर्षणामुळें ओढव-लेल्या कठीण परिस्थितींतून बचाव करण्यासाठीं म्हणून सारातहकुबी देण्याबद्दल विनंति करण्यासाठीं कांहीं लोक रामदुर्गास गेले आणि त्यांनीं सारा तहकूब करण्याबद्दल विनंति केली. श्री. राजेसाहेबांनीं 'दिवाण-राजधानींत नाहींत, ते आल्यावर चौकशी करून हुकूम काढतों' असें उत्तर दिल्यावर ते लोक परतले. पण बरेच दिवस झाले तरी कांहीं कळेना म्हणून निरनिराळ्या खेड्यांचे लोक जमावानें ता. २८-३-१९३८ रोजीं रामदुर्गास गेले आणि सारातहकुबीबद्दल विनंति केली. पण राजेसाहेबांनीं त्यांच्या विनंतीचा अनादर करून तहकुबी मिळणार नाहीं असें निक्षून सांगितलें. तरी ते लोक संध्याकाळपर्यंत तेथेंच बसून राहिले. संध्याकाळीं राजेसाहेब फिरावयास गेल्यावेळीं घोडेस्वारांनीं घोड्याच्या गाडीभोंवतीं कोंडाळें केलें आणि लोकजमावाला गाडीजवळ येऊं दिलें नाहीं. त्या गर्दींत घोड्याची टाप कोणास लागली, आणि त्याचा भरमसाट गवगवा करण्यांत आला. पण राजेसाहेबांनीं रयतेला जें आपल्या अहंकारयुक्त वागणुकीनें झिडकारलें, त्याचा अनिष्ट परिणाम लोकांच्यावर होऊन त्यांनीं साराबंदी करण्याचें ठरविलें. रामदुर्ग संस्थानांतील प्रजा कानडी आणि अधिपति महाराष्ट्रीय याचा संधिसाधूंनीं फायदा घेऊन कर्नाटक–महाराष्ट्र वादाचें बीज रोवलें. श्री. मरुळाराध्य शास्त्री ( विजापूर कॉंग्रेस कमिटीचे त्यावेळचे अध्यक्ष ) यांनीं हा लढा वाढविण्याचे कामांत फार मोठा भाग घेतला. त्यांचीं सतत व्याख्यानें होत असत. त्याचा लोकांचे मनावर अत्यंत अनिष्ट परिणाम झाला असल्यास नवल नाहीं. या लोकांनीं ता. १३–५–१९३८ रोजीं 'रामदुर्ग संस्थान प्रजा संघ' श्री. मनोळी यांच्या अध्यक्षतेखालीं स्थापन केला. रामदुर्ग व इतर खेड्यांतून प्रभातफेऱ्या, मिरवणुकी वगैरे कार्यक्रम सुरू

झाले. रामदुर्गांतील रस्त्यावरील म्युनिसिपॅलिटीचे दिवे ता. २५–४–३८ रोजीं फोडण्याचा अत्याचार करण्यांत आला.

दरबारनें सभाबंदीचा व संस्था नोंदणीचा असे दोन कायदे जारी केले. पण सभाबंदीचा कायदा मोडून सर्रास सभा होऊं लागल्या. पोलिसांना वाटेल तशा धमक्या देण्यांत आल्या. अधिकाऱ्यांच्या विरुद्ध निरर्गल, अश्लील व त्यांच्याबद्दल द्वेष पसरविणारे प्रलाप काढले जाऊं लागले. तेव्हां लोकांच्या मागण्या लक्ष्यांत घेऊन दरबारनें ता. ५–५–१९३८ रोजीं एक जाहीरनामा काढून पुढील सवलती दिल्याः—

( १ ) जे रयत एक महिन्याच्या आंत पहिला हप्ता भरतील, त्यांना दुसऱ्या हप्त्याची निम्मी रक्कम सूट व तहकुबी सारख्या प्रमाणांत दिली जाईल.

( २ ) जुलेअखेर जे पहिला हप्ता भरतील, त्यांना दोन आणे सूट व सहा आणे तहकुबी मिळेल.

( ३ ) मागील बाकी रकमेंत कांहीं सवलत देण्यांत आली, वनचराई फी निम्मी करण्यांत आली, विगर शेतसारा रद्द करण्यांत आला व तगाई कर्जास तहकुबी देण्यांत आली.

पण या सवलतीनें लोकांचें समाधान झालें नाहीं. त्यांनीं चळवळ चालूच ठेवली व सुरेबानचें नाकें ता. २१–५–१९३८ रोजीं जाळण्यांत आलें.

ता. २२-५-१९३८ रोजीं दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेचें १२ वें अधिवेशन सांगलीस सरदार वल्लभभाई पटेल यांच्या अध्यक्षतेखालीं भरल्यावेळीं श्री. मनोळी आणि मरुळाराध्य शास्त्री यांनीं रामदुर्गची सर्व परिस्थिति परिषदेपुढें मांडून करबंदीस परवानगी मागितली. पण ती परिषदेनें न देतां, रामदुर्गची परिस्थिति पहाण्यासाठीं कमिटी नेमली. या कमिटींत श्री. शंकरराव देव, गंगाधरराव देशपांडे, गो. ल. कणबूर, के. एस. पाटील, नेमचंद आरी, दोडमेट्टी हे सभासद होते. रामदुर्ग प्रजासंघानें श्री. देव यांना मुखत्यारपत्र दिल्यावर त्यांनीं दरबारशीं

वाटाघाट केल्यावर ता. २१–६–१९३८ रोजीं दरबारनें प्रजेला दिलेल्या सवलतींचा जाहीरनामा दरबारांत वाचून दाखविण्यांत आला. या जाहिरनाम्यांत राजकीय सुधारणा करण्यासाठीं मिश्र कमिटी नेमण्याचें, व तात्पुरतें सल्लागार मंडळ नेमण्याचें आश्वासन देऊन मागील २९००० रु. ची बाकी सूट सोडण्यांत आली, चालू सालच्या हप्त्यांत ४ आणे सूट व १२ आणे तहकुबी देण्यांत आली, शेतसारा–कपात सुचविण्यासाठीं एक कमिटी नेमण्याचें ठरलें, वनचराई पुढील सालापासून संपूर्ण रद्द करणें, स्थानिक स्वराज्याचे ⅔ सभासद लोकनियुक्त व ⅓ सरकारनियुक्त व अध्यक्ष लोकनियुक्त असावयाचा, प्राप्तीवरील कराची किमान मर्यादा ७०० रु. असावी, संस्थानची सरकारी भाषा मराठी ऐवजीं कानडी राहील, स्थानिक लोकांना नोकऱ्या देणें व जुलमी कायदे रद्द करणें, अशा आशयाचा जाहिरनामा प्रसिद्ध करण्यांत आला. यामुळें रामदुर्गांतील परिस्थिति निवळेल असें वाटलें होतें. श्री. शंकरराव देव हे परमेश्वरी स्वरूपांत भेटले आणि त्यांनीं कृपा केली असें म्हणून त्यांचें अभिनंदन करण्यांत आलें. पण त्यांची पाठ फिरतांच श्री. मनोळी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनीं जाहिरनाम्याविरुद्ध टीका करण्यास सुरवात केली. श्री. मरुळाराध्य शास्त्री यांनीं श्री. देव-देशपांडे हे दोघेहीं ब्राह्मण असल्यानें त्यांनीं ब्राह्मण अधिपतीकडून लांच घेतली असा जहरी प्रचार करण्यास सुरवात केली. आणि त्याचा व्हावयाचा तोच परिणाम झाला. ता. १ सप्टेंबर १९३८ रोजीं सल्लागार मंडळ नेमण्यांत आलें, त्यांत श्री. हणमंतराव कौजलगी, श्री. आप्पासाहेब पटवर्धन, एस. के. जोशी, मनोळी व एस. ए. पाटील यांची नेमणूक करण्यांत आली. पण या सल्लागार मंडळाचें काम फारसें होऊं शकलेंच नाहीं. श्री. शास्त्री आणि मनोळी यांनीं अत्याचारी प्रचार करण्यास सुरवात केली होतीच व संस्थानांत शांततेचें वातावरण नांदत नव्हतें.

ता. २१ जून १९३८ च्या जाहीरनाम्यांत दिलेल्या आश्वासनाप्रमाणें श्री. गंगाधरराव देशपांडे यांच्या अध्यक्षतेखालीं शेतसाऱ्यांत कायम

कपात किती करावी यासाठीं नेमलेल्या कमिटीनें बरीच चर्चा करून ता ३ डिसेंबर १९३८ रोजीं दरबारास आपला रिपोर्ट सादर केला या कमिटींत सांगलीचे दिवाण मि ड, जमखंडीचे दिवाण रावब भागवत, श्री मनोळी, रामदुर्गचे दिवाण रावब कौंडिण्य, श्री रंगराव दिवाकर, अदानेप्पा दोडमेट्टी डॉ हर्डीकर व व्ही व्ही. पाटील हे सभासद होते. शेतसारा सन १८९० च्या मूळ सेटलमेंट इतका करावा व ग्रामोद्धारासाठीं लोकल फंड इतकी रक्कम राखून ठेवावी अशी कमिटीनें शिफारस केली व ती श्री. राजेसाहेबांनीं तावडतोब मान्य केली, व हें ग्रामोद्धाराचें कार्य प्रजासंघाकडे सोंपविण्यास त्यांनीं संमति दिली आणि त्याप्रमाणें ता. २३–१२–१९३८ रोजीं श्री राजेसाहेबांनीं जाहीरनामा काढला प्रजासंघानें वरील देशपांडे कमिटीस उडाविण्याचा घाट घातला व श्री. मनोळी यांनीं श्री देशपांडे यांना कळविलें कीं, त्यांच्या कमिटीऐवजीं दरबारनें प्रजासंघाच्या पांच सभासदांची कमिटी नेमली आहे, पण ही सपशेल खोटी गोष्ट होती व त्याबद्दल दंग्यासंबंधीं रिपोर्ट करण्याकरता नेमलेल्या दावर कमिशननें खरमरीत टीका केली आहे. देशपांडे कमिटीच्या शिफारशीप्रमाणें दरबारनें जाहीरनामा काढला, तरी लोकांचें समाधान होईना शेवटीं प्रजासंघाचे अध्यक्ष श्री मनोळी आणि राजेसाहेब यांच्या सहीनें ता २९–२–१९३९ रोजीं आणखी एक जाहीरनामा काढला जाऊन जास्त सवलती देण्यात आल्या पण वसूल होण्याच्या दृष्टीनें त्याचा कांहींही उपयोग झाला नाहीं प्रभातफेऱ्या, द्वेषमूलक व्याख्यानें यांचा सपाटा चाललाच होता याचवेळीं रामदुर्गास सुप्रजासंघाची स्थापना झाली होती प्रजासंघाची चळवळ अत्याचारी रुळावर गेली होती आणि त्याचा स्फोट होऊन ता ७ एप्रिल १९३९ रोजीं दंगा झाला भर रस्त्यावरील तिरंगी झेंड्याचा झेंड्याविरहित खांब नवीनच आलेले दिवाण रावब. हुल्याळ यांनीं ता ५–४–३९ रोजीं काढला, व लोकांनीं गडबड करण्यास सुरवात केल्यावर लगेच १४४ कलम पुकारण्यात आलें आणि प्रजासंघ बेकायदा संस्था ठरविण्यात आली. दुसरे दिवशीं श्री मनोळी व

देशनूर यांना अटक करण्यांत आली आणि ता. ७ रोजीं २०००।४००
लोक जमा होऊन त्यांनीं आपल्या पुढाऱ्यांना सोडवून नेण्यासाठीं तु
जाळला, ८ पोलिसांना जाळलें आणि गांवांत लुटालूट केली. तुरुंगावरच
पोलिसांनीं प्रथम गोळीबार केला, पण गोळया संपल्यामुळें दंगेखोरांच
भक्ष्यस्थानीं त्यांना बळी पडावें लागले. त्याच दिवशीं संध्याकाळीं कोल्हा
पुराहून मिलिटरी आली आणि शांतता प्रस्थापित झाली.

या दंग्यांतील भाग घेणाऱ्यांवर खटले होऊन या कामासाठीं हायको
जज्ज म्हणून नेमलेलें न्या. पाटकर यांनीं नऊ इसमांना फांशीच्या शिक्ष
दिल्या असून इतर आरोपींना कमी जास्त मुदतीच्या शिक्षा दिल्य
आहेत. या दंग्यामुळें माजी रेसिडेंट ले. क. ओब्रायन यांची श्रीमंतां
प्रथम सल्लागार म्हणून व पुढें सेशन्स जज्ज नेमणूक करण्यांत आली आहे

रामदुर्गच्या या चळवळीमुळें इकडील संस्थानांतून अंतर्गत संरक्षण पुरें
असावें म्हणून समाईक पोलीसदळ ठेवण्याची योजना सरकारनें सर्व संस्थानां
वर आतां लादली आहे. रामदुर्गच्या चळवळीमुळें राजसिंहासनें हादरलं
आणि निरनिराळया संस्थानांतून प्रजेला सवलती देण्याच्या घोषणा झाल्य
हा जरी तादृश फायदा दिसत असला, तरी संस्थानी प्रजापक्षीय चळवळीच्य
दृष्टीनें विचार केल्यास संस्थानी चळवळीचें पाय मागें ओढले गेले अ
म्हणण्यास हरकत नाहीं. अत्याचारी चळवळीमुळें दडपशाही समर्थनीं
ठरते आणि दडपशाहीच्या वडग्यांतून चळवळी शीरसलामत सुटणें फा
कठीण असतें. तीच गोष्ट आज खुद्द रामदुर्ग चळवळीची झाली आहे. चळ
वळ संपली कीं, एकतंत्री राज्यकारभारास ऊत येतो. तेव्हां चळवळी
सातत्य सनदशीरपणें राखणें हाच चळवळीच्या यशाचा मार्ग आहे
रामदुर्गनें संस्थानी प्रजा व संस्थानिक यांना दिलेला धडा अभ्यासनीं
नाहीं असें कोण म्हणेल?

---

# कुरुंदवाड ( थोरली पाती ) संस्थानांतील चळवळ



कुरुंदवाड ( थोरली पाती ) संस्थानांतील प्रजापक्षीय चळवळीचें फळ थोड्या निराळ्या स्वरूपांत जनतेच्या पदरांत पडलें आहे आणि तें संस्थानांतील लांचलुचपतीमुळें अधिकाऱ्यांची झालेली उचलबांगडी यामुळें होय. कुरुंदवाड संस्थानच्या पूर्वेतिहासाची माहिती कुरुंदवाड ( धाकटी पाती ) च्या प्रकरणांत आली आहे. कुरुंदवाडचें क्षेत्रफळ १८२३/४ चौ. मैल असून लोकसंख्या ४४२०४ आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें सव्वादोन लाख आहे. कुरुंदवाडचे माजी अधिपति श्री. आण्णा-साहेब पटवर्धन हे सन १९२७ मध्यें देवाधीन झाल्यावर संस्थानचे अधिपति श्री. बाळासाहेब हे अल्पवयी असल्यानें संस्थानची राज्यव्य-वस्था कुरुंदवाडचे पोलिटिकल एजंट मे. लँग यांचेकडे होती; आणि त्यांनीं संस्थानांत सभाबंदीचा कायदा जारी केला. कै. आण्णासाहेब आणि त्यांचे वडील कै. श्री. बाळासाहेब यांच्या कारकीर्दींत सभाबं-दीचा कायदा नव्हता, इतकेंच काय, पण ते सभांससुद्धां हजर रहात. देशांत होत असलेल्या एकंदर चळवळीचा परिणाम येथील नागरिकांवर होऊन त्यांनीं कांहीं अटी स्वीकारून कुरुंदवाडची पहिली परिषद ता. २–६–१९३१ रोजीं कुरुंदवाड येथें भरली होती. परिषदेचा अध्यक्ष स्थानिक असावा अशी अट दरबारनें घातली होती. संस्थानचे प्रजाजन श्री. अण्णासाहेब लठ्ठे यांनीं परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें कबूल केल्यानें वरील अटींची मातब्बरी कोणास वाटली नाहीं; या परि-षदेस श्री. राणीसाहेब रीजंट व श्री. बालराजे उपस्थित होते ही विशेष उल्लेखनीय गोष्ट होय. या परिषदेच्या अगोदर कांहीं दिवस रेसिडेंट यांनीं संस्थानांत लोकल बोर्ड अॅक्ट लागू केल्यामुळें त्यांची संस्थानांबद्दलची

सहानुभूति व्यक्त झाली होती. या परिषदेंत संस्थानांत जबाबदार राज्य-पद्धति स्थापन करणें, सभाबंदीचा जाहीरनामा रद्द करणें, संस्थानांतील न्यायदान लांचलुचपतीनें कलंकित झालेलें असल्यामुळें याबद्दलची सरकारनें चौकशी करावी, वगैरे ठराव पास झाले. परिषदेचें दुसरें अधिवेशन ता. ३१-५-१९३२ रोजीं तिकोटें येथें मुंबईच्या प्राविण्य मासिकाचे संपादक व संस्थानचे एक नागरिक श्री. का. म. ताम्हनकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें होतें व त्यांत मागील वर्षाप्रमाणें ठराव पास झाले. गेल्या वर्षाच्या एका ठरावांत 'दरबार' ची सुधारणा करून त्यास प्रातिनिधिक स्वरूप देण्यांत यावें हा ठराव तत्त्वतः रेसिडेंट यांनीं मान्य केला पण तो आजवर अमलांत आला नाहीं. या दोन अधिवेशनांनंतर परिषद् जी लुप्तप्राय झाली, ती परत गेल्या वर्षी पुनरुज्जीवित होऊन तिचें तिसरें जादा अधिवेशन, अध्यक्ष स्थानिक असावा ही अट काढून टाकल्यामुळें; श्री. शंकरराव देव यांच्या अध्यक्षतेखालीं ता. २६-२-१९३९ रोजीं कुरुंदवाड येथें भरलें होतें. तिकोटें तालुक्यांतील रयतांनीं श्री. गोविंदराव कणबूर यांच्या प्रमुखत्वाखालीं चळवळ केली होती. सन १९३८ च्या सार्वत्रिक चळवळीचा परिणाम येथील परिस्थितीवर होऊन कुरुंदवाडवासीयांच्या पदरांत कांहीं सवलती पडल्या. तत्पूर्वी ता. ११-२-३९ रोजीं वाटेगांवच्या रयतांचा मोर्चा गाऱ्हाणीं मांडण्यासाठीं श्री. रीजंट राणीसाहेब यांचेकडे गेला आणि त्यावेळीं भुईभाडें माफ केल्याचें त्यांनीं सांगितलें. त्यांच्या इच्छेवरून रयतांचें शिष्टमंडळ श्री. ल. अ. फलटणे यांच्या प्रमुखत्वाखालीं ता. १८-२-३९ रोजीं रेसिडेंट यांना कुरुंदवाडास भेटलें. शिवाय आलास, बुचनाळ, लोकूर, कुरुंदवाड येथील शेतकऱ्यांचे मोर्चेही रेसिडेंट यांना भेटण्यास गेले होते. यानंतर ता. २६-२-३९ रोजीं श्री. शंकरराव देव यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या प्रजापरिषदेच्या शिष्टमंडळास सरकारी मान्यता मिळाली व त्याकरितां आठ इसमांचे सल्लागार मंडळ नेमण्याचें, सन १९१६ प्रमाणें शेतसारा घेण्याचें आणि त्यावरील सारा सूट सोडण्याचें;

पिकांची आणेवारी करण्याचें आणि स्थानिक लोकांस नोकरींत अग्रस्थान देण्याचें आश्वासन देण्यांत आलें.

या परिषदेनें बजावलेली महत्त्वाची कामगिरी म्हणजे संस्थानांतील लांचलुचपतीबद्दल चौकशी करण्याची मागणी ही होय. रेसिडेंट यांस ही मागणी न्याय्य वाटून त्यांनीं एका सी. आय. डी. अधिकाऱ्यामार्फत चौकशी करविली आणि त्यांत त्यांना लोकांची तक्रार खरी असल्याचें दिसून आलें. १००० नागरिकांनीं वरिष्ठ अधिकाऱ्याविरुद्ध लांचलुचपतीबाबत पुरावा सादर केला. रेसिडेंट मि. गॉर्डन यांनीं डिस्ट्रिक्ट जज्ज राव. वाकनीस, मामलेदार अष्टेकर, मामलेदार कुलकर्णी व चीफ पोलीस ऑफिसर महादेवकर यांना बडतर्फ करून इतर १०–१५ नोकरांस सेवानिवृत्त केलें. आणि डिस्ट्रिक्ट जज्जाच्या पदावर संस्थानी प्रजापरिषदेचे एक प्रमुख कार्यकर्ते श्री. अनंतराव गानू वकील यांना नेमलें असून त्यांचेकडे शिक्षण, लोकलबोर्ड व म्युनिसिपालिटी हीं खातीं सोंपविलीं आहेत. संस्थानांत सल्लागार मंडळ स्थापन झालें असून त्यांचेपुढें संस्थानचें बजेट चर्चेकरतां ठेवण्यांत आलेलें आहे. बालराजांना अधिकार मिळण्यापूर्वी विधिमंडळाची योजना अस्तित्वांत येते का पहावें. कै. आण्णासाहेबांनीं विधिमंडळाची पहिली पायरी म्हणून गणपति-उत्सवाच्या वेळीं 'दरबार' भरविण्याचा उपक्रम सुरू केला होता, आणि दरबाऱ्यांना राज्यकारभाराबद्दलचे प्रश्न विचारण्याचा अधिकार असे, या एका गोष्टीवरून त्यांची वृत्ति किती प्रगमनशील होती तें दिसणार आहे. अज्ञान कारकिर्दीत या 'दरबार'ची फार हेळसांड केली जात आहे. या 'दरबार'ला जर जरा व्यवस्थेशीर स्वरूप दिलें गेलें तर, त्यास विधिमंडळाचा दर्जा मिळणेस हरकत नाहीं.

लांचलुचपतीचे बाबतींत पुरावा सादर करण्याचें कार्मी शहापूरचे श्री. हरिभाऊ सराफ यांचे नेतृत्वाखालीं अनगोळ तालुक्यांत फार मोठा प्रचार करण्यांत आला.

सध्यां सभाबंदीचे सर्व कायदे रद्द करण्यांत आले असून नागरिक-स्वातंत्र्य देण्यांत आलें आहे. वकिलांना दरसाल सनदा रिन्यु करून घ्याव्या लागत, तो कायदा रद्द केला गेला आहे व शेतकऱ्यास सुमारें २३००० रु. शेतसारा दरसाल कमी करण्यांत आला आहे. कुरुंदवाडची सर्व चळवळ सनदशीर मार्गानें यशस्वी झाली हें एक वैशिष्ट्य आहे.

---

# मिरजमळा संस्थानांतील प्रगति



मिरज संस्थानची थोरली पाती आणि धाकटी पाती अशी वांटणी सन ८२२ मध्यें होऊन त्यावेळेपासून हीं भिन्न संस्थानें म्हणून अस्तित्वांत ाली आहेत. मिरजमळा म्हणजे मिरज धाकटी पाती संस्थानचें वह्र उत्पन्न वणेचार लाख असून क्षेत्रफळ १९६ चौ. मैल आहे. संस्थानचे तीन लुके बुधगांव, गुडगेरी व खंडाळी हे सातारा, धारवाड आणि सोलापूर जि- ांत आहेत. संस्थानचा मुलूख असा विस्कळित असल्यानें संस्थानच्या ज्यकारभाराचा खर्च प्रमाणावाहेर वाढत असल्यास नवल नाहीं. संस्थानचें जधानीचें गांव बुधगांव हें सांगली-मिरजेसारख्या महत्त्वाच्या गांवापासून ३ा मैलांच्या अंतरावर असून अगर संस्थानांतील दुसरें मोठें गांव गुडगेरी लक्ष्मेश्वर अगर शिरहट्टीपासून जवळ असूनही तेथील चळवळींचा परिणाम संस्थानावर विशेप झाला नाहीं हें विशेष होय. याला कारण संस्थानचा रभार प्रजेच्या हिताविरुद्ध विशेप नाहीं असेंच म्हणावें लागेल. संस्थानचे धिपति श्री. सर बाबासाहेब पटवर्धन हे कुस्तीगीर, घोड्यांचे उत्तम परीक्षक ाणि शर्यतीचे शोकी असल्याचें प्रसिद्ध आहे. श्री. मळेकरांच्या ज्यकारभारास २५ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल त्यांच्या प्रजाजनांनीं त्यांचा ्यमहोत्सव ता. १७-३-१९३४ रोजीं जो साजरा केला, त्यावेळीं ांनीं शेतसाऱ्यांत सूट देऊन रयतसभा अस्तित्वांत आणण्याचा आपला नस व्यक्त केला. मिरजमळ्याच्या आसपासच्या संस्थानांतून प्रजा- रेषदा झाल्या, पण येथें अजून एकही परिषद भरली नाहीं, हें विशेष य. अशी लोकपक्षीय चळवळीची निराशाजनक परिस्थिति असूनही स्थानच्या अधिपतींनीं संस्थानांत रयतसभेची स्थापना ता. १७-३-१९ र्जी करून पहिलें अधिवेशन ता. १ व २ नोव्हेंबर १९३६ रोजीं भर तें. या विधिमंडळांत सहा सरकारी अधिकारी व २ बिनसरकारी व ८ लोकनियुक्त सभासद होते व शिवाय सांगलीचे माजी फडणीस श्री.

चिंतामणराव वापट व श्री. वामनराव पटवर्धन यांना या विधिमंडळाचे तज्ज्ञ सभासद म्हणून नेमलें होतें. पुढील वर्षी श्री. वापटांच्या ऐवजीं रावब. जी. व्ही. पटवर्धन यांची नेमणूक करण्यांत आली. दरसाल विधि-मंडळाचें एक अधिवेशन होत असतें आणि स्थानिक प्रश्नांची योग्य तऱ्हेनें चर्चा झाल्याचें दिसून येतें.

या संस्थानांत जरी कधीं चळवळ झाली नाहीं, तरी सन १९३८ च्या चळवळीची झळ येथेंही लागून गुडगेरी तालुक्यांत जी विकट परिस्थिति निर्माण झाली होती, त्यावेळीं कर्नाटकांतील पुढारी श्री. रंगराव दिवाकर आणि वीरनगौडा पाटील यांच्याशीं वाटाघाट करून मिरजमळा दरवारनें ता. १-८-१९३८ रोजीं पुढील जाहीरनामा काढला:—

(१) मिरजमळा संस्थानांत संस्थानाधिपतींच्या आधिपत्याखालीं जबाबदार राज्यपद्धति अंमलांत आणणें.

(२) रयतसभेंत १६ सभासदांपैकीं १० सभासद लोकनियुक्त घेतले जातील.

(३) स्थानिक स्वराज्यांत ३/४ लोकनियुक्त सभासद घेणें.

(४) ग्रामपंचायतीचा कायदा जारी करणें.

(५) गुडगेरी तालुक्यांत २५ टक्के सारासूट देणें. खंडाळी तालु-क्यांत १७½ टक्के आणि बुधगांव तालुक्यांत रिव्हिजन सर्व्हे आणि ओरिजनल सर्व्हे यांच्या तफावतींतील सूट देणें.

(६) कांहीं साराबाकीची सूट.

(७) गुडगेरी तालुक्यांत कोर्ट कचेऱ्यांचीं कामें कानडी भाषेंत चालविणें.

(८) आणेवारी पद्धत चालू करणें.

वरीलप्रमाणें घोषणा झाल्यावर रयतांचें समाधान होऊन संस्थानांत उठलेली वावटळही शांत झाली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

---

# जत संस्थानांतील चळवळ

जत हें संस्थान मिरजेपासून सुमारें ६० मैलांवर आणि विजापुरापासून ४० मैलांवर वसलेलें असून इतर संस्थानांतील चळवळीचा फारसा परिणाम येथील प्रजेवर झालेला नाहीं व त्यामुळें येथील रयतांनीं दोन वर्षांपूर्वीं पावेतों विशेष चळवळच मुळीं केली नव्हती. सुशिक्षितांची नेतांची संख्या, आणि जे आहेत ते संस्थानच्या नोकरींत असल्यामुळें त्यांना कोणत्याही चळवळींत भाग घेणें शक्य नव्हतें. वरिष्ठ वर्गाची अशी स्थिति असल्यामुळें खालच्या तळापर्यंत चळवळ जाणें शक्य नव्हतें. शिवाय, चळवळी होण्यास जुलुमाची जी पार्श्वभूमिका असावी लागते, तिचाही अनुभव येथील लोकांना आलेला नसल्यामुळें, येथें विशेष चळवळ झाली नाहीं.

जत संस्थानचें क्षेत्रफळ ९८१ चौ. मैल असून संस्थानचें उत्पन्न तीन लाख रुपये आहे. संस्थानांत ११९ खेडीं असून सर्व प्रदेश सलग आहे. जत संस्थानचा ¾ भाग डोंगराळ असल्यानें वाहतुकीच्या रस्त्यांची गैरसोय फार मोठी आहे. पावसाची जत संस्थानवर अवकृपा असल्यामुळें आणि जमिनीचा कसही कमी प्रतीचा असल्यामुळें शेतकऱ्यांचे सालोसाल फार हाल होतात. संस्थानच्या माजी अधिपतींनीं जतची म्युनिसिपॅलिटी सन १९२२ मध्येंच पूर्णपणें लोकनियुक्त केली होती, यावरून त्यांची प्रागतिक मनोवृत्ति दिसून येणार आहे.

जत संस्थानचे माजी सुविद्य अधिपति कै. श्री. आबासाहेब हे देवाधीन झाल्यावर सध्यांचे अधिपति श्री. बाबासाहेब यांना ता. १८-१-१९२९ रोजीं राज्याधिकारसूत्रें देण्यांत आलीं. त्यांनीं आपल्या वडिलांच्या पावलावर पाऊल टाकून राज्यकारभाराचें धोरण स्वीकारल्यामुळें संस्थानांत समाधानता होती आणि लोकपक्षीय चळवळीस आरंभ झाला नाहीं. क्रिकेटपटु म्हणून त्यांचा लौकिक असल्यानें क्रिकेटक्षेत्रांत जतचें नांव नेहमीं झळ-

करीत. संस्थानांत जरी कसलीही चळवळ नव्हती, तरी सन १९३८ च्या इतरत्र चळवळींतील प्रत्याघात थोड्याबहुत प्रमाणांत येथें उमटल्याशिवाय राहिले नाहींत. या बदलत्या काळाचा ओघ लक्ष्यांत घेऊन ता. ३०-७-१९३८ रोजीं श्री. राजेसाहेबांनीं शेतसाऱ्यांत सूट दिल्याचें जाहीर केलें, लोकलबोर्डाची मतदारसंख्या वाढावी म्हणून मतदानाचा हक्क विस्तृत केला, ग्रामपंचायतीचा कायदा लागू करून उमदी व बिळूर या दोन ठिकाणीं ग्रामपंचायती अस्तित्वांत आणण्यांत आल्या आणि बालविवाह-प्रतिबंधक कायदा जारी करण्यांत आला. नंतर ता. १२–१०–१९३८ रोजीं जत संस्थानच्या अधिपतींनीं खेड्यांतील प्रमुखांस बोलावून त्यांच्या-समोर संस्थानांत कायदेमंडळ–स्थापनेची घोषणा केली, वनचराई रद्द केली. सन १९३४–३५ अखेरची साराबाकी सूट म्हणून सोडली व आणखीही किरकोळ सवलती दिल्या.

१९३८ च्या सार्वत्रिक चळवळीनें येथील जनतेच्या मनांत परिषद भरविण्याची इच्छा उत्पन्न झाली आणि जत संस्थान प्रजापरिषदेचें पहिलें अधिवेशन बिळूर येथें श्री. गंगाधरराव देशपांडे यांच्या अध्यक्षतेखालीं ता. १०–११ डिसेंबर १९३८ रोजीं भरून मोठ्या यशस्वी रीतीनें पार पडलें. परिषदेस १०००० शेतकऱ्यांचा जमाव उपस्थित होता. पण दुसरी परिषद मात्र अजून भरविण्यांत आलेली नाहीं. सदर परिषदेमध्यें जबाब-दार राज्यपद्धति देणें, वेठबिगारी बंद करणें, सारासूट देणें, आणेवारी करणें असे महत्वाचे ठराव पास करण्यांत आले. श्री. राजेसाहेबांनीं ता. १२-१-१९३९ रोजीं राज्यारोहणदिन दरबार भरल्यावेळीं संस्थानां-तील शेतसारा खालसापेक्षां कमी असतांहि रुपयास अडीच आण्यांप्रमाणें सारासूट जिराईत जमिनीवर दिली आणि बागाईत जमिनीवर एकरीं एक रुपया सूट दिली. वेठबिगार बंद केल्याचें, आणेवारी पद्धत चालू केल्याचें, साराबाकीकरतां जप्त केलेल्या जमिनी बाकी रकमेपैकीं निम्मी रक्कम जे भरतील त्यांना परत करण्याचें आणि थकबाकींत सूट देण्याचें जाहीर

करण्यांत आलें. भावी विधिमंडळांत निम्मे सरकारी आणि निम्मे लोक-नियुक्त सभासद घेण्याची मनीषा याच भाषणांत त्यांनीं व्यक्त करून याबाबतचें काम श्री. वामनराव पटवर्धन आणि श्री. कुलकर्णी वकील यांचेकडे सोंपविलें होतें; पण श्री. पटवर्धनांच्या आजारपणामुळें आणि श्री. कुलकर्णी यांचे निधनामुळें या बाबतींत प्रगति झाली नाहीं, असा खुलासा श्री. राजेसाहेबांनीं आपल्या या दरबारच्या भाषणांत केला. दरबारच्या अशा प्रजाहितपर धोरणामुळें संस्थानी प्रजा समाधान पावून तिनें पुढें कांहींच चळवळ केली नाहीं. गेल्या वर्षप्रतिपदेच्या दिवशीं म्हणजे ता. ८-४-१९४० रोजीं या विधिमंडळाची घटना जाहीर करून संस्थानचा राज्य-कारभार एका कार्यकारी कौन्सिलकडे सोंपवून श्री. राजेसाहेब युद्धांतील आरमारांत नुकतेच सामील झाले आहेत. या विधिमंडळाच्या घटनेंत मूळ कल्पनेपेक्षां बराच फरक करण्यांत आलेला असून विधिमंडळाचे १५ लोकपक्षीय, ५ सरकारनियुक्त व ७ सरकारीनियुक्त बिनसरकारी सभा-सद मिळून २७ सभासद असणार आहेत. संस्थानांत दोन वर्षांपूर्वीं स्थापन झालेली प्रजापरिषद आणि हें विधिमंडळ यांच्या सहकार्यानें जत संस्थानांत सुराज्याबरोबर स्व–राज्य स्थापन होवो !

# अक्कलकोटांतील चळवळीची माहिती

गेल्या वीस वर्षांतील अक्कलकोट संस्थानच्या राज्यकारभाराचा बराचसा काळ अज्ञान कारकीर्दींत गेला आहे. माजी अधिपति श्री. फत्तेसिंह महाराज हे सन १९२३ मध्यें देवाधीन झाल्यावर तेथें ॲडमिनिस्ट्रेटर नेमून सरकारनें कारभार चालविला. अज्ञान कारकीर्दींत संस्थानी प्रजेच्या दृष्टीनें कांहीं सुधारणा झाल्या असल्या, तरी प्रजापरिषदेच्या बाबतींत दरबारनें स्वीकारलेलें धोरण गैर होतें आणि पुढें संस्थानी कार्यकर्त्यांना तुरुंगवास भोगावयास लागून संस्थानांतील चळवळ नेस्तनाबूद करण्याचें धोरण दरबारनें स्वीकारलें ही अत्यंत अनुचित गोष्ट झाली आहे यांत शंका नाहीं.

अक्कलकोट संस्थान सोलापूर जिल्ह्यास लागून असून संस्थानचें क्षेत्रफळ ४९८ चौ. मैल, लोकसंख्या ९६००० व उत्पन्न सुमारें ७ लाख रुपये आहे. संस्थानचे आधिपति श्री. विजयसिंहराव भोसले यांना २७-२-१९३६ रोजीं राज्याधिकारसूत्रें देण्यांत आलीं. सन १९२३ ते १९३६ पर्यंत संस्थानचा कारभार ॲडमिनिस्ट्रेटर अगर श्री. राणीसाहेब यांना रीजंट नेमून चालविला गेला होता. अक्कलकोट संस्थानच्या प्रजापक्षीय चळवळीकडे दृष्टि फेकल्यास सन १९२३ सालाकडे नजर जाते. या वर्षी ता. १६-८-१९२३ रोजीं अक्कलकोटपासून २४ मैलांवर असलेल्या सोलापूर शहरीं अक्कलकोट संस्थान हितेच्छू मंडळामार्फत अक्कलकोट संस्थान प्रजापरिषदेचें पहिलें अधिवेशन प्रो. ल. ब. भोपटकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आलें. या बाबतींत अक्कलकोट संस्थानचे पोलिटिकल एजंट व सोलापूर जिल्ह्याचे कलेक्टर या एकाच व्यक्तीच्या दोन भूमिका लक्ष्यांत घेण्यासारख्या आहेत. त्यांना सोलापुरास प्रजापरिषद भरवूं देण्यास प्रत्यवाय वाटला नाहीं, तर संस्थान हद्दींत भरविण्यास अडचण वाटली हें विशेष होय. प्रो. भोपटकर यांचें अध्यक्षीय भाषण सडेतोड झालें. संस्थानाधिपतींच्या अध्यक्षतेखालीं जबाबदार राज्यपद्धति स्थापन करणें, श्री. राणीसाहेबांना रीजंट नेमणें, परिषद भरविण्यास

वानगी न दिल्याबद्दल दरबारचा निषेध, शेतसारा कपात करणें हे
हत्त्वाचे ठराव पास झाले.

दुसरी प्रजापरिषद ता. १६ व १७ ऑगस्ट १९२४ रोजीं सोला-
ास कै. दादासाहेब करंदीकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरली होती.
ांत वरील प्रकारचे ठराव पास करण्यांत आले. परिषदेचें तिसरें अधि-
शन पुढें पांच वर्षांनीं ता. १ व २ डिसेंबर १९२९ रोजीं श्री. न. चिं.
ळकर यांच्या अध्यक्षतेखालीं खुद्द अक्कलकोटास भरविण्यांत आलें.
धल्या काळांत लोकमताला मान देऊन सरकारनें श्री. राणीसाहेब यांना
जंट नेमलें आणि त्यांच्या मदतीसाठीं रावब. प्रधान हे अधिकारी दिले.
दर परिषद अपूर्व झाली. गोलमेज परिषदेंत संस्थानी प्रजेचे प्रतिनिधि
णें, वकिलांच्या सनदा कायमच्या देणें, वगैरे ठराव पास झाले. ही
ापूर्व परिषद मात्र शेवटचीच ठरली ही दुःखाची गोष्ट आहे.

या परिषदेबद्दल कोणा कर्णपिशाच्चानें श्री. रीजंट राणीसाहेबांचा
रसमज करून दिला आणि या तिसऱ्या अधिवेशनास उपस्थित होऊन
रिषदेबद्दल सहानुभूति दर्शविणाऱ्या श्री. रीजंट राणीसाहेबांनीं परिषदे-
डे पाठ फिरविली आणि परिषदेस पुढें परवानगी दिली गेली नाहीं. उलट
स्थानांत दडपशाही करण्यास सुरवात करून सन १९३५ सालीं मंगरूळचे
ढारी श्री. रंगनाथ गोविंद पुजारी यांना राजद्रोहाच्या आरोपावरून एक
र्षाची शिक्षा दिली गेली. तत्पूर्वीं सन १९३३ मध्यें श्री. पुजारी बंधूंनीं,
ेतकऱ्यांनीं आपला सारा पूर्ण देऊं नये, असें सांगितलें असतांना,
यांच्यावर चोरीचा आरोप ठेवून त्यांना कडक शिक्षा दिली. संस्थानांत
ा दडपशाहीच्या धोरणामुळें जी दहशत बसली, तींतून अजूनही तेथील
जा बाहेर पडली आहे असें दिसत नाहीं.

श्री. राजेसाहेब विजयसिंहराव यांनीं राज्याधिकारसूत्रें हातीं घतल्या-
र कांहीं सुधारणा होईल अशी आशा प्रजेला वाटत होती, पण
्या बाबतींत निराशाच पदरीं पडलीं आहे. सन १९३८ सालीं विजया-

दशमीच्या दरबारांत कांहीं राजकीय सुधारणा देण्याचें त्यांनीं जाहीर केलें, तर लगेच पुढील आठवड्यांत आक्टोबर १९३८ मध्यें दाक्षिणी संस्थान लोकसभेचे सरचिटणीस श्री. वा. वि. शिखरे हे संस्थानी चळवळीच्या प्रसारार्थ अक्कलकोटांत जाणार होते, त्यांना संस्थानहद्दींत प्रवेश करण्यास बंदी करून आपलें प्रतिगामी धोरण जनतेस दाखविलें. वरील विजयादशमीच्या दरबारांत त्यांनीं साराबाकींत सूट दिली. चौथाई दंड माफ केला, व इतर कांहीं सवलती जाहीर केल्या. राजकीय सुधारणांचें फक्त आश्वासन दिलें गेलें. त्याची पाळवणूक केव्हां होणार हें मात्र समजत नाहीं. अक्कलकोटांतील कुजलेल्या राजकीय जीवनाची कोंडी कोणी तरी फोडल्याशिवाय तेथील प्रजेस स्वराज्यांचा लाभ होण्याची आशा दिसत नाहीं.

---

# करवीर राज्य व मांडलिक संस्थानें

लेखक : जहागिरीचा प्रजानन

इतिहासप्रसिद्ध ताराबाई महाराणीसाहेबांनीं करवीर राज्याची मुहूर्तमेढ जरी इ. स. १७०८ मध्यें रोवली, तथापि सातारा व करवीर येथील छत्रपतीं-मध्यें मराठी राज्याच्या मालकीबद्दल जो तंटा त्याच सुमारास सुरूं झाला, त्यामुळें करवीर राज्याचें रोपटें भाऊबंदी रणसंग्रामांत सुकून जातें कीं काय अशी भीति वाटूं लागली होती. परंतु या लढ्याचा शेवट कृष्णा-वारणेच्या तहानें सन १७३० मध्यें लागला. या तहान्वयें साताराच्या शाहू महाराजांनीं कृष्णा-वारणेपासून तुंगभद्रेपर्यंतचा मुलूख करवीरच्या संभाजी महाराजांना दिला. या तहानें सातारा व करवीर हीं दोन एकमेकांपासून अलग व स्वतंत्र राज्यें झालीं, अगर दोन्ही राज्यां-वरची सार्वभौम सत्ता शाहू महाराजांकडेच राहिली व युवराजास राज्य करण्यासाठीं जसा कांहीं प्रदेश द्यावा, त्याप्रमाणें करवीर राज्याची स्थिति झाली. हा ऐतिहासिक दृष्ट्या वादाचा प्रश्न आहे. करवीर दरबारचें म्हणणें कृष्णा-वारणेच्या तहापासून करवीरचें राज्य मराठी साम्राज्या-पासून अलग व स्वतंत्र झालें आहे. उलट पक्षीं मराठे लोकांचा इतिहास लिहिणारे व ज्यांना सरकारी दप्तरच्या जुन्या कागदपत्रांची माहिती आहे असे प्रसिद्ध इतिहासकार किंकेड हे सन १९२२ सालीं प्रसिद्ध केलेल्या आपल्या इतिहासांत पुढीलप्रमाणें म्हणतात :—

" Its wording shewed that it was dictated by a superior to an inferior and converted Sambhaji from an independent sovereign to a Prince in subordinate alliance to Shahu and cut off Sambhaji from the North. He could only extend his dominions southward and even there he bound himself to hand over half his conquest to Shahu."[1]

---

[1] Kincaid's History of the Maratha people Vol. II, P. 119.

या तहनाम्याच्या भाषेवरून पाहतां तो तहनामा म्हणजे एका वरिष्ठानें आपल्या कनिष्ठास दिलेल्या आज्ञापत्राप्रमाणें दिसतो आणि त्यामुळें संभाजी राजाचें स्वतंत्र राज्यपद जाऊन तो शाहूचा अंकित झाला. तसेंच या तहानें मराठी साम्राज्याच्या उत्तरेकडील मुलुखाचा संभाजीचा संबंध पूर्णपणें तोडून त्यास फक्त दक्षिणेंत स्वाऱ्या–शिकाऱ्या करण्याची मुभा ठेवण्यांत आली व दक्षिणेंत देखील जो मुलूख संभाजी काबीज करील, त्यापैकीं अर्धा हिस्सा त्यानें शाहूला दिला पाहिजे असें ठरलें.

कृष्णा-वारणेच्या तहानें करवीर राज्य पूर्ण अगर निमस्वतंत्र झालें हा जरी वादाचा प्रश्न असला, तरी सन १७३० सालानंतर करवीरचे छत्रपति आपले राज्याचा कारभार आपण पाहूं लागले या गोष्टीबद्दल वाद नाहीं. आणि मराठी राज्याच्या अभिवृद्धीकरितां व तें चिरकाल टिकावें म्हणून शाहू महाराजांनीं साताऱ्यास जशी अष्टप्रधान संस्था निर्माण केली, त्याच धर्तीवर ताराबाई व संभाजी महाराज यांनींही करवीर राजमंडळांत अष्टप्रधानांची स्थापना केली. परंतु शाहू महाराज हे उदार व शांत स्वभावाचे असल्यानें त्यांनीं आपल्या सरदारांनीं स्वाऱ्याशिकाऱ्या करून जो मुलूख काबीज केला त्याचा यत्किंचितही अभिलाष धरला नाहीं. कोणी सरदारानें एखादा प्रांत जिंकला म्हणजे तोच त्याच्या फौजेच्या खर्चास सरंजाम म्हणून नेमून द्यावा आणि हुजूर खर्चाकरितां म्हणून कांहीं नियमित रकम त्याजपासून घ्यावी, असा शाहूमहाराजांनीं प्रथमपासून प्रघात ठेविला होता. या योगानें सरदार लोकांस व कार्यकर्त्या पुरुषांस अधिकाधिक उत्तेजन मिळून ते राज्याचा पसारा वाढवीत गेले. उलटपक्षीं करवीर राज्यांत छत्रपतींचें धोरण आपल्या सरदारांच्या बाबतींत अगदींच अनुदारपणाचें व आकुंचित दृष्टीचें होतें. उदाहरणार्थ, सन १७३० च्या लढाईंत ज्यावेळीं करवीर छत्रपतींचा साताऱ्याच्या सैन्यानें पराभव केला, त्यावेळीं करवीर छत्रपतींच्या बाजूनें लढणाऱ्यांपैकीं बावड्याचे भगवंतराव पंत अमात्य व

इचलकरंजीचे वेंकटराव घोरपडे पंतसचीव हे दोन प्रमुख सरदार सातारच्या प्रतिनिधींनीं पाडाव केले. तेव्हां या दोघांपैकीं फक्त पंत अमात्यांस करवीरकरांनीं खंडणी भरून सोडवून घेतलें आणि इचलकरंजीच्या सरदाराची संभाजी महाराजांनीं कांहींच वास्तपुस्त केली नाहीं. शेवटीं वेंकटराव घोरपड्यांचे मेहुणे बाजीराव पेशवे यांनीं दहा हजार रुपये खंडणी भरून वेंकटरावांची सुटका करून घेतली व तेव्हांपासून इचलकरंजीकरांनीं करवीर छत्रपतींचा पक्ष सोडून ते सातारच्या शाहू महाराजांचे सरदार बनले. तसेंच कृष्णा-वारणेच्या तहानंतर करवीरचे छत्रपति व त्यांचे अष्टप्रधान यांच्या आकांक्षा व कार्याचें क्षेत्र अर्थातच मर्यादित झालें. आणि संभाजी महाराजांच्या निधनानंतर जेव्हां त्यांची वडील राणी जिजाबाईसाहेब यांच्या हातीं राज्यसूत्रें आलीं, तेव्हां त्यांना असें वाटूं लागलें कीं, आपलें हें एवढेसें राज्य, त्याला हे लाखों रुपयांचे सरंजाम खाणारे प्रधान कशाला पाहिजेत ? करवीरच्या राजमंडळांत प्रतिनिधि, अमात्य, सेनापति, सेना खासखेल व इतर सरदार हे अगदीं निर्माल्यवत् झाले. एवढेंच नव्हे तर, संधि येतांच या मांडलिक संस्थानिकांच्याच मुलुखावर स्वाऱ्या करण्यासही करवीर छत्रपतींनीं कमी केलें नाहीं आणि या स्वाऱ्यांचें क्षेत्र स्वतःच्या मांडलिकापुरतेंच मर्यादित न करतां तें आजूबाजूच्या पेशवे सरकारच्या सरदारांच्या मुलुखांतही पसरलें गेलें. आणि या मुलुखगिरीचा इतका कडेलोट झाला कीं, अखेर त्याचा बंदोबस्त करण्याकरितां पेशवे सरकारांनीं कोन्हेरराव आप्पा पटवर्धन यांच्या नेतृत्वाखालीं फौज पाठवून करवीर छत्रपतींच्या सैन्याचा पाडाव केला आणि सन १७७५ सालीं करवीरकर व पेशवे सरकार यांचे दरम्यान पुरंदर मुक्कामीं सतरा कलमी तह करण्यांत आला. या तहांतील खालील दोन कलमें करवीर मांडलिकांच्या दृष्टीनें महत्त्वाचीं आहेत:—

१. " इचलकरंजीकरांचीं लाट व रांगोळी सुद्धां इनाम गांवें व देशमुखी सरदेशमुखीसंबंधी हक्क व इनाम शेतें, कमतें, वगैरे पुरातन

पासून जें जें चालत आलें असेल, तें करवीरकरांनीं चालवावें. उत्तूर वगैरे ठाणें घेतलीं असतील तीं माघारीं द्यावीं."

२. " पंत अमात्य, प्रतिनिधी व सेनापति यांजकडील तालुका व कोट-किल्ले सुद्धां वतनदारी व आम्मल खेडी वगैरे पुरातनपासून त्यांज-कडे चालत आलीं असतील त्याप्रमाणें चालवावें. त्यांचे गांव घेतले असतील ते माघारे द्यावे."

करवीरकरांच्या मनांतून या तहाप्रमाणें वागावयाचें नव्हतें. कशीतरी वेळ मारून नेण्याकरितां त्यांनीं हा तह केला होता. तेव्हां कोन्हेरराव आप्पा पटवर्धन यांची पाठ फिरतांच करवीरकरांनीं पुन्हां उचल खाल्ली व आपले मांडलिक व जवळपासचा पटवर्धन मुलूख यांच्यावर स्वाऱ्या करण्यास सुरवात केली. हें पाहून त्यांचा पक्का बंदोबस्त करण्याकरितां पेशवे सरकारांनीं महादजी शिंदे यांना १७७८ सालीं कोल्हापूरच्या बंदो-बस्ताकरितां पाठविलें. शिंदे यांच्या फौजेनें कोल्हापूर शहरास वेढा देऊन करवीरकरांना नामोहरम केलें. महादजी शिंदे सारख्या शूर सेनानी-पुढें आपलें कांहीं चालत नाहीं असें जेव्हां करवीर छत्रपतींना कळलें, तेव्हां स्वारीच्या खर्चाकरितां पंधरा लक्ष रुपये देण्याचें कबूल करून त्यांनीं पेशवे सरकारशीं समेट केला आणि उभयतांच्या दरम्यान पुरं-दरचा दुसरा तह सन १७७८ सालीं झाला. आणि पहिल्या तहांत आपल्या मांडलिकांपैकीं पंतप्रतिनिधी, बावडेकर पंत अमात्य, सेनापति घोरपडे व इचलकरंजीकर घोरपडे, यांचा घेतलेला मुलूख व वतनें परत करून तीं पूर्ववत् चालविण्याबद्दल जी हमी (ग्यारंटी) करवीरकरांनीं दिलेली होती, ती हमी पुन्हां दुसऱ्या तहाच्या वेळीं अधिक स्पष्ट शब्दांत करवीर-करांनीं लिहून दिली. पूर्वीच्या तहांत नसलेले कागलकर घाटगे यांचाही दुसऱ्या तहांत नामनिर्देश असून त्यांनाही इतर मांडलिकांच्याप्रमाणेंच करवीरच्या छत्रपतींनीं हमी दिलेली आहे. ऱ्या तहांतील दुसरा विशेष हा आहे कीं इचलकरंजीकर घोरपडे यांचा नामनिर्देश रघुनाथराव मंत्री,

मिरजकर पटवर्धन, शिराळेकर भोसले, वगैरे पेशव्यांच्या सरदारांबरोबर स्वतंत्र कलमांत केलेला असून वरील सरदार "आमचे सेवक व राजमंडळाचे सेवक साताऱ्याकडील—त्यांचा आकस धरून उपद्रव करूं नये व आपले राजमंडळापैकीं मशारनिल्हेकडे इनामी वगैरे गांव व वतनें असतील तीं पूर्ववत चालवावीं" अशी पेशवे सरकारांनीं अट घातली असून ती करवीरच्या छत्रपतींनीं पूर्णपणें मान्य केलेली आहे. यावरून इचलकरंजीकर घोरपडे हे करवीरचे मांडलिक नसून भोरकर, औंधकर, पटवर्धन वगैरे सरदारांप्रमाणें ते सातारचे सरदार होते हें स्पष्ट होत आहे. तसेंच पुरंदरच्या या दोन्ही तहांवरून दुसरें असें एक अनुमान निघतें कीं, त्या वेळीं महाराष्ट्रांत साम्राज्य सत्ता ही पेशवे सरकारांत केंद्रित झालेली असून त्या वेळच्या साम्राज्यसत्तेशीं आपल्या मांडलिकांवर इतःपर आगळीक न करतां त्यांचा मुलूख वतनें वगैरे बिनभोभाट चालविण्याविषयीं करवीर सरकार वचनबद्ध झालेलें होतें. पण दुःखाची गोष्ट ही कीं करवीर दरबारनें केलेले तहनामे व दिलेलीं वचनें केव्हांच पाळलीं नाहींत हें पुढील विवेचनावरून स्पष्ट होणार आहे.

करवीरचे मांडलिक आणि सातारचे व पेशव्यांचे मांडलिक यांच्यासंबंधींचा यापुढील इतिहास तुलनात्मक दृष्टीनें वाचल्यास उभयतांच्या भवितव्यतेमध्यें किती अंतर पडलें आहे त्याची पूर्ण कल्पना येणार आहे.

दुसरे बाजीरावाच्या नादानपणामुळें पेशवाईचीं सूत्रें वसईच्या तहानें इ. स. १८०२ सालीं इंग्रजांच्या हातीं गेलीं. त्या वेळीं पेशवे सरकारांत माजलेल्या बजबजपुरीमुळें पेशवे सरकारचे सरदार पटवर्धन व इतर मांडलिक हे त्यांना जुमानीतसे झाले व उभयतांचें भांडण इंग्रज सरकारपर्यंत जाऊन त्याचा शेवट पंढरपूरच्या तहांत सन १८१२ सालीं झाला. या तहान्वयें पटवर्धन व इतर मांडलिक सरदारांचा मुलूख व वतनें त्यांच्याकडे बिनबोभाट चालविलीं जातील व त्याचे मोबदला या मांडलिक सरदारांनीं पेशव्यांचा योग्य तो मानमरातब राखून वहिवाटीप्रमाणें त्यांची

हुकमत मानिली पाहिजे अशी हमी कंपनी सरकारांनी दिली. यानंतर लवकरच पेशवाई बुडाली व इंग्रजी अंमल सुरू झाला. पेशव्यांचें राज्य इंग्रज सरकारनें जिंकून घेतल्यानंतर त्याची व्यवस्था करण्याचें काम एल्फिन्स्टनसाहेबांकडे सोंपविलेलें होतें. हे साहेब फार हुषार व इकडच्या रीतिरिवाजाचे पूर्ण माहितगार व अनुभवी असून बहुतेक मराठी सरदारांची व त्यांची ओळख होती. तेव्हां पंढरपूरच्या तहाच्या धर्तीवर त्यांनीं पेशवे सरकारचे मांडलिक सरदार सांगलीकर, मिरजकर, जमखंडीकर, कुरुंदवाडकर, रामदुर्गकर व मुधोळकर यांच्यापैकीं प्रत्येकाशीं स्वतंत्र तह सन १८१९ सालीं करून त्यावेळीं त्यांचे ताब्यांत असलेला मुलूख व आधिकार पूर्ववत् चालविण्याची हमी दिली. तसेंच त्या सालीं एल्फिन्स्टनसाहेबांनीं सातारच्या महाराजांच्या बरोबरही स्वतंत्र तह केला. या तहांत सातारचें राज्य चालविण्याचें कबूल केलें असून सदर तहाचे सातवे कलमांत अक्कलकोट, भोर, औंध, जत व फलटण या जहागिरदारांचे ताब्यांत असलेला मुलूख व वतनें त्यांचेकडे विनबोभाट चालविलीं जातील व त्याचे मोबदला या मांडलिक सरदारांनीं सातारचे महाराजांचा योग्य तो मानमरातब राखून वहिवाटीअन्वयें त्यांची हुकमत मानिली पाहिजे अशी हमी कंपनी सरकारांनीं दिली व पुढच्याच वर्षीं वरील अर्थाचे तह वरील जहागिरदारांच्या बरोबर स्वतंत्रपणें एल्फिन्स्टन साहेबांनीं केले. पुढें इ. स. १८४८ सालीं सातारचें राज्य खालसा झालें, तेव्हांपासून सातारचे सरदारही इंग्रज सरकारचे प्रत्यक्ष हुकमतखालीं आले व इंग्रज सरकारांनीं त्या त्या सरदारांचा मुलूख व त्यांचे अधिकार पूर्ववत् चालविण्याचें त्यांना वचन दिलें व हें वचन आजतागायत इंग्रज सरकारनें पाळलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

पेशव्यांनीं कंपनी सरकारबरोबर सन १८१२ सालीं जसा तह केला, तसा व त्याच सालीं करवीर छत्रपतींनींही आपल्या राज्याचा बचाव

करण्यासाठीं कंपनी सरकारशीं बोलणें लावून तह ठरवून घेतला. या तहान्वयें इंग्रज सरकारच्या सल्ल्याखेरीज करवीरच्या छत्रपतींनीं कोठेंही स्वारी अगर कोणाशीं लढाई करूं नये व यापुढें करवीर राज्याच्या सुरक्षितपणाबद्दल इंग्रज सरकारनें हमी घ्यावी असें उभयतांमध्यें ठरलें. म्हणजे वसईच्या तहानें पेशव्यांचें स्वातंत्र्य जसें नष्ट झालें, तोच प्रकार या तहानें करवीरच्या छत्रपतींचा झाला. पण याची उमज त्या वेळच्या छत्रपतींना चांगलीशी पटली नसावी असें दिसतें. कारण या तहानंतरही करवीरच्या बुवासाहेब महाराजांनीं आपले मांडलिक व इतर सरदार यांच्यावर पूर्वीप्रमाणेंच चढाई करण्याचें धोरण स्वीकारलें. या वेळीं देशांत इंग्रजी अंमल नवीनच सुरूं झाला होता आणि एल्फिन्स्टन साहेबांनीं "संस्थानिक व राजे-रजवाडे यांच्यामध्यें लढे उत्पन्न झाल्यास एकदम परस्परांनीं हातघाईवर येऊन लढाई करूं नये, एकमेकांविरुद्ध काय तक्रारी असतील त्या आमच्या नजरेस आणाव्या, आम्ही त्यांचा वाजवी दिसेल त्याप्रमाणें न्याय करूं, कोणी खटला वाढवून लढाई करील तर त्याजवर सरकारची इतराजी होईल," असें सर्व सरदारांस लिहून बजाविलें होतें. या फर्मानाप्रमाणें करवीरकरांविरुद्ध इंग्रज सरकारांत फिर्याद नेण्याचा प्रसंग त्यांचे मांडलिकांच्यावर लवकरच आला. सन १८२० सालीं करवीरच्या छत्रपतींनीं इचलकरंजीवर फौज रवाना केली व त्या फौजेनें इचलकरंजीकरांस फार त्रास दिला. तेव्हां त्या वेळच्या इचलकरंजीच्या अधिपतींनीं इंग्रज सरकारकडे दाद मागितली. त्याचा विचार होऊन पुण्याचे कमिशनर चापलिन साहेब यांनीं ता. १ आक्टोबर १८२२ रोजीं करवीरच्या महाराजसरकारास खालीलप्रमाणें खलिता लेहिला :

"इचलकरंजीकर घोरपडे हे श्रीमंत पेशवे यांचे आप्त. बहुत दिवसांपासून (पेशवे सरकार) त्यांचे बहुमान राखीत होते. हल्लीं आमचे सरकार त्या जागीं आहे. म्हणोन त्या सरदारांवर अन्याय होत असतां

पाहोन उगेच राहोन अगदीं सोडून देणें सरकारास योग्य दिसत नाहीं. ऐशियास कलमी करण्यांत येत आहे कीं, आमहाराजांनीं त्याजवर आपले इलाखा वाजवी असेल तितका मजकूर करून घ्यावें. परंतु जाजती करून त्यांचे दौलतीस खलल करावे, अथवा त्यांचे वाजवी हक्क नेत मोडावा, असें आमहाराजाकडोन होऊं नये. ”

विशाळगडचे पंत प्रतिनिधी यांचेवरही बुवासाहेब महाराजांनीं सन १८३२-सालीं स्वारी करून विशाळगड किल्ला घेतला व विशाळगड-करांच्या चौक्याची जाळपोळ केली. तेव्हां पंत प्रतिनिधींनी इंग्रज सरका-कडे तक्रार केल्यावरून धारवाड सुभ्याचे सर कलेक्टर व पोलिटिकल एजंट बेवर यांचेकडोन सन १८३२ सालीं करवीरच्या छत्रपतींस खलिता आला त्यांत असें लिहिलें आहे कीं,

“ कंपनी सरकारचा महाराज छत्रपतीसाहेबाशीं तहनामा जाहला त्यांतील २ कलमांत आपले मुलुखांतील मुलखाबाहेरले लोक हवाल जाला होतील; तितकी फौज ठेवणार नाहीं. हरद्व सरकारच्या मुलकेचे आबादी व आरामी बाबे सरकार इंग्रज बहादूर सल्ला देतील त्याप्रमाणें वहिवाट ठेवण्यांत येईल असे आहे. ऐशास प्रतिनिधी विशाळगडकर हे कदीम संस्थानिक अबरुदार, याजवरीं कांहीं गैरवाजवी दस्तदराजी जाहल्या त्याणी व दिगर सरंजामीदारी वगैरे मुतफिक होऊन काय तंटा चालवि-तील व त्यांजकडून काय नुकसान येईल हें आतां समजणार नाहीं. प्रति-निधी मोसूफ यासी कांहीं खटला आल्यास लढाईचा मोकदमा न करितां अपेशात किंवा कंपनी सरकारचे विद्यमानें फैसल करून घेणें बेहत्तर आहे. सरकारमार्फत फैसल करून घेणेचे साहिप असलेस त्याजकडून महा-राजांची नुकसानी व जलल होणार नाहीं व प्रतिनिधी मोसूफ यांजवर कांहीं गैर अंमल दरपेश होणार नाहीं. ”

कागलकर घाटगे यांच्यावरही याच छत्रपतींनीं स्वारी केली होती व कागलचें ठाणें घेऊन जाळून टाकलें होतें. इंग्रज सरकारनें महाराजांस

वारंवार निक्षून सांगितलें असतांही ते त्यांच्या खलित्यांना जुमानीत नसत. तेव्हां निरुपाय होऊन इंग्रज सरकारनें महाराजांच्या पारिपत्याकरितां धारवाडचे कलेक्टर बेबर यांच्या हुकमतीखालीं सन १८२५ चे डिसेंबरांत सहा हजार फौज रवाना केली. सदरचें सैन्य येऊन दाखल होतांच महाराजांचें धैर्य खचलें व त्यांनीं बेबरसाहेबांची मिनतवारी करून त्यांच्याशीं सन १८२६ सालीं तह केला. या तहाच्या तिसऱ्या कलमांत कागलकर घाटगे व इचलकरंजीकर घोरपडे यांचीं उत्पन्नें व हक्क पूर्वीं चालत आल्याप्रमाणें चालविण्यास केव्हांही हरकत करणार नाहीं अशी हमी करवीरच्या छत्रपतींनीं इंग्रज सरकारास दिलेली आहे. सदरहू कलमाची भाषा खालीलप्रमाणें आहे:—

"The Raja of Kolhapur engages never to molest Hindurao Ghatge Kagalkar and Narayanrao Ghorpade Ichalkarnjikar in the enjoyment of their respective lands and rights according to ancient custom."

वरीलप्रमाणें तह करून इंग्रज सरकारची फौज परत फिरतांच करवीरच्या छत्रपतींनीं पुन्हां आपल्या फौजेचा मोर्चा आपले मांडलिक सरदार व पटवर्धनी मुलूख काबीज करण्याच्या उद्देशानें फिरविला व त्यांचे मुलुखांत धुमाकूळ घालण्यास सुरवात केली. तेव्हां या सरदारांच्या तक्रारी पुन्हां इंग्रज सरकाराकडे गेल्या आणि इंग्रजांची फौज धारवाडचे कलेक्टर निसबेट यांच्या हुकमतीखालीं येऊन त्यांनीं करवीर शहर काबिज केलें. तेव्हां महाराजांनीं पुन्हां तहाचें बोलणें लावून सन १८२७ च्या सप्टेंबरांत इंग्रज सरकारांबरोबर तह केला. या तहानें पूर्वीं झालेल्या तहाचीं कलमें कायम करून शिवाय आपले मांडलिक सरदार व शेजारील संस्थानिक यांच्या मुलुखांत महाराजांनीं जी लुटालूट केली होती, त्याबद्दलची नुकसानी सरकार ठरवील त्याप्रमाणें भरून द्यावी, सरकारची फौज बंदोबस्ताकरितां करवीरास राहील व महाराजांस सल्ला देण्याकरितां

मुख्य प्रधानाची नेमणूक सरकारांतून होईल व त्याचा खर्च महाराजांन
द्यावा असें ठरलें.

वर लिहिल्याप्रमाणें महाराजांचा व इंग्रज सरकारचा तह होऊन चोहे
कडे बंदोबस्त झाल्यावर महाराजांच्याकडून कोणा संस्थानिकाचें किर
नुकसान झालें याची चौकशी झाली व त्या चौकशींत इचलकरंजीकरांन
साडे सत्तेचाळीस हजार रुपये व कागलकरांना सोळा हजार रुपये इतक
नुकसानी करवीरच्या महाराजांकडून इंग्रज सरकारांनी देवविली.

बुवासाहेब महाराज सन १८३८ सालीं वारले व त्यांचे पुत्र शिवाज
महाराज गादीवर बसले. पण ते अज्ञान असल्यानें राज्यकारभा
चालविण्यासाठीं एक रीजन्सी कौन्सिल नेमण्यांत आलें. पण लवकर
कौन्सिलच्या सभासदांत भांडणें सुरू झालीं व राज्याची खरी सत्
महाराजांची चुलती दिवाणसाहेब यांनीं हिरावून घेतली. परंतु या बाई
साहेबांच्या कारकीर्दींत लोकांवर इतका जुलूम झाला कीं, सन १८२
च्या तहान्वयें इंग्रज सरकारनीं दाजी कृष्ण पंडित म्हणून नांवाजलेल
सरकारी नोकरींतील इसम करवीरचा कारभारी नेमला. या कारभ
त्यांनीं राज्यकारभाराची घडी नीट बसविण्याचा प्रयत्न केला. त्याच
परिणाम भलताच होऊन सन १८४४ सालीं करवीर राज्यांत सामानगडचे
सुप्रसिद्ध बंड झालें. तें मोडण्याकरितां इंग्रज सरकारास मोठें सैन्य पाठ
वावें लागलें व बंडाचा बीमोड होतांच सन १८४५ सालीं इंग्रज सरक
रांनीं करवीरचा राज्यकारभार कायमचा आपलें हातांत घेऊन राज्याच
नीट व्यवस्था लावण्यासाठीं कॅप्टन ग्राह्याम यांना कोल्हापुरास पोलि
टिकल सुपरिंटेंडेंट म्हणून नेमलें. हे साहेब अत्यंत हुशार व शिस्तीं
भोक्ते असल्यानें त्यांनीं करवीरच्या राज्यकारभारांत बऱ्याचशा सुधारण
केल्या. सन १८३९ सालीं इंग्रज सरकारांनीं साताराच्या मांडलिक सर
दारांचे फौजदारी अधिकार मर्यादित करून त्यांना गुन्हेगारास सात वर्षं
पर्यंत शिक्षा देण्याचा अधिकार देण्यांत आलेला होता. त्याचप्रमाण

कॅप्टन ग्राह्याम यांनींही करवीरच्या मांडलिकांच्या फौजदारी अधिकारावर मर्यादा घातली. त्यावेळी जे मांडलिक अज्ञान होते त्यांच्या कारभाऱ्यांना अगदीं बेताचे म्हणजे सेकंड क्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार देण्यांत आले; पण जे मांडलिक स्वत.चा कारभार स्वत.च्या मुखत्यारीनें पहात होते त्यांना बरेच फौजदारी अधिकार आधिक देण्यांत आलेले होते. उदाहरणार्थ, त्यावेळचे इचलकरंजीचे आधिपति केशवराव तात्यासाहेब यांना दहा वर्षेपर्यंत शिक्षा देण्याचा आधिकार होता.

कृष्णा-वारणेच्या तहानतर इचलकरंजीकर करवीरचा पक्ष सोडून सातारचे व पुढे पेशव्याचे सरदार बनले होते पण इग्रजी अमल सुरुं झाल्यानंतर इचलकरजीकर कोणाचे अकित हा प्रश्न प्रामुख्यानें उत्पन्न झाला. कारण सन १८२० साली जरी एल्फिन्स्टन-साहेबानीं त्याना तह करण्याचे उद्देशानें पुण्यास बोलावले होते, तथापि काही कारणानें त्यांच्याशी इतर पेशव्याच्या सरदाराप्रमाणें इंग्रजांचा तह झाला नाहीं. तेव्हा बुवासाहेब महाराजाच्या कारकीर्दींत हा प्रश्न धसास लागला व करवीरकर आणि इचलकरजीकर या उभयताचें म्हणणें ऐकून मुबई सरकारानीं सन १८३५ सालीं इचलकरजीकर हे पटवर्धन सरदारांप्रमाणे स्वतंत्र सस्थानिक आहेत असा निर्णय दिला, पण तो करवीरकराना मान्य न झाल्याने पुन्हा चौकशी झाली व त्यात पहिला ठराव फिरून इचलकरजीकर करवीरचे माडलिक सन १८४४ सालीं ठरले. हा ठराव झाला त्यावेळीं केशवराव तात्यासाहेब हे इचलकरजीच्या गादीवर होते. त्यानी तो मानण्याचें नाकबूल केलें व सदरहू ठरावाचा सरकारनें सक्तीनें अमल केल्यास आपण काशीस जाऊन राहणार, सरकारनें आपल्या संस्थानचें वाटेल तें करावें असें सरकारास लिहून कळविलें. त्यावेळीं मेजर ग्राह्याम हे करविरी पोलिटिकल सुपरिंटेंडेंट होतें. त्यानीं त्यावेळचे सांगलीचे अधिपति चिंतामणराव आपासाहेब याच्या मध्यस्तीनें सरकारचा झालेला ठराव मान्य करण्याबद्दल इचलकरजीच्या

अधिपतीचें मन वळविलें व इचलकरंजीचे संस्थानिक व इंग्रज सरकार या उभयतांमध्यें करवीर दरबार व इचलकरंजी संस्थान यांचे परस्परांमधील संबंध कसे राहतील याजबद्दलचा पांच कलमी करार होऊन सन १८४७ सालीं इचलकरंजीकरांनीं करवीरच्या छत्रपतींचें मांडलिकत्व कबूल केलें. या कराराप्रमाणें कोल्हापूर महाराजांची ताबेदारी नुसती नांवापुरती रहावयाची होती. करवीर दरबारनें इचलकरंजी संस्थानास ताबेदार म्हणून प्रत्यक्ष हुकूम देण्याचा नसून त्या संस्थानांत रोखा, पट्टी, पळणी वगैरे कोणत्याही प्रकारचे कर बसविण्याचें नव्हतें. इचलकरंजीकर यांचें नांव दक्षिणेंतील पहिल्या प्रतीचे सरदारांत दाखल करणेचें, इचलकरंजीकरांना दत्तक घेण्याचा प्रसंग आल्यास त्याचा विचार इंग्रज सरकारांतून होईल व करवीरचे छत्रपति व इचलकरंजीकर घोरपडे यांच्या भेटीचा प्रसंग आल्यास त्याजबद्दल नजराणा वगैरेंचा खर्च इचलकरंजीकरांना कांहीं येणार नाहीं, अशा अर्थाचा हा करार होता.

या कराराचा अंमल मात्र फार काळ झाला नाहीं. सन १८७६ सालीं दत्तकास परवानगी मागण्याचा प्रसंग हल्लींच्या अधिपतींच्या दत्तक मातोश्रीस जेव्हां आला, तेव्हां इचलकरंजीच्या अज्ञान कारकीर्दीचा व बाईसाहेबांच्या असहाय्य स्थितीचा फायदा घेऊन इंग्रज सरकारानें या करारास Political Expediency च्या ( राजकीय गरज ) सबबीवर हरताळ फासला व इचलकरंजीकरांना करवीर सरकारच्या इतर मांडलिक सरदारांच्या जोडीस नेऊन बसविण्यांत आलें.

सन १८५७ सालचें बंड जर झालें नसतें, तर कदाचित् सर्व हिंदी संस्थानें खालसा झालीं असतीं. या बंडानंतर हिंदुस्थानांतील संस्थानासंबंधीं इंग्रज सरकारचें धोरण बदललें. बंडाचा बीमोड झाल्यावर कंपनीचें राज्य मोडून या देशाचा कारभार व्हिक्टोरिया महाराणीनीं आपल्या हातीं घेतला व त्या दिवसापासून एतद्देशीय संस्थानांची जोपासना करण्याकडेच व त्यांचे मानमरातब वाढविण्याकडेच इंग्रज सरकारची प्रवृत्ति झाली. या

ोरणाप्रमाणें सन १८६२ सालीं करवीरचे छत्रपती व इंग्रज सरकार या उभयतांमध्यें एक करारनामा होऊन करवीरचें राज्य पुन्हां शिवाजी छत्रपतींच्या हवालीं करण्यांत आलें. सन १८६२ चा करारनामा हा मांडलिक संस्थानिकांच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा असल्यानें त्यांतील महत्त्वाची कलमें पुढें देण्यांत येत आहेतः—

(1) "That in all matters of importance, the Raja of Kolhapur agrees to follow the advice of the British Government as conveyed by the Political Officer representing that Government at Kolhapur.

"(8) That certain of the higher Jahagirdars, such as the Pratinidhi of Vishalgad. The Pant Amatya of Bawada, the Chiefs of Kagal, Ichalkaranji, Kapshi, Torgal, the Sirluskar, Narayanrao of Kagal, Ramabai of Walva (since dead), Himmat Bahadar should be considered as still in some degree under the supervision of the Political Agent, who should act, as far as circumstances permit, in cooperation with the Raja's Government; and that all criminal cases within the jurisdiction of these sardars involving death or imprisonment beyond seven years, should be forwarded for trial before the Political Agent, for submission to Government. The supervision proposed to be retained over these sardars, and the guardianship of such of them as may be minors by, the British Gevernment acting in concert with the Raja, are not intended in any way to infringe the seignorial rights of the Raja, but merely to secure good Government and to prevent those disputes which in old days were frequently the cause of disturbance and bloodshed."

वरील दोन कलमांचा थोडक्यांत असा आशय आहे कीं, सर्व महत्त्वाच्या बाबतींत रेसिडेंट्च्या सल्ल्यानुसार कोल्हापूरच्या छत्रपतींनीं वागावें आणि

वरच्यां दर्जाच्या सर्व जहागिरदारांवर म्हणजे विशाळगड, बावडा कागल, इचलकरंजी, कापशी, तोरगल यांचे अधिपती, सर लष्कर, कागलचे *नारायणराव, वाळव्याच्या रमाबाई, हिम्मतबहादर,* वगैरेंवर पोलिटिकल एजंट यांची देखरेख रहावी व शक्य तोंवर रेसिडेंटसाहेबांनीं दरबारच्या सहकार्यानेंच कामें करावीं. याचा अर्थ येवढाच कीं पूर्वीच्याप्रमाणें वरिष्ठ व कनिष्ठ सत्तेंत तंटेबखेडे न होतां सुरळितपणें राज्यकारभार चालावा. कोल्हापूर दरबारचे हक्क हिरावून घेण्याचा उद्देश मुळींच नाहीं. सात वर्षांपेक्षां अगर देहांत शिक्षा देणेचें खटले पोलिटिकल एजंटकडे पाठवावे अशी अट घालण्यांत आली.

या करारनाम्यांतील वरील कलमांचा अर्थ पूर्णपणें लक्षांत येण्यासाठ त्याच्या पूर्वेतिहासाचा विचार करणें जरूर आहे. सन १८५७ च्या बंडानंतर आपलें राज्य आपले हवालीं करावें म्हणून करवीरच्या छत्रपतींनीं जेव्हां मागणें केलें, तेव्हां त्यावेळचे पोलिटिकल एजंट मेजर हॅवलॉक यांनीं कोणत्या अटीवर करवीरचें राज्य छत्रपतीला परत करावें याजबद्दल ता. ८ डिसेंबर सन १८६० रोजीं जो रिपोर्ट मुंबई सरकारकडे केलेला आहे, तो अत्यंत महत्त्वाचा आहे. कारण त्या रिपोर्टांत त्यांनीं करवीर दरबार व त्यांचे मांडलिक यांचे पूर्वापार संबंध कशा प्रकारचे होते याचा पूर्ण खुलासा केलेला असून उभयतांचे दरम्यान भावि संबंध कसे रहावेत याजबद्दलच्या अटी नमूद केलेल्या होत्या व एका बाबीखेरीज करून बाकीच्या सर्व अटी सरकारांनीं कबूल केल्या. या रिपोर्टांत मेजर हॅवलॉक म्हणतात: —

"34th. The Chiefs of Vishalgad, Bavada, Kagal, Ichalkaranji, *Kapshi, Torgal and the Sarlashkar,* Narayanrao of Kagal, Ramabai of Walva and the Himat Bahadar are Feudatories of Kolhapur and (except the last three named) pay an annual sum in commutation of Saranjam service and I think it would be desirable for the welfare of these estates that the paramount power should interest

itself so far in their favour, as to require that the appointment and removal of Karbhari should be subject to the consent of the British Government and that all cases involving sentences of death or imprisonment beyond seven years should be forwarded to the Political Officer's Court for trial and final submission to Government. I would also recommend that the British Government shoutd retain a guardianship over such of these Chiefs as should be minors, the control being clearly understood not in any way to infringe the Seignorage and feudal rights of the Raja.

"36th. I do not think the Raja could make any reasonable objections to this arrangement and securing as it would, the formal infeudation of the Chiefs and their annual payments for service, it would be placing the Raja in a better relative position than his father and grandfather were, whose supremacy was often contested—while it would at the same time maintain a judicious supervision on the part of Government-general as related to the good management of the Estates and special as related to the most serious criminal offences and that awful consideration for the human race, the "fiat" of life and death.

"52 (x). That certain of the higher Jahagirdars should be considered as under the special supervision of Government through the Political Officer. The appointment and dismissal of their Karbharis to be in the hands of the British Government. That all criminal cases within the jurisdiction of these Jahagirdars involving death and imprisonment beyond seven years should be forwarded for trial before the Political Officer for submission to Government. That this arrangement should not be considered in any way to infringe on the rights of the Raja as regards his Feudatories, the desire of the Government being to regulate these rights and settle any disputes which in former times

have caused ill-will, strife and serious injury to the parties concerned.

"53rd. I recommend that these should be the basis of a final settlement and I have stated my opinion that as regards the preservation of peace and order, the soundness of the finances and the regulation of civil and criminal justice, the scheme will be eventually safe and practicable."

हॅवलॉक यांचें वरील शिफारशींत असें म्हणणें आहे कीं, वरिष्ठ सत्तेला जहागिरीच्या कारभाऱ्यांना नेमण्याचा व काढण्याचा हक्क असावा. तसेंच फांशीची सजा किंवा सात वर्षांहून अधिक कैद असलेले कायद्याचे प्रश्न पोलिटिकल अधिकाऱ्याकडे ठेवावेत. शिवाय जहागिरींचे वारस अज्ञान असतील तर सरकारनें त्यांचें पालन करावें. या शिफारसींचा हेतु कोल्हापूर दरबारच्या हक्काला कोणत्याही रीतीनें बाध आणावयाचा नाहीं, हें त्याबरोबरच विसरून चालावयाचें नाहीं. जहागिरीच्या सुव्यवस्थेकरितां ब्रिटिश सरकारची कायदेशीर देखरेख असावी या तत्त्वास कोल्हापूर दरबार हरकत घेईल असें वाटत नाहीं. 'वरिष्ठ दर्जाच्या जहागिरीवर ब्रिटिश सरकारनें विशेष देखरेख ठेवावी. तेथील कारभाऱ्यांच्या नेमणुकी-संबंधीं सर्व हक्क ब्रिटिश सरकारनेंच आपल्या ताब्यांत ठेवावेत व महत्त्वाचे कायद्याचे प्रश्न पोलिटिकल एजंटच्या कोर्टासमोर यावेत.'

मांडलिक संस्थानांतील कारभाऱ्यांची नेमणूक व बडतर्फी ही ब्रिटिश सरकारांनीं करावी म्हणून जी शिफारस हॅवलॉकसाहेबांनीं केलेली होती, त्यामुळें मांडलिकांच्या अंतर्गत कारभारांत विनाकारण ढवळा-ढवळ केल्यासारखें होणार आहे, तेव्हां ती शिफारस सरकारनें मान्य केली

नाहीं व त्याऐवजीं कारभाऱ्याच्या नेमणुकीस मात्र सरकारची संमति घ्यावी अशा अर्थाची सौम्य अट घालण्यांत आली. ही एक बाब खेरीज करून बाकीच्या हॅवलॉक यांच्या सर्व शिफारशी सरकारनें मंजूर करून त्यास अनुसरून सन १८६२ चा करारनामा तयार करण्यांत आला. या करारनाम्यानें करवीरच्या छत्रपतींची सत्ता बरीचशी नियंत्रित करण्यांत आली हें या करारनाम्याचीं कलमें वाचणाऱ्याच्या सहज लक्षांत येण्यासारखें आहे. हा करारनामा हंगामी स्वरूपाचा असल्यानें तो आपणावर पूर्णपणें बंधनकारक नाहीं आणि तो आपणास बदलून मिळावा म्हणून करवीर दरबारनें पुष्कळ प्रयत्न केला, पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. सन १८९१ सालीं विशाळगडचे अधिपतींना ज्यावेळीं मुखत्यारी दिली त्यासंबंधीं मुंबई सरकारचा ठराव ( Resolution No. 6522 dated 27th August 1891 ) जो झालेला आहे त्यांत या करारनाम्यासंबंधीं मुंबई सरकारनें ता. २३ आक्टोबर १८२७ च्या तहांतील ७ व्या कलमांत सर्व जहागिरी ब्रिटिश सरकारच्या संरक्षणाखालीं आहेत आणि १८६२च्या कायमच्या तहांत वरिष्ठ जहागिरीसंबंधींचीं दोन कलमें मुद्दाम घालण्यांत आलेली आहेत असें म्हटलेलें आहे. हें कलम पुढीलप्रमाणें आहे:

"In the Treaty of October 23rd 1827, Article VII, they (the feudatories) were declared to be "under the protection of the British Government" and in the Treaty of 1862, *which was the final settlement of Kolhapur's relations with the British Government on the one side and with the "higher Jahagirdars", on the order,* two articles were specially devoted to them."

करवीर दरबार व मांडलिक संस्थानें यांच्या दरम्यान फौजदारी अधिकाराबद्दल वाद उत्पन्न झाला, तेव्हां सन १८९७ सालीं मुंबई सरकारानें जो ठराव दिला त्यांत या करारनाम्याबद्दल पुढील मजकूर आहे :—

"The Treaty of 1862 is the formal expression of the conditions under which the Paramount Power reestablished Native Rule in Kolhapur and not a Treaty arrived at by negotiation between the parties.

यानंतर सन १९१९ सालींही कै. शाहूमहाराज यांनीं हा करारनामा बदलून घेण्याचा प्रयत्न केला पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं.

सन १८६२ च्या करारनाम्यानंतर त्या वेळचे करवीरचे छत्रपति श्रीमंत बाबासाहेब महाराज हे लवकरच वारले व त्यानंतर खुद्द कोल्हापूर व मांडलिकांच्यापैकीं बरींच मांडलिक संस्थानें या दोन्हीही ठिकाणीं अज्ञान कारकीर्द सुरू झाल्यानें सर्व राज्यकारभार पोलिटिकल एजंटच्या प्रत्यक्ष नजरेखालीं आला व तो शक्य तों ब्रिटिश मुलुखांतील राज्यव्यवस्थेच्या पद्धतीवर चालला. ही अज्ञान कारकीर्द ३०।३२ वर्षें चालली व त्या मुदतींत राज्यकारभारास बराचसा व्यवस्थितपणा आला. कै. शाहू महाराजांना सन १८९४ सालीं मुखत्यारी मिळाल्यावर परत मांडलिक संस्थानिकांचे हक्क, अधिकार व मानमरातब यांच्यावर त्यांनीं पूर्वींप्रमाणें अतिक्रमण करण्याचा उद्योग सुरू केला. या अतिक्रमणाची पूर्ण कल्पना येण्याकरितां शाहू महाराज अधिकारारूढ झाले, त्यावेळीं त्यांच्या मांडलिकांचे अधिकार काय होते याजबद्दलची रूपरेषा देणें जरूर आहे. विशाळगड व इचलकरंजीचे अधिपति सन १८९१ व १८९२ सालीं सज्ञान झाले, तेव्हां त्यांना मुखत्यारीची थैली देण्याकरतां जो मुंबई सरकारचा ठराव झाला, तो करण्यांत सर वुइल्यम् ली वॉर्नर हे मुंबई सरकारचे कौन्सिलर म्हणून मुख्य होते. हे कौन्सिलरचे हुद्यावर जाण्यापूर्वीं बरेच दिवस कोल्हापूरचे पोलिटिकल एजंट व करवीर येथील कौन्सिल ऑफ ॲड्मिनिस्ट्रेशनचे प्रेसिडेंट होते व म्हणून त्यांना करवीर दरबार व मांडलिक संस्थानें यांचे अधिकार व हितसंबंध काय आहेत याची पूर्ण कल्पना होती. त्यावेळच्या करवीर दरबारच्या रीजन्सी कौन्सिलनें विशाळगडकर व इचलकरंजीकर

या उभयतांनाही अगदीं तुटपुंजे अधिकार द्यावेत म्हणून शिफारस केली होती, पण ती मुंबई सरकारनें फेटाळली व अधिकारथैलीचा मसुदा तयार करून पाठविला; त्या प्रसंगीं मुंबई सरकारचा जो ठराव झालेला आहे, तो मांडलिकांच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा आहे. सदरहू ठरावाचा आशय असा आहे कीं,

'सन १८६२ च्या तहान्वयें कोल्हापूर दरबारचे, ब्रिटिश सरकार व वरिष्ठ दर्जाचे जहागिरदार या दोघांशींही कायमचे संबंध कसे असावेत हें ठरलें गेलें आहे. आणि अधिकार-थैली पूर्वापार परंपरा, राजकीय संबंध आणि मागील तह यांचा विचार करूनच द्यावी लागेल. त्यावेळच्या दिवाणाचें असें मत होतें कीं "जहागिरदारास योग्य वाटतील तेवढेच न्यायदानाचा अधिकार देणेचा हक्क छत्रपतींना आहे." पण हें म्हणणें निःसंशय चूक आहे.

याच ठरावांत पुन्हा असें म्हटलें कीं १८६२च्या ठरावानें जहागिरदार व कोल्हापूरचे छत्रपति यांचे संबंध निःसंदिग्धपणें ठरले गेले आहेत व छत्रपतींना त्यांच्या वाडवडिलांपेक्षां जास्ती अधिकार दिलेले आहेत. फक्त या तहान्वयें ब्रिटिश सरकारपुढें महत्त्वाचे फौजदारी कायद्याचे प्रश्न ठेवावेत असें ठरलें.पण दिवाणी प्रश्नाचें बाबतींत असे विशेष अधिकार महाराजांच्या हातीं ठेवलेलें नाहींत.'

मूळ इंग्रजी ठराव पुढीलप्रमाणें आहे :—

The Treaty of 1862 was "the final settlement of the Kolhapur's relations with the British Government on the one side and with the Higher Jahagirdars on the other," and that 'the terms of the investiture must be based on the established political relations, on Treaty and on past custom' and that these could only be determined by a thorough retrospect and examination of what had gone before. The contention of the then Divan that "The Chief, as a Feudatory, is bound to exercise such powers only in

judicial matters as the parent state may consider proper in the interest of the subjects committed to his care," is emphatically repudiated and it is stated that " the Treaties of the Kolhapur State indicate with sufficient clearness that such language ignores the proper relations of the mediatised Chiefs of Kolhapur, both with their Suzerain and the British Government.

"The same Resolution points out that the formal infeudation of the Chiefs and their annual payments placed the Raja in a better relative position than that enjoyed by his ancestors and that the new position was placed beyond further controversy by the Treaty of 1862 and that this Treaty merely gave the superior or residuary criminal jurisdiction to the British Agent aud the British Government; but that in all civil cases, " on specific jurisdiction had been formally reserved by the British Government and looking back at the period antecedent to that treaty and the former practice, there is no evidence that any civil jurisdiction was ever reserved by Maharaja's Government."

करवीर राज्यांत नऊ मांडलिक संस्थानें आहेत. त्यांचे सन १८४८ सालापासून दोन वर्ग करण्यांत आले असून विशाळगड, बावडा, कागल थोरली पाती व इचलकरंजी हीं मोठीं मांडलिक संस्थानें आणि कापशी, तोरगल, सरलष्कर, कागल धाकटी पाती व हिंमतबहादूर हीं छोटीं मांडलिक संस्थानें अशीं मानण्यांत येतात. मोठे व छोटे मांडलिक यांचे अधिकारांत थोडेसें अंतर आहे. पहिल्या वर्गाचे अधिकार स्थूलमानानें खालीलप्रमाणें आहेतः—

१. मुलकी ( रेव्हिन्यू ) खात्यासंबंधींचे पूर्ण अधिकार; या खात्यांत जंगल, पोलिस, शाळा, दवाखाना, पब्लिक वर्क्स वगैरे सर्व खात्यांचा

समावेश होतो. संस्थानास कारभारी नेमण्याचा तो ब्रिटिश सरकारचे संमतीचा असावा.

२. ब्रिटिश मुलखांत हायकोर्टांत सेकंड अपिलें व तपासणीचीं कामें चालतात तेवढीं कामें कोल्हापूरचे महाराजांचे दिवाणी कोर्टांत चालणेचीं असून त्याखेरीज बाकीचे सर्व दिवाणी अधिकार.

३. इंडियन पीनल कोडांत ज्या अपराधास सात वर्षांपेक्षां अधिक शिक्षा सांगितली आहे व ज्यांचा इनसाफ फक्त सेशन कोर्टांतच करतां येतो असे गुन्हे खेरीज करून बाकीच्या सात वर्षेपर्यंत शिक्षा सांगितली, अशा सर्व गुन्ह्यांसंबंधानें इनसाफ करण्याचा अधिकार. याखेरीज सन १९०५ सालीं सात वर्षेपर्यंत शिक्षा सांगितली आहे, अशा गुन्ह्यासंबंधानें हायकोर्टचे अधिकारही यावेळीं हयात असलेल्या मोठ्या मांडलिकांना दिलेले आहेत.

४. राज्यकारभाराच्या दृष्टीनें करवीर राज्य व मांडलिक संस्थानें यांचें स्वतंत्र अस्तित्व ( separate entities ) असून करवीर दरबारला मांडलिक संस्थानचे हद्दींत कोणताही कर बसवितां येत नाहीं. तसेंच ब्रिटिश सरकारच्या परवानगीखेरीज व मांडलिक संस्थानला आपलें म्हणणें मांडण्यास पूर्ण संधि दिल्याखेरीज कोणताही नवा कायदा मांडलिक संस्थानास लागूं करतां येत नाहीं.

५. मुलकी, दिवाणी व फौजदारी खात्यासंबंधीं सर्वसाधारण देखरेख ( Political supervision ) कोल्हापूरचे पोलिटिकल एजंट यांनीं करणेची असून फौजदारीसंबंधीं वरिष्ठ व अवशिष्ट अधिकार ( Residuary jurisdiction ) ब्रिटिश सरकारांनीं चालविण्याचे आहेत.

६. मांडलिक संस्थानच्या अंतर्गत कारभारांत करवीर दरबारनें कोणत्याही प्रकारची ढवळाढवळ करण्याची नसून सर्वसाधारण

देखरेख करण्याचे प्रसंगीं व्यक्तिशः कामांत पोलिटिकल एजंटांनीं जरूर तर करवीर दरबारचा अभिप्राय घ्यावा, पण अखेरचा ठराव करणेचा तो पोलिटिकल एजंट यांनीं स्वतः करणेचा आहे.

छोटे मांडलिक संस्थानिक यांना कै. शाहु महाराज सन १८९४ सालीं गादीवर आल्यानंतरच अधिकार देण्यांत आले व ते देतांना मुलकी, दिवाणी व फौजदारी अधिकारांत बरीचशी कपात झाली. तथापि वरील तीन खातीं सोडून बाकी बाबतींत त्यांचे व मोठे मांडलिकांच्या अधिकारांत कांहीं फरक नाहीं.

कै. शाहू महाराजांच्या व हल्लींच्या महाराजांच्या कारकीर्दींत मांडलिकांचे अधिकार, हक्क व मानमरातबाबाबत जे अनेक हल्ले झाले त्याचें वर्णन करण्यापूर्वीं सातारा आणि पेशवे सरकारचे मांडलिक यांचे अधिकार, व करवीरचे मांडलिक यांचे अधिकार, हक्क व मानमरातब यांचा तुलनात्मक दृष्टीनें विचार करणें जरूर आहे.

करवीरच्या मांडलिकांच्याप्रमाणेंच सातारा व पेशवे यांचे मांडलिक यांचे फौजदारी अधिकार सन १८३९ सालीं सात वर्षांची सजा देण्यापर्यंतच मर्यादित केले होते. मुलकी व दिवाणी अधिकार मात्र त्यांना पूर्णपणें होते. पण सन १९२० व १९२३ सालीं* ब्रिटिश सरकारनें त्यांच्या फौजदारी अधिकारावर घातलेलें नियंत्रण कमी करून त्यांना अंतर्गत कारभारांत पूर्ण स्वातंत्र्य दिलें. सन १९११ च्या दिल्ली दरबारांत मरहूम बादशहा पंचम जॉर्ज यांनीं जाहीर केल्याप्रमाणें त्यांच्याकडून वारसा नजर म्हणून जो औरस संतती असल्यास एक सालच्या उत्पन्नाइतका, दत्तकप्रसंगीं दोन सालच्याइतका, नजराणा घेण्याची पूर्वापार पद्धत होती, त्याचीही माफी इंग्रज सरकारनें या संस्थानिकांना दिली. सरळ वारस गादीला असला व तो सज्ञान असला म्हणजे तो वडील

* See Bombay Government's Resolutions Nos. 9029 dated 3rd December 1920 and No. 168 B dated 10th January 1923 respectively.

दैवाधीन होतांच, आपले अधिकारांत गादीवर बसून राज्यसूत्रें आपल्या हातीं घेतल्याचें जाहीर करण्याचा विशेष अधिकार या संस्थानिकांना दिलेला होता; एवढेंच नव्हे तर, पूर्वींच्या सरदारांना साताऱ्चे जहागिरदार अथवा " चीफ " म्हणून सरकारी रीतीनें संबोधिलें जात असे. पण अलिकडे तर त्यांना हिज हायनेस, .राजेसाहेब असे मानमरातबाचे हुद्दे देण्यांत आलेले आहेत. या संस्थानिकांकडून करवीरच्या मांडलिकांच्या, प्रमाणें दरसाल ब्रिटिश सरकारास कांहीं ठराविक खंडणी मिळत असे, तीही फेडरेशन होतांच कमी करण्याचें साम्राज्य सरकारानें अभिवचन दिलें आहे. एकंदरींत दिवसेंदिवस सातारा व पेशवे सरकारांच्या मांडलिकांचे अधिकार, हक्क व मानमरातबाचें क्षेत्र ब्रिटिश सरकारच्या अधिराज्याखालीं एकसारखें वृद्धिंगत होत आहे, तर करवीरच्या मांडलिकांचे अधिकार, हक्क व मानमरातब करवीर छत्रपतींच्या अधिराज्याखालीं एकसारखे संपुष्टांत येऊं लागले आहेत. हा राजकारणांतील विचित्र दैवपट नव्हे काय ?

आतां कै. शाहू महाराजांच्या व सांप्रतच्या श्री. सर राजाराम महाराजांच्या कारकीर्दींत त्यांच्या मांडलिकांचे अधिकार, हक्क व मानमरातबावर वेळोवेळीं जे अनेक आघात झालेले आहेत, त्यांपैकीं अगदीं ठळक व मासलेवाईक अशींच कांहीं उदाहरणें देण्याचें योजिलें आहे.

## शाहू महाराजांची कारकीर्द ( सन १८९४–१९२२ )

( १ ) शाहू महाराज राज्यारूढ झाल्यानंतर दोनच वर्षांनीं विशाळगडचे पंतप्रतिनिधि यांना ज्यावेळीं नवीन कारभारी नेमण्याचा प्रसंग आला, त्यावेळीं थैलीप्रमाणें ब्रिटिश सरकारच्या संमत्तीची जरुरी असतां ब्रिटिश सरकाराऐवजीं आपली संमत्ति घेणें जरूर आहे, तसेंच त्यासालीं इचलकरंजी तालुक्याची रिव्हिजन सर्व्हे करण्यास ज्यावेळीं इचलकरंजीकरांनीं सुरवात केली त्यावेळीं मांडलिक संस्थानांत सर्व्हे करण्याचा अधिकार मांडलिकांचा नसून तो करवीर दरबारचा आहे अशा तक्रारी करवीर दर-

वारनें केल्या. पण मुंबई सरकारनें करवीर दरबारचें म्हणणें नामंजूर करून सदरचे अधिकार मांडलिकांना आहेत असा निकाल दिला. या वरील दोन्हीही मुद्यांवर आपल्या विरुद्ध निकाल झाला असतांना देखील बावडे संस्थानांत सन १९२३ सालीं कारभाऱ्याची नेमणूक करतेसमयीं व इचलकरंजी संस्थानांत इचलकरंजी तालुक्याची सेकंड रिव्हिजन सर्व्हे करण्याचें काम सन १९२६ सालीं सुरूं झालें, त्या वेळीं करवीर दरबारनें पुन्हां पूर्वींप्रमाणेंच हरकती घेतल्या, परंतु त्यांना त्यांत यश आलें नाहीं हा भाग निराळा.

(२) सन १८९८ सालीं मोठे मांडलिकांच्या संस्थानांत पूर्वापार ज्यांच्या त्यांच्या नांवचे स्वतंत्र जनरल व कोर्ट फी स्टांप चालूं होते, ते बंद करण्यांत येऊन करवीर दरबारच्या शिक्याचे स्टांप वापरले पाहिजेत असा हुकूम करवीर दरबारनें दिला. याविरुद्ध चारीही मोठे मांडलिकांनीं मुंबई सरकारपर्यंत तक्रारी केल्या, पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं.

(३) सन १९०३ सालीं, सन १८६२ च्या करारनाम्याच्या आठव्या कलमाप्रमाणें मांडलिकांच्या फौजदारी अधिकारांतील अवशिष्ट अधिकार (Residuary jurisdiction) जे ब्रिटिश सरकारनें आपणाकडे राखून ठेवले होते, ते करवीर दरबारच्या आग्रहाच्या विनंतीवरून इंग्रज सरकारनें करवीर दरबारला सुपूर्त केले आणि त्या कृत्यानें व त्या वेळेपासून करवीरच्या मांडलिकांच्या अधिकाराची अधोगति जोरानें सुरू झाली.

या अवशिष्ट अधिकाराबद्दल सर वुइल्यम ली वार्नर यांनीं आपल्या "हिंदुस्थानांतील एतद्देशीय संस्थानें" या पुस्तकांत असें अधिकारवाणीनें सन १९१० सालीं लिहिलें आहे कीं, कोल्हापूर संस्थानच्या ज्या मांडलीक जहागिरी आहेत, त्या ब्रिटिश सरकारच्या खास ग्यारंटीमुळें आस्तित्वांत आहेत. आणि शिवाय १८६२ च्या तहान्वयें अवशिष्ट अधिकार दरबारचा नसून तो रेसिडेंटनें स्वतःकडे राखून ठेवलेला आहे. ते म्हणतात:—

"In the south of India, the Kolhapur State still includes some Feudatory States, but they exist because of the British guarantee, and because, by the Treaty of Kolhapur, dated the 20th of October 1862, the residuary jurisdiction had been removed from the suzerain State and taken into the safe keeping of the British.

( See p. 12, Native States in India, by Sir William Lee Warner, 1910. )

या वेळीं कर्नल फेरिस म्हणून दरबारचे पुरस्कर्ते व पाठिराखे असे कोल्हापूरचे पोलिटिकल एजंट असल्यानें जरी या अधिकारदानाविरुद्ध मांडलिक संस्थानांनीं जोराची तक्रार केली, तरी त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. कारण इंग्रज सरकारास राजकीय दृष्टया मांडलिक संस्थानांसंबंधीं पूर्वी इतकें अगत्य राहिलें नव्हतें व साम्राज्य सत्तेच्या राजकीय न्यायदेवतेचा कांटा दिवसेंदिवस मोठमोठे संस्थानिक व राजे लोक यांच्या बाजूनें झुकूं लागला होता. मांडलिकांनीं या वेळीं जी जोराची तक्रार केली, त्याचा परिणाम येवढाच झाला कीं, चौघे मोठे मांडलिकांना व्यक्तिशः सात वर्षांपर्यंत शिक्षेचे फौजदारी कामांतील हायकोर्टाचे अधिकार सन १९०५ सालीं करवीर महाराजांनीं मुंबई सरकारच्या सल्ल्यावरून दरबार भरवून दिल्याचें जाहीर केलें. पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं संधि येतांच ते कमी करण्याचा अगर त्यांत खोट घालण्याचा प्रयत्न दरबारचा अव्याहत चालू आहे.

फौजदारींतील अवशिष्ट अधिकार करवीर दरबारला देते वेळीं मुंबई सरकारनें सन १९०३ सालीं कै. शाहू महाराजांना जो खलिता पाठविला आहे त्यांत असें म्हटलें आहे कीं, दरबारच्या न्यायखात्यानें जहागिरीच्या न्यायदानाच्या वाजवी हक्कांत ढवळाढवळ करतां कामा नये. (Your Highness's courts will, of course, avoid any possible allegation of encroachment on the jurisdiction

reserved to the Feudatory Jahagirdars on their investiture by a scrupulous respect for the terms of the Thaillis addressed to them".

( See Aitchison's Treaties, Vol. VIII p. 245, Edition 1929 )

वरीलप्रमाणें मांडलिकांच्या फौजदारी अधिकारांत ढवळाढवळ केली जाणार नाहीं व सात वर्षें शिक्षेपर्यंतचे फौजदारी अधिकार स्वतंत्रपणें चालविण्याची ह्यांना पूर्ण मुभा आहे असेंही ज्या त्या मांडलिकांना सन १९०३ च्या आक्टोबरांत कळविण्यांत आलें. पण हें आश्वासन व खलित्यांतील अट कागदोपत्रींच राहिली असून तिचा उपयोग करवीर दरबारच्या अतिक्रमणास पायबंद घालण्याकरितां पोलिटिकल एजंट करीत नाहींत ही दुःखाची गोष्ट होय.

( ४ ) सन १९०६ सालीं, प्राचीन काळापासून करवीरच्या मांडलिक संस्थानांना " संस्थानें " व त्यांच्या अधिपतींना " संस्थानिक अगर चीफ" असें म्हणत असत. ते हुद्दे करवीर दरबारनें बदलून यापुढें त्यांना " जहागिरदार " या हुद्यानें संबोधण्याबद्दल व तसा मायना वापरण्याबद्दल सक्तीचे हुकूम दिले.

पेशवे व सातारचे सरदार " चीफ " म्हणून संबोधले जात होते आणि त्यांची बढती " राजे " पदावर झाली, तर करवीर राज्यांत त्याच दर्जाचे मांडलिक यांची " संस्थानिक अगर चीफ " या पदावरून " जहागिरदार " पदावर बडतर्फी झाली ! मांडलिकांच्या हुद्यांत हा बदल करण्याचें मुख्य कारण म्हणजे त्यांचा पूर्वापार चालत आलेला हुद्दा हा छत्रपतींच्या अधिराजपदास ( Sovereignty ) कमीपणा आणणारा आहे असें दरबारचें म्हणणें आहे. वस्तुतः हें कारण अगदीं बालिशपणाचें दिसतें. जहागिरदारांचा अधिराजा म्हणवून घेण्यापक्षीं संस्थानिकांचे अगर चीफ लोकांचे आपण अधिराज आहों असें म्हणवून घेण्यांतच करवीरच्या छत्रपतींना अधिक मोठेपणा आहे. हैद्राबादचे निजाम, व उत्तर हिंदुस्थानांतील बडीं संस्थानें यांच्यांत जे मांड-

लिक आहेत, त्यांपैकीं बरेच जणांना "ठाकोर" "राजेसाहेब" असे हुद्दे देण्यांत आले आहेत व अशा मोठ्या हुद्याचे मांडलिकावर आपलें स्वामित्व आहे असें जगास दाखविण्यांतच आपला अधिक मोठेपणा आहे असें त्या संस्थानिकांना वाटतें. पण करवीरच्या राजमंडळांत उच्च दर्जाच्या मुत्सद्देगिरीचा अभाव असल्यानें मांडलिकांच्या बाबतींत त्यांची नेहमींच संकुचित व अनुदारपणाची दृष्टि असल्याचें हें एक ठळक व मासलेवाईक उदाहरण आहे.

(५) १९०७ सालीं, प्रत्येक मांडलिकाच्या संस्थानांत ज्यांच्या त्यांच्या नांवाचे स्वतंत्र शिक्के असत. ते बदलून सर्व शिक्के करवीर दरबारांत रूढ असल्या आकाराचे व मजकुराचे असले पाहिजेत व नवीन शिक्का तयार करतांना त्याचा आकार व त्यांतील मजकूर बरोबर असल्याबद्दल दरबारची मंजुरी घ्यावी असा हुकूम करवीर दरबारनें दिला. याविरुद्ध मांडलिकांनीं मुंबई सरकारापर्यंत काम चालविलें, पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. एका तोंडानें मांडलिक संस्थानें राज्यकारभाराच्या दृष्टीनें स्वतंत्र ( Separate entity ) आहेत असें म्हणावयाचें व दुसऱ्या तोंडानें ज्या योगें त्यांचें स्वतंत्र अस्तित्व नाहींसें होईल असें कृत्य करण्यास दरबारास प्रोत्साहन द्यावयाचें, या राजनीतीस काय म्हणावें हेंच कळत नाहीं. सन १९०७ सालीं आपल्या कोर्टांना शिक्के देण्याचा अधिकार मांडलिकांचा आहे, शिक्याचा विशिष्ट आकार व आंतील मजकूर येवढाच दरबारनें मंजूर करावयाचा हें सन १९०७ मध्यें मुंबई सरकारापर्यंत काम चालून ठरलें व याप्रमाणें आज ३२ वर्षें वहिवाट चालू आहे. असें असतांना गेल्या सालीं मांडलिक संस्थानांतील कोर्टें व अधिकारी यांना शिक्के देण्याचा व ते शिक्के काय आकाराचे व कोणत्या मजकुराचे असावेत या दोन्ही गोष्टी ठरविण्याचा हक्क एकट्या दरबारचा असल्यानें तसा अंमल करण्याबद्दल दरबारनें नवीन हुकूम काढले आहेत. याविरुद्ध सर्वही मांडलिकांनीं रेसिडेंट साहेबांकडे तक्रारी केलेल्या आहेत असें कळतें.

( ६ ) कोल्हापुरपासून चार मैलांवर करवीरच्या मांडलिकांपैकीं मे. हिम्मतबहादूर यांचें निगवें नांवाचें खेडें आहे. या गांवापैकीं सुमारें वीस एकवीस एकर जागा शाहू महाराजांनीं हिम्मतबहादूर यांना न विचारतां आपल्या ताब्यांत घेऊन त्या ठिकाणीं त्या वेळीं फार प्रसिद्धीस आलेला सोनतळी कँप स्थापन केला. मे. हिम्मतबहादूरसाहेबांनीं या जबरदस्तीबद्दल बरीच तक्रार केली, पण त्यांना जागेची नुकसानभरपाई देखील मिळाली नाहीं असें कळतें. पूर्वींच्या काळीं करवीरचे छत्रपति आपल्या मांडलिकांच्या मुलुखावर सैन्य घेऊन स्वारी करीत, पण इंग्रजी राज्यांत स्वारी करण्यास सैन्याचीही जरुरी राहिली नाहीं !

( ७ ) विशाळगडचे प्रतिनिधि यांना दरसाल दरबारला पांच हजार रुपये लष्करी सैन्याबद्दल खंडणी म्हणून द्यावी लागते. व दरसाल दरबाराकडून विशाळगड संस्थानला बाबतीबद्दल तीन हजार रुपये, अबकारी कॉंपेनसेशनबद्दल जी रकम ठरेल ती ( ही अंदाजीं सातआठ हजार रुपये असते ) आणि अशाच प्रकारच्या कांहीं बाबींची रकम मिळणेचा हक्क आहे. सन १९०६ सालीं दरबारनें खंडणीची रकम मांडलिकांनीं एप्रिलच्या पहिल्या तारखेस दरबारच्या खजिन्यांत भरली पाहिजे व तसें करण्यास जे चुकतील, त्यांचेवर दरसाल दर शेंकडा एकोत्राप्रमाणें व्याज आकारलें जाईल असा हुकूम सोडला. त्यावेळीं विशाळगडकरांनीं दरबारला असें कळविलें कीं दरसाल दरबाराकडून विशाळगडला ज्या ठराविक बाबींचे पैसे रोखीनें मिळतात, त्याची वजावाट खंडणीच्या रकमेंत दरबारनें करावी व जें येणें देणें निघेल तें एकमेकांचें एकमेकानीं द्यावें. विशाळगड प्रतिनिधींनीं ही जी तडजोड सुचविली होती ती आपणांस कबूल आहे किंवा नाहीं याचा दरबारनें निर्णय तर कांहीं केलाच नाहीं. उलट खंडणीच्या दरसालच्या रकमेवर दरसाल दरशेंकडा एकोत्रा दरानें व्याज आकारून केवळ व्याजाचीच म्हणून विशाळगडच्या प्रतिनिधींवर ६७००० रुपयांची बाकी काढली व या बाकींत दरबारकडून विशाळ-

गडला दरसाल मिळणाऱ्या रकमा वजा घालून बाकी येणें राहिलेलें व्याज व दरसाल येणारें खंडणीची मुद्दल रकम अशी तात्बडतोब पाठवावी म्हणून विशाळगड प्रतिनिधींकडे तगादा लावला. मुद्दल येणें ६५००० रुपये व त्यावरील व्याज ६७००० रुपये असें धरून व्याजांत दरबारनें विशाळगडला देण्याच्या फक्त मुद्दल रकमेची तेवढी वजावाट केली होती. या हिशेबाच्या विरुद्ध विशाळगडकरांनीं बरीच जोराची तक्रार केली व मुंबई सरकारापर्यंत काम चालविलें. अखेर मुंबई सरकारच्या मध्यस्थीनें रु. ६७००० व्याजाच्या रकमेपैकीं निम्मी रकम दरबारनें सूट दिली व निम्मी रकम प्रतिनिधींकडून वसूल केली. दरबारनें प्रतिनिधींना दरसाल देण्याच्या रकमा वेळेवार दिल्या नाहींत. त्याजबद्दल दरबार मांडलिकांना कांहीं व्याज देण्यास बांधलेलें नाहीं. तसेंच उभयतांच्या येण्यादेण्याची दरसाल वजावाट करावी म्हणून प्रतिनिधींनीं वेळींच कळविलें असतांना त्याप्रमाणें करण्यास आपण कबूल आहों किंवा नाहीं हेंही दरबार कळवीत नाहीं. आणि उलट आपण काढलेल्या एकतर्फी हुकुमाच्या जोरावर एकोत्राप्रमाणें जबर व्याज खंडणीच्या येणें रकमेवर आकारून वसूल करतें यास कोणी न्याय म्हणेल काय?

## श्री. सर राजाराम महाराजांची कारकीर्द

शाहु महाराज हे सन १९२२ सालीं दिवंगत झाले व श्री. राजाराम महाराज हे गादीवर आले; त्यावेळीं त्यांनीं जी घोषणा केली त्यांत आपले परमपूज्य पराक्रमी पिते यांच्या पाउलावर पाऊल टाकून राज्य करण्याचा आपला इरादा आहे असें त्यांनीं जाहीर केलें. ही घोषणा त्यांनीं मांडलिक संस्थानिकांच्या बाबतींत तरी अल्पावधींतच पुरेपूर पूर्ण केली, येवढेंच नव्हे तर, पित्यास जी गोष्ट साध्य करतां आली नाहीं, ती त्यांनीं लवकरच साध्य करून घेतली हें पुढील हकीगतीवरून ध्यानांत येईल.

राज्यसूत्रें हातीं घेतल्यानंतर लवकरच त्यांनीं दिवाणबहादूर लठ्ठे या कर्तबगार गृहस्थांची दिवाणपदावर नेमणूक केली व नवीन दिवाणांनीं सन १८६२ सालापासून मांडलिक संस्थानावरची पोलिटिकल सुपरव्हिजन जी पोलिटिकल

एजंटकडे होती, ती दरबारकडे मिळावी म्हणून सन १९२६ सालीं मुंबई सरकारकडे मागणें केलें. या कामीं सर्व मांडलिकांनीं जोराची तक्रार केली व हा वाद सेक्रेटरी ऑफ स्टेटपर्यंत जाऊन शेवटीं कांहीं विशिष्ट अटींवर मांडलिक संस्थानिकांवरील प्रायमरी पोलिटिकल सुपरव्हिजन करवीर दरबारला द्यावी असा सन १९२९ सालीं निकाल झाला. हा निकाल म्हणजे ब्रिटिश सरकारनें आजपर्यंत ग्यारंटी केलेल्या मांडलिक संस्थानिकांचे हक्क व अधिकार यांवर घातलेली कुऱ्हाड होय. जी गोष्ट शाहू महाराजांच्या कारकीर्दींत त्यांना साध्य करतां आली नाहीं, ती गोष्ट श्री. सर राजाराम महाराजांना सहज साध्य झाली. याला मुख्य कारण म्हणजे मागील महायुद्धानंतर वडे संस्थानिकांना खुष ठेवण्यासाठीं ब्रिटिश सरकारचें बदललेलें राजकीय धोरण हेंच होय. करवीरच्या आधीं ग्वाल्हेर, धार, इंदूर वगैरे संस्थानिकांच्या ताब्यांत त्यांच्या राजवटींतील मांडलिक संस्थानिकांना करवीरप्रमाणेंच देण्यांत आलेलें होतें. या उदाहरणामुळें करवीर दरबारचा मार्ग या बाबतींत अधिकच सुकर झाला होता. असो.

पोलिटिकल सुपरव्हिजन दरबारकडे देऊं नये म्हणून मांडलिक संस्थानिकांनीं जी जोराची तक्रार केली, तिचा परिणाम येवढाच झाला कीं ज्या मांडलिकांना मुखत्यारीच्या अधिकार-थैल्या पूर्वीं दिलेल्या असतील व जे मांडलिक नवीन योजनेला कबूल नसतील, त्यांच्या थैलींत कांहीं बदल करण्याचा नसून त्यांच्या हयातीपर्यंत त्या थैलींत नमूद केल्याप्रमाणें त्यांच्यावरील पोलिटिकल सुपरव्हिजन पोलिटिकल एजंटकडे राहील व दरबारनें पोलिटिकल सुपरव्हिजनचे जे अधिकार चालविण्याचे त्या संबंधाचे नियम सरकारांतून मंजूर होऊन त्याप्रमाणें करवीर दरबारनें हे अधिकार चालविले पाहिजेत असें ठरलें. यांपैकीं कांहीं नियम पुढें दिले आहेत:

**Supervision Notification issued by the Darbar on 31st May 1930.**

Whereas the Government of His Highness the Maharaja of Kolhapur as a consequence of the transfer becomes

responsible to the Government of India for the strict observance of any assurances or promises which have been given or made to the nine Feudatory Jahagirdars by the Government of India and Bombay at or subsequent to the signing of the Agreement of 1862; and

Whereas the Government of His Highness the Maharaja of Kolhapur is determined to maintain a scrupulous respect of the rights, dignities and privileges of the nine Feudatory Jahagirdars, recognised as entitled to be exercised and to be enjoyed by them in accordance, with the terms of the Agreement of 1862, or of such rights, privileges or dignities, as have, since the Agreement of 1862 been adjudged by the Governments of India or Bombay to belong to the nine Feudatory Jahagirdars.

Now therefore, the Government of His Highness the Maharaja of Kolhapur has thought fit to issue this Notification declaring,

(1) That no alteration in the terms of the Thaili of Investiture at present in the possession of any of the nine Feudatory Jahagirdars will be made during the life-time of the holder of the Thaili, without his consent, except with the approval of the British Government.

(2) That the terms of all Thailis of Investiture which have been given or which may, in future, be given will be scrupulously observed.

(3) That all decisions which have been passed or which may be passed, or advice which has been given or which may be given, by the British Government or the Resident at Kolhapur on all matters appertaining to the rights, privileges and dignities of the Feudatory Jahagirdars will be scrupulously respected.

(11) That during the period of minority of a Feudatory Jahagirdar his guardianship shall vest jointly in His Highness and the Resident at Kolhapur. Such minority will ordinarily terminate when a Feudatory Jahagirdar reaches the age of 20, and will not be prolonged without the consent of the British Government.

That his education and administrative training shall be conducted in accordance with the practice in vogue in the Political Department of the Government of India and with due regard to the wishes of the late Jahagirdar, if any, concerning the education and training of his successor. That on attaining majority, a minor Feudatory Jahagirdar will be invested with the guaranteed powers enjoyed by his father or the last holder of the Jahagir subject to his accepting and strictly conforming to the conditions laid down in his Thaili of Investiture which conditions will be drawn up in consultation with the Resident at Kolhapur and approved of by the British Government.

(12) That during the period of minority of a Feudatory Jahagirdar the administration of his Jahagir shall be conducted by the Government of His Highness the Maharaja acting in close co-operation with the Resident at Kolhapur.

That in order to meet the wishes of his Feudatory Jahagirdars and to remove from their minds any possible anxiety with regard to the management of a minority administration, the Government of His Highness the Maharaja will be prepared to allow the revenue and judicial administrations of the minority Jahagirs to be conducted, as far as is consistent with the interests of the Jahagirs, as separate entities.

That the wishes of a Feudatory Jahagirdar as expressed by will or Testament with regard to the care and maintenance of his family and dependents and also for the conduct of the minority administration will, as far as possible, be respected.

(13) That for the consideration of the introduction of legislation into the Feudatory Jahagirs and to advise His Highness on questions appertaining to the Jahagirs, His Highness the Maharaja will create an Advisory Council of Feudatory Jahagirdars.

That the constitution of this Council will be settled with the approval of the British Government.

That this Council will consider all proposed legislation and all questions regarding the general fiscal policy of the State in so far as such policy affects the interests of the Feudatory Jahagirs.

That in the event of any Feudatory Jahagirdar feeling aggrieved by any law or decision passed (or proposed to be passed) by the Government of His Highness, after obtaining the views of the Feudatory Council, such Jahagirdar may, if so advised, approach the British Government to advise the Government of His Highness to modify, alter or repeal the law or decision passed (or to refrain from passing it) and the Government of His Highness will be prepared to accept any advice which the British Government may desire to give to His Highness on the question under consideration.

(15) That in view of the fact that His Highness' Government will henceforth primarily exercise supervision over its Feudatory Jahagirdars it is the pleasure of His Highness' Government to declare that the supervision will be exercised, as far as possible, in the same manner as has hitherto been followed by the British Government in rela-

tion to such Feudatory Jahagirs and in accordance with rules for the exercise of the controlling jurisdiction vested in His Highness which are appended to this Notification.

(16) That it is the desire of the Government of His Highness to pursue with the Feudatory Jahagirdars a policy of generosity, trust, confidence and support which will ensure to the Feudatory Jahagirdars the advancement of their respective Jahagirs to the fullest possible extent.

That in persuance of this policy His Highness has in the past been pleased to enhance the civil and criminal jurisdictions of such Feudatories as were in the opinion of His Highness deserving of such enhancements.

That in further pursuance of this policy His Highness will be again prepared to consider such further extensions of the powers of his loyal Feudatory Jahagirdars as may be in the interests of good government when he is satisfied that the efficiency and adequacy of their administrative machinery admit of such extension.

## Rules for the exercise of the Powers of Supervision.

2. In the exercise of its supervisory jurisdiction His Highness' Government will be guided by the principles that it will not interfere in trifling matters of administration or jurisdiction, that it will not sit as a regular court of appeal and will not exercise its power of advice merely because it disagrees with the decisions or orders passed by the Jahagirdars. The Government of His Highness will take action only if such Government is clearly of opinion that the decisions are perverse, unjust or oppressive. It will rest with the Government of His Highness to determine when an application is made to exercise its power of revision, whether the matter is one upon which it is necessary to take action. If it decides not to do so, it

will reject the application recording briefly its reasons for doing so.

6. Unless for very exceptional reasons which shall be stated in the order, no application will be entertained under rule 3, unless it is presented within 60 days from the date of the decision complained of.

वरील जाहीरनाम्याचा आशय अगदीं थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहे:—

१ ज्या नऊ जहागिरदारांच्या अधिकार थैल्या देण्यांत आल्या आहेत, त्यामध्यें त्यांच्या हयातीपर्यंत त्यांच्या संमतीशिवाय अगर ब्रिटिश सरकारच्या संमतीशिवाय फेरफार केला जाणार नाहीं.

२ थैल्यांतील सर्व अटी पाळण्याचें बंधन दरबारवर राहील.

३ जहागिरीचे हक्कासंबंधीं रेसिडेंटच्या सल्ल्यानुसारच सर्व गोष्टी कल्या जातील.

११ अज्ञान जहागिरदाराचे पालक म्हणून रेसिडेंट व छत्रपति हे दोघेही राहतील. २० व्या वर्षी जहागिरीचे हक्क सुपूर्त केले जातील; आणि ब्रिटिश सरकारच्या इच्छेशिवाय ही वयोमर्यादा वाढविली जाणार नाहीं.

अज्ञान जहागिरदाराचें शिक्षण हिंदुस्थान सरकारच्या राजकीय खात्याच्या नेहमींच्या पद्धतीनुसार अगर मृत जहागिरदाराच्या इच्छे-प्रमाणें केलें जाईल. अधिकारदानाच्या वेळीं मागील जहागिरदारांस असलेले हक्क दिले जातील. मात्र दरबार व रेसिडेंटसाहेब यांच्या अनुमतीनें थैलींत लिहावयाच्या अटी त्या वारसास कबूल असल्या पाहिजेत.

१२ अज्ञान जहागिरीची व्यवस्था छत्रपति रेसिडेंटसाहेबांच्या सल्ल्यानें व निकट सहकार्यानें पाहतील.

जहागिरदारांची इच्छा असल्यास व कसलीही शंका येऊं नये म्हणून दरबार अज्ञान जहागिरीच्या व्यवस्थेकरितां महसूल व न्याय अशीं वेगवेगळीं खातीं करून कारभार चालवील.

मयत जहागिरदाराच्या मृत्युपत्राप्रमाणें शक्य तोंवर त्याच्या कुटुंबाची, वारसादाराची व जहागिरीची व्यवस्था दरबार पाहील.

१३ जहागिरीसंबंधीं कायदेकानू करण्याकरितां म्हणून छत्रपति जहागिरदारांचें सल्लागार मंडळ नेमतील.

या सल्लागारमंडळाची घटना ब्रिटिश सरकारच्या अनुमतीनें केली जाईल.

जहागिरींचा संबंध येतो अशा सर्व कायद्यांचा व आर्थिक प्रश्नांचा विचार हें मंडळ करील.

एखाद्या जहागिरदारास एखादा विशिष्ट कायदा विघातक वाटल्यास त्यानें ब्रिटिश सरकारपुढें आपलें गाऱ्हाणें मांडावें. दरबार अशा बाबतींत ब्रिटिश सरकारच्या सूचना मान्य करील.

१५ ज्या रीतीनें ब्रिटिश सरकार आजतागायत जहागिरींच्या व्यवस्थेवर देखरेख करीत आलें, त्याच पद्धतीनें व नियमानुसार दरबारची देखरेख राहील.

१६ सर्व जहागिरींशीं दरबारचें विश्वासनिदर्शक व सलोख्याचें धोरण राहून जहागिरदारांचा उत्कर्ष ज्याप्रकारें होईल असें धोरण अनुसरलें जाईल.

ज्या राजनिष्ठ जहागिरींची राज्यव्यवस्था दरबारला समाधानकारक वाटेल त्यांना पूर्वींप्रमाणें अधिकाधिक अधिकार देण्यांत येतील.

## देखरेखीच्या हक्कबजावणीकरितां नियम

२ जहागिरींच्या नेहमींच्या व्यवस्थेंत दरबार ढवळाढवळ करणार नाहीं. ज्यावेळीं एखादी गोष्ट अन्यायमूलक वाटेल अशा वेळींच दरबार त्यांत लक्ष घालेल.

वरील नियम कोणीही तिऱ्हाइतानें वाचल्यास या नियमाप्रमाणें दरबारनें अधिकार चालविल्यास त्यांत मांडलिकाचें तादृश असें नुकसान

कांहीं झालें नाहीं असें वाटण्याचा संभव आहे. पण मांडलिकांच्या बाब-तींत आजपर्यंत दरबारनें जें धोरण अवलंबिलें आहे, याची ज्याला माहिती आहे, त्याला मात्र दरबारच्या हातांत आपल्या मांडलिकांना नामोहरम करण्याकरितां चांगलेंच हत्यार दिलेलें आहे असें वाटल्या-खेरीज म्हाणार नाहीं व देखरेख दरबारच्या हातांत गेल्यापासून गेल्या ८।९ वर्षांत मांडलिकांच्या हक्कांची व अधिकाराची दरबारकडून जी पायमल्ली झाली आहे, त्यावरून वरील दुसरा अंदाजच खरा ठरतो.

सुपरव्हिजन दरबारकडे देतेवेळीं ब्रिटिश सरकारांनीं करवीरच्या छत्रपतींस जो खलिता लिहिला आहे, त्यांत सन १९०२ सालीं फौजदारी अधिकारांतील अवशिष्ट अधिकार देतेवेळीं जसा इशारा दिला होता, तसाच मांडलिकांचे अंतर्गत कारभारांत ढवळाढवळ न करण्याबद्दल व त्यांचे ग्यारंटी केलेले हक्क पूर्वींप्रमाणें चालविण्याबद्दल करवीर छत्रपतींना इशारा दिला आहे. येवढेंच नव्हे तर, असेंही म्हणतात कीं, त्या वेळचे हिंदुस्थान सरकारचे पोलिटिकल सेक्रेटरी सर वॅाटसन यांनीं करवीरच्या दिवाणांना पहिलीं आठदहा वर्षें सुपरव्हिजनचे अधिकार आपणाला मिळालेच नाहींत अशा भावनेनें व उदारपणानें दरबारनें मांडलिक संस्थानिकांशीं वागलें पाहिजे असेंही सुचविलें होतें. पण यानंतरचें दरबारचें वर्तन पाहिलें तर या सर्व इशाऱ्यांची व सूचनांची त्यांना पूर्ण विस्मृति झालेली असावी आणि सुपरव्हिजन चालविण्याबद्दल ब्रिटिश सरकारानें घालून दिलेले निर्बंध व नियम हे आजतागायत दरबारच्या दप्तरांत धूळ खात पडले आहेत असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें.

सन १९२० सालीं दि. ब. लठ्ठे जाऊन त्यांचे ठिकाणीं रावबहादूर सुर्वे दिवाण आले व ते दिवाणपदावर आल्यापासून त्यांनीं मांडलिक संस्थानांच्या बाबतींत आपला करडा अंमल सुरू केला आहे. त्यांच्या कारकीर्दींत मांडलिकांच्या हक्कावर झालेल्या आघातांची संख्या जरी

मोठी असली तरी त्यांपैकीं कांहीं मुख्य उदाहरणें मासल्याकरितां पुढें दिलेलीं आहेत:—

सन १९३१ च्या मे महिन्यांत सर्व करवीर राज्याकरितां एक हायकोर्ट स्थापन करून हायकोर्टाचा कायदा लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशीं पास केला व तो मांडलिक संस्थानिकांनाही लागू करून त्यांचीं व त्यांचे संस्थानांतील सर्व कोर्टें या नवीन हायकोर्टास ताबेदार केलीं. ही गोष्ट आजपर्यंतच्या सरकारच्या ठरावांच्या व सन १८६२ च्या तहनाम्याविरुद्ध झाली, हें मागें दिलेल्या माहितीवरून सहजीं लक्षांत येणार आहे. करवीर दरबारला कोणताहि कायदा आपल्या स्वतःच्या अधिकारांत मांडलिक संस्थानांत लागू करितां येत नाहीं व नवीन कायदा लागू करतांना कोणते नियम पाळले पाहिजेत याजबद्दल मुंबई सरकारनें सन १९०० सालीं नियम करून दिलेले होते. त्या नियमांचें दरबारनें उल्लंघन केलें असल्यानें व या कायद्यानें त्यांच्या ग्यारंटी केलेल्या दिवाणी फौजदारी अधिकारांवर अतिक्रमण होत असल्यानें मांडलिकांनीं या नवीन हायकोर्ट-घटनेच्या कायद्याविरुद्ध जोराची तक्रार केली. तेव्हां हिंदुस्थान सरकारच्या सल्ल्यावरून रेसिडेंट-साहेब यांनीं या कामीं मध्यस्ती केली व दरबार व मांडलिक संस्थानें यांचे प्रतिनिधी या उभयतांनीं आपापसांत वाटाघाट करून या नवीन कायद्यानें मांडलिकांच्या दिवाणी व फौजदारी हक्कांवर नवीन हायकोर्टाकडून अतिक्रमण होणार नाहीं अशा दुरुस्त्या सुचविल्या व त्या हिंदुस्थान सरकारनें मंजूरही केल्या, आणि त्याप्रमाणें दरबारनें गेल्या सालीं जाहीरनामेही काढले. पण या दुरुस्त्या पुन्हां दप्तरांतच राहिल्या व नवीन हायकोर्टाकडून मांडलिकांच्या अधिकारांत ढवळाढवळ पूर्वीप्रमाणें करण्याचें काम चालू आहे. उदाहरणार्थ, या नवीन जाहीरनाम्याप्रमाणें मांडलिक संस्थानांतील कोर्टांवरील कोल्हापूर हायकोर्टाची देखरेख व ताबा ( superintendence and control) कमी करून तीं कोर्टें ज्या त्या मांडलिकांच्या ताब्यांत आहेत

असें ठरलें होतें. दुसरी गोष्ट अशी ठरली होती कीं दिवाणी कज्याचा वर्ग अगदीं महत्त्वाचें कारण असल्याखेरीज मांडलिकांच्या कोर्टाकडून करूं नये आणि हा वर्ग करण्याचा प्रसंग आल्यास त्यास तसेंच सबळ कारण आहे, याची दरबारच्या पोलिटिकल खात्यानें प्रथम आपली खात्री करून घ्यावी व तशी खात्री झाल्यास मग तें प्रकरण विचार करण्याकरितां हायकोर्टाकडे पाठवावें; तसेंच फौजदारी कामांत ज्यांना हायकोर्टाचे देख-रेखीपासून माफी दिलेचे अधिकार १९०५ च्या जाहिरनाम्यानें मिळाले आहेत, त्यांच्या बाबतींत तर हायकोर्टाला कांहीं करतांच येणार नाहीं. ( असें आतां विशाळगडकर व इचलकरंजीकर हे दोघेच मांडलिक हयात आहेत. ) पण इतर मांडलिकांच्या बाबतींतही मांडलिक संस्थानांतील सर्व कोर्टांकडून कायदेशीर दाद मागण्याचे सर्व मार्ग संपल्यानंतर पक्षकारानें या अखेरच्या निकालाविरुद्ध श्रीन्महाराज सरकारच्या हायकोर्टाकडे जरूर तर दाद मागण्याची आहे. अशा या महत्त्वाच्या दुरुस्त्या सन १९३१ सालच्या हायकोर्टाच्या कायद्यांत झालेल्या असून देखील कोल्हापूर हायकोर्टाकडून दिवाणी व फौजदारी कामांत नेहमीं ढवळाढवळ होत असते. उदाहरणार्थ, इचलकरंजी कोर्टांतील आठ दिवाणी दाव्यांचे कागद वर्ग करण्याचे अर्जावरून हायकोर्टाकडून मागविण्यांत आले असून त्या-विरुद्ध तक्रार केली असतां हायकोर्टाचा हुकूम वाजवी असल्याचें दरबारकडून लिहून आलें आहे असें कळतें. विशाळगड संस्थानांतील एका दिवाणी दाव्याचा वर्ग विशाळगड कोर्टातून करवीरच्या फर्स्ट क्लास सब-जज्जाचे कोर्टांत करण्यांत आलेला आहे, असें समजतें.

फौजदारी कामांत तर करवीर हायकोर्टाची ढवळाढवळ प्रत्यहीं चाल-लेली आहे. नवीन हायकोर्ट स्थापन झाल्यापासून आतांपर्यंत इचलकरंजी संस्थानचें उदाहरण घ्यावयाचें झाल्यास शेंकडों फौजदारी कामांत हाय-कोर्टानें अनाधिकारी नात्यानें अपिलें अगर तपासणी अर्ज घेऊन कज्याचे कागद मागविले आहेत असें म्हणतात. कांहीं कज्यांत तर कज्या चालूं

असतानांच तहकुबीचा हुकूम देऊन आरोपीस जामिनावर सोडण्याचे हुकूम झालेले आहेत. ब्रिटिश मुलुखांत हायकोर्टाकडून अशा प्रकारची ढवळाढवळ ताबे कोर्टाच्या कामांत क्वचितच झाल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. आणि इचलकरंजी जहागिरीच्या बाबतींत तर तेथील अधिपतींना करवीर छत्रपतींकडून सन १९०५ सालीं हायकोर्टच्या देखरेखीपासून माफी (ज्याचा अर्थ मुंबई सरकारानें हायकोर्टाचे जरूर ते सर्व अधिकार असा केलेला आहे ती) मिळालेली आहे. आणि सुपरव्हिजन नोटिफिकेशनप्रमाणें व तशाच दुरुस्त झालेल्या हायकोर्टाच्या कायद्याप्रमाणें इचलकरंजी कोर्टांतील अखेर ठरावांवर फक्त खुद्द श्रीमन्महाराज सरकारकडे पोलिटिकल रिव्हिजन घेण्याचा तेवढा अधिकार राखून ठेवलेला आहे. असें असतांना देखील प्रत्यहीं वरील प्रकारचे ढवळाढवळीचे प्रयत्न एकसारखे होत आहेत असें कळतें.

हायकोर्टखेरीज दिवाणी व फौजदारी कामांतसुद्धां ढवळाढवळ करण्याची दुसरी एक सत्ता करवीर दरबारांत वास करीत आहे आणि ती म्हणजे सर्वाधिकारी प्राइम मिनिस्टर साहेब यांची होय. हायकोर्टला निदान सिव्हिल व क्रिमिनल प्रोसिजर कोडचें बंधन आहे, पण प्राइम मिनिस्टरचे हुकुमावर "हुजूर आज्ञेवरून" असा शिक्का बसला कीं तो कोणत्याही कायद्याचें बंधन मानीत नाहीं. यामुळें मांडलिक कोर्टाच्या दिवाणी व फौजदारी अधिकारांत अमर्याद ढवळाढवळ होत असते. *इचलकरंजीपैकीं आजरें मुन्सिफ कोर्टांत हाळोलीचे* इनामदार नाडगोंडे यांजवर त्यांचे सावकारानें लावलेले बरेच दिवाणी दावे व दरखास्तीचीं कामें चालूं आहेत. तसेंच त्या इसमावर मामलेदार कोर्टांत चालूं वहिवाटीच्या व मदतीच्या फिर्यादी चालू आहेत आणि त्यांचे चिरंजिवानें आपल्या गांवच्या एका माणसास मारहाण केली म्हणून आजरेच्या मॅजिस्ट्रेट कोर्टांत एक फौजदारी फिर्याद सन १९३१ सालीं दाखल झालेली होती. पण आपण कदीम इनामदार असल्यानें आपले दावे

हागीर कोर्टांत चालूं नयेत, आपणास तिथें न्याय मिळणार नाहीं अशा कारची त्यानें तक्रार केली व ती दरबारला पटून तावडतोब हे सर्व वाणी दावे, दरखास्ती व फौजदारी काम ताबडतोब तहकूब ठेवून ज्याचीं कामें दरबारकडे पाठवावीत असे "हुजूर आज्ञेवरून" म्हणून प्राइम निस्टर यांनी हुकूम सोडले व हल्लीं तीं सर्व कामें बंद पडलेलीं आहेत. वढेंच नव्हे तर, दरखास्तींच्या कामीं दरबारचे हुकूम येण्यापूर्वीं जो माल त झालेला होता, तोही इनामदाराला परत करण्याचा हुकूम झालेला आहे. या इनामदाराचें गांव आज दोन शतकें इचलकरंजीच्या अंमलाखालीं हे व ज्याच्या पूर्वजांचे व स्वतःचे दावे इचलकरंजी कोर्टांत आजतागा त चालत असत, तो इनामदार एकाएकीं दरबारच्या दृष्टीनें इचलकरंजी र्टाच्या अधिकारकक्षेच्या बाहेर कसा ठरतो हें कळत नाहीं. आणि हीं जीं मेें दरबारनें मागवून नेलीं आहेत, तीं गेलीं ७|८ वर्षें त्यांचा निकाल न तां तिथेंच पडून आहेत. ब्रिटिश हायकोर्टांत वर्गाचे अगर तहकुबीचे अर्ज तकीं वर्षें निकाल न होतां पडल्याचें उदाहरण सांपडेल असें वाटत नाहीं.

आजरें येथें सन १९३४ सालीं मुसलमानांचा दंगा होऊन तो मोड याकरितां इचलकरंजीच्या अधिकाऱ्यांना गोळीबारही करावा लागला. ा कामीं करवीर दरबारच्या कमिशनमार्फत चौकशी होऊन त्या कामीं ोळीबार करणें जरूर असलें, तरी तो वाजवीपेक्षां अधिक केला असा ाचा निकाल होऊन त्यावेळीं हजर असलेले पांच व हजर नसलेले क असे सहा अंमलदार बडतर्फ करण्याचा व दंग्यांत मयत झालेले समांच्या वारसांस नुकसानभरपाई देण्याचा दरबारनें हुकूम केला. या ्कुमाविरुद्ध हिंदुस्थान सरकारकडे अपील होऊन सन १९२७ सालीं गोळी-ार करणारे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांना पेन्शन देण्याचा व इतर बडतर्फ ालेल्या अधिकाऱ्यांना कामावर घेण्याचा व नुकसानभरपाईपैकीं अर्धी कम करवीर दरबारनें इचलकरंजी संस्थानला देण्याचा हुकूम झाला व ा हुकुमाप्रमाणें पूर्वींचे अंमलदार कामावर रुजूं झाले. यांपैकीं एक

मुनसफ असून एक डिस्ट्रिक्ट व सेशन जज्ज आहेत. परंतु या अंमलदारांच्या कोर्टांत आजरें मुसलमान लोकांचीं कामें चालूं नयेत, कारण त्यांना न्याय मिळणार नाहीं अशी तक्रार या मुसलमानांपैकीं कांहीं जणांनीं सन १९३९ सालीं केली व त्यावरून एक दिवाणी दावा व एक, सेशन्सचा कज्जा असे कज्जे तहकूब ठेऊन त्याबाबत खुलासे विचारण्यांत आले आहेत. याचा अर्थ ज्या मॅजिस्ट्रेटानें एकाद्या आरोपीस एकवार शिक्षा दिली असेल, अथवा एखाद्या मुनसफानें एखाद्याचा दावा त्याच्या विरुद्ध केल्यास, हे दोन्हीही अधिकारी इतःपर सदरहू पक्षकारांविरुद्ध कोणतेंही फौजदारी अगर दिवाणी काम चालविण्यास नालायख ठरतात असेंच म्हटलें पाहिजे. आणि दरबारची ही विचारसरणी मान्य केल्यास प्रत्येक इसमाच्या दाव्यागणिक नवीन इसम नेमावा लागेल !!!

या बाबतींतील अगदीं ताजें उदाहरण म्हणजे इचलकरंजी येथील सामानगडकर खटल्याचें होय. हा गृहस्थ एक विमा एजंट असून त्यानें बऱ्याच गरीब लोकांना फसवून त्यांचेकडून विम्याच्या हप्त्याचे वगैरे पैसे घेऊन त्याचा अपहार केला. तेव्हां त्याचेविरुद्ध दोन इसमांनीं फौजदारींत विश्वासघाताच्या फिर्यादी दिल्यावरून त्यास रीतसर अटक करण्यांत आली व मॅजिस्ट्रेटनें त्यास जामिनावर सोडलें; पण त्यास जामीन न मिळाल्यानें तो कांहीं दिवस अटकेंत राहिला. तेव्हां त्याचे भावानें आपल्या भावावर खोटे खटले केले आहेत असा करवीर दरबारकडे अर्ज केला व तावडतोब प्राइम मिनिस्टरकडून त्यास जामिनावर नव्हे, तर जातमुचलक्यावर खुलें करावें व कज्याचे कागद पाठवावेत असा 'हुजूर आज्ञेवरून' हुकूम आला. वास्तविक या दोन्ही कज्यामध्यें जो लेखी पुरावा हजर झालेला आहे, तेवढ्यावरून आरोपीचें कृत्य विश्वासघाताचें असल्याचें स्पष्ट होत असतांना अशा खटल्यामध्यें सुद्धां जर असा वेळीं अवेळीं दरबारकडून हस्तक्षेप होऊं लागला, तर मांडलिकांच्या राजवटींतील राज्यकारभाराचा बंदो-

बस्त तरी कसा राहणार व खुद्द मांडलिकांचा बोज तरी कितपत रहाणार ? इंग्रज सरकारनीं हल्ली करवीर दरबारच्या बाबतीत पूर्णपणें डोळेझांक केली असल्याने मांडलिकाना अशा या दरबारच्या दंडपशाही धोरणाविरुद्ध व त्यानी केलेल्या अनधिकारी अतिक्रमणाविरुद्ध रेसिडेंट-साहेबाकडे केवळ अर्पिलें करण्यापलिकडे दुसरा मार्गच राहिलेला दिसत नाहीं.

कदीम इनामदारावरील तावा व कदीम इनामासंबधींचे अधिकार या-संबधींचा वाद कै शाहूमहाराजाच्या वेळेपासून दरबार व कागल थोरली पातीखेरीज इतर मोठे मांडलिक (विशाळगड, बावडा व इचलकरंजी) यांचे-मध्यें चालू होता व तो मुंबई सरकारच्या मध्यस्तीनें सन १९३२ सालीं मिटला त्यावेळीं मुंबई सरकारनें असा ठराव केला कीं महाली हक्कदार खुतातील इनामदार (देसाई, देशपांडे, देशमुख) यांचे वारसाचौकशीचे ठराव तेवढे दरबारनें करावेत व हे वारसा ठराव करण्याचे अधिकाराखेरीज बाकी कदीम इनामासंबधाचे सर्व हक्क म्हणजे गाव हक्कदार खुतातील जे इनामदार ( पाटील, कुलकर्णी, सनदी, बलुतेदार, महार तराळ, देवस्थान वगैरे ) असतील, त्यांच्यावरील पूर्ण तावा व त्यांचे वारसा–ठराव वगैरे करणें, महाली व गाव हक्कदार खुतातील इनामदाराच्या वारसासंबधीं नजराणा, नोकरीअंश, बेवारशी मिळकतीवरील वगैरे सर्व हक्क कर-वीर दरबारनें या मोठ्या मांडलिक संस्थानिकाना सुपूर्त करावेत हा ठराव होण्यापूर्वी जे निकाल मांडलिकानी केले असतील त्यात करवीर दरबारने ढवळाढवळ करूं नये व कदीम आणि जदीद इनामासंबधीं मांडलिकाच्याकडून काहीं अन्याय झाल्यास त्याचे जे अखेरचे निकाल होतील, त्याविरुद्ध जरूर तर पक्षकारानी श्रीमन्महाराज सरकारकडे दाद मागावी

अशा प्रमाणे ठराव होऊन त्याप्रमाणे करवीर दरबारने कदीमचे हक्क मोठ्या मांडलिकाना दिल्याबद्दल जाहीरनामाही ( नंबर ६१/१९३२ ) प्रसिद्ध केला. कागल थोरल्या पातीच्या बाबतींत सन १८८३ सालीं मुंबई

सरकारचा ठराव होऊन महाली व गांव हक्कदार असे दोन्हीही सुतांतील कदीम इनामदारांवर कागलकरांचा पूर्ण ताबा व हक्क आहे असें ठरलें होतें. या ठरावावर शाहूमहाराजांनीं आपल्या २८ वर्षांच्या कारकीर्दींत अथवा राजाराममहाराजांनींही कै. श्री. बापूसाहेब कागलकर हयात असतांना अपील वगैरे कांहीं केलें नाहीं; पण श्री. बापूसाहेब कागलकरांच्या पश्चात् अज्ञान कारकीर्दीचा फायदा घेऊन सन १९३२ च्या जाहीरनाम्यांत कागल सिनियरचेंही नांव गोवण्यांत आलें व हल्लींचे कागळ अधिपतींचे आजोबांनीं जे हक्क करवीर दरबारबरोबर मुंबई सरकारापर्यंत भांडून सन १८८३ सालीं मिळविले होते, ते ५० वर्षांच्या उपभोगानंतर दरबारनें त्यांच्या अज्ञानावस्थेंत काढून घेतले ! या ठरावावर सध्यांच्या श्री. कागलकरांनीं अपील केलेलें असणारच !

कदीमासंबंधींचा जाहीरनामा सन १९३२ सालीं काढल्यानंतर त्याचे अर्थाबद्दल वाद सुरू झाला व हल्लीं हा जाहीरनामा पुन्हां सुप्तप्रायच राहिला असून करवीर दरबार त्यांत असंदिग्धपणें ठरलेल्या गोष्टींत देखील त्या जाहीरनाम्याप्रमाणें वागत नाहीं. उदाहरणार्थ, कोणत्याही-प्रकारचें इनाम असो, त्याजवरील वारसा, नजर, नोकरी अंश व नष्टांश झाल्यास तें इनामी उत्पन्न मोठे मांडलिकांना मिळालें पाहिजे असा स्पष्ट ठराव झालेला असतांना इचलकरंजी संस्थानपैकीं हाळोली, मेंढोली व उचंगी याचे वारसा ठराव दरबारनें करून त्यांचेवरील वारसा-नजर, नोकरीअंश हा तर कदीम जाहीरनाम्याच्या विरुद्ध स्वतःकडे घेतलाच, पण या तीन्हीही इनाम गांवाकडून आज दीडशें दोनशें वर्षें जुडी, बावती सरदेशमुखी वगैरे ज्या रकमा इचलकरंजीकरांना अव्याहत मिळत असत व ज्याबद्दल अज्ञान कारकीर्दींत पोलिटिकल एजंटचे ठरावही इचलकरंजीकरांतर्फे झालेले आहेत, अशा बाबी जप्त करून त्या बाबीवरील हक्क शाबित करण्याबद्दल इचलकरंजीकरांना दरबारनें फर्मा-विले आहे. तसेंच या तिन्हीही गांवांवरील ताबा ( मुलकी, दिवाणी

व फौजदारी ) इचलकरंजीकरांना कसा पोंचतो असा एक नवीनच प्रश्न उपस्थित केलेला असून इनाम गांवावरील मांडलिकांचा ताबाही आस्ते आस्ते काढून घेण्याचा प्रयत्न चालू आहे. या दरबारच्या दंडेलीविरुद्ध इचलकरंजीकरांनीं अपिलें केलीं असून तीं दरबारच्या दप्तरांत वर्षानुवर्षें पडून आहेत असें कळतें.

कुलकर्णी व पाटील वतनावरील पूर्ण ताबा मोठे मांडलिकांना सन १९३२ च्या जाहीरनाम्यानें दिलेला आहे. त्यास अनुसरून इचलकरंजी येथील पोलिस पाटील वतनाचा ठराव इचलकरंजीकरांनीं केला होता. त्या ठरावाविरुद्ध महाराज सरकारकडे विरुद्ध पक्षकारानें अर्ज करितांच सदरहू उत्पन्न जप्त करून सरकार ताब्यांत घेण्याबद्दल व पोलीस पाटील कामावर सरकारतर्फे इसम नेमण्याबद्दल अलिकडे एकतर्फी हुकूम झालेला आहे. तसेंच शिरढोण येथील कुलकर्णीवतनासंबंधानेंही असाच एकतर्फी हुकूम झालेला आहे. कदीम जाहीरनाम्यान्वयें महाराज सरकारकडे जे अर्ज करावयाचे ते पोलिटिकल रिव्हिजन या नात्यानें घ्यावयाचे असतांना करवीर दरबार मात्र कोणताही अर्ज आला कीं त्याची चौकशी आपले ताबे कोर्टावरील अपील कोर्टाप्रमाणें करतें व मांडलिकांचें म्हणणें काय आहे अथवा कामांतील गुणदोष काय आहेत याबद्दलची चौकशी न करतां एकतर्फी व सक्तीचे हुकूम सोडीत असतें. सुपरव्हिजन नोटिफिकेशनमध्यें सुपरव्हिजनचा अंमल कोणत्या तत्त्वानें व कोणत्या नियमास अनुसरून केला जाईल याजबद्दल पूर्वीं नमूद केल्याप्रमाणें ब्रिटिश सरकारनें स्पष्ट नियम घालून दिले आहेत. तसेंच सुपरव्हिजनचा अधिकार चालवितांना ब्रिटिश सरकार ज्या पद्धतीनें सातारा व दाक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिकांवर सदरचे अधिकार चालवितें, तीच पद्धत व तेच नियम आपणही पाळूं व आपले मांडलिकांना विश्वासानें व सहानुभूतीनें वागवून त्यांना व त्यांचे राज्यकारभारास जरूर ती मदत व दुजोरा देऊं अशा प्रकारचीं स्पष्ट अभिवचनें ब्रिटिश सरकारला दरबारनें सन १९३० सालीं दिलेलीं असून प्रत्यक्ष अंमल मात्र याच्या अगदीं उलट होत आहे.

विशाळगड संस्थानांतही कदीमसंबंधीं दरबारनें वरीलप्रमाणेंच दंडेलीचें धोरण स्वीकारलें आहे हें खालील उदाहरणावरून स्पष्ट होईल:

कुंभवडे इनामगांवचा इनामदार बेवारस मयत होऊन मूळ संपादकाचे घराण्यांतील कोणी वारस नसल्यानें त्याचा नष्टांश झाला आणि ही देणगी जदीद असल्यानें विशाळगड संस्थाननें सन १९१२ सालीं हें गांव वारसा चौकशीचे नियमाप्रमाणें खालसा केलें. या ठरावावर दूरच्या भाऊबंदांनीं पोलिटिकल एजंटकडे अपील केलें, त्यावरून तें काम सन १९१२ सालीं दरबारच्या अभिप्रायाकरितां पाठविलें व दरबारनें सदरहू काम आज २७।२८ वर्षें आपल्या दप्तरांत बांधून ठेविलें आहे.

निळें म्हणून दुसरें एक इनाम गांव विशाळगड संस्थानांत असून या गांवची देणगी जदीद म्हणजे खुद्द विशाळगडकरांची आहे असा निकाल मुंबई सरकारनें सन १८५७ सालीं दिलेला आहे. पुढें या इनामदाराचा नष्टांश झाला आणि मूळ संपादकाच्या घराण्यापैकीं कोणी वारस राहिला नाहीं तेव्हां त्या कुटुंबांतील शेवटच्या विधवा बाईनें पराई इसम दत्तक घेण्याची परवानगी मागितलीं असतां ती विशाळगडकरांनीं नाकारली. सदरहू इनामदाराला कोल्हापूर हद्दींतही अगदीं जुजबी उत्पन्न इनाम आहे, तेव्हां त्या बाईनें दरबारकडे दत्तकास परवानगी मागितली व दरबारनें पराई इसमास दत्तक घेण्यास परवानगीही दिली. करवीर दरबार आपल्या हद्दींतील उत्पन्नाबद्दल कशीही व्यवस्था करण्यास मुखत्यार आहे; पण आपण ज्या पराई इसमास दत्तक घेण्यास परवानगी दिलेली आहे त्याच दत्तक मुलग्यास विशाळगडकरांनींही मान्यता देऊन विशाळगड हद्दींतील इनामगांवही त्याच दत्तकाकडे चालविलें पाहिजे, एवढेंच नव्हे तर, मुंबई सरकारनें जी देणगी सन १८५७ सालीं जदीद ठरविली, तो ठराव चुकीचा असून सदरहू देणगी कदीम आहे आणि म्हणून या उत्पन्नासाठीं दत्तकास परवानगी देण्याचा हक्कच मुळीं विशाळगडकरांना प्राप्त होत नाहीं असें हल्लीं दरबारचें म्हणणें आहे. यावरून सुपरव्हिजन

नोटिफिकेशनमध्यें ब्रिटिश सरकार व रेसिडेंट यांचे पूर्वी झालेले व पुढें होणारे ठराव आपण मान्य करूं असें दरबारनें सरकारला सन १९३० सालीं जें अभिवचन दिलेलें आहे, त्याची मातब्बरी काय राहिली तें उघड होत आहे.

विशाळगड संस्थानांत महागांव म्हणून एक खालसा गांव असून सदरहू गांवांतील देसगत इनाम जमिनींतून पूर्वापार जो सार्वजनिक रस्ता जात होता तो रस्ता इनामदारानें नांगरून रस्त्याची जमिन आपल्या शेतांत सामील करून घेतली. तेव्हां रीतसर पंचनामा व चौकशी होऊन लँड रेव्हिन्यू कोडच्या ६१ कलमाखालीं आतिक्रमण करणाऱ्या इनामदारांना मुलकींतून दंड करण्यांत आला; पण या इनामदारांपैकीं एकजण महाराज सरकारचे असिस्टंट प्रायव्हेट सेक्रेटरी व दुसरे दरबारचे असिस्टंट फॉरेस्ट ऑफिसर पडले, तेव्हां कदीम इनामासंबंधीं आतिक्रमण झाल्यास त्याची चौकशी करण्याचा अधिकार जहागिरीस पोंचत नाहीं, या सबबीवर विशाळगडकरांनीं केलेल्या ठरावाची अंमलबजावणी तावडतोब तहकूब करून जहागिरींत चाललें काम निकालाकरितां मागविलें आहे. याबद्दल विशाळगडकरांनीं तक्रार केली आहे पण त्याची दाद कोण घेणार ?

सन १८६२ च्या तहापूर्वी व या तहनाम्यानंतरही मांडलिकाचे वकील पोलिटिकल एजंटाचे दरबारांत असत व त्यांचेमार्फत पोलिटिकल एजंटाशीं मांडलिकांचा पत्रव्यवहार चालत असे. ही जी पद्धत १८८० च्या सुमारास बंद झाली तेव्हांपासून पोलिटिकल एजंटाचा पत्रव्यवहार प्रत्यक्ष मांडलिकांच्याबरोबर होऊं लागला. अशी पूर्वापार वहिवाट असतांना सन १९३२ च्या मे महिन्यांत करवीर दरबारनें असा जाहिरनामा ( नंबर २ ता. १४ मे १९३२ ) काढला कीं, ज्याअर्थी ब्रिटिश सरकाराकडून दरबारकडे प्रायमरी सुपरव्हिजन देण्यांत आलेली आहे, त्याअर्थी यापुढें मांडलिक संस्थानिकांचा रेसिडेंटसाहेबांशीं होणारा पत्रव्यवहार सर्वसाधारणपणें दरबारच्या मार्फत केला जावा. इंग्रजी अंमल सुरूं झाल्यापासून

आज तागायत शंभरसव्वाशें वर्षें ब्रिटिश सरकारच्या प्रतिनिधीशीं प्रत्यक्ष पत्रव्यवहार करण्याचा व त्याचा वेळोवेळीं सल्ला घेण्याचा मांडलिक संस्थानिकांचा फार प्राचीन हक्क होता, तो असा एकाएकीं व एकतर्फी निघालेल्या जाहीरनाम्यानें हिरावून घेतल्यानें मांडलिकांचें अपरिमित नुकसान झालें आहे व दरबारच्या या हुकुमाविरुद्ध सर्वही मांडलिकांनीं जोराची तक्रार केली पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. आणि या जाहिरनाम्यानंतर मांडलिकांची स्थिति " आई जेऊं घालिना व बाप भीक मागूं देईना " अशी झाली. कारण करवीर दरबारचें मांडलिकांच्या हक्कावर अतिक्रमण प्रत्यहीं चाललें होतें, पण त्याचेविरुद्ध तक्रार अगर अपील अर्ज रेसिडेंटकडे करावयाचा तो दरबारचे मार्फतच करावयाचा असल्यानें दरबारास सदरचे अर्ज अगर अपिलाचीं कामें आपल्या दप्तरीं पाडून ठेवण्यास नामी संधि मिळाली. आणि याचा परिणाम असा झाला आहे कीं दरबारच्या हुकुमाविरुद्ध मांडलिकांनीं रेसिडेंट व हिंदुस्थान सरकार यांचेकडे केलेलीं शेंकडों अपीलें वर्षानुवर्षें दरबारच्या दप्तरखान्यांत धूळ खात पडून आहेत. दरबार अगर रेसिडेंट अथवा हिंदुस्थान सरकारच्या ठरावावर मांडलिकांनीं अपील करावयाचें झाल्यास त्यास अनुक्रमें तीन व सहा महिने अशा मुदतीचें बंधन आहे; उलट दरबारला मात्र मांडलिकांच्याकडून आलेलें अपील कांहीं एका विवक्षित मुदतींत रेसिडेंटकडे रवाना केलें पाहिजे, याजबद्दल कांहींही मुदतीचें बंधन नसल्यानें व रेसिडेंटसाहेबही त्यांना वर्षानुवर्षें अपिलें कां पाडून ठेविलीं आहेत याजबद्दल एका शब्दानेंही विचारित नसल्यानें या बाबतींत मांडलिकांची अगदीं अनुकंपनीय स्थिति झाली असल्यास नवल नाहीं. संस्थानांतील कोणत्याही साध्या प्रजाजनांस दरबारच्या हुकुमाविरुद्ध रेसिडेंट, व्हाईसराय अगर सेक्रेटरी ऑफ स्टेटकडे जी दाद प्रत्यक्ष अर्जानें मागतां येते, ती दाद, दरबारमार्फत न जातां, मांडलिकांना, प्रत्यक्षपणें मागतां येऊं नये हें विचित्र नव्हे काय ?

मांडलिक संस्थानांत जे कायदे लागूं आहेत ते सन १८८८ सालीं लागूं केले असल्यानें ते फार जुने आहेत व हल्लींच्या बदललेल्या परिस्थितीस ते लागू पडणारे नसल्यानें व ब्रिटिश हिंदुस्थानांत अलिकडे बरेच नवे कायदे झाले असल्यानें त्यांपैकींही जरूर ते कायदे लागूं करण्याबद्दल मांडालिक संस्थानांकडून दरबारकडे सन १९०९ सालापासून वेळोवेळीं लिहिण्यांत आलेलें असून आजवर त्याबाबत कांहींही हुकूम झालेले नाहींत.

डिस्ट्रिक्ट पोलिस अ‍ॅक्ट, मोटार व्हियिकल अ‍ॅक्ट, पब्लिक कनव्हेअन्स अ‍ॅक्ट, इंडियन कंपनीज अ‍ॅक्ट, स्टांप अ‍ॅक्ट, लोकलफंड, स्टांप अ‍ॅक्टची दुरुस्ती, रेकॉर्ड ऑफ राइट अ‍ॅक्ट वगैरे सारखे अ‍ॅक्ट लागू करण्याबद्दल मागणी करून परवानगी मिळत नाहीं. याबाबत रेसिडेंटकडे अपील केलें तरी निकाल लागत नाहीं अशी परिस्थिति आहे. आणि खुद्द कोल्हापुरांत जे कायदे लागू आहेत, ते जहागिरींत लागू करण्यास दरबार परवानगी देत नाहीं हें विशेष होय.

पूर्वीं मांडलिक संस्थानें आपापला गांजा तयार करीत असत, पण सर्व करवीर राज्यांत अबकारीची पद्धत एकच असावी म्हणून सन १९०५ सालीं ब्रिटिश सरकारच्या सल्ल्यावरून मांडलिक संस्थानांकरितां गांजा तयार करून तो मक्तेदारांना पुरविणें व या बाबतींत लायसेन्स ड्यूटीचें वगैरे मांडलिकांचें जें नुकसान होईल, त्याजबद्दल प्रत्येकास मुंबई सरकारनें दाक्षिण महाराष्ट्रांतील व इतर संस्थानांतील गांजा ड्यूटीबद्दल जे नियम केले आहेत, त्याच पद्धतीवर आपल्या मांडलिकांना दरसाल नुकसानभरपाई देण्याचें दरबारनें सन १९०५ सालीं कबूल केलें. पण या नुकसानभरपाईची रकम दरबारकडून मिळेना, म्हणून मांडलिकांनीं बऱ्याच तक्रारी केल्या. तेव्हां वीस वर्षांनीं दि. ब. लठ्ठे यांच्या कारकीर्दींत त्यांना नुकसानभरपाईची रकम मिळाली; पण ती देतांना त्यांपैकीं ½ रकम आपल्या व्यवस्थेच्या खर्चाकरितां म्हणून दरबारनें कापून घेतली. ही रकम मुंबई

सरकार १/१३ घेत असतां दरबारनें त्या प्रमाणापेक्षां जास्त प्रमाणांत कापून घेतली ती आपणास परत मिळावी म्हणून मांडलिकांनीं सन १९२९ सालीं तक्रारी केल्या असून तीं कामें दरबारकडून अद्याप तशींच तजविजीविना पडलेलीं आहेत.

करवीर दरबारच्या पन्हाळा पेटयापैकीं ३७ गांवांत, गांवच्या वसुलापैकीं २/५ वसूल विशाळगडकरांना मिळण्याचा अनादिकालापासून हक्क आहे व या हक्कास " पंचद्वयी " असें म्हणतात. दरबारचें म्हणणें या गांवच्या वसुलापैकीं २/५ वसूल मिळण्याचा हक्क विशाळगडला नसून प्रत्येक गांवच्या वसुलापैकीं कांहीं ठराविक रकम गांवनिहाय देण्यांत येईल. या उभयतांमधील वादास सन १८६० सालीं प्रथमतः सुरवात झाली व त्याचा निर्णय सन १८६१ सालीं त्या वेळच्या पोलिटिकल एजंटनें असा केला कीं या ३७ गांवांपैकीं १४ गांवांत विशाळगडकर म्हणतात त्याप्रमाणें गांवच्या वसुलापैकीं २/५ वसूल त्यांना मिळणें जरूर आहे; बाकीचीं जीं २३ खेडीं राहतात, त्या बाबतींत वरीलप्रमाणें हक्क असल्याबद्दल विशाळगडकरांनीं आपला पुरावा सादर करावा. त्याप्रमाणें सन १८६२ सालीं हल्लींच्या प्रतिनिधींच्या वडिलांनीं आपला पुरावा हजर केला पण त्यांच्या हयातींत त्या कामाचा निकाल झाला नाहीं. हल्लींचे प्रतिनिधि सन १८९१ सालीं मुखत्यार झाले व त्यांनीं या कामास पुन्हां सुरवात केली. त्यांचें म्हणणें हा वाद आपल्या व दरबारच्या दरम्यान दिवाणी स्वरूपाच्या बाबीबद्दल असल्यानें त्याचा निकाल दरबारनें न करतां सन १८६२ च्या तहनाम्याच्या सातव्या कलमाप्रमाणें रेसिडेंट व करवीर दरबारचे चीफ जज्ज या उभयतांच्या जॉईंट कोर्टापुढें काम चालून व्हावा. पण त्यांत त्यांना यश न येतां त्याचा निकाल प्रथमतः दरबारनें करावा असा रेसिडेंटसाहेबांनीं सल्ला दिला व त्याप्रमाणें करवीर दरबारच्या न्यायासनासमोर आपला पुरावा मांडण्याची विशाळगडनें तयारी केली. इतक्यांत ज्या १४ गांवांबद्दल सन १८६१

सालीं पोलिटिकल एजंटांनी विशाळगडकरांसारखा निकाल देऊन त्या निकालावरहुकूम दरसाल विशाळगडकरांना वसूल मिळत होता, त्या ठरावाचा अंमल तहकूब करून पुन्हां सर्वही ३७ गांवांवरील आपल्या हक्काबद्दल विशाळगडकरांनीं पुरावा सादर करावा असा कै. शाहू महाराजांनीं सन १९०८ सालीं हुकूम दिला. म्हणजे वरिष्ठ कोर्टानें ४७ वर्षांपूर्वीं दिलेल्या हुकुमास करवीर दरबारनें आपल्या अधिकारांत लेखणीच्या एका फटकाऱ्यासरशी धाब्यावर बसविलें. यानंतर हें काम तक्रारीकरितां सन १९२८ सालीं आलें व त्यावेळीं विशाळगडकरांतर्फे मुंबईचे प्रसिद्ध बॅरिस्टर ओगार्मन यांनीं दिवाण लठ्ठे यांचेसमोर तक्रारी मांडल्या. तक्रारी होऊन एक वर्षानें ज्या तोंडी तक्रारी केल्या होत्या, त्या लेखी लिहून देण्याबद्दलचा दरबारचा हुकूम झाला व त्याप्रमाणें लेखी तक्रारी विशाळगडकरांनीं सन १९२९ सालीं दिल्या. तेव्हांपासून गेलीं दहा अकरा वर्षें ठराव लिहिण्यावर हें काम हल्लींच्या दिवाणांपुढें पडून आहे.

वरीलप्रमाणेंच बावड्याचे पंत अमात्य व इचलकरंजीकर यांचे दरम्यान दोन इनाम गांवांबद्दल वाद असून दि. ब. लठ्ठे दिवाणांनीं सन १९२६।२७ सालीं उभयतांच्या तक्रारी ऐकून घेतल्या आहेत, पण तें काम अद्याप निकाल देण्यावर गेलीं १२ वर्षें पडून आहे.

सन १९३२ सालीं रेसिडेन्सीबरोबर प्रत्यक्षपणें पत्रव्यवहार करण्याचा मांडलिकांचा हक्क हिरावून घेतल्यानंतर त्यांच्या बाबतींत "हम करेसो कायदा" याप्रमाणें स्वैर वर्तन करण्यास दरबारास पूर्ण वाव मिळाला व त्याचें पहिलें दृश्य फल म्हणजे या सालीं दरबारनें मांडलिकांच्या खजिन्यावर केलेलें आक्रमण हें होय. करवीर राज्याचें संरक्षण व संगोपन पंत अमात्य, पंत प्रतिनिधी, कापशीचे सेनापति या व अशा मांडलिकांनीं केलें असल्यानें त्यावेळच्या राजेमहाराजांनीं वेळोवेळीं आपल्या

मांडलिकांना “ बाबती सरदेशमुखी ” “ सरदेश कुलकर्णी ” वगैरे प्रकारचे हक्क दिलेले होते. व इंग्रजी अंमल सुरू झाल्यानंतर या हक्काबाबतच्या रकमा मुक्रर होऊन त्या आजतागायत दरसाल करवीर खजिन्यांतून मिळत असत. बावडेकर पंत अमात्य यांना दरसाल अंदाजी ५००० रु., विशाळगडकर प्रतिनिधी यांना दरसाल ३००० रु., इचलकरंजीकर यांना दरसाल २००० रु. याप्रमाणें रकमा करवीर दरबारच्या खजिन्यांतून पूर्वापार मिळत असतां, सन १९३२ सालीं या रकमा मिळण्याचा तुम्हाला काय हक्क आहे, त्याजबद्दलचीं सनदापत्रें व पुरावा असेल तो हजर करावा, त्याचा विचार होऊन निकाल होईपर्यंत या रकमा देण्याचें तहकूब करण्यांत आलें आहे असें दरबारनें फर्मान काढलें. त्याप्रमाणें ज्या त्या मांडलिकांनीं आपलें म्हणणें दरबारपुढें मांडलें, पण त्याचा निकाल अद्याप झाला नसून गेल्या दहा वर्षांच्या रकमा दरबारी खजिन्यांत पडून आहेत.

सन १८८१ च्या पूर्वीं मोठे मांडलिक हे आपापल्या संस्थानापुरती गांवठी दारु तयार करीत असत. पण अबकारी धोरण हें चोहोंकडे सारखें असावें म्हणून मुंबई सरकारनें ठरविलें व त्यास अनुसरून चारी मोठ्या मांडलिकांच्या संस्थानांतील अबकारीची व्यवस्था दरबारनें मुंबई सरकारच्या सल्ल्यावरून आपल्या हातांत घेतली आणि चारीही मांडलिक संस्थानिकांना असें आश्वासन दिलें कीं, मुंबई सरकार हें सातारा व दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानें यांच्या अबकारीच्या हक्काबद्दल त्यांना दरसाल ज्या तत्त्वावर नुकसानभरपाई देईल, त्या तत्त्वावर आपणही आपल्या मांडलिकांना वागवूं. आणि या बाबतींत करवीरच्या रीजन्सी कौन्सिलनें असा ठराव (नंबर ४०९।१८८३) केला कीं गेल्या दहा वर्षांच्या विक्रीची सरासरी काढून जी रक्कम ठरेल ती व त्याखेरीज प्रत्यक्ष वाढीकरितां वगैरे शेंकडा वीस टक्के अधिक अशी रक्कम पुढील दहा वर्षें दरसाल या चारी मांडलिकांना दिली जाईल. या ठरावाप्रमाणें सन १८८३पासून सन

१९१० पर्यंत दरसाल अबकारी नुकसानभरपाईच्या रकमा मोठे मांडलिकांना मिळत गेल्या. सन १९१० सालीं सरासरीपेक्षां जी वीस टक्के वाढ मिळत असे, तीं कांहीं सबबीवर बंद करण्यांत आली. आणि सन १९३२ सालीं दरबारनें सन १८८३ सालीं ठरलेलें गेल्या दहा सालच्या सरासरीचें प्रमाण सोडून दिलें व दरसाल प्रत्यक्ष जी विक्री येईल, तेवढी रकम खर्चवेंच वजा जातां दिली जाईल असें मांडलिकांना कळविलें; म्हणजे गेल्या वर्षीं जी रकम त्यांना मिळाली, तिच्या निम्म्यापेक्षांही कमी रकम सन १९३२ सालीं त्यांच्या हातांत पडली. उदाहरणार्थ इचलकरंजीला सन १९३०–३१ सालाबद्दल नुकसानभरपाई रु. २०,४४८ मिळाले आणि सन १९३२ सालीं मात्र ही रकम रु. ९,६१२ पर्यंत उतरली. याचप्रमाणें इतरांचीही हीच स्थिति झालेली आहे.

दरबारकडे अबकारीचे जमाखर्चाचे उतारे अगर इतर माहिती मागितली असतांना ( जी माहिती मुंबई सरकार त्यांचेकडे अबकारीची व्यवस्था असलेल्या कोणत्याही संस्थानाला सहज देतें ) देत नाहीं अशी तक्रार असून नुकसानभरपाई कमी कशी झाली याजबद्दल चौकशी केल्यास त्याची बिलकूल दाद लागत नाहीं. अबकारीच्या बाबतींत दरबारचा मांडलिकांच्या बाबतींत कसा सापत्नभाव चालला आहे हें पुढील तुलनात्मक आंकड्यांवरून स्पष्ट होणार आहे.

| वर्ष | नांव | अबकारी उत्पन्न | लोकसंख्या | दर माणशीं अबकारी उत्पन्नाची सरासरी. रु. | आ. | पै |
|---|---|---|---|---|---|---|
| १८९१ | खुद्द करवीर | ९३,२०६ | ७,०५,२५१ | ० | २ | १ |
| | इचलकरंजी | ७,१११ | ६६,३६५ | ० | १ | ८ |
| १९२१ | खुद्द करवीर | ६,४३,२५४ | ५,९८,२५७ | १ | १ | २ |
| | इचलकरंजी | २०,४४८ | ६०,३६६ | ० | ५ | ५ |
| १९३२ | खुद्द करवीर | ६,१८,३१९ | ६,९०,७४१ | ० | १४ | ५ |
| | इचलकरंजी | १४,४३१ | ६८,५६७ | ० | ३ | ४ |

वरील आंकडे कोल्हापूर ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्टवरून घेतलेले आहेत. करवीर दरबारचें स्वतःचें अबकारीचें उत्पन्न लोकसंख्येच्या मानानें माणशीं सुमारें १ रुपया पडत आहे. तसेंच ज्यांच्या अबकारीची व्यवस्था मुंबई सरकारकडे आहे, अशा दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानांतील अबकारी उत्पन्नाचे आंकडे पाहिल्यास त्यांनाही मुंबई सरकारकडून लोकसंख्येच्या मानावर सरासरी माणशीं एक रुपया याप्रमाणें रक्कम मिळत आहे. असें असतांना करवीरच्या मांडलिकांना मात्र तें जास्तींत जास्त त्यांच्या एकतृतीयांश व अलिकडे तर एक पंचमांश सुद्धां मिळत नाहीं हें योग्य आहे कां ?

तसेंच सन १९३० सालापासून हिंदुस्थान सरकारकडून करवीर दरबारला दरसाल पेट्रोल ड्यूटी व काड्याच्या पेट्यांवरील एक्साईज ड्यूटी म्हणून तीन लक्षांपेक्षांही अधिक रकम मिळते. ही रकम खुद्द करवीर राज्य व त्यांतील समाविष्ट मांडलिक संस्थानें यांच्यासुद्धां आकारून दिली जाते, पण यांपैकीं आपल्या हद्दींतील रस्त्याचे प्रमाणांत पेट्रोल ड्यूटी व लोकसंख्येच्या प्रमाणांत काड्याच्या पेट्यांवरील ड्यूटी आपणांस मिळावी म्हणून मांडलिक संस्थानांनीं करवीर दरबारकडे रास्त मागणें केलेलें आहे. ही रकम सर्व मांडलिकांची मिळून दरसाल अंदाजी पन्नास हजार रुपये होईल. पण दरबारनें ती न देता, ही रकम तशीच पाडून ठेवली आहेत.

अलिकडे दरबारनें असा एक दंडक घातला आहे कीं मांडलिक संस्थानें हीं करवीरच्या अधिराज्याखालीं असल्यानें संस्थानी प्रजेवर लँड रेव्हिन्यू, पाणीपट्टी, जनावरावरील टीव, लोकलफंड व अशाच प्रकारचे इतर कर वगैरे जे आहेत, ते खुद्द दरबार हद्दींतील प्रचलित करापेक्षां जास्त असतां कामा नये. आणि या धोरणानें मांडलिक संस्थानांतील लँड रेव्हिन्यू, मनाई जातीच्या झाडावरील व इतर सर्व कर दरबारच्या कराइतकेच करण्यास मांडलिक संस्थानांना भाग पाडलें. कोल्हापुरास सन

१९३८ सालीं रयत लोकांचे दोन प्रचंड मोर्चे आले, त्यावेळीं छत्रपतींनीं दरबार हद्दींतील शेतसारा ब्रिटिश मुलुखांतील शेतसाऱ्याइतका कमी करण्याचें अभिवचन दिलें व पुढें कांहीं प्रमाणांत आपल्या हद्दींतील जमीनमहसूल कमी केला. यानंतर अशाच प्रकारचा मोर्चा इचलकरंजीस आला अथवा आणला गेला, त्यावेळीं श्री. इचलकरंजीकरांनीं करवीर दरबार ज्या प्रमाणांत जमीनमहसूल कमी करील, त्याच प्रमाणांत आपणही कमी करण्यास तयार आहों असें सांगितलें व त्याप्रमाणें त्यांनीं दरसाल सत्तेचाळीस हजार रुपये जमीनमहसुलांत सूट दिली आणि इतर करांच्या बाबतींतही दरबारप्रमाणें धोरण स्वीकारल्यानें इचलकरंजी संस्थानचे दरसालचे उत्पन्नांत अंदाजी साठ हजार रुपयांची तूट आली. याशिवाय वर नमूद केलेल्या दरबारकडून दरसाल मिळणाऱ्या बाबती व सरदेशमुखी, अबकारी नुकसानभरपाई, पेट्रोल व काड्याच्या पेट्यांवरील ड्यूटी, आजरें तालुक्यांतील दस्तुरीची रकम वगैरे ज्या रकमा दरबारनें वर्षानुवर्षे योग्य कारणाविना अडकवून ठेविल्या होत्या, त्यामुळें झालेलें आर्थिक नुकसान सुमारें तीस ते चाळीस हजार जमेस धरतां वट्ट अशी पाऊण ते एक लाखाची खोट आपल्या उत्पन्नांत आली असल्यानें मांडलिक संस्थानांपेक्षां दरबार हद्दींत जे अधिक कर व उत्पन्नाच्या बाबी आहेत त्या आपणांस उपलब्ध करून द्याव्यात म्हणून इचलकरंजीकरांनीं दरबारकडे मागणें केलें आहे. लोकलफंड दुरुस्तीचा ॲक्ट, सन १९२६ चा कोर्ट फी व स्टॅांप ॲक्ट, मोटार व्हिियिकल ॲक्ट हे कायदे आज किती एक वर्षे मागणें केलें असतांना लागू होत नाहींत. तसेंच करवीर इलाख्यांत प्राप्तीवरील कर, शिक्षणफंड, देवस्थानफंड, मोटार टॅक्स, आक्ट्राय हे कर प्रचलित आहेत आणि सन १९२९ सालीं पाटीलवतन खेरीज करून बाकीचीं सर्व वतनें व इनामें कुलकर्णी, अलुते, बलुते, धर्मादाय, म्हारतराळ, खुनकाट, बक्षिस, रांडरोटी, बालदरवेश, जातइनाम वगैरे दरबारनें रयतावा करून ज्या त्या इनामदाराकडे चालविलीं आहेत. त्याच-

प्रमाणें सदरचीं इनामें व वतनें इचलकरंजीकरांनाही रयतावा करून चालविण्याची परवानगी दिल्यास दरसाल त्यांचें उत्पन्नांत अंदाजी चाळीस हजार रुपये भर पडेल, तेव्हां तसें करण्यासही परवानगी मिळावी असें जहागिरीचे मागणें आहे. या उत्पन्नाच्या बाबी दरबारनें उपलब्ध करून दिल्यास रयतेवर बसणारा जमीनमहसुलाचा बोजा कमी होऊं शकेल. यामुळें जहागिरींतील प्रजा सुखी होईल आणि साराबाढीचा प्रसंग येणार नाहीं. पण दरबारचें धोरणच मुळीं उलट आहे. मांडलिकांच्या उत्पन्नाच्या बाबी शक्य तेवढ्या कमी करण्याचें दरबारचें धोरण असल्यानें सांपत्तिकदृष्ट्या करवीर मांडलिकांची स्थिति दिवसेंदिवस अधिकाधिक खालावत चालली आहे. आणि जोंपर्यंत ब्रिटिश सरकार या बाबतींत लक्ष घालणार नाहीं तोंपर्यंत मांडलिकांना दरबारकडून न्याय मिळण्याची आशा वाटत नसल्यास आश्चर्य नाहीं.

सन १९३३ सालीं दरबारनें जाहिरनामा काढून हत्यारांच्या कायद्याप्रमाणें मांडलिक संस्थानांतील पोलिस व मॅजिस्ट्रेट यांना या कायद्याखालीं जे अधिकार होते ते काढून घेतले. तसेंच खुद्द मांडलिकांनाही स्वतःच्या उपयोगाकरितां लागणाऱ्या हत्यारांबद्दल दरबारच्या अधिकाऱ्यांचे परवाने घेतले पाहिजेत असा हुकूम दिला. जे अधिकार सन १९०५ सालीं ब्रिटिश सरकारांतून मंजूर झालेल्या कायद्यान्वयें मांडलिकांच्या पोलिस मॅजिस्ट्रेटांस होते व ज्या कायद्यान्वयें स्वतःच्या हत्यारांबद्दल मांडलिकांना लायसेन्सची माफी होती, त्या हक्कावर एकदम असा अचानक हल्ला आल्यावर मांडलिकांनीं तक्रारी रेसिडेंटकडे केल्या व सन १९३७ सालीं रेसिडेंटच्या मध्यस्तीनें या वादाचा निकाल लागून पूर्ववत् स्थिति थोड्याबहुत फरकानें प्राप्त झाली आहे.

मुखत्यारीच्या थैलीप्रमाणें मांडलिकांना जमीनमहसुलाचे पूर्ण अधिकार आहेत व पोलिटिकल सुपरव्हिजन दरबारकडे सन १९२९ सालीं दिल्यावेळीं जुन्या थैल्या धारण करणाऱ्या मांडलिकांच्यावरील पोलिटिकल

सुपरव्हिजन पूर्वीप्रमाणेंच रेसिडेंटकडे राहील, असें हिंदुस्थान सरकारनें ठरविलें होतें. पण दरबारनें हा निर्बंध झुगारून देऊन मुलकी कामांतही केवळ सुपरव्हिजनच नव्हे तर प्रत्यक्ष अपील कोर्टाप्रमाणें अधिकार चालविण्यास कशी सुरवात केली आहे तें पुढील उदाहरणानें स्पष्ट होणार आहे.

विशाळगड किल्ल्यावर फार प्राचीन काळीं राजाराम छत्रपतींची बायको श्री आहिल्याबाई सती गेल्या होत्या व त्यांची त्या ठिकाणीं छत्री असून त्याची पूजाअर्चा पडवळ या आडनांवाचे इसमाकडे होती व दरसाल त्यास २८५ रुपयांची नेमणूक होती अशी दंतकथा आहे. या पुजाऱ्यानें अज्ञान कारकीर्दींत या नेमणुकीचें मागणें करवीर दरबारकडे केलें होतें व सन १८४८ सालीं करवीर दरबारांतून या बाबतींत पूर्ण चौकशी होऊन त्या पुजाऱ्यास नेमणूक मागण्याचा कांहीं हक्क नाहीं असा करवीरच्या स्टेट कारभाऱ्यानीं निकाल दिला. विशाळगड किल्ल्यावर श्रीअहिल्याबाईच्या छत्रीचाही कोठें मागमूस राहिलेला नाहीं. असें असतां अलिकडे त्या पुजाऱ्याच्या वारसांनीं पुन्हा तो प्रश्न उपस्थित केला व नुकताच दरबार-कडून असा हुकूम झाला आहे कीं विशाळगड किल्ल्यावर श्रीअहिल्या-बाईची छत्री श्रीछत्रपति बांधतील; पण हा किल्ला विशाळगड हद्दींत अस-ल्यानें या छत्रीच्या पूजेअर्चेबद्दल पूर्वीच्या पडवळ आडनांवाच्या पुजा-ऱ्याच्या हल्लींच्या वारसास दरसाल विशाळगड संस्थाननें २८५ रुपये आपल्या खजिन्यांतून द्यावे. छत्रपतींच्या पूर्वजांचें स्मारक तीनशेंहे वर्षांनीं राजाराम छत्रपति करणार व त्या स्मारकाचा दरसालचा खर्च मात्र त्यांच्या मांडलिकांनीं करावा !!!

हिंमतबहाद्दर यांच्या हद्दींतील निगवे गांवांत जुना एक तलाव होता तो बुजला. तेव्हां सन १९२६ सालीं सदरची बेवारस इस्टेट आहे म्हणून दरबारनें त्या जमिनीचा कबजा घेतला व ही जमीन आणि हिंमतबहाद्दर जहागिरींतील कौळगें गांवांत अशी बेवारस झालेली दुसरी एक जमीन,

या दोन्ही श्री. छत्रपति राजाराम महाराजांनीं आपल्या कृपेंतील म्हमूलालसाहेब महसूल मंत्री यांना बक्षिस देऊन टाकल्या. अलिकडे जदीद स्वरूपाच्या बेवारस इस्टेटीवर मालकी हिंमतबहाद्दर यांची पोंचते असा हिंदुस्थान सरकारचा ठराव झालेला आहे. तेव्हां या ठरावान्वयें वरील जमिनी हिंमत बहाद्दर यांना परत मिळतात किंवा कसें हें पहावें.

विशाळगड संस्थानांतील मलकापूर येथील दारूच्या मक्तेदारानें तिथें भरणारे जत्रेंत दारू विकण्याचा परवाना करवीरच्या एक्साईज कमिशनर-कडून मिळविला व पुढें आपणांस जत्रेंत दारू विकण्याबद्दल जहागिरीच्या अधिकाऱ्यांनीं बंदी केली, त्यामुळें आपलें नुकसान १०० रुपये झालें अशी दरबारकडे तक्रार केली. त्यावरून काम चालून व वस्तुस्थिति काय आहे याची चौकशी न करितां दरबारनें सन १९३५ सालीं विशाळगडकरांना मिळावयाच्या अबकारीमधून १०० रुपये दबारनें कापून घेतले.

तसेंच गेल्या सालीं इचलकरंजीस जो रयत व गिरणी कामगारांचा मोर्चा आला होता, त्यांतील लोक पुढें करवीरीं महाराजांच्याकडे व रेसि-डेंटकडे दाद मागण्यास गेले व त्यावेळीं करवीर शहरांत क्रि. प्रो. कोडचें १४४ कलम लागूं असतांही या ४००।५००लोकांना करवीर शहरांत जमा-वानें फिरण्यास मोकळीक देण्यांत आली. पुढें त्यांनीं रेसिडेंटची भेट घेऊन आपलीं गाऱ्हाणीं सांगितलीं व त्यानंतर या लोकांना करवीर दरबारनें आपल्या मोटारींतून त्यांच्या त्यांच्या घरीं पोंचविलें व त्याकरितां मोटार-भाड्याकरितां दरबारला जो ७०० रुपये खर्च आला, ती रकम जहागिरी-कडून मिळावी म्हणून दरबारचें मागणें आहे असें कळतें. हा खर्च श्री. इचल-करंजीकरांच्या संमतीखेरीज झालेला असल्यानें तो देण्यास ते जबाबदार नाहींत हें उघड आहे. पण तें दरबारास न पटून त्यांनीं सदरची रक्कम चालूं सालच्या अबकारी कॉंपेनसेशनच्या रकमेंतून वजा करून घेतली आहे असें कळतें व त्याविरुद्ध इचलकरंजीनें रेसिडेंटकडे अपील केलें आहे.

तसेंच इचलकरंजीला म्युनिसिपालिटी असून म्युनिसिपल कायद्या-प्रमाणें घरपट्टी, पाणीपट्टी, व्हील टॅक्स असे कर म्युनिसिपालिटीनें बसविलेले आहेत. सदरहू बाबतींतही करवीर दरबारनें हरकत घेतली असून व्हील टॅक्स वगैरे वसूल करण्यास बंदी केली आहे.

इचलकरंजीच्या मोर्च्यानंतर गिरणी-मालक व मजूर यांच्यामधील तंटा सलोख्यानें मिटविण्याबद्दल करवीरच्या प्राइम मिनिस्टरसाहेब यांनीं उभयतांकडून स्वतःच्या नांवानें पंच म्हणून ऐकटपत्र घेतलें. यानंतर कांहीं दिवसांनीं गिरणीमालक व मजूर या उभयतांच्या दरम्यान आपसांत तडजोड इचलकरंजी येथील कांहीं अधिकाऱ्यांच्या मध्यस्तीनें झाली; तेव्हां १९३९च्या मार्च महिन्यांत गिरणीमालक व मजूर या उभयतांनींही प्राइम मिनिस्टरसाहेबांना आपला वाद आपसांत मिटला असल्यानें आपणास दिलेलें ऐकटपत्र रद्द केलें आहे असें लेखी कळविलें. अशी वस्तुस्थिति असतांना येथील प्रजासंघाच्या लोकांनीं गिरणीमालकांबद्दल कांहींही भलीबुरी तक्रार करतांच प्राइम मिनिस्टरसाहेब गिरणीमालक संघाकडे खुलासे विचारतात व हुकूम सोडतात ! ऐकटपत्र रद्द केल्यानंतर आपणास अधिकार पोंचत नाहीं असें जरी गिरणीमालक संघानें कळविलें, तरी त्यांची समजूत पटत नाहीं आणि यांतील दुसरी एक विशेष गोष्ट ती ही कीं, हे खुलासे व हुकूम इचलकरंजी जहागिरीचें म्हणणें काय आहे तें न ऐकतांच अथवा स्थानिक अधिपति म्हणून त्यांचेकडोन या इसमांना दाद मिळते किंवा नाहीं याची वाट न पाहतांच दरबार-कडून परभारे हुकूम दिले जात असतात. कोणत्या तरी निमित्तानें जहागिरीचें अस्तित्वच नष्ट करण्याचा हा दरबारचा प्रयत्न आहे असें यावरून स्पष्ट दिसतें.

सन १८६२ च्या तहनाम्यांतील कलम आठ प्रमाणें अज्ञान मांडलि-कांच्या इस्टेटींची व्यवस्था करवीर दरबार व ब्रिटिश रेसिडेंट या उभय-तांच्या समाईक देखरेखीखालीं आहे, असें जरी तहनाम्याचें कलम असलें,

तरी अज्ञान मांडलिकांच्या इस्टेटीची प्रत्यक्ष देखरेख व व्यवस्था दरबारच पाहत असतें. रेसिडेंट तिकडे लक्ष देत नाहींत. अलिकडे ५-६ वर्षांत बावडा, कागल धाकटी पाती व सरलष्कर बहादूर येथील अधिपतींची अज्ञानदशा संपून त्यांना आपापल्या जहागिरींचे अधिकार मिळाले आहेत. यांपैकीं बावडा व कागल संस्थानांची व्यवस्था दरबारकडे असतांना दोन्ही संस्थानांतील कदीम इनामदारासंबंधाचे सर्व कागदपत्र गाड्या भरून दरबारनें त्यांच्या रेकॉर्डांतून नेऊन आपल्या रेकॉर्डांत ठेवले व मुखत्यारीनंतर सदरहू कागदपत्र मागितले असतांना ते त्यांना देण्याचें दरबारनें तर नाकारलेंच, पण त्यांच्या नकला मागितल्या असतांना त्या नकला तयार करण्याकरतां कांहीं कारकून नेमून त्यांच्या पगाराची आकारणी अदमासें हजार बाराशें रुपये कागलकरांवर केली म्हणे! सन १८८३ सालीं कदीम उत्पन्नावर पूर्ण ताबा कागलकरांचा आहे असें मुंबई सरकारनें ठरविलें असतांना अज्ञान कारकीर्दीचा फायदा घेऊन कदीमचें सर्व रेकॉर्ड अज्ञानाचें पालन करणाऱ्या विश्वस्तांनीं नेणें या परता अधिक अन्याय तो कोणता ?

कागलचे अधिपति व हल्लींचे छत्रपति हे जनक घराण्यांतील नात्यानें सख्खे चुलत भाऊ होतात. तेव्हां त्यांचे अज्ञानदशेंत ते व त्यांचे भाऊ कांहीं दिवस छत्रपतींच्या जवळच रहात असत. त्यावेळीं एकदा छत्रपतींबरोबर ते देवदर्शनास गेल्यावेळीं त्यांनींही छत्रपतींबरोबर देवास दोन नारळ ठेवले. तसेंच ते छत्रपतींबरोबर पुणें-मुंबईस गेल्यावेळीं छत्रपतींनीं त्यांना कांहीं कपडे करून दिले. आतां ते मुखत्यार होऊन आपला राज्यकारभार पाहूं लागल्यानंतर दरबारच्या खासगी खात्याकडून या दोन नारळांचे व कपड्यांचे खर्च झालेले पैशाची मागणी कागलकरांकडे केली असून या व अशाच प्रकारच्या बऱ्याच तसलमाती खुद्द हल्लींच्या अधिपतींच्या अज्ञानदशेंतील तसेंच त्यांचे वडील हयात असतांना त्यांच्या नांवानें दरबारांत त्यांचे वडील बंधु कै. शाहुमहाराज असतांना तसलमात

म्हणून खर्च पडलेल्या रकमा हल्लींचे कागलकरांकडून वसूल करण्याचीं कामें सुरू आहेत असें म्हणतात.

सरलष्कर बहादूर यांचे वडिलांनीं सन १९२२ सालीं असगेकर या "जदीद" सनद्याची जमीन त्यानें नोकरीस तक्रार केल्यावरून काढून घेतली होती. या ठरावावर पक्षकारानें रेसिडेंट व मुंबई सरकारकडे अपील व तपासणी अर्ज केले होते व दोन्ही अर्ज सन १९२४ व १९२५ सालीं नामंजूर होऊन सरलष्कर यांचा ठराव कायम झाला होता. पुढें सरलष्कर मयत होऊन त्यांचे चिरंजीव अज्ञान असल्यानें इस्टेटीची व्यवस्था दरबारकडे आली, तेव्हां दरबारनें पूर्वीं झालेले रेसिडेंट व मुंबई सरकारचे ठराव धाब्यावर बसवून अर्जदारास सदरहू जमिनीचा कबजा सन १९३१–३२ सालीं दिला.

वरीलप्रमाणेंच सदाशिव गोपाळ अळतेकर या नांवाचे इसमाचे पूर्वजास सन १८१८ सालीं त्यावेळचे सरलष्करांनीं एक जमीन नोकरीकरितां इनाम दिली होती. ती जमीन चुकून रयताव्यांत दाखविली गेली तेव्हां तें खुत बदलून सन १९०८ सालीं सरलष्कर बहादूर यांनीं ती इनाम पत्रकांत दाखल करण्याचा हुकूम केला. त्याविरुद्ध अळतेकरांनीं पोलिटिकल एजंटकडे अपील केलें. या अपिलाचें काम चालूं असतांना आळतेकर यांजकडून कांहीं अक्षम्य अपराध झाल्यावरून त्यास बडतर्फ करण्यांत आलें व त्याजकडून बिन नोकरीचा आकार वसूल करण्याचा हुकूम झाला. तो त्यानें न दिल्यानें जमीन सरकारांत घेऊन तिचा लावणी लिलांव होऊं लागला. याविरुद्ध त्यानें रेसिडेंटकडे तक्रार केल्यावरून रेसिडेंटनें दरबारचा अभिप्राय मागवून त्या अभिप्रायानुसार त्याचा अर्ज नामंजूर केला. त्या निकालावर त्यानें मुंबई सरकारकडे दाद मागितली व मुंबई सरकारनें त्याचा अपील अर्ज सन १९२२ मध्यें नामंजूर झाला. यानंतर सध्याचे सरलष्कर यांच्या अज्ञानावस्थेचा फायदा घेऊन पूर्वीं आपण दिलेल्या अभिप्रायाविरुद्ध करवीर दरबारनें सदरची जमीन सदर

आळतेकर यास परत करण्याचा सन १९३७ सालीं हुकूम दिला एवढेंच नव्हे तर, दरम्यानचे सर्व वर्षांचें उत्पन्नही अर्जदारास सरलष्कर जहागिरीने द्यावें असे त्यानी हल्लीच्या सरलष्कर बहादुराना फर्माविलें आहे.

सुपरव्हिजन आपल्या हातीं घेतल्यावेळीं सन १९३० सालीं दरबारनें जो जाहीरनामा काढलेला आहे, त्यात आपल्या मांडलिकाना विश्वासाने व सहानुभूतीनें वागवूं व त्याच्या पूर्वापार मानमरातबाचें परिपालन करू असें ब्रिटिश सरकारास आश्वासन दिलें तें त्याचेकडून कितपत पाळलें गेलें याजबद्दलचीं काहीं उदाहरणें पुढे दिलीं आहेत:—

करवीर दरबारात विशाळगडचे प्रतिनिधी याना पहिली खुर्ची असे व करवीरचे दिवाणाची खुर्ची चौथी असे, पण श्री राजाराम छत्रपतींनीं आपल्या प्राइम मिनिस्टरास पहिल्या खुर्चीचा मान दिला व पतप्रतिनिधींस दुसऱ्या खुर्चीवर बसण्याचा हुकूम दिला आहे याविरुद्ध पतप्रतिनिधींनी बरीच तक्रार केली, पण त्याचा काहीं उपयोग झाला नाही.

दरबारी व सरकारी समारभ होतील त्या समारभांस सर्व मांडलिकांनी दरबाऱ्याप्रमाणे मराठ्याच्या पोषाखांत म्हणजे पायात इराक विजार व पपशू, अंगात कमालखानी अगरखा, कमरेस पडदळ पट्टा व तरवार आणि डोक्यावर मराठी फेटा अशा प्रकारचा पोषाख करून आले पाहिजे असे सक्तीचे हुकूम काढले या मांडलिकांपैकीं विशाळगड, बावडा व इचलकरंजी हे तीन ब्राह्मण असून यापैकीं हल्लीचे पंतप्रतिनिधि इचलकरंजीकर व पूर्वीचे पत अमात्य हे सनातनी वृत्तीचे असून त्याना ब्राह्मणी पागोटें सोडून मराठेशाही फेटा बाधण्याचे अत्यत जिवावर आले ब्रिटिश सरकारच्या दरबारांतही पोषाखाबद्दल व विशेषतः शिरोभूषणाबद्दल अशा प्रकारची सक्ती कधी केली जात नाहीं, पण या सनातनी वृत्तीच्या मांडलिकाच्या मनोभावनेकडे दरबारनें पूर्ण दुर्लक्ष करून त्यांचे बाबतींतही पोषाखाबद्दल सक्तीचा अमल करविला. आणि आपल्या आवडत्या प्राइम मिनिस्टर साहेबाना मात्र दरबारी पोषाखा-

पासून माफी दिलेली आहे! ते कधीं इंग्रजी पोषाखांत म्हणजे हॅट घालून येतात व लहर लागल्यास कधीं पूर्ण अगर निम दरबारी पोषाखांतही येतात.

इचलकरंजी किल्ल्यावर पूर्वापार घोरपडी निशाण लावण्याची वहिवाट असे. पण सन १९३३ सालीं अशा प्रकारचें निशाण मांडलिकांच्या किल्ल्यावर फडकणें हें करवीर छत्रपतींच्या अधिराजपदास कमीपणा आणणारें आहे, तेव्हां तें तावडतोब काढून दरबारकडे पाठवून देण्याचा हुकूम सोडला गेला. व्यापारी कंपन्या, आरमारी नावा व सरदार लोक हे आपापल्या पूर्व वैभवाचें प्रतीक म्हणून इंग्रजी राज्यांत चोहींकडे अशा तऱ्हेचीं निशाणें लावतात व त्या योगानें इंग्लंडच्या बादशहाची मानहानि होत नाहीं. परंतु करवीर दरबारच्या आधिपत्यास मात्र या चिमुकल्या घोरपडी निशाणानें जबर धक्का बसतो हें आश्चर्य होय.

इचलकरंजी येथील शाळामास्तरानें इचलकरंजीचा भूगोल लिहून खासगी रीतीनें छापला. त्या भूगोलांत इचलकरंजीला " संस्थान " म्हणून संबोधलें व हें त्याचें कृत्य करवीर छत्रपतीच्या अधिराज्याला कमीपणा आणणारें असल्यानें त्या पुस्तकाच्या सर्व प्रती जप्त कराव्यात म्हणून दरबारनें सन १९३४ च्या नोव्हेंबरमध्यें हुकूम दिला व सर्व पुस्तकें सरकारजमा करण्यास झालीं.

सन १९३४ सालीं इचलकरंजीच्या अधिपतीच्या नातीचें लग्न झालें. त्यावेळीं सांगलीचे राजेसाहेब लग्नास आल्यावेळीं त्यांच्या सन्मानार्थ तोफांची सलामी इचलकरंजीकरांनीं दिली; ती कां दिली गेली, तोफ उडविण्याचा तुम्हांस काय अधिकार आहे, अशी करवीर दरबारनें तक्रार केली. तेव्हां तोफ ही पूर्वापार दौलतीस असून तोफेची सलामी नेहमीं देण्यांत येते व पूर्वीची तोफ बाद झाली तेव्हां करवीर दरबारनेंच अज्ञान कारकीर्दींत नवीन तोफ विकत दिली, अशा अर्थाचा खुलासा केल्यावर तें प्रकरण तूर्त तरी संपलें आहे.

## करवीर राज्य व मांडलिक संस्थानें

सन १९१७ सालापासून मोटारचा कायदा लागू करण्याची परवानगी मागितली असून मिळत नाहीं. तेव्हां इचलकरंजीच्या मोटारगाड्या मुंबई पोलिसखात्यांत राजिस्टर केल्या जात. पण सन १९३३ सालीं इचलकरंजीच्या सर्व गाड्या करवीरच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटसमोर रजिस्टर करून लायसेन्स घेतलें पाहिजे असा दरबारनें हुकूम दिला. कायद्याच्या बाबतींत मांडलिक संस्थानें स्वतंत्र असून करवीरचा कोणताही कायदा आपोआप जहागिरींत लागू होत नाहीं असें असतांना देखील मोटारी करवीरीं रजिस्टर करण्यास भाग पाडणें कायद्याच्या दृष्टीनें अगदीं चुकीचें आहे. पण या तक्रारीची कांहीं दाद न घेतां गेलीं सात आठ वर्षे इचलकरंजीच्या तसेच इतर जहागिरींतील सर्व मोटारी करवीरीं सक्तीनें राजिस्टर करविल्या जाऊन या बाबतींत मोटार लायसेन्स फी, राजिस्ट्रेशन चार्ज वगैरे मिळून जहागिरींचें पैशाचे दृष्टीनेंही बरेंच मोठें नुकसान होत आहे.

मांडलिकांना ब्रिटिश हद्दींत दस्तुरीची माफी असे. ती करवीर दरबारनें सन १९३४ च्या फेब्रुवारींत काढून घेतली. ही माफी दस्तुरीच्या कायद्याप्रमाणें ब्रिटिश सरकार कोणाही प्रतिष्ठित माणसास देतें, त्याप्रमाणें करवीरच्या रेसिडेंटसाहेबांनीं करवीरच्या मांडलिकांना दिलेली होती. ती काढून घेण्यांत दरबारनें स्वतःच्या ट्रेझरीचा फायदा केला असतां तर एका दृष्टीनें त्यांचें हें कृत्य कांहीं अंशीं समर्थनीय तरी झालें असतें. पण स्वतःचा यत्किंचितही फायदा नसतांना फक्त आपल्या मांडलिकांना ब्रिटिश हद्दींत दस्तुरीचा भुर्दंड भरावा लागावा एवढेंच समाधान दरबारास लाभत असेल !!!

सन १९३१ सालपर्यंत करवीर राज्याच्या नकाशांत चारी मोठ्या मांडलिकांच्या संस्थानांचा मुलूख निराळ्या ( तांबड्या ) रंगानें दाखविण्याची वहिवाट होती. ती मोडून सन १९३२ सालापासूनच्या करवीरच्या ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्टाच्या सोबत असलेल्या नकाशांत या चारी मांडलिकांच्या जहागिरीचे मुलूख खुद्द करवीर राज्यांपैकीं ज्या त्या

लगतच्या तालुक्याचे मुलुखांत मिसळून टाकण्यांत येऊन त्यांचें स्वतंत्र अस्तित्व नकाशांतून देखील काढून टाकण्यांत आलें आहे.

"कोल्हापूर इलेक्ट्रिसिटी ॲक्ट" इचलकरंजींत लागू करण्याबद्दलची हकीकत थोडी मनोरंजक आहे. इचलकरंजी शहरांत कांहीं मंडळींनीं मिळून वीज उत्पादन करून ती लोकांना पुरविण्याची एक खासगी कंपनी श्री. इचलकरंजीकरांच्या प्रोत्साहनानें व मदतीनें सन १९३५ मध्यें काढली. येथें विजेचा कायदा नसल्यानें व दरबारकडे मागणी करूनही तो लवकर लागू होण्याचा संभव नसल्यानें स्थानिक सरकार या नात्यानें सार्वजनिक सुरक्षिततेकरितां जेवढी खबरदारी घेणें जरूर आहे, तेवढी घेऊन इचलकरंजीच्या अधिपतींनीं ही कंपनी काढण्यास परवानगी दिली व त्याप्रमाणें इचलकरंजी शहरांत विजेचे दिवे लागूं लागले. ही गोष्ट दरबारच्या नजरेस येतांच त्यांनीं हुकूम सोडला कीं अशा विजेच्या कारखान्यास कायद्याच्या नियंत्रणाची जरूरी असल्यानें हुकूम पोंचल्यापासून एक महिन्याचे आंत "कोल्हापूर इलेक्ट्रिसिटी ॲक्ट" इचलकरंजीस लागू करण्याबद्दल जर रीतसर मागणी आली नाहीं, तर इचलकरंजीस निघालेली वीज कंपनी व विजेचा कारखाना सक्तीनें बंद करावा लागेल. याप्रमाणें सन १९३५च्या डिसेंबर महिन्यांत दरबारकडे रीतसर सदरहू कायदा आपल्या संस्थानास लागू करण्याबद्दल लिहिलें गेलें असून गेलीं पांच वर्षें सदरचा कायदा लागू करण्याबद्दलचें काम दरबारी दप्तरांत पडून आहे. प्रजेच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें अशा कायद्यांची किती अवश्यकता आहे हें निराळें सांगणें नकोच.

ही झाली गोष्ट मांडलिकांना जरूर असणाऱ्या कायद्यांची. याच्या उलट दरबारास ज्या गोष्टींची जरूर असते, ती गोष्ट मांडलिक संस्थानांत कायदा लागू असो वा नसो, दरबार एका लेखणीच्या फटकाऱ्यासरशी करून मोकळें होतें. उदाहरणार्थ, सन १९३९ सालीं मुंबईचें "विविधवृत्त" व बेळगांवचें "आघाडी" व "धडाडी" या वर्तमानपत्रांतून

करवीरच्या राजघराण्यांतील मंडळीसंबंधीं कांहीं लेख प्रसिद्ध झाले. तेव्हां सदरच्या तिन्हीही वर्तमानपत्रांना करवीर दरबारच्या हद्दींत तर बंदी झालीच, पण सदरचीं वर्तमानपत्रें मांडलिक संस्थानांतही आल्यास जप्त करून त्याजबद्दल खटले करावेत म्हणून दरबारनें हुकूम सोडला. ज्याअर्थीं सदरहू वर्तमानपत्रांत खुद्द छत्रपति व त्यांचे कुटुंबांतील मंडळीवर अपमानकारक लेख येत होते, त्याअर्थीं दरबारच्या हुकुमाप्रमाणें अंमल करण्यास मांडलिकांनीं आपापल्या पोलिस अधिकाऱ्यांना हुकूम दिले; पण ज्या प्रेस ॲक्टाखालीं ही बंदी करण्यांत आली होती, तो कायदा मांडलिक संस्थानांत लागू नसल्यानें दरबारचा हुकूम मांडलिकांच्या हद्दींत कसा कायदेशीर होईल व यदाकदाचित् कोणी तक्रार केल्यास अगर हरकत केल्यास त्या इसमावर कायद्याच्या अभावीं खटला कसा करतां येईल अशी शंका जहागिरींनीं विचारली असल्यास नवल नाहीं. त्यांस प्राईम मिनिस्टर साहेबांनीं असें उत्तर पाठविलें म्हणे कीं 'छत्रपति व छत्रपतींची इज्जत ही कायद्याच्या कक्षेच्या बाहेर व कायद्यापेक्षां अधिक श्रेष्ठ आहे; तेव्हां त्यांजवर शिंतोडे उडविणाऱ्या इसमाचा अगर वर्तमानपत्राचा बंदोबस्त करण्यास कायदा लागू असण्याची जरुरी नाहीं.' जी गोष्ट अखिल हिंदुस्थानच्या बादशहास कायद्याच्या अभावीं करतां येत नाहीं, ती गोष्ट आमच्या छत्रपतींच्या राज्यांत एका लेखणीच्या फटकाऱ्यासरशी होऊं शकते !

सन १९३८ च्या डिसेंबर महिन्यांत ज्या वेळीं करवीरीं प्रजेचा मोठा मोर्चा आला, त्यावेळीं छत्रपतींनीं त्यांना नागरिकत्वाचे सर्व हक्क, म्हणजे, भाषण-स्वातंत्र्य, सभा-स्वातंत्र्य, लेखन-स्वातंत्र्य तसेंच राज्यकारभारांत प्रजेला सहभागी करून राजकीय सुधारणांचा कायदा करण्याचें व दरबार हद्दींतील जमीनमहसुलाचे दर ब्रिटिश हद्दीप्रमाणें करण्याचें अभिवचन दिलें. यांपैकीं करवीर दरबारनें किती वचनांची पूर्तता केली व प्रजापरिषद बेकायदेशीर ठरवून किती दडपशाही केली याजबद्दलचा ऊहापोह प्रत्यहीं वर्तमानपत्रांतून होत आहे. तेव्हां त्याजबद्दल येथें विशेष

लिहिण्याचें प्रयोजन नाहीं. मांडलिकांच्या दृष्टीनें यांपैकीं राजकीय सुधारणांचा मात्र विचार करणें जरूर आहे. राजकीय सुधारणांची मागणी सर्व संस्थानांतून जोराची असून संस्थानी प्रजेच्या राजकीय आकांक्षा साहजिकपणें वाढूं लागल्या आहेत व त्या पूर्ण करणें हें ज्या त्या संस्थानिकाचें कर्तव्य आहे. तेव्हां आपल्या संस्थानांतील प्रजेच्या राजकीय क्षेत्रांतील आकांक्षा शक्य तों पुऱ्या कराव्या म्हणून इचलकरंजीच्या अधिपतींनीं गेल्याच्या मागील दसऱ्याच्या दिवशीं आपल्या जहागिरीपुरतें एक सल्लागार मंडळ स्थापण्याचें आपण योजलें असून या सल्लागार मंडळास आपल्या राज्यकारभारांत भागीदार केलें जाईल अशा प्रकारची घोषणा केली व त्याप्रमाणें या सल्लागार मंडळाची घटना तयार करण्यास सुरवात केली. ही वातमी करवीर दरबारास कळतांच त्यांचेकडून अशा प्रकारचें सल्लागार मंडळ बनवितां येणार नाहीं, तेव्हां त्या मंडळाची घटना तहकूब करावी असा हुकूम आला. यानंतर दरबारनें राजकीय सुधारणांच्या घटनेबद्दलचा "कोल्हापूर लेजिस्लेटिव्ह असेंब्ली" नांवाच्या एका कायद्याचा मसुदा तयार केला. या मसुद्यांत नऊही मांडलिक संस्थानांचें स्वतंत्र अस्तित्व पूर्णपणें नष्ट करण्यांत येऊन हें कायदेमंडळ करवीर राज्य व मांडलिक संस्थानें या सर्वांकरितां मिळून एकच करण्याचें योजिलें होतें. या कायदेमंडळांत एकंदर सभासदांची संख्या ४१ राहणार असून त्यांपैकीं १९ लोकांनीं निवडलेले व बाकीचे सरकारनियुक्त अशी सभासदांची विभागणी केली होती; व त्यांत चार मोठे मांडलिकांना व्यक्तिशः एक एक जागा देण्यांत येऊन बाकीच्या पांच मांडलिकांना मिळून दोन जागा देण्यांत आलेल्या होत्या. तसेंच लोकनियुक्त जागांपैकीं फक्त चार जागा प्रत्येकीं एक याप्रमाणें चारी मोठ्या मांडलिक संस्थानांतील प्रजेला दिल्या होत्या व बाकी पांच छोट्या मांडलिकांच्या हद्दींतील गांवें करवीर राज्यांत निवडणुकीसाठीं सामील करण्यांत आलीं होती. या कायदेमंडळाला जे अधिकार देण्यांत आले होते, त्यांतही

स्वतः छत्रपति व करवीर दरबारचें ॲडमिनिस्ट्रेशन यांना ज्या प्रकारचें संरक्षण दिलें होतें, त्यापैकीं कोणतेंही संरक्षण खुद्द मांडलिकांना किंवा त्यांच्या ॲडमिनिस्ट्रेशनला देण्यांत आलें नव्हतें आणि अशा प्रकारचा हा प्रतिगामी कायदा मांडलिकांच्या अपरोक्ष हिंदुस्थान सरकारकडून मंजूर करून घेण्याची कारवाई दरबारनें केली होती. पण त्याची चाहूल मांडलिकांना लागतांच त्यांनीं त्याविरुद्ध जोराची तक्रार केली, तेव्हां हिंदुस्थान सरकारपर्यंत काम चालून अखेर सदरहू घटनेबद्दल मांडलिकांचें म्हणणें काय आहे याबद्दल त्यांचे अभिप्राय मागविणें दरबारला भाग पडलें. ही कायदेमंडळाची योजना मांडलिकांच्याकडे आल्यावर त्यांनीं त्यांत बऱ्याचशा सुधारणा अशा सुचविल्या म्हणे कीं ज्यायोगानें त्यांचें स्वतंत्र अस्तित्व कायम राहून त्यांच्या प्रजेलाही स्वराज्याचा लाभ मिळेल. त्यांनीं ज्या सुधारणा सुचविल्या, त्या अशा स्वरूपाच्या होत्या कीं नवीन कायदा पास करण्याकरितां करवीर दरबारनें तयार केलेल्या घटनेंत आपल्या प्रजेस लोकसंख्येच्या मानानें प्रतिनिधित्व मिळावें. तसेंच आपल्या ॲडमिनिस्ट्रेशनची बाजू मांडण्याकरितां प्रत्येक मांडलिकांचा एक अधिकारी सरकारानियुक्त म्हणून असावा आणि सुपराव्हिजन दरबारकडे देतेवेळीं सुपराव्हिजन नोटिफिकेशनच्या तेराव्या कलमांत दरबारनें कबूल केल्याप्रमाणें नऊ मांडलिकांचें एक सल्लागार मंडळ स्थापन करावें व कोल्हापूर लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्यें पास होणारे कायदे मांडलिक जहागिरींना लागू होण्यापूर्वीं ते या सल्लागार मंडळांतूनही पास करून घ्यावे. कायद्याखेरीज मुलकी व सार्वजनिक हिताच्या इतर बाबींबद्दल प्रत्येक मांडलिकाला आपापल्या जहागिरीपुरतीं लहान लहान सल्लागार मंडळें स्थापन करण्याची परवानगी असावी. या योजनेमुळें मांडलिक संस्थानांचें अस्तित्व सुपराव्हिजन नोटिफिकेशनमध्यें दरबारनें कबूल केल्याप्रमाणें स्वतंत्र राहून त्यांच्या प्रजाजनांना कायद्याचे बाबतींत कोल्हापूर कायदेमंडळांत, व इतर बाबतींत मांडलिकांच्या सल्लागार मंडळांत भागदायी

होतां येईल. पण मांडलिकांनीं सुचविलेली ही योजना दरबारास पसंत नसून त्याबाबतचें काम सुरूं आहे असें कळतें. वास्तविक पाहिलें तर करवीर दरबारला मांडलिकांना अगर स्वतःच्या प्रजेला कोणतेही राजकीय हक्क देण्याचें मनांत नाहीं, केवळ कागदी घोडे नाचवावयाचे आहेत असें म्हणणें भाग पडतें. नाहींपेक्षां आजूबाजूच्या संस्थानिकांनीं आपापल्या राज्यांत राजकीय सुधारणा जाहीर करून वरींच वर्षे झालीं असतां करवीर दरबार अद्याप आपला राज्यकारभार नेहमींप्रमाणें निरर्गलपणें चालवीतच आहे !

वरील सर्व विवेचनावरून मांडलिक संस्थानांच्या बाबतींत करवीर दरबारचें दडपशाहीचें धोरण किती बेतालपणाचें आहे व खुद्द ब्रिटिश सरकार यांनीं मांडलिकांना वेळोवेळीं दिलेलीं अभिवचनें व तहनाम्यांतील ग्यारंटी यांचा विसर साम्राज्य सरकारासहुद्धां किती पडला आहे याची पूर्ण कल्पना आल्याशिवाय रहाणार नाहीं. ब्रिटिश सरकारशीं झालेले तहनामे शब्दशः सरकारनें पाळले पाहिजेत असें राजेरजवाडे कंठरवानें ओरडत आहेत व हिंदुस्थानांतील लोकशाहीची लाट आवरून धरण्याकरितां साम्राज्य सरकारही संस्थानिकांशीं झालेले तहनामे काडीमात्रही मोडण्यास तयार नाहींत. ते " Inviolate and inviolable " आहेत असें तितक्याच जोरानें ब्रिटिश सरकार प्रतिपादन करीत आहे. बटलर कमिटीच्या वाटाघाटी लंडनमध्यें चालूं असतांना त्या कमिटीनें मांडलिकांचें म्हणणें ऐकून घेण्याचें नाकारलें; तेव्हां मांडलिकांना दिलेल्या ग्यारंटी, कितपत सुरक्षित रहातील याजबद्दल लॉर्ड लॅमिंग्टन व लॉर्ड हॅरिस यांनीं प्रश्न विचारल्यावरून हाऊस ऑफ लॉर्डस्‌मध्यें वाटाघाट झाली, त्याप्रसंगीं ता. ५ डिसेंबर सन १९२८ रोजीं त्या वेळचे हिंदुस्थानचे अंडर सेक्रेटरी लॉर्ड पील यांनीं उत्तर दिलें कीं मांडलिक जहागिरदारांना सरकारनें दिलेलीं अभिवचनें अभंग आहेत. ( The pledges originally given by the British Government to the Feudatories of Indian States must remain inviolable. )

परंतु संस्थानिक व ब्रिटिश सरकार हे उभयतांही विसरतात कीं, जे तहनामे शब्दशः पाळावे असें राजे लोकांचें आग्रहाचें म्हणणें आहे व जे तहनामे आपण शब्दशः पाळूं असें साम्राज्य सरकार म्हणतें, त्याच तहनाम्यांत व त्या तहनाम्याअन्वयें दिलेल्या अभिवचनांत मांडलिक संस्थानिकांचे हक्क, अधिकार व मानमरातब पूर्णपणें चालविले जातील अशा प्रकारची ब्रिटिश सरकारनें मांडलिकांना दिलेली ग्यारंटी मात्र कशी पाळली जात नाहीं, हें वरील विवेचनावरून ध्यानीं येणार आहे.

तेव्हां तहांतील राजे लोकांच्या फायद्याचीं व हिताचीं कलमें तेवढीं पाळावीत व मांडलिक संस्थानिकांच्या फायद्याच्या व हिताच्या कलमांना तेवढा हरताळ फासावा हें कितपत न्यायाचें होईल ?

मांडलिकांच्या बाबतींत आजपर्यंत खुद्द करवीर दरबारचें व साम्राज्य सरकारचें जें वर्तन झालें आहे, तें महाराणी व्हिक्टोरिया यांच्या सन १८५८ च्या व ख्रिस्तवासी पंचम जॉर्ज यांच्या सन १९२१ मधील जाहीरनाम्यास कमीपणा आणणारें आहे. पण पॉक्स ब्रिटानियाच्या अंमलाखालीं पूर्वीप्रमाणें बंड करून स्वतःचे हक्क संरक्षण करण्याचीं साधनें मांडलिकांच्या हातांत राहिलीं नसल्यानें त्यांनीं 'आलेल्या भोगाशीं असावें सादर' या संतोक्तीचें अवलंबन केल्याखेरीज अन्य तरणोपाय दिसत नाहीं.

कोल्हापूर दरबार आणि मांडलिक संस्थानें यांच्या या भांडणाचा परिणाम जहागिरींतील प्रजाजनांना सोसावा लागून त्यांचे मात्र फार हाल होत आहेत. कोल्हापूरच्या आधिपत्याखालीं नऊ जहागिरी आहेत आणि सर्व जहागिरींबद्दल दरबारची समान वृत्ति आहे असेंही म्हणतां यावयाचें नाहीं. विशेषतः विशाळगड आणि इचलकरंजी या संस्थानच्या अधिपतींनीं करवीर दरबारशीं आपल्या हक्कासाठीं आपली सर्व हयात खर्च केली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यांतल्या त्यांत इचलकरंजीचे अधिपति आणि कोल्हापूर दरबार यांच्यामधील परस्पर विरुद्ध भावना

तर जास्त तीव्रतर आहेत असें दिसतें. वरिष्ठ सरकारनें वेळोवेळीं झालेल्या तहांची जर कसोशीनें पाळवणूक केली असती, आणि तक्रारी सतत केल्यावर सरकारचा निवाडा बदलूं शकतो, अशी दरबारची समजूत झाली नसती तर जहागिरी आणि दरबार यांच्यामध्यें इतके वाद वाढले नसते. पण राजनीतीच्या आणि मोठ्या संस्थानास खूष करण्याच्या धोरणाचा मोह न आवरल्यामुळें सरकारनें आपल्या निवाड्यांत फरक केला आणि यामुळें प्रजेच्या हजारों रुपयांचें नुकसान झालें. हा सत्ताधाऱ्यांचा झाला खेळ, पण तेथील प्रजेचे मात्र फार हाल झाले. या भांडणांत वरिष्ठ सत्तेनें प्रजाजनांच्या हिताच्या दृष्टीनें आपल्या धोरणाचा विचारच केला नाहीं, असें म्हणावयास हरकत नाहीं. या दोन सत्ताधाऱ्यांच्या भांडणांत कोल्हापूर राज्यांतील खास प्रजेला जे हक्क व सुख-सोयी आहेत, त्यासुद्धां जहागिरीच्या प्रजाजनांस उपलब्ध होऊं शकत नाहींत. कोल्हापुरास असलेले कायदे जहागिरींत नसावे, यामध्यें दरबारी सापत्नभावच व्यक्त होत नाहीं काय?

छोट्या संस्थानांचा आणि या मांडलिक राजांचा राजकीय-दृष्ट्या विचार केल्यास असें दिसतें कीं, त्यांचीं उत्पन्नें अगदीं बेताचीं असल्यानें त्यांना आपला राज्यकारभार आधुनिक पद्धती-प्रमाणें कार्यक्षमतेनें चालवितां येणार नाहीं आणि आपल्या प्रजेच्या वाढत्या आकांक्षाही त्यांना पुरवितां येणार नाहींत. तेव्हां या सर्व गोष्टींचा सांगोपांग रीतीनें विचार केला असतां मांडलिकांनीं आपल्या प्रजेच्या उन्नतीकरितां व स्वतःच्या हिताकरितां जपानमधील सरदारांनीं जशा आपल्या सरदाऱ्या सोडून प्रतिष्ठित नागरिकाचा पेशा स्वीकारला, त्याप्रमाणें करवीरच्या मांडलिकांनीं आपापल्या जहागिरवरील अधि-कारांचा मोह सोडला, तर त्यांचें त्यांत अलौकिकत्व दिसून येईल आणि त्यामुळें त्यांच्या जहागिरींचें खरें, अंतिम चिरकाल टिकणारें हित होईल.

# संयुक्त राज्यघटना आणि संस्थानें

लेखकः वी

संयुक्त राज्यघटनेची कल्पना आतां बरीच दृढमूल झालेली आहे असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. संयुक्त राज्यघटना ही शब्दयोजना इंग्रजींतील ‘ फेडरेशन ’ या शब्दाला समानार्थक म्हणून उपयोगांत आणिली जाते. परंतु ‘ फेडरेशन ’ या शब्दावरून सामान्यतः जें राज्य-यंत्र अभिप्रेत होतें किंवा आपल्या नजरेसमोर उभें राहतें तेंच राज्ययंत्र, तितक्याच पूर्ण स्वरूपांत आणि त्याच अंगोपांगांनीं युक्त अशा रीतीनें, संयुक्त राज्यघटना—हिंदुस्थानांत सुरू करण्यांत येणारी संयुक्त राज्य-घटना—या शब्दापासून आपल्या नजरेसमोर उभें राहत नाहीं ही गोष्ट ध्यानांत ठेवणें जरूरीचें आहे. फेडरेशनचें राज्ययंत्र जगांत बऱ्याच ठिकाणीं सुरू झालेलें असून त्या पद्धतीवर आधारलेली राज्यघटना यश-स्वीही झालेली आहे. हिंदुस्थानचे संस्थानी हिंदुस्थान व ब्रिटिश हिंदुस्थान असे दोन भाग स्वभावतःच पडत असल्यानें आणि या दोन्ही भागांस मानवणारी आणि पचणारी अशी राज्यघटना निर्माण करण्या-खेरीज दुसरा मार्गच नाहींसा झाल्यानें मुत्सद्यांचे डोळे फेडरेशनच्या कल्पनेकडे वळले. परंतु अडचण अशी आली कीं, निरनिराळ्या प्रमा-णांत आणि स्वरूपांत शासनाधिकार वापरणारीं संस्थानें आणि पूर्ण स्वायत्त असे ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रांत यांची सांगड फेडरेशनच्या मूलभूत राज्यघटनेंत घालतां येईना. फेडरेशनची योजना तर तात्त्विक व खऱ्या स्वरूपांत अवलंबितां येत नाहीं—पण कांहीं तरी राज्यघटनेचें तंत्र निर्माण करून प्रजेच्या आकांक्षा पूर्ण करणें तर जरूर—अशा दुहेरी पेंचांत मुत्सद्दी सांपडले आणि कांहीं काल गांगरूनही गेले. पण अशा

बावरलेल्या स्थितींतच त्यांना मार्ग सुचला आणि थोड्याशा विकृत स्वरूपांत कां होईना फेडरेशनच्या कल्पनेला जन्म दिला गेला !

या कल्पनेचा उगम कोठें व कसा झाला, याचें श्रेय कोणाकडे आणि हें बाळंतपण करणारी मुख्य सुईण कोण या गोष्टींच्या शोधांत शिरण्याची आपणास जरूरी नाहीं. असें समजतें कीं, या कल्पनेचा जन्म बोटीवर प्रवासांत असतांना झाला. कांहीं संस्थानिक आणि ब्रिटिश हिंदुस्थानांतील राजकारणी पुढारी वाटाघाट करण्यासाठीं विलायतेस निघाले होते आणि वाटेंत बोटीवर या कन्यकेचा जन्म झाला. जन्म-दात्री माता कोण आणि प्रसववेदना झाल्या कीं नाहीं, असल्यास त्या कुणाला झाल्या हें नक्की समजत नाहीं. सामान्य नियमाप्रमाणें हा गर्भसंभव तरी प्रसूतीच्या आधीं योग्य काल झाला होता कीं कसें हें समजण्यासही मार्ग नाहीं. पण कसेंही असलें तरी, आणि अपत्यसंभवा-साठीं गर्भसंभव ही पूर्वगामी निश्चित गोष्ट असली तरी, मातापित्यांस खरा आनंद अपत्यजन्मानंतरच होतो; त्याचप्रमाणें, क्षितिजावर अकस्मात् एखादा तेजस्वी तारा दिसावा, तसा, या कल्पनेचा जन्म अकस्मात् बोटीवर झाला आणि एका मोठ्या संकटांतून आपण पार पडलों असें सर्वांना वाटून जिकडे तिकडे आनंदीआनंद सुरू झाला !

संयुक्त राज्यघटना असें या कन्यकेचें नामाभिधान करण्यांत आलें आणि पुढील संस्कार सुरू झाले. विलायतेंत खलबतें झालीं; वाटाघाटी झाल्या, गोलमेज परिषदा भरविण्यांत आल्या, राज-कारणांतील सर्व पक्षोपपक्षांनीं वाटाघाटींत भाग घेतला, संस्थानिकांनीं आपले हक्क किंवा अधिकार या नवीन घटनेमुळें कमी होणार नाहींत या-बद्दल पराकष्ठेची दक्षता घेतली, लाखों रुपये खर्च करून कायदेपंडितांचा अभिप्राय घेण्यांत आला आणि अखेर या कल्पनेला सन १९३५ च्या कायद्यानें मूर्त स्वरूप देण्यांत आलें. ही नवी राज्यघटना ब्रिटिश हिंदु-स्थानांतील प्रजेच्या आकांक्षा तृप्त करण्याजोगी असावी यासाठीं ब्रिटिश

हिंदुस्थानांतील लोकाग्रणींनीं किती व कसे प्रयत्न केले या इतिहासांत शिरण्याचें मला कारण दिसत नाहीं. संस्थानिकांचेबद्दलच बोलावयाचें झाल्यास असें निःशंक रीतीनें सांगतां येईल कीं ही आगामी संयुक्त राज्यघटनेची योजना आपल्या स्वतःच्या हक्कांस वा अधिकारास बाधक न व्हावी यासाठीं संस्थानिकांनीं पराकाष्ठेचे प्रयत्न केले. थोडक्यांत सांगावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल कीं, गेल्या आठदहा वर्षांत हा एकच विषय संस्थानिकांचीं अन्तःकरणें व्यापून राहिलेला आहे. नरेंद्रमंडळाच्या बैठकींत देखील हा एकच विषय प्रामुख्यानें चर्चेसाठीं होता. खासगी संभाषणांत वा सभेंत याच विषयाची चर्चा, रात्रंदिवस याच विषयाचा ध्यास आणि याच राज्यघटनेमुळें आपलें नुकसान होऊं नये हीच एक मनाची तळमळ. असें विधान करण्यास देखील मला हरकत वाटत नाहीं कीं, अग्रपूजेचा मान मिळविणाऱ्या ब्रिटिश हिंदुस्थानच्या पुढाऱ्यांनीं देखील जितका सूक्ष्म व खोल विचार या आगामी राज्यघटने-बद्दल केला असेल, त्याहीपेक्षां जास्त सूक्ष्मपणें व खोल रीतीनें या प्रश्नाचा अभ्यास संस्थानिकांनीं आणि त्यांच्या मंत्र्यांनीं केला आहे; आणि खरोखरच संस्थानिकांच्या या पराकाष्ठेच्या प्रयत्नाबद्दल त्यांना दोष देण्याचें कारण तर नाहींच; पण उलट याबद्दल त्यांची तारीफ करणेंच योग्य ठरेल.

आणि संस्थानिकांच्या या प्रयत्नाचें फळही त्यांना मिळालेलें आहे, असें या घटनेचा चिकित्सापूर्वक करून अभ्यास करणाऱ्यास कबूल करावें लागेल. संयुक्त राज्यघटनेची कल्पना तूर्त बाजूस पडली आहे ही गोष्ट खरी आणि या योजनेस ब्रिटिश हिंदुस्थानांतील सर्व पक्षांचा विरोध आहे ही गोष्टही उघड आहे. संस्थानिकांत देखील सकारण वा अकारण या योजनेस तीव्र विरोध करणारे संस्थानिक आहेत हीही गोष्ट खरी आहे. युरोपांत चालू असलेलें महायुद्ध आणखी वर्ष सहा महिने सुरू झालें नसतें, तर

या सर्व विरोधास बाजूस सारून साम्राज्य सरकारनें ही योजना अंमलांत आणण्याचे कामीं यशही मिळविलें असतें असें मानण्यासही जागा आहे. कालाच्या उदरांत काय सांठविलेलें आहे हें कोणासही सांगतां येत नसलें, तरी अनुकूल काल येतांच ही संयुक्त राज्यघटनेचीच योजना जारी करण्याचा प्रयत्न साम्राज्य सरकार करणारच नाहीं असें तरी कोणीं सांगावें ?

पण पुढें कसेंही घडणार असलें तरी, सन १९३५ च्या कायद्यानें घोषित केलेली संयुक्त राज्यघटनेची योजना एकंदरींत वाटते तितक्या रीतीनें संस्थानिकांची आणि त्यांच्या संस्थानांच्या हिताची विरोधी नाहीं असें मला वाटतें. कसें तें आतां थोडक्यांत पाहूं.

या गोष्टीचें मर्म ध्यानीं येण्यास साप्रंत संस्थानिकांची स्थिति व त्यांचा राजकीय दर्जा काय आहे इकडे थोडें लक्ष दिलें पाहिजे. संस्थानिक हे आपणाला पूर्ण सत्ताधारी आणि पूर्णपणें स्वयंशासित समजतात. त्यांची ही समजूत कशी चुकीची आहे हें दाखविण्याचें हें स्थळ नव्हे. पण साम्राज्य सरकारच्या धोरणाशीं विरुद्ध वा विसंवादी वर्तणूक त्यांची सुरू झाली म्हणजे स्वातंत्र्याच्या आणि सत्तेच्या वल्गना पार लोपून जातात आणि संस्थानिक म्हणजे ब्रिटिश राजसत्तेच्या रागालोभावर अवलंबून असणारी मर्यादित राजसत्ता हा अनुभव वेळोवेळीं येतो. म्हणून, संस्थानिक हे स्वतंत्र नाहींत, तर परावलंबी किंवा परोपजीवि असे आपआपल्या संस्थानांचे अधिपति आहेत, हीच गोष्ट नजरेसमोर ठेऊन नवीन संयुक्त राज्यघटनेमुळें त्यांचा राजकीय दर्जा वाढतो कीं कसें हें पाहिलें पाहिजे.

संस्थानें म्हणजे केवळ संस्थानाधिपतिच नव्हेत. संस्थानी प्रजा आणि संस्थानाधिपति या दोहोंचा अन्तर्भाव संस्थानें या शब्दांत होतो. म्हणून संयुक्त राज्यघटना संस्थानाला उपकारक ठरेल कीं कसें हें पाहतांना ज्याप्रमाणें संस्थानाधिपतींच्या राजकीय उन्नतीचा

विचार केला पाहिजे, त्याचप्रमाणें संस्थानी प्रजेच्या उत्कर्षाचाही प्रश्न विचारांत घेतला पाहिजे. संस्थानिक व संस्थानी प्रजा या दोहोंचा उत्कर्ष या योजनेमुळें साध्य होत असेल, तरच ती योजना स्वीकारार्ह म्हणावी लागेल.

संकल्पित राज्यघटनेमुळें हा दुहेरी हेतु थोड्या अंशानें कां होईना पण साध्य होईल असें मला वाटतें. संस्थानिकांच्या बाबतींत या योजनेमुळें त्यांचा राजकीय दर्जा नि अधिकार वाढतील, तर प्रजेच्या दृष्टीनें या योजनेमुळें त्यांच्या राजकीय आकांक्षेचा एक टप्पा गांठल्यासारखें होईल. संस्थानी प्रजा राजकीय हक्कदानासाठीं संस्थानिकांचेबरोबर भांडतच आहे. हें भांडण अद्यापि विकोपाला गेलें नसलें, तरी लवकरच तीव्र स्वरूप धारण करील असें मानण्यास जागा आहे. हा काळ संक्रमणाचा आहे. संस्थानी प्रजेचा प्रश्न कॉंग्रेसनें अलीकडे हातीं घेतला असला तरी, कॉंग्रेस ही स्वतःच्याच विवंचनेंत जास्त गुरफटली असल्यानें तिला आपली शक्ति संस्थानी प्रजेच्या प्रश्नाकडे गुंतविणें शक्य होणार नाहीं. अशा स्थितींत, संयुक्त राज्यघटना जर अमलांत आली तर साहजिकच संस्थानी प्रजेला एका सामर्थ्यसंपन्न संस्थेची मदत मिळाल्यासारखें होईल आणि या संस्थेच्या मदतीनें व सहानुभूतीनें चळवळीचा रथ मोठ्या वेगानें जाऊं लागेल. सामर्थ्यवान् मित्राचा लाभ होणें ही गोष्ट यशाचे दृष्टीनेंहि विशेषच महत्त्वाची होय यांत संशय नाहीं.

संयुक्त राज्यघटनेचा स्वीकार करणारे सर्वच संस्थानिक ते मूलतः कमीअधिक प्रमाणांत समान राजकीय दर्जाचे नसले, तरी एकाच राजकीय पातळीवर येणार असल्यानें त्यांचेमधील विषमतेचा लोप होण्यास आपोआपच सुरुवात होईल. हैद्राबादचे निजामसाहेब काय किंवा ज्याचें उत्पन्न पांच चार लाख देखील नाहीं असा संस्थानिक काय—दोघेही संयुक्त राज्यघटनेचे घटक या दृष्टीनें सारख्याच महत्त्वाचे दिसतील. आज श्रेष्ठ—कनिष्ठ या भावनेमुळें परस्परांत जो अविश्वास व असंतोष दिसतो आणि

स्वतःच्या काल्पनिक श्रेष्ठपणावर अधिष्ठित केलेल्या अहंभावाचा आविष्कार केला जातो, त्या मनोवृत्तीस आपोआपच पायबंद बसून सर्वच संस्थानिक एका रांगेत उभ्या केलेल्या सैन्यांतील शिपायाप्रमाणें आपापसांत अधिक सलोख्यानें, प्रेमानें आणि आत्मीयतेच्या दृष्टीनें वागूं लागतील. मी श्रेष्ठ तूं कनिष्ठ, या आजपर्यंत चालत आलेल्या भावनेस जोराचा धक्का बसेल आणि सर्वांचा राजकीय दर्जा एकाच मापानें मोजण्याचा प्रघात पडूं लागेल. संयुक्त राज्यघटनेच्या कायद्याप्रमाणें संस्थानिकांच्या अधिकारां-तील कांहीं बाबी संयुक्त सरकारकडे जावयाच्या आहेत. या बाबींपुरती तरी सर्व सत्ता एका स्वतंत्र अधिकार-यंत्राकडे सोंपविली जात असल्यामुळें संस्थानिकांचे मध्यें श्रेष्ठ–कनिष्ठपणाच्या प्रश्नाला स्थानच राहत नाहीं. आतां अन्तर्गत राज्यव्यवस्थेबद्दल या नवीन राज्यघटनेपासून प्रत्यक्ष कांहीं फायदा दाखवितां येणार नाहीं, हें खरें असलें तरी, क्रमानें आणि संसर्गाच्या प्रभावानें अन्तर्गत राज्यव्यवस्था देखील नवीन उत्क्रांत स्वरूप धारण करील यांतही संशय नाहीं. संयुक्त राज्यघटनेनें राज्यकारभाराच्या बाबींचे दोन भाग करून एक भाग स्वतःकडे घेऊन व दुसरा भाग संस्था-निकांच्या पूर्ण अखत्यारींत ठेवला असला तरी, हे दोन विभाग पर-स्परांपासून अगदीं अलग राहणें केव्हांही शक्य नाहीं आणि हेंच मर्मस्थान ओळखून संस्थानिक या योजनेस प्रतिकूलता दर्शवीत आहेत. हें नवीन राज्ययंत्र जोरानें फिरूं लागलें कीं सर्वच बाबतींत भयंकर खळबळ उडेल. संस्थानिकांचे अधिकार कायद्यानें आणि नियमानें नियंत्रित केले जातील आणि क्रमानें पण निश्चितपणें ब्रिटिश हिंदुस्थानांतील राज्यपद्धति संस्थानी मुलुखांतही सुरू झाल्याशिवाय राहणार नाहीं.

आज पुष्कळ संस्थानिक हिंदुस्थान सरकारास वार्षिक खंडणी देतात; याचा अर्थच असा कीं, हे संस्थानिक हिंदुस्थान सरकाराच्या आधिप-त्याखालीं आज आहेत. नवीन राज्यघटनेनें हिंदुस्थान सरकारची जागा संयुक्त सरकार घेणार असल्यानें आणि तें संयुक्त सरकार ब्रिटिश हिंदु-स्थान व संस्थानें यांच्या भागीदारीनेंच निर्माण होणार असल्यानें एक

वरिष्ठ व दुसरा त्याचा मांडलीक, आणि म्हणून खंडणी देण्यास पात्र हा प्रश्नच शिल्लक उरत नाहीं. आर्थिकदृष्ट्या ही खंडणीची सूट महत्त्वाची आहेच, पण या सुटींतच मांडलिकत्वाच्या भावनेच्या उच्चाटनाचें तत्त्व आपोआपच गोवलें जात असल्यानें खंडणीची सूट हा एक निःसंशय राजकीय दर्जाच्या दृष्टीनें मोठा फायदा आहे.

खंडणीच्या माफीच्या दृष्टीनें आर्थिक फायद्याचा प्रश्नच निघाला असल्यानें संयुक्त राज्यघटनेपासून आणखी होणाऱ्या आर्थिक फायद्याचा विचार या ठिकाणींच संपविणें बरें; संयुक्त राज्यघटनेच्या ज्या उत्पन्नाच्या बाबी ठरविल्या आहेत त्यांचें उत्पन्न आजदेखील कांहीं मोठ्या संस्थानांखेरीज इतरांना मिळतच नाहीं, ही गोष्ट या बाबींची यादी पाहिली तर सहजच दिसून येणार आहे. या बाबी अशाच आहेत कीं, त्या आजदेखील पुष्कळ संस्थानिकांच्या अधिकाराच्या कक्षेंत नाहींत. मुख्यतः या बाबींच्या उत्पन्नांतूनच संयुक्त सरकारच्या कारभाराचा खर्च चालणार असून संस्थानिकांनीं संयुक्त सरकारच्या खर्चासाठीं म्हणून स्वतंत्र अशी कांहींच रकम देणेची नाहीं. प्राप्तीवरील कर ही बाब प्रांतिक सरकारची, पण तूर्त सोईसाठीं ती संयुक्त सरकारकडे जाणार. प्राप्तीवरील कराच्या बाबीसंबंधानें नवीन राज्यघटनेच्या कायद्यानें ही बाब स्वतःकडे राखून ठेवण्याचा अधिकार संस्थानिकांना दिलेला आहे. मात्र, जरूर पडेल तर, या उत्पन्नाच्या प्रमाणांत कांहीं जास्त रकम (Surcharge) संयुक्त सरकार संस्थानिकांकडे मागूं शकेल. याशिवाय दुसरा बोजा संस्थानिकांवर कायद्यानें घातलेला नाहीं. याच्या उलट संयुक्त सरकारच्या कांहीं बाबींच्या उत्पन्नाचा मर्यादित भाग, कांहीं अटींवर व विवक्षित परिस्थितींत, प्रांतिक सरकारांना आणि घटनेंत सामील झालेल्या संस्थानांना मिळण्याची तजवीज कायद्यांत करून ठेवली आहे. ही गोष्ट घटनेच्या कायद्यांतील १३७, १३८ व १४० हीं कलमें वाचलीं तर दिसून येणार आहे. ही अधिक उत्पन्नाची बाब अनिश्चित म्हणून बाजूस ठेवली तरी, बहुसंख्य संस्थानांचें संयुक्त राज्यघट-

नेच्या योजनेपासून आर्थिक नुकसान कांहींच नाहीं ही गोष्ट कबूल करावी लागेल. नुकसान होत असेल तर फारच थोड्या संस्थानांचें.

अशा रीतीनें राजकीय दर्जा आणि आर्थिक परिस्थिति या दोन्ही दृष्टीनें संयुक्त राज्यघटनेचा स्वीकार केल्यापासून बहुसंख्य संस्थानिकांचें नुकसान होत नाहीं इतकेंच नव्हे तर फायदाच होत आहे असें दिसून येतें. आतां संस्थानी प्रजेच्या दृष्टीनें विचार करावयाचा.

संस्थानी प्रजेचा देखील संयुक्त राज्यघटनेपासून फायदाच होईल हें थोड्याशा विचारांतीं दिसून येणार आहे. सुराज्य हेंच प्रजेच्या चळवळीचें ध्येय आहे. संस्थानांत एका अर्थानें स्वराज्य आहे; पण सुराज्य नाहीं असें म्हणणें असून तें मिळविण्यासाठीं प्रजेनें चळवळ चालू केली आहे. सुराज्याचीं मुख्य अंगें राजानें आपला खाजगी खर्च योग्य प्रमाणांत ठरवून घेणें आणि राज्यकारभार लोकमतानुवर्ती करणें हीं होत. खासगी खर्चाचें प्रमाण ठरवून घेणेची गोष्ट आतां अंमलांत आणल्याशिवाय दुसरा मार्गच संस्थानिकांना राहिलेला नाहीं. दुसरी गोष्ट राज्यकारभार लोकमतानुरोधानें चालविण्याची तजवीज करणें ही होय. संयुक्त राज्यघटना अंमलांत आणली गेली तर, त्या सत्तेकडे सोंपविण्यांत येणाऱ्या खात्यांचा कारभार आपोआपच संस्थानिकांच्या हातचा जाऊन लोकमतानुतंत्री होतोच. इतक्या प्रमाणांत सुराज्याचें ध्येय अल्प स्वरूपांत कां होईना, पण साध्य झाल्याप्रमाणें होतच आहे. या बाबी न्यायदानाचे बाजूनें देखील संयुक्त सरकारच्या वा फेडरल कोर्टाच्या अधिकारक्षेत्रांत जाणाऱ्या असल्यानें तितक्या प्रमाणांत स्वराज्यच मिळाल्यासारखें होणार आहे. ज्या बाबी संयुक्त सरकारच्या कक्षेंत नाहींत— आणि अन्तर्गत कारभाराच्या बहुतेक सर्व बाबी याच सदरांत येतात—त्या संस्थानिकाच्या अनियंत्रित सत्तेखालींच आतांप्रमाणें राहणार हें खरें; तथापि, याही बाबतींत ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रगमनशील राज्यकारभाराचें दडपण संस्थानिकांवर पडणारच. संयुक्त कायदेमंडळांत संस्था-

निकांचे प्रतिनिधी ब्रिटिश इंडियाच्या प्रतिनिधींबरोबर बसतील. त्या ठिकाणीं संस्थानांचा अन्तर्गत कारभार हा चर्चेचा विषय होऊं शकत नसला तरी, या नाहीं त्या मार्गानें आणि या नाहीं त्या स्वरूपांत, संस्थानांत चालू असणारा बेलगामी कारभार—तो तसा असेल तर—चवाट्यावर येणारच आणि त्यावर लोकमतानुवर्ती टीकेचा भडिमार होणारच. आज खुद्द संस्थानिक किंवा त्यांचे प्रतिनिधी कायदेमंडळांत बसतील तर त्यांच्या तोंडावर उघडपणें त्यांच्या बेलगामी कारभाराबद्दल प्रश्न विचारले जातील किंवा त्यांच्या समक्ष टीकेची झोड उठविली जाईल. संस्थानिकांचा कारभार अत्यंत प्रतिगामी स्वरूपाचा असेल तर अशा प्रसंगीं त्या संस्थानच्या प्रतिनिधीला लज्जेनें आपली मान खालींच घालावी लागेल! लोकमताच्या दडपणास अशा रीतीनें मान तुकविल्याशिवाय गत्यंतरच राहणार नाहीं. सुधारणेच्या बाबतींत आपल्या शेजारचें जग झपाट्यानें पुढें जात असतांना, संस्थानिक मात्र कांहींच हातपाय न हालवितां जागच्या जागींच बसतील आणि आपली निरकुंश-सत्ता गाजविण्याचाच उपक्रम चालू ठेवतील असें मानणें चुकीचें होईल. त्यांतही त्यांना पाठीशीं घालण्यास साम्राज्य सरकार तयार नाहीं. कोणाचा पाठिंबा नाहीं कीं कोणाची सहानुभूति नाहीं; अशा स्थितींत अनन्य-गतिक होऊन संस्थानिक आपल्या प्रजेचेंच अनुरंजन करण्यास प्रवृत्त होतील आणि आपल्या प्रजेचेंच प्रेम संपादन करण्याठीं अधिकारदानाची त्यांची मागणी पुरी करण्याच्या उद्योगास खात्रीनें लागतील असें मला वाटतें. सत्संगतीचा प्रभाव मोठा आहे. पुष्पाच्या संगानें मातीस सुगंध प्राप्त होईल या सुभाषिताचें मर्म तरी हेंच होय. कालाचा ओघ प्रचंड आहे. दुराग्रहाचा खडक कितीही मोठा असला तरी तो या ओघापुढें टिकाव धरूं शकणार नाहीं. प्रजेची अन्तर्गत चळवळ, बाहेरून होणारी टीका किंवा साम्राज्य सरकारच्या आधाराचा अभाव या तीन गोष्टींच्या कैचींत सांपडल्यानंतर जुलमी संस्थानिकाचें तोंड आधारासाठीं आणि प्रेमासाठीं प्रजेकडे वळलेंच पाहिजे असें मला वाटतें.

आतां तूर्त तरी संयुक्त राज्यघटनेंतील कायदेमंडळांत संस्थानिक किंवा त्यांचे प्रतिनिधी बसणार आणि प्रतिनिधी निवडून पाठविण्यास प्रजेला हक्क नाहीं ही गोष्ट खरी आहे. तथापि, थोडक्याच काळांत ही स्थिति पालटून प्रजेचे प्रतिनिधी संयुक्त कायदेमंडळांत बसूं लागतील अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. प्रजेची हीच मुख्य तक्रार असून ती नाहींशी होण्याच्या मार्गांत आहे.

संयुक्त राज्यघटना अस्तित्वांत आली तर संस्थानी न्यायदानपद्धतींतही इष्ट तो फरक घडून आल्याशिवाय राहणार नाहीं. संयुक्त बाबींपुरतें बोलावयाचें झाल्यास संस्थानी हायकोर्टाच्या ठरावांवर फेडरल कोर्टाकडे अपिलें होतील. यामुळें संस्थानी हायकोर्टाचें काम 'हायकोर्ट' या संस्थेस अनुरूप असें व्हावें या गोष्टीकडे संस्थानिकांना लक्ष द्यावें लागेलच. अशा रीतीनें फेडरल कोर्टाची नजर आपल्या कामाकडे आहे असें समजल्यानंतर संस्थानिक आपलीं हायकोर्टें पूर्ण कार्यक्षम आणि पूर्ण स्वतंत्र करण्याचा प्रयत्न कसोशीनें करतील. संस्थानिकांच्या हायकोर्टावर कांहीं बाबींपुरतें तरी फेडरल कोर्टाचें नियंत्रण चालणार आहे. हीं हायकोर्टें कार्यक्षम असावींत असाच कटाक्ष दिसतो आणि म्हणूनच ज्या हायकोर्टाचे ठरावावर फेडरल कोर्टाची हुकमत चालणार आहे असें संस्थानी हायकोर्ट प्रथम 'हायकोर्ट' या संस्थेस पात्र असल्याचें सर्टिफिकेट बादशहांनीं दिलें असलें पाहिजे असा निर्बंध घटना कायद्याच्या कलम २१७ मध्यें घालण्यांत आलेला दिसतो!

संस्थानांतील हायकोर्टाची सुधारणा झाली तर संपूर्ण न्यायपद्धतीची सुधारणा क्रमानें होणेंच भाग आहे. न्यायदानाचा पवित्रपणा ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे; किंबहुना संपूर्ण राज्यकारभाराची इभ्रत न्यायदानाचे चोखपणावर अवलंबून असते. यासाठीं, संयुक्त राज्यघटनेच्या स्वीकारापासून न्यायदानपद्धतीच्या सुधारणेच्या दिशेनें प्रजेनें फार मोठा फायदा पदरांत पाडून घेतला असेंच होणार आहे.

वरील विवेचनावरून आगामी संयुक्त राज्यघटना संस्थानिकांना त्यांचे प्रजेस, राजकीय व आर्थिक दृष्टीनें, फायदेशीर आहे ही गोष्ट ध्यानं येईल, अशी उमेद आहे. आतां ही राज्यघटना निर्दोष आहे असें मा समजण्याचें कारण नाहीं. ती सदोष आहे आणि असलेले दोष नाहीं करण्याचा प्रयत्न करून झाला पाहिजे यांतही वाद नाहीं. पण आहे य स्थितींत देखील ती स्वीकारार्ह आहे इतकेंच मला म्हणावयाचें आहे अखिल हिंदुस्थान ही योजना त्याज्य ठरवून तिला सर्व पक्षोपपक्ष धिक्क रित असतांना संस्थानिकांनीं तरी अखिल हिंदुस्थानाच्या हिताकडे नज देऊन आणि आपल्या ब्रिटिश हिंदुस्थानांतील बांधवांस पाठिंबा देण्या बुद्धीनें ती योजना स्वतःच्या फायद्याची असली तरी ती स्वीकाराव कीं धिक्कारावी हा प्रश्न निराळा—त्याचा विचार मुत्सद्यांनीं कराव माझा तो विषय नव्हे. तो भाग बाजूस ठेऊन केवळ तात्त्विक दृष्टीं आहे त्या स्थितींत देखील संयुक्त राज्यघटनेची योजना संस्थानिकां स्वीकारार्ह आहे इतकेंच मला दाखवावयाचें आहे. आज हा सर्वच विष बाजूला पडला आहे. कदाचित् तो पुनः पुढें येईल अगर अन्यस्वरूपहं धारण करील. भवितव्यता काय आहे हें कोणास समजलें आहे ?

---

# अखिल भारतीय संस्थान लोकपरिषदेची कामगिरी



अखिल भारतीय संस्थान लोकपरिषद् ही संस्था म्हणजे संस्थानी प्रजेची कॉंग्रेस आहे व आज तिला मिळालेला हा मान्यवर दर्जा तिनें आपल्या गेल्या १२ वर्षांच्या आयुष्यांत आपल्या सर्वांगीण कामगिरीनें प्राप्त करून घेतलेला आहे. राष्ट्रीय सभेच्या प्रत्येक लहानसहान गोष्टीकडे ज्या उत्सुकतेनें जनता आज पहात आहे, त्याच उत्सुकतेनें संस्थानी प्रजा या संस्थेकडे पहात असल्याचें दृश्य आज दृष्टीस पडत आहे. राष्ट्रीय सभा अस्तित्वांत येऊन तिला ५० वर्षें होऊन गेलीं, तर या संस्थेचें बालपण कोठें आतां संपत आलें आहे. पण या अल्प अवधींत या संस्थेनें जी महनीय कामगिरी केली, त्याचें श्रेय लोकपरिषदेचे चिटणीस श्री. अमृतलाल शेट, कै. प्रो. गणपतराव अभ्यंकर व कै. श्री. मणिशंकर त्रिवेदी आणि परिषदेचे दोन अध्यक्ष कै. दिवाणबहादूर एम्. रामचंद्रराव व डॉ. पट्टाभि सीतारामय्या या पांच व्यक्तींकडे मुख्यतः आहे हें विसरून चालणार नाहीं. या पांच व्यक्तींनीं आपली जबाबदारी अत्यंत कर्तव्यकठोर बुद्धीनें पार पाडली आहे व त्याबद्दल संस्थानी प्रजा त्यांची ऋणी राहील यांत शंका नाहीं. या अखिल भारतीय संस्थान लोकपरिषदेची कल्पना दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानी चळवळींचे तिघे प्रवर्तक श्री. न. चिं. केळकर, कै. ग. र. अभ्यंकर व कै. वामनराव पटवर्धन यांनीं काढली आणि या परिषदेची पहिली प्रास्ताविक सभा दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेचे चिटणीस कै. वामनराव पटवर्धन व श्री. न. चिं. केळकर यांनीं मुंबईस ता. ५-३-१९२२ रोजीं सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे दिवाणखान्यांत राजकोटचे वॅ. शुक्ल यांचे अध्यक्षतेखालीं भरविली होती. सदर सभेस दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानें, काठेवाड, गुजराथ, मध्यहिंदुस्थान व इतरत्र भागां-

तील संस्थानांतील ४० कार्यकर्ते गृहस्थ उपस्थित होते. संस्थानांतील राज्यकारभारांत सुधारणा घडवून आणण्याकरतां कशा तऱ्हेची चळवळ करावी, निरनिराळया संस्थानी संस्थांचा परस्परांशीं संबंध काय असावा, लोकमत कशा प्रकारें अजमावून त्यास योग्य वळण लावावें, वगैरे प्रश्नांचा विचार करण्याकरतां ही सभा बोलावण्यांत आली होती. या सभेच्या प्रथमारंभीं श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांचें प्रास्ताविक भाषण होऊन त्यांनीं सभेचा उद्देश समजावून सांगितला. बॅ. शुक्ल यांनीं संस्थानांतील त्रेतायुगांतील कारभार प्रजेला कसा जाचक होत आहे तें सांगून अ. भा. संस्थान प्रजापरिषदेसारख्या संस्थेची आवश्यकता असल्याचें सांगितलें. नंतर ऑगस्ट–सप्टेंबरमध्यें परिषदेचें अधिवेशन करण्याचें ठरून तात्पुरती समिति नेमण्यांत आली आणि या कमिटीचें काम श्री. केळकर, कै. पटवर्धन, श्री. मेथा, चुडगर, व ज. र. घारपुरे यांच्याकडे सोंपविण्यांत आलें, आणि कमिटीची कचेरी तूर्तातूर्त दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेच्या कचेरींत पुणें येथें ठेवण्याचें ठरलें. पण पुढें या परिषदेची कल्पना पटवून देण्यांत आणि प्रचाराचे कामींच फार दिवस गेल्यानें पुढें चार वर्षें परिषद भरविण्याच्या दृष्टीनें कांहींच काम झालें नाहीं.

पुढें चार वर्षांनीं म्हणजे १९२६ या वर्षीं परत कांहीं कार्यकर्त्यांचीं सभा झाली. या कमिटीच्या पुढें बऱ्याच सभा भरून शेवटीं या परिषदेचें पहिलें अधिवेशन एलोरचे प्रागतिक पुढारी कै. दि. ब. एम्. रामचंद्रराव या विद्वान् व अत्यंत मेहनती गृहस्थांच्या अध्यक्षतेखालीं ता. १७ व १८ डिसेंबर १९२७ रोजीं मुंबईस भरलें. ही परिषद यशस्वी होण्यासाठीं खूप प्रचार करण्यांत आला होता. ईदर, जामनगर, भावनगर या ठिकाणीं या संस्थानांच्या प्रजापरिषदा व काठेवाड राजकीय परिषद भरविण्यांत आली आणि वृत्तपत्रांतून श्री. पोपटलाल चुडगर, कै. गणपतराव अभ्यंकर, व कै. श्री. मणिलाल कोठारी यांनीं संस्थानी राज्यकारभारावर टीकेचा भडिमार उडवून दिला, आणि त्यामुळें ही परिषद म्हणजे एक नवी

शक्ति निर्माण होणार असें लोकांस वाटूं लागलें. या प्रचारामुळें १५०० संस्थानी कार्यकर्ते परिषदेच्या अधिवेशनास उपस्थित होते. या पहिल्या परिषदेचे स्वागताध्यक्ष श्री. गोविंदलाल शिवलाल मोतीलाल यांनीं आपल्या भाषणांत परिषदेचा जन्म कोणत्या कारणासाठीं झाला, याचें मोठें सुंदर विवेचन केलें आहे. ते म्हणतात, "राजकीयदृष्ट्या हिंदुस्थानाची संस्थानी व खालसा हिंदुस्थान अशी विभागणी झालेली असून खालसा मुलखाचें क्षेत्रफळ १०,९४,३०० चौरस मैल आहे तर संस्थानी मुलखाचें ७११,०३२ चौरस मैल आहे. खालसांतील लोकसंख्या २४ कोटी ७० लक्ष आहे, तर संस्थानांतील ७ कोटी, १० लक्ष आहे. हीं ५६१ संस्थानें सर्व हिंदुस्थानभर विखुरलेलीं आहेत; हीच संस्थानांची संख्या पूर्वीं ६९४ होती. ही घट कशी झाली तें मला सांगतां येणार नाहीं. तें फक्त पोलिटिकल खातें जाणत असेल. हीं संस्थानें म्हणजे भूतकाळांतील हिन्दी राज्याचे अवशेष आहेत. राजपुतान्यांतील संस्थानें हीं सर्वांत जुनीं आहेत. बाकीचीं मोंगल, मराठी आणि शीख राज्यें धुळीस मिळाल्यावर जन्माला आणलेलीं आहेत. राजपुतान्यांतील राजे मोंगल आणि मराठी साम्राज्याचे मांडलिक होते. या रजपूत राजांनीं ईस्ट इंडिया कंपनीशीं १८ व्या व १९ व्या शतकांत तह-करार केले. सन १८५८ मध्यें या कंपनीनें आपला कारभार ब्रिटिश राजसत्तेकडे सुपूर्त केल्यावर पार्लमेंटच्या कायद्याप्रमाणें ईस्ट इंडिया कंपनी व संस्थानिक यांच्यामध्यें झालेले करार आपणांवरही बंधनकारक आहेत, असें ब्रिटिश राजसत्तेनें ठरवून घेतलें. ईस्ट इंडिया कंपनी होती, त्यावेळीं तहकरारांची काटेकोर अंमलबजावणी होत नसे; ढिला कारभार होता. पण ब्रिटिश सत्तेनें आपल्याकडे कारभार घेतल्यावर ही स्थिति पालटली. ब्रिटिश राजसत्तेनें तहकराराच्या जोडीस प्रघात, परंपरा व रूढि अमलांत आणली आणि संस्थानिकांचे अधिकार आणि महत्त्व दिवसेंदिवस कमी करण्याचें ठरविलें. निजामसाहेबांनीं आपल्या अधिकाराचें फाजील स्तोम माजविल्याबरोबर व्हाईसरॉय लॉर्ड रिडिंग यांनीं सणसणीत उत्तर पाठवून तह-करारांची प्रतिष्ठा काय आहे तें दाखवून दिलें आहे."

या तहकरारांना केराच्या टोपलीइतकेंच महत्त्व आहे असें पुढें दिसून आलेलें आहे. एका काळच्या स्वतंत्र पण प्रजेच्या सामर्थ्यावर जिवंत राहूं शकणाऱ्या राजांनीं ब्रिटिशांचें संरक्षण मिळाल्याबरोबर आपल्या प्रजेला धुडकावून लावून स्वतंत्ररित्या कारभार चालविण्यास सुरवात करून आपल्या सुखासाठीं, चैनीसाठीं, व विषयोपभोगासाठीं प्रजेच्या सुखावर अंगार ठेवला. त्यामुळेंच संस्थानी कारभार म्हणजे बेबंदशाहीचा कारभार ठरून गेला. वेफाम करवाढ, अन्यायी न्यायनिवाडे, खासगीचा भयंकर खर्च, भाषण-स्वातंत्र्य-बंदी, मुद्रण-स्वातंत्र्यास बंदी, वगैरे अनेक गोष्टींमुळें संस्थानी प्रजा म्हणजे केवळ गुलामगिरींत काळ कंठणारीं मानवी जनावरें अशी त्यांची केविलवाणी स्थिति झाली. 'मुकीं बिचारीं कुणी हांका' असा त्यांना जनावरांचा दर्जा प्राप्त झाला. ही स्थिति सुधारण्यासाठीं व ब्रिटिश राजवटीप्रमाणें संस्थानांचा कारभार चालावा म्हणून संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति स्थापिली जावी अशी मागणी करण्यांत येऊ लागली आणि त्याचा पुरस्कार श्री. गोविंदलाल शिवलाल यांच्या भाषणांत केलेला आहे. त्यांनीं आपल्या भाषणांत पुढील महत्त्वाच्या गोष्टींची आवश्यकता प्रतिपादन केली होती:— (१) खासगी खर्च निश्चित करणें; (२) संस्थानांतील गाऱ्हाण्यांसाठीं चौकशी कमिशन नेमणें; (३) छोट्या संस्थानांचें एकीकरण करून एक मोठें संस्थान निर्माण करणें; (४) स्वतंत्र हायकोर्ट अस्तित्वांत आणणें.

ज्या फेडरेशनचा पुढें एवढा बोलबाला झाला व आज जें मागें पडलें आहे, ती कल्पना श्री. गोविंदलाल शिवलाल यांच्या या भाषणांत मांडलेली आहे हें विशेष होय. त्यांनीं संस्थानें आणि खालसा मुलूख यांचें फेडरेशन झालें, तरच पुढील मार्ग सुकर होईल असें भविष्य वर्तविलें होतें. गोलमेज परिषदेंत फेडरेशनचा पुरस्कार होऊन संस्थानिकांनीं फेडरेशनची कल्पना पसंत केली, म्हणून त्यांचीं स्तुतिस्तोत्रें गाण्यांत आलीं. पण हिंदुस्थानच्या हिताचे दृष्टीनें आवश्यक काय आहे याचा विचार अ. भा. सं. प्रजापरिषदेच्या पहिल्या अधिवेशनांत किती दूरदृष्टिपणानें केला होता,

हें श्री. गोविंदलाल शिवलाल यांच्या भाषणावरून दिसत आहे. त्यांनीं तहकरारांची परत उजळणी व्हावी अशीही सूचना आपल्या भाषणांत केली होती.

परिषदेचे अध्यक्ष कै. दिवाण बहादूर एम्. रामचंद्रराव, बी. ए., बी.एल्. यांचें भाषण त्यांच्या गाढ विद्वत्तेस साजेसेंच झालें. फेडरल राज्यकारभार, आर्थिक प्रश्न, बटलर कमिटी, संस्थानिकांचें फेडरेशनमध्यें स्थान वगैरे बाबतींत त्यांनीं आपले विचार निर्भिडपणें मांडले. संस्थानांतील अंतर्गत कारभार व अधिराजसत्तेची जबाबदारी याबद्दल बोलतांना ते म्हणाले कीं, 'जर सार्वभौम राजा, खालसा मुलुखांतील कारभार लोकांच्या हितासाठीं जबाबदार राज्यपद्धतीचा करणार असेल, तर संस्थानांतील राज्यकारभारही खालसाच्या दर्जाप्रमाणें करण्याचें कर्तव्य सार्वभौम सत्तेनें पाळलें पाहिजे. संस्थानी कारभार कितीही कनिष्ठ दर्जाचा असला, तरी तो तहकरारांच्या सबबीखालीं सार्वभौमसत्तेला सुधारतां येत नाहीं असें म्हणणें चुकीचें आहे.'

या अधिवेशनांत ' संस्थानिकांच्या आधिपत्याखालीं जबाबदार राज्यपद्धति स्थापन करणें हें परिषदेचें ध्येय असल्याचें निश्चित करण्यांत आलें.' या परिषदेंत पुढील महत्त्वाचे ठराव पास झाले:—(१) संस्थानांत कोणती राज्यपद्धति असावी हें ठरविण्याचा हक्क स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर संस्थानी प्रजेचा आहे. (२) संस्थानिकांनीं जबाबदार राज्यपद्धति स्थापन करावी, संस्थानचे अंदाजपत्रकावर विधिमंडळाला मत देण्याचा अधिकार असावा; खासगी खर्चावर मत देण्याचा विधिमंडळाला हक्क असावा, व स्वतंत्र न्यायदानपद्धति स्थापन करून संस्थानिकांची न्यायदानांतील ढवळाढवळ अजिबात थांबविली जावी. (३) हिंदुस्थानला स्वराज्य लवकर मिळणें शक्य व्हावें म्हणून खालसा हिंदुस्थान व संस्थानांना जोडणारी एक राज्यघटना तयार व्हावी आणि संस्थानी प्रजेला या घटनेंत स्थान प्राप्त व्हावें (४) प्रजेला नागरिक स्वातंत्र्याचे—सभास्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य, व्यक्ति स्वातंत्र्य—हक्क दिल्याची घोषणा व्हावी.

(५) वेठबिगार बंद व्हावी. (६) राजकुमारांना राजकुमार कॉलेजांतून जें शिक्षण दिलें जातें, तें राष्ट्रीयत्वास बाधक आहे. (७) संस्थानांतील अंतर्गत कारभारांत वरिष्ठ सरकारनें पायाशुद्ध तत्त्वावर ढवळाढवळ करावी. ( ८ ) संस्थानिकांच्या मागणीवरून जी बटलर कमिटी नेमण्यांत आली आहे, त्या कमिटीनें संस्थानी प्रजेचें म्हणणें ऐकून घ्यावयाचें ठरविलेलें असल्याचें दिसत नाहीं. तेव्हां अशा कमिटीचे निर्णय संस्थानी प्रजेला मान्य होणार नाहींत हें सरकारनें लक्ष्यांत ठेवावें.

या पहिल्या प्रजापरिषदेनें अखिल भारतीय चळवळीची मुहूर्तमेढ रोवली गेली आणि पुढें या कार्याचा विस्तार व दर्जा जो वाढला, त्याला कै. दिवाण-बहादूर एम्. रामचंद्रराव यांचें नेतृत्व कारणीभूत आहे हें विसरून चाल-णार नाहीं. पहिल्या परिषदेंत दुसऱ्या राजकीय संस्थांशीं सहकार्य करण्या-बाबत जो एक ठराव पास झाला आहे,त्याअन्वयें सन १९२७च्या मद्रासच्या कॉंग्रेस अधिवेशनाला श्री. मणिलाल कोठारी व श्री. बी. एस. पथिक यांचें शिष्टमंडळ पाठविण्यांत आलें व त्यांनीं कॉंग्रेस श्रेष्ठींची भेट घेऊन त्यांना प्रजापरिषदेचें म्हणणें पटवून दिलें व कॉंग्रेसनें संस्थानी प्रजेच्या लढ्यांत मदत करणें किती आवश्यक आहे, तेंही समजावून सांगण्यांत आलें व यामुळेंच संस्थानांतून जबाबदार राज्यपद्धति स्थापन करण्याच्या मागणीला कॉंग्रेसनें प्रथमच कॉंग्रेसच्या मद्रास अधिवेशनांत एका ठरावानें पाठिंबा दिला आणि हा ठराव पुढें लखनौ व कलकत्ता कॉंग्रेसमध्यें पुनः पसार करण्यांत आला.

सर लेस्ली स्कॉट यांची हिंदुस्थानांत संस्थानिकांचें ‘ अल्स्टर ’ निर्माण करण्याची योजना प्रसिद्ध झाल्यावर तिचा सर्वत्र धिःकार कर-ण्यांत आला. या योजनेनें संस्थानिकांचा ‘ सवता सुभा ’ होणार होता आणि ही योजना हिंदी राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या आड येणारी होती. साम्राज्यशाहीच्या पुरस्कर्त्यांनीं संस्थानिकांशीं संगनमत करून हिंदुस्थानला गुलामगिरींत खितपत ठेवण्यासाठीं केलेली कारवाई सर्वत्र निषेधार्ह ठरली

गेली आणि या कामीं अ. भा. सं. लोक परिषदेनें फार मोठा भाग उचलला होता.

काँग्रेसनें भावी राज्यघटनेसाठीं नेमलेल्या नेहरू कमिटीचा रिपोर्ट हा सन १९२८ मध्यें प्रसिद्ध झाला. संस्थानिकांशिवाय इतरांना तो स्वागतार्ह वाटला. भावी मध्यवर्ति सरकारकडे, आज संस्थानांबाबत हिंदुस्थान सरकार जें कर्तव्य बजावीत आहे, तें सोंपविण्यांत यावें, अशी नेहरू कमिटीनें केलेली शिफारस अत्यंत योग्यच होती. संस्थानिकांची कबुली असेल, तर संस्थानी आणि खालसा भूभागाचें फेडरेशन करावें अशी योजना नेहरू कमिटीनें मान्य केली होती. त्याचबरोबर पोलिटिकल खात्याविरुद्ध संस्थानिकांचीं असलेलीं गाऱ्हाणीं नेहरू कमिटीनें मान्य करून या गाऱ्हाण्यांचा निकाल लावण्यासाठीं सुप्रीम कोर्ट अंमलांत आणण्याची शिफारस तिनें केली होती. हा रिपोर्ट हिंदुस्थानांतील सर्व पक्षांस मान्य होता, पण तो संस्थानिकांस मान्य नव्हता. संस्थानिकांशीं या बाबतींत वाटाघाट करण्याची तयारी कमिटीनें दर्शविली, पण प्रजा-पुढाऱ्यांबरोबर एकाच मेजाभोंवतीं बसवून त्यांना बरोबरीचा दर्जा देण्यास संस्थानिक तयार नसल्यामुळें संस्थानिकांच्या दुराग्रही खडकावर हा रिपोर्ट आदळून तो निकालांत निघाला.

सन १९२८ मध्यें संस्थानिकांच्या मागणीवरून सार्वभौमत्व आणि तहकरार या प्रश्नांची चौकशी करण्यासाठीं नेमण्यांत आलेल्या बटलर कमिटीचें कार्यक्षेत्र फारच संकुचित होतें; आणि या बटलर कमिटीच्या शिफारशींचा ज्या जनतेवर खरा परिणाम होणार होता, त्या संस्थानी जनतेच्या प्रतिनिधींची साक्ष अगर त्यांचें म्हणणें ऐकून घेण्याची तजवीज सरकारनें केली नव्हती. परिषदेनें हा प्रश्न हातीं घेऊन हिंदुस्थान सरकारकडे या कमिटीच्या घटनेबद्दल व तिच्या कामकाजाबद्दल जोराची तक्रार केली, पण त्याचा काडीमात्रही उपयोग झाला नाहीं. बटलर कमिटीच्या कामाच्या वेळीं संस्थानिकांचा मोठाच

मेळावा लंडनमध्यें जमा झाला होता. नरेंद्रमंडळानें इंग्लंडांतील वृत्तपत्रांत सारखे लेख प्रसिद्ध करवून आपलें मागणें किती योग्य आहे, तें सिद्ध करण्याची मोहीम चालविली होती. संस्थानिकांना अनियंत्रित राज्य-कारभार करावयास सतत मिळावा, म्हणून ही सारी संस्थानिकांची खटपट होती. ब्रिटिश वर्तमानपत्रांतून संस्थानिकांच्या स्तुतिपर लेख प्रसिद्ध होऊं लागले आणि त्याचा परिणाम संस्थानांतून सुराज्य आहे व तेथील लोक फार सुखी आहेत, असा समज होण्यांत झाला. संस्थानिक व त्यांचे सल्लागार यांनीं संस्थानांच्या सार्वभौमत्वाबद्दल आणि त्यांचे संबंध थेट बादशाहांशीं आहेत, याबद्दल प्रचार सुरू ठेवला. या भाडोत्री प्रचारास आळा घालण्याची आवश्यकता वाटूं लागल्यावर परिषदेनें संस्थानिकांवर प्रतिहल्ला इंग्लंडांतच चढविण्यासाठीं कै. दि. ब. एम्. रामचंद्रराव, बॅ. पी. एल्. चुडगर व कै. प्रो. ग. र. अभ्यंकर यांचें शिष्टमंडळ इंग्लंडास पाठवि-ण्याचें ठरविलें. या शिष्टमंडळानें तेथें फार मोठी कामगिरी बजावून संस्था-निकांचें खरें स्वरूप उघडकीस आणलें व त्यामुळें संस्थानिकांचा डाव हुकला असें म्हणण्यास हरकत नाहीं. दि. ब. रामचंद्रराव यांनीं विलायतेस रवाना होण्यापूर्वी व्हाईसरॉयांची भेट घेऊन आपलें म्हणणें निवेदन केलें. इंग्लंडांतील निरनिराळे मुत्सद्दी, वृत्तपत्रकार, पार्ल-मेंटचे सभासद यांनीं या शिष्टमंडळाचें म्हणणें ऐकून घेतल्यानें पार्ल-मेंटांत यासंबंधीं बरींच प्रश्नोत्तरें झालीं, आणि शिष्टमंडळाचा इंग्लंडला जाण्याचा हेतु सफल झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. या शिष्टमंडळाची भेट जरी बटलर कमिटीनें घेतली नाहीं, तरी शिष्टमंडळानें आपलें लेखी म्हणणें कमिटीस सादर केलें. संस्थानांतील परिस्थिति माणुसकीला काळिमा आणणारी कशी आहे, संस्थानिकांचा प्रचार कसा दिखाऊ आहे आणि संस्थानांतील कारभार सुधारलेल्या ब्रिटिश राष्ट्राला कलंक लावणारा कसा आहे, तें श्री. चुडगर यांनीं निरनिराळीं पत्रकें छापवून व प्रसार करून लोकांना पटवून दिलें.

या शिष्टमंडळाच्या खर्चासाठीं फंड जमविण्याचें मोठें अवघड काम, फारच कौशल्यानें श्री. अमृतलाल शेट यांनीं केलें. शिष्टमंडळाच्या सभासदांप्रमाणें श्री. शेट यांच्या कामगिरीबद्दल संस्थानी प्रजा ऋणीच राहील यांत शंका नाहीं.

या परिषदेचें दुसरें अधिवेशन ता. २५-२६ मे १९२९ रोजीं 'लीडर' पत्राचे सुविख्यात संपादक श्री. सी. वाय्. चिंतामणि यांच्या अध्यक्षतेखालीं मुंबई येथें झालें, स्वागताध्यक्ष प्रो. अभ्यंकर यांच्या स्वागताध्यक्षीय भाषणांत बटलर कमिटीच्या रिपोर्टाची कसून छाननी करण्यांत आलेली आहे. लॉर्ड आयर्विन यांनीं राजकोट येथील आपल्या भाषणांत संस्थानिकांना कटु पण हिताचा उपदेश करतांना, ( १ ) प्रातिनिधिक संस्थांची वाढ करा, ( २ ) स्वतंत्र न्यायदानपद्धत अंमलांत आणा, ( ३ ) न्याय व अंमलबजावणी खात्यांची फारकत करा, ( ४ ) नोकरीची शाश्वति, नोकरांना वाटेल असें करा, व ( ५ ) निश्चित खासगी खर्च करण्याबद्दल ज्या सूचना केल्या, त्याबद्दल तपशीलवार विवेचन प्रो. अभ्यंकरांनीं करून या गोष्टी अंमलांत आल्यास संस्थानी प्रजेची तक्रार रहाणार नाहीं असा त्यांनीं अभिप्राय व्यक्त केला. या अधिवेशनांत बटलर कमिटीच्या शिफारशींबद्दलच मुख्यतः ठराव पास झाले.

जामनगर व पतियाळा संस्थानांतील राज्यकारभाराबद्दल प्रजाजनांच्या तक्रारी आल्यावरून परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनांत चौकशी कमिट्या नेमल्या. पहिल्या कमिटीचे अध्यक्ष बॅ. जमनादास मेथा होते. जामनगर संस्थानांतील मक्तेपद्धतीमुळें प्रजा अगदीं हैराण झाली होती. या कमिटीचा रिपोर्ट हा आंकडेवार माहितीनें इतका भरलेला आहे कीं, दरबारला त्याबद्दल उत्तर देणेंच शक्य झालें नाहीं. पतियाळाच्या माजी महाराजांवर कांहीं स्त्रियांना पळविल्याचे, कांहींचे खून केल्याचें, वगैरे भयंकर आरोप करण्यांत आले होते. परिषदेनें या आरोपांची चौकशी करण्यासाठीं श्री. अमृतलाल शेट, प्रो. अभ्यंकर व श्री. अमृतलाल ठक्कर यांची कमिटी नेमून

तिनें पंजाबांत साक्षीपुरावा गोळा करून Indictment of Patiala या नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें. या पुस्तकानें सर्वत्र भयंकर खळबळ उडून गेली. त्यांचेवर केले गेलेले आरोप खरे आहेत असें चौकशीअंतीं ठरलें. नरेंद्रमंडळाच्या चॅन्सेलरच्या जागीं असलेल्या पतियाळाच्या महाराजांचीं कृष्णकृत्यें जगासमोर आलीं व पुढें ते पहिल्या गोलमेज परिषदेस जाण्यासाठीं मुंबई बंदरावर आले, तेव्हां काळीं निशाणें दाखवून त्यांचा धिःकार करण्यांत आला. पतियाळाचे महाराजांची चौकशी करण्यासाठीं कमिशन नेमावें अशी सर्वत्र मागणी करण्यांत आली. पण ब्रिटिश सरकारनें कांहीं हालचाल केली नाहीं. पतियाळा महाराजांच्या विनंतीवरून पतियाळाचे पो. एजंट मि. फिट्झपॅट्रिक यांची नेमणूक या रिपोर्टांतील आरोपांची चौकशी करण्यासाठीं व्हाईसरॉय लॉर्ड आयर्विन यांनीं ता. ९ मे १९३०रोजीं केली व मि.फिटझ्पॅट्रिक यांच्यापुढें आपला पुरावा मांडण्यासाठीं म्हणून सन १९३० च्या कायदेभंगाच्या चळवळींत तुरुंगांत असलेले श्री. अमृतलाल शेट यांना सरकारनें मुक्त केलें. श्री. शेट यांनीं फिट्झपॅट्रिक कमिटीची घटना बदलण्याचा आटोकाट प्रयत्न केला, पण त्यांत यश न आल्यानें त्यांनीं या कमिटीशीं सहकार्य केलें नाहीं. मिं. फिट्झपॅट्रिक यांच्यावर लोकांचा विश्वास बसणें शक्य नसल्यानें त्यांच्या शिफारशींस कांहींच किंमत मिळाली नाहीं. ता. १७-२-१९३५ रोजीं लोकपरिषदेच्या कार्यकारी मंडळानें पतियाळा तुरुंगांत मृत्युमुखीं पडलेले सरदार सेवासिंग यांच्या मृत्यूबद्दल, तुरुंगांतील राजबंद्यांबद्दल चौकशी करण्याचें ठरवून शेवटीं श्री. न. वि. गाडगीळ, बळवंतराय मेथा, व अमृतलाल शेट यांच्या कमिटीनें साक्षीपुरावा घेऊन वरील प्रश्नाबाबत पतियाळा रिपोर्टाचा दुसरा भाग सन १९३९ च्या फेब्रुआरी महिन्यांत प्रसिद्ध केला आहे. या दरम्यान पतियाळाचे महाराज देवाधीन झाले, तेव्हां रिपोर्ट प्रसिद्ध करावा अगर न करावा असें परिषदेस वाटत होतें व याबद्दल झालेल्या पत्रव्यवहारांत पतियाळा दरबारच्या धोरणाचा वीट येऊन शेवटीं हा रिपोर्ट प्रसिद्ध करण्यांत आला.

दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या अगोदर व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन व म. गांधी याच्यामध्ये वाटाघाटी चालल्या असतांना, संस्थानी प्रजेचें म्हणणे महात्माजींच्या कानावर घालण्यासाठीं कै प्रो अभ्यंकर, श्री काकलभाई कोठारी व रंगिलदास कपाडिया याचे शिष्टमंडळ दिल्लीस पाठविण्यात आलें महात्माजींनी संस्थानी प्रजेच्या मागण्याकडे दुर्लक्ष होणार नाहीं असें या शिष्टमंडळास आश्वासन दिलें

या परिषदेचें तिसरें अधिवेशन ता ९ जून १९३१ रोजीं श्री रामानंद चतर्जी यांच्या अध्यक्षतेखालीं झालें

या तिसऱ्या अधिवेशनात संस्थानी प्रजेच्या पुढील किमान मागण्या असल्याचा एक ठराव पास करण्यात आला —

( १ ) संस्थानी लोकास संघटनात्मक राष्ट्राचे नागरिकत्व व त्याचे नैसर्गिक हक्क अबाधितपणे चालविले जातील याबद्दलची कलमे नवीन घटनेंत समाविष्ट करण्यात यावींत

( २ ) संस्थानी लोकाच्या नैसर्गिक हक्काचें संरक्षण करण्यासाठीं संघटनेच्या योजनेंत न्यायपीठाची योजना करण्यात यावी.

( ३ ) मध्यवर्ति कायदेमंडळात संस्थानाचे प्रत्यक्ष निवडणुकीने प्रतिनिधी घेणें व खालसाप्रमाणें मतदानाचा हक्क संस्थानी लोकांना देणें

( ४ ) फेडरल वरिष्ठ कोर्ट संस्थानी कोर्टाशी संलग्न ठेवणें

चवथे अधिवेशन ता २२ जुलई १९३३ रोजी श्री न चि केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरले होतें. चवथ्या अधिवेशनात फेडरेशनची घटना संस्थानी प्रजाजनांना नापसत असल्याचा ठराव पास करण्यात आला ता ३ फेब्रुआरी १९३४ रोजी दिल्ली येथें परिषदेचें जादा अधिवेशन, संस्थानिक संरक्षण बिल लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत चर्चेसाठीं येणार होतें म्हणून, प्रसिद्ध पत्रपंडित श्री नटराजन् याच्या अध्यक्षतेखाली भरविण्यात आलें. या परिषदेच्या या मधल्या काळात म्हणजे सन १९३०पासून परिषदेचे पाचवें अधिवेशन सन १९३६मध्यें कराचीस

अखेरपर्यंत परिषदेच्या कामांत जरा शैथिल्यच आलें होतें. त्याचें कारण असें कीं, महात्मा गांधींनीं सन १९३० व सन १९३२ मध्यें ज्या कायदे-भंगाच्या चळवळी केल्या, त्यांत बऱ्याच संस्थानी कार्यकर्त्यांनीं भाग घेतल्यामुळें, चळवळ चालविणारीं माणसें संस्थेंत राहिलीं नाहींत. या मधल्या काळांत परिषदेचे आधारस्तंभ प्रो. अभ्यंकर ता. ४–४–३५रोजीं स्वर्गवासी झाले, दि. ब. रामचंद्रराव यांनाही ता. २२–५–३६ रोजीं देवाज्ञा झाली. श्री. मणिशंकर त्रिवेदी व मणिलाल कोठारी हेही दिवंगत झाले. श्री. अमृतलाल शेट यांनीं कांहीं कारणानें राजकारणसंन्यास घेतला. श्री. शेट यांनीं आपल्या धडाडीनें परिषदेचें काम फारच जोरानें केलें हें नमूद करणें इष्ट वाटतें.

कराची येथें परिषदेचें पांचवें अधिवेशन प्रसिद्ध कॉंग्रेस पुढारी डॉ. पट्टाभिसीतारामय्या यांच्या अध्यक्षतेखालीं ता. १८ व १९ जुलै १९३६रोजीं भरून परिषदेच्या कार्यास परत चालना मिळाली. कराचीचें हें अधिवेशन अनेक दृष्टींनें अभूतपूर्व झालें. डॉ. पट्टाभि यांच्या सडेतोड विचाराचा परिषदेच्या कार्यावर परिणाम झाला. परिषदेचें नवीन नामकरण करण्यांत येऊन तिला अखिल भारतीय देशी राज्य लोकपरिषद् असें संबोधण्याचें ठरलें आणि या परिषदेनें बदलत्या काळास अनुसरून आपली घटना बदलली आणि परिषदेचें ध्येय पुढीलप्रमाणें ठरविण्यांत आलें:—

The object of the conference is the attainment by the people of the States of full responsible Government by all peaceful and legitimate means, as integral parts of free federal India.

त्यांनीं निरनिराळ्या भागांतील संस्थानांत दौरा काढून प्रत्यक्ष परिस्थिति पाहिली. दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानांत त्यांनीं सप्टेंबर १९३६ मध्यें दौरा काढून जनतेचीं मनें आकृष्ट करून घेतलीं व त्यांच्या व्याख्यानांचा फारच मोठा परिणाम झाला. हा दौरा घडवून आणण्याचें श्रेय श्री. बा. वि. शिखरे यांना आहे. डॉ. पट्टाभि यांच्या अध्यक्षतेखालीं ओरिसा संस्थान प्रजापरिषद्, कोचीन संस्थान प्रजापरिषद्, त्रावणकोर राजकीय सभा यांचीं अधिवेशनें झालीं. सन १९३८ च्या

हरिपुरा काँग्रेसच्या आधीं नवसरी येथें ३०० संस्थानी कार्यकर्त्यांचें संमेलन डॉ. पट्टाभींच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आलें. हरिपुरा काँग्रेसमध्यें संस्थानी ठरावावर तेरा उपसूचना आल्या होत्या, ही एकच गोष्ट संस्थानी प्रश्नानें किती खळबळ काँग्रेसमध्यें उडविली होती याचें निदर्शक आहे. डॉ. पट्टाभींच्या वजनाचा, अनुभवाचा आणि मुत्सद्देगिरीचा फार उपयोग झाला, व संस्थानी प्रजाजनांना थोडासा आशादायक असा ठराव या हरिपुरा काँग्रेसमध्यें पास झाला. त्यानंतर सहावें अधिवेशन लुधियाना येथें पं. जवाहरलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें होतें. या अधिवेशनांत ५० लाखांपेक्षां कमी उत्पन्नांचीं संस्थानें खालसा करणेचा महत्त्वाचा ठराव पसार झाला. कराची परिषदेनंतर ता. ४-९-१९३७ रोजीं परिषदेचे निस्सीम कार्यकर्ते व चिटणीस श्री. मणिशंकरजी त्रिवेदी हे शिरोहीबद्दल मुंबईस भरलेल्या सभेंत भाषण करीत असतांना हृदयविकारानें मृत्यु पावले. त्यांनीं परिषदेच्या कार्यासाठीं फार मेहनत घेतलेली होती.

अखिल भारतीय संस्थान प्रजापरिषदेनें पंजाब, राजपुताना, मध्यहिंदुस्थान, मद्रास वगैरे निरानिराळ्या भागांतील परिषदा भरविण्यास चालना दिली व मुख्यतः या संस्थेमार्फत अगर तिच्या प्रोत्साहनानें प्रांतिक संस्थानी लोकपरिषदांनीं संस्थानांचा काळा कारभार चव्हाट्यावर मांडून फार मोठी कामगिरी बजावली आहे. म्हैसूर, त्रावणकोर, हैद्राबाद, मालेरकोटला, रतलाम, झबुआ, रामपूर, भोपाळ, लोहरू, काश्मीर, जुनागड, नवानगर, बिकानेर, ओरिसा संस्थानें वगैरे संस्थानांतील जुलमी कारभारांची साधार माहिती प्रसिद्ध केलेली आहे. परिषदेनें आपल्या एका तपाच्या कारकिर्दींत अत्यंत महनीय कामागिरी बजावलेली आहे. सध्या परिषदेचे कार्यवाह श्री. बळवंतराय मेथा आणि रंगीलदास कपाडिया असून ते आपल्या मागील चिटणीसाप्रमाणें उत्साहानें काम करीत आहेत. दोन वर्षांपासून 'स्टेटस पीपल' या नांवाचें परिषदेचें मासिक मुखपत्र प्रसिद्ध होत आहे आणि त्यांत संस्थानी राजकारणाच्या अभ्यासूंना अत्यंत

विचारप्रवण करणारी माहिती प्रसिद्ध होत आहे आणि संस्थानांतील दडपशाहीची विस्तृत अशी माहिती दिली जात असते. सन १९४० च्या रामगड कॉंग्रेसच्या वेळीं रामगड येथें या परिषदेच्या कार्यकारी मंडळीची जी सभा झाली, त्यांत हें 'स्टेटस् पीपल' साप्ताहिक करण्याचें ठरलें आहे आणि असें झालें तर लोकपरिषदेच्या कार्याचा प्रचार द्रुत गतीनें होईल अशी आशा करण्यास हरकत नाहीं.

या लोकपरिषदेचें अधिवेशन साल दरसाल निरनिराळया संस्थानी मुलुखांत अगर त्याच्या आसपास भरविलें गेलें, तर परिषदेचा यापेक्षां जास्त प्रचार होऊं शकेल. संस्थानी राजकारण हें राजकीय पक्षभेदातीत ठेवण्याचें धोरण या परिषदेनें व इतर संलग्न प्रांतिक लोकपरिषदांनीं ठेवल्यामुळें परिषदेचें काम एकमुखी झालें. खालसांतील राजकीय मतभेद या परिषदेच्या कार्याच्या आड आलेले नाहींत ही लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. परिषदेचें कार्य असेंच जास्त वृद्धिंगत होईल अशी आशा बाळगण्यास हरकत वाटत नाहीं, इतका तिचा इतिहास उज्ज्वल आहे.

---

# राष्ट्रीय सभा व संस्थानें



राष्ट्रीय सभा सन १८८५ मध्यें स्थापन होऊन आतां ५० वर वर्षें होऊन गेलीं. पण राष्ट्रीय सभेनें अखिल हिंदुस्थानांतील खालसा हिंदुस्थान आणि संस्थानी हिंदुस्थान यांचेकडे सारख्याच आत्मीयतेनें पाहिलेलें नाहीं हें नमूद करण्यास दुःख वाटतें. देशी संस्थानांचा विस्तार ७,१२,५०२ चौरस मैल असून खालसा मुलुखाचा विस्तार ८,६२,६७९ चौरस मैल आहे. हिंदुस्थानची एकंदर लोकसंख्या ३५,२८,३७,७७८ आहे, आणि त्यांपैकीं ८,१३,१०,८४५ इतकी जनता संस्थानी हिंदुस्थानांत आहे. इतक्या मोठ्या जनसमुहाची उपेक्षा आजवर हिंदुस्थानच्या एकमेव लोकपक्षीय संस्थेनें केली आहे. हिंदुस्थानांत लहानमोठीं ५६२ संस्थानें असून तेथील कारभार खालसापेक्षां अत्यंत मागासलेला आहे; संस्थानांचा कारभार जुलुमी व प्रतिगामी आहे. खालसांतील कित्येक पुढाऱ्यांना संस्थानें पूर्वजांच्या स्मृतीचीं अवशिष्ट चिन्हें म्हणून माननीय वाटतात आणि संस्थानांचे अधिपति हे आपल्याच रक्तामांसाचे असल्यानें त्यांच्यावर नैतिक वजन टाकून आपलें म्हणणें त्यांना मान्य करावयास लावावें असें महात्माजींना वाटत असल्यानें राष्ट्रीय सभेंत संस्थानी प्रजेबद्दल ठराव पास होण्याच्या बाबतींत फार वादविवाद झालेले आहेत.

राष्ट्रीय सभेचें संस्थानी प्रश्नाबाबतचें धोरण हा विषय गेल्या दहा बारा वर्षांत अनेकदां चर्चिला गेला असून, आतां कोठें राष्ट्रीय सभेचें धोरण संस्थानी प्रजेविषयीं सहानुभूतीचें आणि आत्मीयतेचें असल्यासारखें दिसूं लागण्याचीं चिन्हें दृग्गोचर होत आहेत. राष्ट्रीय सभेचें संस्थानविषयक धोरण काय असावें, हा प्रश्न महाराष्ट्रांतील संस्थानी कार्यकर्ते श्री. तात्यासाहेब केळकर, कै. गणपतराव अभ्यंकर, कै. वामनराव पटवर्धन, श्री. श्री. ग. वझे वगैरेंनीं सुरू केला आणि त्यांची विचारसरणी अखिल भारतीय संस्थानी लोकपरिषदेच्या संस्थानी आणि कॉंग्रेस कार्य-

कर्त्यांना पटून हा प्रश्न दरसाल राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांत अत्यंत वादाचा असा होई. राष्ट्रीय सभा व तिची संलग्न संस्था—ऑल इंडिया काँग्रेस कमिटी—यांमध्यें तर कित्येक वेळां हा एकच प्रश्न प्रमुखत्वानें होता. राष्ट्रीय सभेंत हा प्रश्न कसा व केव्हां आला, त्याचें स्वरूप कसकसें बदलत गेलें, याची माहिती उद्बोधक आहे आणि संस्थानिकांशीं लोकशाहीसाठीं लढा लढतांना, राष्ट्रीय सभेशीं संस्थानी प्रजेला कसा सामना द्यावा लागला हें पाहणें बोधप्रद होईल असें वाटतें.

राष्ट्रीय सभेचें पहिलें अधिवेशन मुंबई येथें ता. २८ डिसेंबर १८८५ रोजीं बंगालचे सुप्रसिद्ध पुढारी मि. डब्ल्यू. सी. बानर्जी यांच्या अध्यक्षतेखालीं तीन दिवस भरून मोठ्या उत्साहानें पार पडलें. राष्ट्रीय सभेच्या स्थापनेपासून तिचें ध्येय अखिल भारतीय स्वरूपाचें आहे व म्हणूनच तिचें नामाभिधानहि अखिल भारतीय असें आहे. राष्ट्रीय सभेच्या प्रारंभापासून संस्थानांतून राष्ट्रीय सभेस प्रतिनिधी जात होते व इचलकरंजी येथें दक्षिण महाराष्ट्रीय संस्थानांच्या राष्ट्रीय सभेची एक शाखाही स्थापन झाली होती. काँग्रेसमध्यें खालसा मुलुखाच्या हितानहिताच्या जितक्या प्रश्नांबद्दल ठराव पास केले गेले आहेत, त्यांच्या मानानें संस्थानी हिंदुस्थान व संस्थानें यांच्याबद्दलच्या प्रश्नांबद्दलचे फारच थोडे ठराव पास केलेले आहेत, असें दिसून येतें.

## संस्थानी प्रजेची जुनी तक्रार

राष्ट्रीय सभेचें संस्थानी प्रश्नांकडे जसें लक्ष जावयास पाहिजे होतें तसें तें गेलेलें नाहीं, याबद्दल लोकांची तक्रार असल्याचा उल्लेख मि. जी. सुब्रह्मण्यम् अय्यर यांनीं ९ व्या राष्ट्रीय सभेंत केलेल्या भाषणांत सांपडतो. ते म्हणतात, "कांहीं संस्थानांतील कारभारावर जशी टीका व्हावयास पाहिजे आहे तशी ती होत नाहीं. राष्ट्रीय सभा व सर्वसाधारणपणें सर्व सुशिक्षित समाज हे संस्थानी प्रश्नाची बाजू उचलून धरून टीका करीत नाहींत असा आक्षेप त्यांचेवर घेतला जातो." राष्ट्रीय सभेच्या कार्यपद्धती-

बद्दल लोकांची ही असलेली तक्रार आजमितीसही कायम आहेच. परंतु त्यापूर्वी राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांतून संस्थानी प्रश्नांबद्दल अजिबात ठराव झाले नाहींत असें मात्र नव्हे. सन १८९४ च्या १० व्या अधिवेशनांत म्हैसूरच्या महाराजांच्या निधनाबद्दल दुःखप्रदर्शक ठराव पास करण्यांत आला. सन १८९६ च्या अधिवेशनांत रेसिडेंटच्या अंमलाखालील संस्थानी मुलुखामध्यें वृत्तपत्रांची जी गळचेपी करण्यांत आली, त्याच्या निषेधाचा ठराव पास करण्यांत आलेला आहे. राष्ट्रीय सभेच्या बाराव्या, तेराव्या व चवदाव्या अधिवेशनामध्यें ' कोणत्याही संस्थानिकास वाईट राज्यकारभाराच्या अगर वर्तनाच्या आक्षेपाबद्दल ट्रायब्युनलमार्फत चौकशी होऊन आरोप शाबीत झाल्याशिवाय राज्यभ्रष्ट केलें जाऊं नये, ' अशा आशयाचा फार महत्त्वाचा ठराव पास झालेला आहे. सतराव्या अधिवेशनामध्यें सरकारनें संस्थानिक व सरदार यांच्या घराण्यांपैकीं इसमांना लष्करी अधिकाऱ्यांचीं कमिशनें देण्याचें सरकारनें जें धोरण ठरविलें, त्याबद्दल सरकारचें अभिनंदन ठरावानें करण्यांत आलें आहे; ही झाली संस्थानिकांच्या ठरावाबद्दलची गोष्ट. परंतु राष्ट्रीय सभेच्या स्थापनेपासून जवळजवळ पुढील चाळीस वर्षांत संस्थानी प्रजेच्यासंबंधानें मात्र एकही ठराव पास झालेला नाहीं ही लक्ष्यांत घेण्यासारखी गोष्ट आहे.

## संस्थानी प्रजेसंबंधीं राष्ट्रीय सभेंत प्रथम ठराव

सन १९१७ च्या ऑगस्ट महिन्यांत हौस ऑफ कॉमन्समध्यें समाईक ब्रिटिश प्रधानमंडळांतील हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी यांनीं हिंदुस्थानच्या राजकीय ध्येयाची जी घोषणा केली, ती अखिल भारतीय स्वरूपाची होती व त्यावेळचे भारतमंत्री मॉंटेग्यु व व्हाईसरॉय लॉर्ड चेल्मसफोर्ड यांनीं पार्लमेंटच्या इच्छेबरहुकूम हिंदुस्थानच्या राज्यकारभाराबद्दल जी चौकशी केली, त्यावेळीं संस्थानी राज्यकारभाराबद्दल त्यांनीं कित्येक संस्थानिकांबरोबर चर्चा केली व मॉंटफोर्ड रिपोर्टांत हिंदुस्थानचें भविष्यकालीन राजयंत्र खालसांतील प्रांत व संस्थानें यांच्या संघटनेच्या स्वरूपाचें आज नाहीं तरी

उद्यां होणें क्रमप्राप्त आहे असें मत नमूद केलें. मि. मॉंटेग्यू हे हिंदुस्थानांत चौकशीच्या दौऱ्यावर आलेवेळीं कै. प्रो. गणपतराव अभ्यंकर यांनीं त्यांचेकडे संस्थानी लोकपक्षाची म्हणून एक कैफियत सादर केली व त्याच तऱ्हेची एक कैफियत मुंबईमधील कित्येक काठेवाडी संस्थानांतील रहिवाशांनीं त्यांच्याकडे सादर केली होती. राष्ट्रीय ध्येयासिद्धीच्या दृष्टीनें संस्थानी हिंदुस्थानास नवीन घटनेंत कांहीतरी स्थान आतां मिळालेंच पाहिजे असें ज्यांना वाटावयास लागलें, त्यांनीं संस्थानांतून व संस्थानाबाहेर संस्थानी प्रजाजनांच्या उन्नतीची चळवळ सुरू करणें अवश्य आहे हें लक्षांत घेऊन या बाबतींत वरील उपक्रम सुरू केला. मॉंटफोर्ड रिपोर्टांतील सूचनेप्रमाणें नरेंद्रमंडळाची स्थापना झाल्यामुळें संस्थानी प्रजेच्या प्रश्नास चालना मिळाली व त्यामुळें सन १९२० सालीं नागपूर येथील राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांत संस्थानिकांनीं आपापल्या संस्थानांतून जबाबदार राज्यपद्धति स्थापन करावी अशा अर्थाचा ठराव प्रथमच राष्ट्रीय सभेंत पास करण्यांत आला.

## गौहत्तीची राष्ट्रीय सभा

सन १९२० सालापासून राष्ट्रीय सभेचीं सूत्रें महात्मा गांधींच्या हातीं गेलीं आणि त्यांचें संस्थानविषयक धोरण, संस्थानिकांच्या विरुद्ध ठराव करण्याच्या विरुद्ध असल्यानें, सबंध राष्ट्रांच्या उद्धारासाठीं झटणाऱ्या महात्माजींना संस्थानी प्रजेला संस्थानिकांच्या मुस्कटदाबींतून मुक्त करण्याची आवश्यकता भासली नाहीं हें विशेष होय. राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षांच्या भाषणांत संस्थानी प्रश्नाबद्दल जरी टीकात्मक भाग असला, तरी कॉंग्रेसमध्यें मात्र ठराव सहसा पास होत नसे. गौहत्ती येथें राष्ट्रीय सभेचें अधिवेशन श्री. श्रीनिवास अयंगार यांच्या अध्यक्षतेखालीं भरल्यावेळीं घडलेली एक गोष्ट नमूद करण्यासारखी आहे. सरदार शार्दूलसिंग यांनीं सर्व अकाली कैद्यांची विनशर्त बंधमुक्तता करण्यासंबंधाचा एक ठराव या राष्ट्रीय सभेच्या विषयनियामकमंडळापुढें आणला. या ठरावांत नाभाच्या अधिकारभ्रष्ट महा

राजांसंबंधानें झालेल्या अन्यायासंबंधाचाही उल्लेख होता. या ठरावाला काँग्रेसचे जनरल सेक्रेटरी मि. रंगस्वामी अयंगार यांनीं हरकत घेतली. संस्थानांच्या अंतर्गत कारभारासंबंधाच्या बाबी काँग्रेसनें चर्चेसाठीं घेऊं नयेत असा निर्बंध काँग्रेसच्या घटनेंत आहे, म्हणून नाभाच्या महाराजांसंबंधींचा उल्लेख असलेला ठराव विचारासाठीं घेणें नियमबाह्य आहे असा मुद्दा मि. रंगस्वामी यांनीं पुढें आणला. त्यावर नाभाच्या महाराजांच्या प्रश्नासंबंधानें काँग्रेसच्या दिल्ली येथें भरलेल्या खास अधिवेशनांत ठराव पास करण्यांत आला होता, या गोष्टीचें मि. महमदअल्ली यांनीं स्मरण दिलें आणि नाभा प्रकरणासंबंधांतल्या सरकारच्या धोरणाला आळा घालण्यांत आला नाहीं तर, संस्थानी अमलाखालीं असलेला ⅓ हिंदुस्थानही ब्रिटिशांच्या हातीं जाईल अशी भीति त्यांनीं प्रकट केली. सरदार शार्दूलसिंग यांच्या ठरावानें कोणत्याही संस्थानच्या अन्तर्गत कारभाराचा प्रश्न उपस्थित होत नाहीं व त्यामुळें तो ठराव नियमबाह्य होत नाहीं, असा अध्यक्ष मि. श्रीनिवास अयंगार यांनीं अखेर निर्णय दिला. नंतर, नाभाच्या महाराजांना पुन्हां गादीवर बसवून हरएक बाबतींत त्यांना न्याय दिल्याशिवाय शिखांचा प्रश्न सोडवितां येणार नाहीं अशा आशयाची दुरुस्ती मि. शार्दूलसिंग यांच्या ठरावांत मि. रंगस्वामी यांच्या सूचनेवरून करण्यांत आली आणि तो ठराव विषयनियामक कमिटीनें पास केला. दुसरे दिवशीं विषयनियामक कमिटीची सभा पुन्हां भरली, तेव्हां या ठरावासंबंधीं सर्व गाडें फिरलें. म. गांधी व पंडित मोतिलाल नेहरू हे दोघेही यावेळीं हजर होते. संस्थानांच्या अन्तर्गत कारभारासंबंधाचे प्रश्न काँग्रेसच्या घटनेंतील नियमाप्रमाणें काँग्रेसला केव्हांही हातीं घेतां येत नाहींत, नाभाच्या महाराजांचा उल्लेख असलेला ठराव पास करण्यांत विषयनियामक मंडळाच्या हातून घोडचूक झाली आहे, यासाठीं त्या ठरावाचा फेरविचार झाला पाहिजे असा म. गांधी यांनीं सल्ला दिला व तो विषयनियामक मंडळांतील बहुमताला पसंत पडून त्या प्रश्नाचा पुन्हां विचार करण्यांत आला आणि नाभाच्या महाराजांचा उल्लेख सदर ठरावां-

तून गाळावा आणि नाभाच्या प्रश्नासंबंधानें छाननी करून रिपोर्ट करण्याचें काम वर्किंग कमिटीकडे सोंपवावें असें विषयनियामक कमिटीनें अखेर ठरविलें. कॉंग्रेसचे अध्यक्ष व कायदेपंडित मि. श्रीनिवास अयंगार यांनीं नियमांना अनुसरूनच दिलेला वरील निर्णय लागलीच दुसऱ्या दिवशीं महात्माजींच्या सल्ल्यानें फिरला गेला. या अधिवेशनाचे अध्यक्ष श्री. श्रीनिवास अयंगार हे आपल्या अध्यक्षीय भाषणांत म्हणाले होते कीं, 'हिंदुस्थानाच्या भावि संयुक्त राज्यांत संस्थानांचा एकजीव व्हावा यासाठींच जबाबदारीच्या स्वराज्याच्या ध्येयाचा मार्ग आक्रमण करतांना संस्थानी प्रजाजनांनाही ब्रिटिश हिंदुस्थानांतील जनतेनें आपल्याबरोबर घेतलें पाहिजे. हीं संस्थानें आहेत तशींच मागसलेलीं राहतील आणि त्यायोगानें ब्रिटिश हिंदुस्थानही प्रगतीच्या मार्गावरून मागें खेचला जाऊन त्याच्या ध्येयसिद्धीचा काल आपण होऊन आपल्या हातानें दूर लोटला असें होईल.' मि. श्रीनिवास अय्यंगार यांच्यासारख्या संस्थानी जनतेच्या कोंढमाऱ्याची स्पष्ट कल्पना असलेल्या आणि त्या जनतेच्या आकांक्षांसंबंधानें सर्वांनीं सक्रिय सहानुभूति दाखवावी असें प्रतिपादन करणाऱ्या पुढाऱ्याच्या धुरीणत्वाखालीं राष्ट्रीय सभेचें अधिवेशन भरलें असतांही राष्ट्रीय सभेच्या ठरावांत कोणत्याही संस्थानी प्रश्नाला थारा देण्यांत आला नाहीं.

## संस्थानी चळवळीचा कॉंग्रेसवर परिणाम

संस्थानी प्रश्नांस अखिल भारतीय संस्थानी प्रजापक्षीय चळवळीचें स्वरूप देण्याचा उपक्रम पुढें झाला व राष्ट्रीय सभेच्या कित्येक बैठकींचे वेळींच संस्थान प्रजापरिषदांच्या बैठकीही तेथेंच झाल्या. यामुळें राष्ट्रीय सभेच्या कार्यकर्त्यांना यापुढें संस्थानी राजकारणास अखिल भारतीय राजकारणाचा विचार करतांना वगळून चालावयाचें नाहीं असें पटलें व त्याचीं प्रतीकें बेळगांव येथील राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षस्थानापासून महात्मा गांधी यांनीं संस्थानी प्रश्नांचा केलेला ओझरता उल्लेख, नेहरू रिपोर्ट, सन १९२७ च्या मद्रासच्या राष्ट्रीय सभेच्या बैठकींत संस्थानांतील राज्य-

पद्धतीबद्दलचा ठराव हीं होत. या मद्रासच्या अधिवेशनाच्या वेळीं अ. भा. सं. लोकपरिषदेनें आपलें एक शिष्टमंडळ काँग्रेसला हजर राहून संस्थानी प्रश्नासंबंधीं ठराव पास करून घेण्यासाठीं पाठविलें होतें. या शिष्टमंडळाचे प्रमुख मि. मणिलाल कोठारी यांनीं यासंबंधीं खटपट केल्यामुळें 'संस्थानिकांनीं त्यांच्या व त्यांच्या प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें आपापल्या संस्थानांतून जबाबदार राज्यपद्धति व प्रातिनिधिक संस्था स्थापन करावी' अशा आशयाचा ठराव पास झाला.

## काँग्रेस धोरणांत क्रांति

सन १९२८ मधील कलकत्ता येथील सर्वपक्षीय परिषदेंत संस्थानी प्रश्नासंबंधीं ठराव पास झाला व त्याचाच परिणाम सन १९२८ च्या कलकत्ता येथील राष्ट्रीय सभेच्या बैठकींत पंडित जवाहिरलाल नेहरू यांच्या सूचनेवरून एक महत्त्वाचा ठराव पास झाला. पं. जवाहिरलाल नेहरू यांच्या ठरावानें संस्थानांच्या राज्यकारभारांत सुधारणा सुचविण्याचे बाबतींत राष्ट्रीय सभेनें मौन स्वीकारण्याचें प्रतिबंधाचें जें कलम होतें तें काढून टाकण्यांत आलें. ही दुरुस्ती झाल्यावर या कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेच्या बेठकींत 'संस्थानिकांनीं प्रातिनिधिक संस्थांच्यावर आधारलेली जबाबदार राज्यपद्धति स्थापन करावी आणि नागरिक स्वातंत्र्याचे हक्क प्रजेला द्यावेत; व संस्थानी प्रजेच्या जबाबदार राज्यपद्धति स्थापन होण्याच्या लढ्यांत काँग्रेसचा संस्थानी प्रजेला पूर्ण पाठिंबा आहे' अशा आशयाचा ठराव पास झाला. हा मूळ ठराव पुढीलप्रमाणें आहे:—

"This Congress urges on the ruling Princes of the Indian States to introduce responsible government, based on representative institutions in the States, and to issue immediately proclamations or enact laws—guaranteeing elementary and fundamental rights of citizenship, such as rights of association, free speech, free press and security of person and property.

"This Congress further assures the people of the Indian States of its sympathy with and support to their legitimate and peaceful struggle for the attainment of full responsible government in the States."

या ठरावावर बोलतांना मि. सत्यमूर्ति म्हणाले कीं, "राष्ट्रीय सभेनें संस्थानांतर्गत कारभारांत हात न घालण्याचा केलेला निश्चय आतां बदलण्यांत येत आहे. राष्ट्रीय सभेची सर्व सत्ता, सर्व सहानुभूति व सर्व मदत संस्थानांतून जबाबदार राज्यपद्धति स्थापन करण्यासाठीं संस्थानी प्रजा जो झगडा करील, त्यासाठीं द्यावी, असें या ठरावांत म्हटलेलें आहे."

मि. सत्यमूर्ति यांच्या वरील भाषणानें सन १९२८ सालीं राष्ट्रीय सभेचें धोरण संस्थानी राजकारणाबद्दल काय होतें तें स्पष्ट होत आहे.

सन १९२९ सालीं लाहोरच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांत 'संस्थानिकांनीं आपापल्या संस्थानांत जबाबदार राज्यपद्धति स्थापन करण्याची वेळ आली असून नागरिकस्वातंत्र्याचे मूलभूत हक्क म्हणजे भाषणस्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य, मालमत्तेची सुरक्षितता दिल्याचें जाहीर करावें,' अशी संस्थानिकांना विनंति करणारा एक ठराव पास झाला.

## संस्थानी प्रतिनिधींना महात्माजींची मुलाखत

कराचीच्या राष्ट्रीय सभेच्या बैठकीच्या वेळीं सन १९३१ सालीं संस्थानांच्या प्रश्नास दुसऱ्याही अनेक अन्य कारणामुळें बरेंच महत्त्व आलें होतें. वर्किंग कमिटी, ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी, विषय-नियामक कमिटी वगैरेमध्यें संस्थानी प्रजाजनांच्या भवितव्याबद्दल लोक-पुढाऱ्यांनीं वेळींच योग्य मागणी केली पाहिजे असें मागणें संस्थानी प्रजाजनांच्या पुढाऱ्यांकडून करण्यांत आलें. या कराचीच्या राष्ट्रीय सभेत संस्थानी प्रश्नासंबंधानें जरी बरीच चर्चा झाली, तरी अखेर संस्थानी प्रश्नासंबंधानें व संस्थानी प्रजाजनांच्या हक्कासंबंधानें राष्ट्रीय सभेपुढें कोणत्याही स्वरूपाचा ठराव येऊं शकला नाहीं. यावेळीं म. गांधी यांच्या मुलाखतीस मेसर्स सत्यमूर्ति, मणिलाल कोठारी, के. टी. भाष्यम, बलवंतराय मेथा, बाबूराव गोखले, विठ्ठलराव जोशी, सांभराव दर्शने ही

गेल्ची गेल्या वेळीं महात्माजींनीं संस्थानी प्रश्नासंबंधानें राष्ट्रीय सभेपुढें ठराव न आणणें इष्ट आहे, असा आपला अभिप्राय व्यक्त केला. ते म्हणाले,

"He recognised the claims of the States' peoples, but he still continued to be of opinion that there should *be no resolutions.* If the other problems in the way, like communal settlement and the safeguards were settled properly, there would comparatively speaking be very little difficulty in the way of getting the Princes to agree to the legitimate demands of their peoples."

श्री. बाबूराव गोखले यांनीं या वेळींच विचारलेल्या प्रश्नास उत्तर देतांना महात्माजी म्हणाले,

"He would be pleased to take their delegates with him to England to put the peoples' claims in Indian States. Only they should come at their expense, the coffers of the Congress not being big to meet such expenditure."

महात्माजी गोलमेज परिषदेस गेल्यावेळीं अ. भा. सं. लोकपरिषदेनें श्री. अमृतलाल शेट व प्रो. अभ्यंकर यांना विलायतेस पाठविलें होतेंच. महात्माजी विलायतेहून परत आल्यावर कायदेभंगाची चळवळ सुरू होऊन सर्वत्र स्तिमितता उत्पन्न झाली. पुढें परिस्थिति बदलल्यावर या प्रश्नानें पुनः डोकें वर काढलें. महात्माजींनीं गोलमेज परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशनांत जें धोरण स्वीकारलें होतें, तें संस्थानी प्रजेस मान्य नसल्यानें व सन १९३४ मध्यें रांची येथें डॉ. अनसारी यांच्या अध्यक्षतेखालीं भरणाऱ्या स्वराज्य पक्षाचें धोरण महात्माजींच्याप्रमाणेंच राहील अशी भीति वाटल्यानें, संस्थानी प्रजेचें म्हणणें काय आहे, तें मांडण्यासाठीं अ. भा. सं. लोकपरिषदेचे अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर यांनीं ता. २-५-१९३४ रोजीं डॉ. अनसारी यांना तार करून आपलें म्हणणें कळविलें. पण त्याचा कांहींच खुलासा न झाल्यानें संस्थानांतील

कार्यकर्त्यांनीं या प्रश्नांसंबंधीं वाटाघाट करण्याकरतां राष्ट्रीय सभेच्या त्यावेळचे अध्यक्ष शेट जमनालाल बजाज यांच्याकडे मुलाखत मागितली. कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें ही मुलाखत घेण्याचा अधिकार म. गांधी व शेट जमनालाल बजाज यांना दिला आणि ही मुलाखत ता. २०।६।३४ रोजीं पुणें येथें झाली. संस्थानी प्रजाजनांतर्फे श्री. तात्यासाहेब केळकर, बाबुराव गोखले, श्रीधरपंत वझे, राघवेंद्रराव शर्मा, वामनराव पटवर्धन, अमृतलाल ठक्कर, गोकुळभाई भट्ट, मिरजेचे बाळकृष्णपंत शिखरे, सांगलींचे दुधगांवकर वकील, सदाशिवराव फडके वकील व बापूराव जोग अशी मंडळी या मुलाखतीच्या वेळीं हजर होती.

"संस्थानी प्रजा कार्यक्षम नाहीं व म्हणून संस्थानी प्रजेचा प्रश्न राष्ट्रीय सभेच्या कार्यक्रमांत समाविष्ट करूं इच्छित नाहीं" असें महात्माजींनीं या चर्चेच्या वेळीं स्पष्ट सांगितलें.

जुलै १९३४ मध्यें महात्माजींनीं जें एक पत्र श्री. न. चिं. केळकरांना उत्तरादाखल लिहिलें, त्या वेळेपासून या वादास विशेष महत्त्व चढलें. महात्माजींनीं श्री. केळकरांना लिहिलेलें हें पत्र पुढीलप्रमाणें आहे:—

### महात्माजींचें श्री. केळकरांना उत्तर

वर्धा, जुलै १९३४.

प्रिय श्री. केळकर यांसी,

आपलें गेल्या जून महिन्यांत जें पत्र आलें, त्याचें आजवर उत्तर लिहिण्यास वेळ झाला नाहीं व हेंच या दिनावधीचें कारण होय.

तुमच्या प्रश्नांना प्रत्यक्ष उत्तर देण्याऐवजीं संस्थानांच्या बाबतींत माझें काय धोरण आहे तेंच मी प्रथम सांगूं इच्छितों.

संस्थानी प्रश्नाच्या बाबतींत ढवळाढवळ न करण्याचें जें धोरण राष्ट्रीय सभेनें ठेवलें आहे, तेंच योग्य व शहाणपणाचें आहे.

ब्रिटिश कायद्यान्वयें संस्थानें या स्वतंत्र सत्ता होत. खालसा हिंदुस्थान म्हणून समजल्या गेलेल्या भागाला, अफगाणिस्थान अगर सिलोन यांच्या

ाबतींत धोरण ठरविण्याचा जेवढा अधिकार आहे, तेवढाच अधिकार ंस्थानांच्या संबंधीं धोरण ठरविण्याचा आहे.

असें जर नसतें तर बरें झालें असतें. पण या बाबतींतील माझी अस-ायता मी जाणतों. भौगोलिक हिंदुस्थानचा संस्थानी हिंदुस्थान हा एक ाग आहे यांत शंकाच नाहीं. पण तेवढ्यामुळें आपण आज जेथें उभे ाहों, त्यांच्यापुढें पाऊल टाकूं शकत मात्र नाहीं. पोर्तुगीज व फ्रेंच हेंदुस्थान हे सुद्धां भौगोलिक हिंदुस्थानचे घटकच आहेत, पण तेथील श्नांच्या बाबतींत आपण कांहींच करूंच शकत नाहीं.

संस्थानांतून काँग्रेसचे सभासद नोंदले जातात व त्यांच्यापासून आम्हांला ुष्कळच मदत मिळते. त्यांच्याबद्दल कांहीं करण्याची इच्छा नाहीं अगर यांच्याबद्दल जाणीव नाहीं म्हणून कांहींही ढवळाढवळ न करण्याचें ोरण स्वीकारलेलें नाहीं. हा आमच्या असहायतेचा परिणाम आहे.

राष्ट्रीय सभेनें संस्थानांच्या बाबतींत ढवळाढवळ करण्याचा जरा यत्न नुसता केला, तरी सुद्धां त्यामुळें संस्थानी प्रजेच्या हितसंबंधास ोका येईल अशी माझी पक्की खात्री आहे.

परंतु संस्थानांनीं अमुक एक धोरण आंखावें असा त्यांना आग्रह कर-ण्यास आपणाला कांहीं कोणीं प्रतिबंध केलेला नाहीं.

माझें असें मत आहे कीं, खालसांत आपण जें यश मिळवूं, त्याचा ारिणाम संस्थानांतून झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

संस्थानांनीं आपल्या प्रजेला राज्यकारभारांत पूर्ण स्वायत्तता द्यावी व ंस्थानिकांनीं स्वतःसाठीं उत्पन्नाच्या प्रमाणांत थोडा निश्चित पैसा घेऊन आपण आपल्या प्रजेचे विश्वस्त आहों अशा भावनेनें त्यांनीं वागावें अशी ाझी फार इच्छा आहे. संस्थानिक असे विश्वस्त होण्यांत अभिमान बाळ-ाणार नाहींत असें मला अद्याप वाटत नाहीं; मी त्या बाबतींत निराश ालों नाहीं. त्यांचा दर्जा नष्ट व्हावा असें मला वाटत नाहीं. संस्था व ्यक्ती यांच्यांत फेरबदल झाला पाहिजे असें मला वाटतें.

गोलमेज परिषदेंत मीं केलेलें भाषण संस्थानिकांना केवळ विनंतिवजा होतें. त्यांनीं त्या विनंतीचा स्वीकार केला, अगर न केला, तरी राष्ट्रीय सभा फेडरेशन मान्य करणार आहे असा त्याचा अर्थ नव्हे. काँग्रेसवर असें बंधन घालण्याचा मला अधिकार नव्हता. संस्थानिक काय धोरण स्वीकारतात, या एका गोष्टीपेक्षां इतर किती तरी गोष्टींवर राष्ट्रीय सभेनें संघटनेंत शिरण्याचें अवलंबून आहे. संघटनेची घटना आलीच तर ती परस्परांची देवाणघेवाणाच्या तत्त्वांमुळेंच येईल.

आपण जे मुद्दे उपस्थित केले आहेत, त्यांचें उत्तर दिलेंच आहे. जर एखादा मुद्दा राहिला असेल, तर तसें मला कृपा करून कळवा. कामांची विलक्षण गर्दी असतांना मीं हें पत्र लिहिलें आहे.

आपला

**एम्. के. गांधी**

## महात्माजींची विचारसरणी अमान्य

महात्माजींच्या वरील पत्रांतील विचारसरणी कोणास मान्य होईल असें वाटत नाहीं. महात्माजींनीं संस्थानांना स्वतंत्र राजसत्तेचा दर्जा दिला आहे पण तो कोणीही मान्य करणार नाहीं. बटलर कमिटीनेंही संस्थानें स्वतंत्र नाहींत असा अभिप्राय दिलेला आहे. ब्रिटिश राजसत्ता आज संस्थानिकांना चुटकीसरसें गादीवरून पदच्युत करते व संस्थानांतून संस्थानिकांना मुदत न देतां हद्दपार करूं शकते असें दिसत असून महात्माजींनीं या बाहुल्यांना सिलोन, अफगाणिस्थान, गोंवें किंवा पाँदेचरी येथील राजसत्तांचा दर्जा आहे असें म्हणावें हें हास्यास्पद आहे. राष्ट्रीय सभेच्या कार्यासाठीं खादीच्या प्रसारार्थ व हरिजनोद्धाराच्या चळवळीसाठीं महात्माजींनीं खालसा मुलुखाप्रमाणेंच संस्थानी हिंदुस्थानांत पूर्वीं दौरे काढलेले आहेत. संस्थानें परराष्ट्रें आहेत, असें एकदां म्हटल्यानंतर महात्माजींना संस्था-

नांतून दौऱ्यावर जाऊन तेथील लोकांना अशा बाबतींत उपदेश करण्याचा काय अधिकार पोंहचतो असा प्रश्न कोणीही साहाजिकपणें त्यांना करील. महात्माजींना परकीय संस्थानी प्रजेची मदत पाहिजे असते; त्यांना राष्ट्रीय सभेच्या कार्यांत व राजकीय चळवळींत पैशाची व माणसांची मदत संस्थानांतून व्हावयास पाहिजे आहे. पण संस्थानी प्रजेच्या दातृत्वाची फेड महात्माजी त्यांच्याबद्दल उदासीनता दाखवून करीत आहेत, हें सर्व गूढच आहे. अफगाणिस्थानांतील अफगाण लोक, पोर्तुगीज अगर फ्रेंच हिंदुस्थानांतील रहिवाशी अगर सिलोनमधील नागरिक यांना राष्ट्रीय सभेचे सभासद करून घेण्याची अगर त्या भूभागांत राष्ट्रीय सभेच्या तालुका, जिल्हा अगर प्रांतकमिट्या प्रस्थापित करण्याची खटपट महात्माजींनीं करविलेली नाहीं; सिलोन व अफगाणिस्थान यांच्यासारखीं संस्थानें जर स्वतंत्र राजसत्ता असत्या, तर तेथें काँग्रेस कमिट्या स्थापन करण्यास राष्ट्रीय सभेला व महात्माजींना अधिकारच नव्हता. परंतु तसें आजवर न करतां महात्माजी आज संस्थानें ‘ स्वतंत्र राजसत्ता ’ आहेत या सबबीवर संस्थानी प्रजेच्या प्रश्नाचा विचार राष्ट्रीय सभेच्या कार्यक्षेत्रांत घेऊं इच्छित नाहींत व ती लुडबूड राष्ट्रीय सभेनें करूं नये असें म्हणत आहेत.

“ राष्ट्रीय सभेनें संस्थानी प्रजाजनांचा प्रश्न हातीं घेतल्यास त्यामुळें संस्थानी प्रजाजनांच्या प्रश्नांस धोका येण्याचाच फार संभव आहे, ” असें महात्माजींना कां वाटूं लागलें तें समजत नाहीं. राष्ट्रीय सभेच्या कलकत्ता व मद्रास येथील अधिवेशनांत संस्थानी राजकारणाचे बाबतींत स्पष्ट ठराव पास झाले असतां महात्माजींनीं वरीलसारखे उद्गार काढावे हें आश्चर्य नव्हे काय ? असो. अखिल भारतीय संस्थान लोकपरिषदेच्या कार्यकारी मंडळानें यासंबंधानें स्पष्ट ठराव करून महात्माजींची चूक त्यांच्या निदर्शनास आणली. सदर ठरावांतील महत्त्वाचा भाग खालीलप्रमाणें आहे:—

(1) That Mahatmaji's view of the constitutional and legal position of the States is incorrect.

(2) That the States are an integral part of the political India, as envisaged in the constitution of the Indian National Congress.

(3) That it is the constitutional duty of the Indian National Congress, apart from its moral obligation, to render effective help to the people of the States, in their endeavours to secure freedom for themselves.

कै. श्री. मणिलाल कोठारी हे महात्माजींच्या पट्टशिष्यांपैकीं एक गृहस्थ होते व त्यांनीं बनारस येथें कॉंग्रेस वर्किंग कमिटीचे अध्यक्ष सरदार वल्लभभाई पटेल यांना, कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें संस्थानी प्रश्नांबाबत राष्ट्रीय-सभेचें धोरण निश्चित स्वरूपाचें ठरवावें अशी विनंति तार पाठवून केली. श्री. अमृतलाल शेठ यांनीं बनारस येथें सरदार वल्लभभाई, म. गांधी वगैरेंच्या भेटी घेऊन राष्ट्रीय सभेचें संस्थानी प्रश्नांबाबत आजवरचें धोरण कोणतें आहे तें दाखवून दिल्यावर महात्माजींनीं सदर प्रश्न राष्ट्रीय सभेच्या सन १९३४ च्या मुंबई येथील बैठकीपुढें संस्थानी प्रजाप्रतिनिधींना पसंत होईल अशा पद्धतीनें मांडण्याचेंहि आश्वासन दिलें.

दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेनें १९३४ च्या आक्टोबर महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यांत खालसा व संस्थानी हिंदुस्थानांत 'संस्थानी प्रजा-सप्ताह' साजरा करून या प्रश्नाबाबत काय लोकमत आहे, तें राष्ट्रीय सभेच्या कार्यकर्त्यांच्या नजरेस आणण्याची तजवीज केली. या खटपटीचा परिणाम चांगला होऊन महाराष्ट्र व कर्नाटक प्रांतांच्या प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यांनीं संस्थानी प्रजाजनांच्या मागण्या योग्य आहेत हें कबूल करून त्याबाबत राष्ट्रीय सभेनें मुंबईच्या अधिवेशनांत ठराव पास करावा असे ठराव पास केले. पण राष्ट्रीय सभेच्या मुंबई येथील अधिवेशनांत संस्थानी प्रश्नांबद्दल व संस्थानी प्रजेच्या हक्कांसंबंधीं सहानुभूति दर्शविणारा ठराव पास झाला नाहीं हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. या अधिवेशनाचे अध्यक्ष बाबू राजेंद्रप्रसाद यांनीं आपल्या भाषणांत कल-

करण्याचा ठराव संस्थानविषयक काँग्रेसचें धोरण काय आहे ते दर्शविणारा आहे असें सांगितलें.

राष्ट्रीय सभेच्या संस्थानी प्रजाविषयक धोरणाबद्दल संस्थानी प्रजा अशा प्रकारामुळें संशयांत असतांना श्री. भुलाभाई देसाई यांनीं म्हैसूर येथील आपल्या भाषणांत "संस्थानी प्रजेनें खालसाच्या अनत्याचारी युद्धांत भाग घेतला म्हणून राष्ट्रीय सभेला संस्थानांच्या अंतर्गत कारभारांत भाग घेतां येईल असें म्हणणें चुकीचें आहे" व "संस्थानिक हे परके नसून संस्थानें नष्ट व्हावींत असें म्हटल्यानें ते ग्रेट ब्रिटनचे दोस्त मात्र होतील, म्हणून संस्थानी प्रजेनें संस्थानिकांशीं गोडीगुलाबीनें वागूनच त्यांच्याकडून क्रमाक्रमानें जबाबदार राज्यपद्धति मिळवावी" अशीं विधानें केल्यामुळें राष्ट्रीय सभेच्या अनुयायांपैकीं संस्थानी प्रजेच्या उन्नतीची खटपट करणाऱ्या लोकांना बाँबगोळा पडल्याप्रमाणें झालें. संस्थानी प्रजेच्या उद्धाराच्या चळवळींतील मुख्य कार्यकर्ते श्री. अमृतलाल शेट यांना श्री. भुलाभाई यांची वरील विचारसरणी चमत्कारिक वाटल्यामुळें व श्री. भुलाभाईंचें मत हेंच राष्ट्रीय सभेचें मत आहे कीं काय, अशी शंका आल्यामुळें त्यांनीं या बाबतींत राष्ट्रीय सभेच्या ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची सभा भरवून या प्रकाराचा निर्णय करावा म्हणून एक ठराव राष्ट्रसभापति बाबू राजेंद्रप्रसाद यांचेकडे पाठविला. ता. २९ जुलै १९३५ रोजीं वर्धा येथें काँग्रेस वर्किंग कमिटीची सभा झाल्यावेळीं या ठरावाचा विचार करण्यांत येऊन तो योग्य रीतीनें मांडलेला नाहीं म्हणून परत पाठविण्यांत जरी आला, तरी काँग्रेस वर्किंग कमिटीनें श्री. भुलाभाई देसाई यांनीं संस्थानिकांस दिलेला सल्ला व म्हैसूर येथील भाषणांत केलेलीं विधानें याबद्दल त्यांना खुलासा करण्याची संधि दिली. श्री. भुलाभाईंनीं संस्थानिकांना आपण दिलेला सल्ला व म्हैसूरचें भाषण या आपल्या वैयक्तिक गोष्टी आहेत असें सांगितलें व त्यानंतर वर्किंग कमिटीनें सदरचा प्रश्न आपल्या कार्यक्षेत्रांत येत नाहीं असें ठरविलें. परंतु यानंतर अध्यक्ष

बाबू राजेंद्रप्रसाद यांनीं ॲ. भुलाभाई देसाई यांच्या विधानाबद्दल कांहीं अभिप्राय न देतां राष्ट्रीय सभेचें संस्थानांबाबतचें धोरण काय आहे त्याचें कथन करणारें एक पत्रक प्रसिद्ध केलें. पण या पत्रकानें संस्थानी प्रजाजनांचें मुळींच समाधान झालें नाहीं. राष्ट्रीय सभेच्या पत्रकांत संस्थानी प्रजेबद्दल सहानुभूति व्यक्त केली असून संस्थानी प्रजेच्या कायदेशीर व शांततामय चळवळीस पाठिंबा देण्याचें पूर्वीं जें आश्वासन कलकत्त्याच्या ठरावांत दिलें आहे, त्याचाच पुनरुच्चार केलेला आहे. पण पुढें त्यांत म्हटलें आहे कीं "संस्थानांतून चळवळ करण्याची जबाबदारी संस्थानांतील प्रजेवर सर्वस्वीं आहे. राष्ट्रीय सभा संस्थानांवर (म्हणजे संस्थानिकांवर) नैतिक व मित्रत्वाचें दडपण कोठेंहि टाकीलच टाकील; यापेक्षां जास्त कांहीं करण्यास राष्ट्रीय सभा असमर्थ आहे. भावी राज्यघटना राष्ट्रीय सभेला मान्य नाहीं, असें अनेकदां जाहीर केलेलें आहे व कॉन्स्टिट्युअन्ट असेंब्लीनें तयार केलेली घटनाच राष्ट्रीय सभेला मान्य होणार आहे. संस्थानिकांचा पाठिंबा मिळविण्यासाठीं प्रजेचा विश्वासघात राष्ट्रीय सभा कधींही करणार नाहीं. राष्ट्रीय सभा जनता-जनार्दनाची सेवा करण्याकरतां अस्तित्वांत आलेली आहे; तिचा जन्म विशिष्ट हितसंबंधासाठीं झालेला नाहीं."

संस्थानी प्रजेनें राष्ट्रीय सभेला स्वतःच्या जबाबदारीवर संस्थानांत चळवळ करण्याची कधींही आजवर मागणी केलेली नाहीं. राष्ट्रीय सभेनें संस्थानी प्रजापक्षीय चळवळीस सहानुभूति असल्याचें जाहीर करून प्रसंगीं पाठिंबा देण्याचें आश्वासन द्यावें एवढीच मागणी केलेली होती; पण महात्माजींनीं त्यांना 'परस्थ' लेखल्यामुळें हा वाद वाढत चालला.

### लोकपरिषदेच्या मागण्या

अखिल भारतीय संस्थानी लोकपरिषदेच्या कार्यकारी मंडळाची सभा ता. ११।८।३५ रोजीं होऊन राष्ट्रीय सभेच्या वरील पत्रकाबाबत चर्चा होऊन एक पत्रक प्रसिद्ध करण्यांत आलें. अ. भा. सं. लोकपरिषदेच्या कार्यकर्त्यांनीं आपल्या पत्रकांत राष्ट्रीय सभेनें पुढील प्रश्नाबाबत आपलें

मत ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या येत्या बैठकींत निश्चित करावें असें मागणें केलें. या पत्रकांत खालील उपस्थित प्रश्न केलेले होते:—

( १ ) संस्थानांत सुद्धां राजकीय कार्य करणेस राष्ट्रीय सभा तयार आहे. सत्ताभिन्नत्वाचा प्रश्न तिच्या या कार्याच्या मार्गांत आड येतो असें नाहीं.

( २ ) भरतखंडांतील भिन्न राजसत्तेच्या कृत्रिम भेदामुळें उत्पन्न झालेल्या संस्थानी व खालसा या दोन्ही मुलखांत आपल्या शक्त्यनुसार चळवळ करण्याची राष्ट्रीय सभेवर नैतिक जबाबदारी आहे.

( ३ ) या चळवळीच्या मार्गांत राष्ट्रीय सभेचें मर्यादित सामर्थ्य एवढीच तिची अडचण आहे.

( ४ ) ज्यावेळीं कॉन्स्टिटयुअट असेंब्लीची घटना होईल, त्यावेळीं खालसामधील प्रजेला ज्या नियमाबरहुकूम प्रतिनिधित्व मिळेल त्याच-प्रमाणें संस्थानी प्रजेलाही मिळेल.

( ५ ) जर कॉन्स्टिटयुअन्ट असेंब्ली अस्तित्वांत येऊं शकली नाहीं, तर संस्थानी प्रजेला अमान्य असणारी फेडरल घटना राष्ट्रीय सभा मान्य करणार नाहीं.

ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची सभा ता. १७ व १८ ऑक्टोबर १९३५ रोजीं मद्रास येथें झाल्यावेळीं संस्थानी प्रश्नाबाबत कोणतें धोरण ठेवावें याबद्दल जोराचा वादविवाद होऊन राष्ट्रीय सभेच्या हल्लींच्या वर्किंग कमिटीनें तयार केलेले ठरावांचे मसुदे जशाच्या तशा स्वरूपांत ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या मद्रास येथील बैठकींत पास झाले. संस्थानी प्रश्नांच्या बाबत वर्किंग कमिटीनें तोंडदेखली सहानुभूति व पाठिंबा देण्याचें धोरण स्वीकारून संस्थानी प्रश्नांबाबत सक्रिय मदत संस्थानी प्रजाजनांस करावयाची नाहीं असें जें वर्किंग कमिटीनें ठरविलें, त्यास अनुसरून ऑल इंडिया काँग्रेस कमिटीचा मद्रासच्या बैठकींत ठराव झाला.

संस्थानी प्रश्नांच्या बाबतींत मद्रास येथें जसा जोरकस वादविवाद झाला, तसा वादविवाद यापूर्वी झाला नव्हता. सरदार वल्लभभाई यांनीं या ठरावावर बोलतांना या प्रश्नासंबंधानें अगदीं बेपर्वाईचें भाषण केलें आणि संस्थानी प्रश्न राष्ट्रीय सभेनें सक्रिय हातीं घ्यावा असें जर ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें ठरविलें, तर सध्यांची वर्किंग कमिटी राजिनामा देईल अशी धमकी देण्यापर्यंत त्यांनीं या लढ्याची मजल नेवविल्यामुळें या धमकीचा परिणाम होऊन वर्किंग कमिटीचा ठराव बहुमतानें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटींत पास झाला. कलकत्ता कॉंग्रेसच्या ठरावानें घटनेंत झालेल्या बदलास महत्त्व देण्याचें कारण नाहीं असें सरदार वल्लभभाई म्हणाले. ते म्हणतात:—

## सरदार वल्लभभाईचें भाषण

"There had been no occasion that he could remember, when the Congress Working Committee of the Congress had lent support to any struggle that had been carried on, in any Indian State by the States' subjects. Much had been made of the clause drafted at Calcutta or Nagpur and the dropping of the clause relating to non-interference at the instance of Pandit Jawaharlal Nehru. How was the omission interpreted by the conduct of the Working Committee, since the change was effected for it was really from the conduct of the Congress-executive that the interpretation should be made? He could not recollect one single instance in which the Congress had interfered with States' affairs, after the change had been effected."

Much had been made of the clause drafted at Calcutta or Nagpur and the dropping of the clause relating to non-interference, at the instance of Pandit Jawaharlal Nehru. They asked "what is the value of your lip sympathy or moral pressure." His answer would be, "well, if you do not value it, I am not anxious to give it."

संस्थानी लोकपक्षीय चळवळींतील कार्यकर्त्यांना, राष्ट्रीय सभेच्या ठरावांची किंमत राष्ट्रीय सभेंतील प्रमुख कार्यकर्ते किती करतात हेंच एकदां निर्णयास लावावयाचें होतें व म्हणूनच या प्रश्नाच्या मागें अखिल भारतीय लोकपरिषदेचें कार्यकारी मंडळ लागलेलें होतें. सरदार वल्लभभाई यांच्या मद्रास येथील भाषणानें या प्रश्नाचा निकाल त्यावेळीं लागला असें म्हटलें जात होतें.

सन १९३६ चें लखनौंचे राष्ट्रीय सभेचें अधिवेशन होण्यापूर्वीं वर्किंग कमिटीच्या बैठकींत जो एक ठराव पास झाला, त्यांत संस्थानांसंबंधीं पुढील भाग आहे:—

"Further the Congress deeply regrets that in Indian States there is similar suppression of civil and personal liberties, and in many of them conditions in this respect are even worse than in the rest of India, and that almost every kind of liberty is non-existent, that in some States, even the Congress has been banned and normal peaceful work of organisation prevented and insult offered to the National Flag. The Congress realises that the effective power behind States is that of the British Government and many States are under direct control of British Officers. However, the responsibility for this deplorable state of affairs might be shared between the British Government and the Rulers of States, the Congress declares that it can recognise no differentiation in personal, civil and democratic liberties as between States and the rest of India. The Congress expresses the determination of the Indian people that notwithstanding this attempt to paralyse national growth and activity, they will continue to face the situation with courage and fortitude and will carry on the struggle for freedom till Independence is achieved."

या लखनौ येथील राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष पंडित जवाहरलाल हे आपल्या भाषणांत म्हणतात,

"The people of India will never admit the right of Indian States to continue as feudal and autocratic monarchy. If the States will put their house in order, there will be no need for any conflict."

या लखनौच्या काँग्रेसमध्यें कलकत्त्याच्या ठरावांस व मद्रास येथें ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या ठरावांस पाठिंबा देऊन असें नमूद करण्यांत आलें कीं, "संस्थानांतील लढा हा तेथील संस्थानी प्रजेनें लढविणें हेंच स्वाभाविक आहे."

सन १९३६ सालीं फैजपूर येथें काँग्रेसच्या अधिवेशनांत पुढील आशयाचा ठराव पास झाला आहे:– "नागरिक स्वातंत्र्याचे हक्क जास्तच प्रमाणांत संस्थानांतून हिरावून घेतले जात आहेत, याबद्दल राष्ट्रीय सभेला खेद होत आहे. संस्थानांतर्गत अखिल भरतखंडाच्या नागरिकांच्या नागरित्वाचे हक्क मान्य झाले पाहिजेत व या हक्काच्या संपादनासाठीं काँग्रेस लढा करील. यासाठीं राजकीय स्वातंत्र्य अवश्य असून त्याच्या प्राप्तीसाठींच राष्ट्राची शक्ति खर्च झाली पाहिजे."

ता. ३१ आक्टोबर १९३७ रोजीं कलकत्ता येथील ऑल इंडिया काँग्रेस कमिटींत म्हैसुरांतील दडपशाहीबद्दल दरबारच्या निषेधाचा ठराव पास करण्यांत आला. हा ठराव पास केल्याबद्दल नंतर महात्माजींनीं आपली नापसंती व्यक्त केली. हरिपुऱ्यास काँग्रेस भरणाच्या पूर्वी वर्किंग कमिटीनें पुढील ठराव ता. ५-२-१९३८ रोजीं केला.

"हिंदी संस्थानांत प्रजेची स्वातंत्र्याची मागणी वाढत असून, सार्वजनिक जीवनही अधिक प्रगल्भ होत चाललें असल्यामुळें नवे नवे प्रश्न व नवीन नवीन स्वरूपाचीं भांडणें तेथें उपस्थित होत आहेत. म्हणून काँग्रेस संस्थानांसंबंधाचें आपलें धोरण पुनः नमूद करीत आहे.

"हिंदी संस्थानें हा हिंदुस्थानचा एक महत्त्वाचा व अविभाज्य घटक असून, हिंदुस्थानच्या इतर भागांप्रमाणेंच हिंदी संस्थानांतही राजकीय,

सामाजिक व आर्थिक स्वातंत्र्य मिळावें असें कॉंग्रेसचें मत आहे. पूर्ण स्वराज्य अथवा पूर्ण स्वातंत्र्य हें जें कॉंग्रेसचें ध्येय आहे, तें हिंदी संस्थानांसह अखिल भरतखंडाबाबत असून सध्यांच्या पारतंत्र्याच्या काळाप्रमाणें यापुढील स्वातंत्र्याच्या काळांतही अखिल भारतवर्षाची एकी व एकजूट कायम राहणें जरूर आहे. ज्या संघटनेमध्यें संस्थानांव्यतिरिक्त हिंदुस्थानांतील बाकीच्या प्रांतांतील लोकसत्ताक राज्यपद्धतीप्रमाणें जबाबदार राज्यपद्धति अस्तित्वांत असलेलीं संस्थानें स्वतंत्र घटक म्हणून प्रवेश करतील तें फेडरेशन कॉंग्रेसला मान्य आहे. म्हणून संस्थानांत जवळ जवळ पूर्ण जबाबदार राज्यपद्धति व नागरिक-स्वातंत्र्याची हमी असावी असें कॉंग्रेसचें मत असून सध्यां बऱ्याच संस्थानांत दिसून येणारा मागासलेपणा, स्वातंत्र्याचा पूर्ण अभाव व नागरिक-स्वातंत्र्याची गळचेपी याबद्दल कॉंग्रेसला खेद वाटतो.

" संस्थानांत हें ध्येय साध्य करण्यासाठीं कार्य करणें हा कॉंग्रेसचा हक्क आहे. पण सध्यांच्या परिस्थितींत कित्येक संस्थानांत संस्थानिकांनीं किंवा त्यांच्यामार्फत ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं कॉंग्रेस चळवळीवर जे निर्बंध व नियंत्रणें घातलीं आहेत, त्यामुळें या वरील ध्येयसिद्धीसाठीं परिणामकारक रीतीनें प्रयत्न करणें कॉंग्रेसला शक्य नाहीं. कॉंग्रेसचें मोठें नांव व इभ्रत यामुळें संस्थानी प्रजाजनांच्या मनांत ज्या आशा व आकांक्षा उत्पन्न होत आहेत, त्या तूर्त तरी परिपूर्ण करण्यास परिणामकारक मदत करणें कॉंग्रेसला शक्य नाहीं व त्यामुळें संस्थानांतील लोकांची निराशा होते. ज्या ठिकाणीं कॉंग्रेस कमिट्या परिणामकारक रीतीनें कार्य करूं शकत नाहींत तेथें कॉंग्रेस कमिट्या स्थापणें किंवा तेथें राष्ट्रीय निशाणाचा होणारा उपमर्द सहन करणें कॉंग्रेसच्या इभ्रतीला साजेसें नाहीं. लोकांच्या मनांत आशा व आकांक्षा उत्पन्न झाल्यावर त्या परिपूर्ण करण्याच्या कामीं कॉंग्रेसला परिणामकारक मदत किंवा संरक्षण देतां न आल्यामुळें संस्थानांतील जनता असहाय व निराश होते व तेथील

स्वातंत्र्याच्या चळवळीच्या मार्गांत अडथळा उत्पन्न होतो. संस्थानांत व हिंदुस्थानच्या बाकीच्या भागांत असलेल्या भिन्न परिस्थितीमुळें काँग्रेसचें सर्वसाधारण धोरण संस्थानांना योग्य नाहीं व त्यामुळें संस्थानांत स्वातंत्र्याच्या चळवळीच्या नैसर्गिक वाढीला व्यत्यय येतो.

" संस्थानांतील लोक बाहेरच्या मदतीवर किंवा काँग्रेसच्या इभ्रतीवर अवलंबून न रहातां आपल्या परिस्थितीप्रमाणें चळवळी करतील तर अशा चळवळींची प्रगति फार झपाट्यानें होण्याचा संभव असून त्यामुळें संस्थानी प्रजाजनांत आत्मविश्वास निर्माण होईल. सबब संस्थानांत होणाऱ्या स्वतंत्र स्वरूपाच्या अशा चळवळींचें काँग्रेस स्वागत करते. सध्यांच्या परिस्थितींत तेथील स्वातंत्र्याच्या लढ्याची जबाबदारी मुख्यतः संस्थानी प्रजेवरच पडली पाहिजे. शांततामय व कायदेशीर मार्गांनीं चालविण्यांत येणाऱ्या अशा तेथील चळवळींना काँग्रेस नेहमीं आपणहून पाठिंबा देईल. पण सध्यांच्या परिस्थितींत संस्थानी चळवळींबद्दल काँग्रेस फक्त नैतिक पाठिंबा व सहानुभूतिच व्यक्त करील. यापेक्षां अधिक मदत काँग्रेस कार्यकर्त्यांना आपल्या वैयक्तिक जबाबदारीवर फक्त करतां येईल. अशा रीतीनें काँग्रेसला बंधनकारक न होतां व बाहेरच्या विचारामुळें अडथळा न येतां हा लढा वाढूं शकेल. म्हणून हिंदी संस्थानांत यापुढें काँग्रेस कमिट्या स्थापन करूं नयेत व संस्थानांतील लढा काँग्रेसच्या नांवावर चालवितां कामा नये अशी काँग्रेसची आज्ञा आहे. याकरितां संस्थानांतून संस्थानी चळवळीच्या संस्था स्वतंत्र काढण्यांत याव्यात किंवा जेथें पूर्वींच्या संस्था असतील तेथें त्या चालू ठेवाव्यात. संस्थानी प्रजाजनांना काँग्रेसचे प्राथमिक किंवा निवडलेले सभासद होतां येईल, पण ते ज्या कमिटीचे सभासद होतील ती कमिटी संस्थानाबाहेर असली पाहिजे.

" संस्थानी प्रजेच्या स्वातंत्र्याच्या लढ्याला काँग्रेसचा पूर्ण पाठिंबा व सहानुभूति आहे असें काँग्रेस त्यांना आश्वासन देऊं इच्छिते. संस्थानी

प्रजेच्या मुक्ततेचा काल फार दूर नाहीं असा कॅंग्रेसला भरंवसा वाटत आहे."

या ठरावावर अ. भा. सं. लोकपरिषदेचे अध्यक्ष व कॉंग्रेस पुढारी डॉ. पट्टाभि यांनीं नवसरी येथें ता. १५-२-१९३८ रोजीं भरलेल्या संस्थानी कार्यकर्त्यांच्या संमेलनांत जोराची टीका केली. ते म्हणाले:—

"आक्टोबर १९३७ मध्यें कलकत्ता येथें भरलेल्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें संस्थानविषयक जो ठराव पास केला आहे, त्यामुळें या प्रश्नास जास्तच महत्त्व प्राप्त झालें आहे. या प्रश्नाला जास्त महत्त्व पूर्वीपासून यावयास लागलेंच होतें व महात्मा गांधींना कॉं. सभासदत्वाचा सुद्धां राजिनामा देण्यास जीं विविध कारणें होतीं, त्यांत संस्थानविषयक कॉंग्रेसचें धोरण हें एक कारण होतें.

## कॉंग्रेसचें विसंगत धोरण

ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या ठरावाप्रमाणें वर्किंग कमिटी खालसा व संस्थानी मुलुखांत भिन्न व परस्पर विसंगत धोरणाचा अवलंब करते असा उघड अर्थ निष्पन्न होतो. हरिपुरा कॉंग्रेसपुढें पुढील तीन महत्त्वाचे प्रश्न आहेत:—

( १ ) संस्थानांत सविनय कायदेभंगाची चळवळ सुरू करण्यास कॉंग्रेस संमति देईल काय?

( २ ) कॉंग्रेसच्या नांवाखालीं संस्थानी प्रजेनें अशी चळवळ सुरू केल्यास कॉंग्रेस आपल्या नांवाचा उपयोग करून देईल काय? निदान मित्रत्वाचा पाठिंबा तरी देईल काय?

( ३ ) कॉंग्रेस तिच्या नांवाखालीं सविनय कायदेभंगाची चळवळ संस्थानांत सुरू करण्यास परवानगी देणारच नाहीं असें समजावयाचें कीं काय?

या तीन महत्त्वाच्या प्रश्नांचा निकाल हरिपुरा काँग्रेसमध्यें लावून घेतला पाहिजे.

## काँग्रेसचें प्रतिगामी धोरण

काँग्रेसच्या परागतिक धोरणामुळें आपण निराश होण्याचें कारण नाहीं. काँग्रेसचें संस्थानविषयक राजकारण मागेंपुढें हेलकावे खातें, पण प्रगति-पथावर चाललें आहे. १९३७ च्या कलकत्त्याच्या ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या ठरावानें आपण उडी मारली व महात्माजींनीं धोक्याचा तांबडा दिवा दाखविला. श्री. भुलाभाई देसाई यांनीं हिरवा कंदील दाखविल्यामुळें आपला प्रगतीचा मार्ग परत चालू होणार आहे.

हरिपुरा काँग्रेससाठीं वर्किंग कमिटीनें वर्धा येथें जो ठरावांचा मसुदा तयार केला आहे, तो काँग्रेसच्या संस्थानविषयक धोरणांत क्रांति घडवि-णारा आहे. राजकीय उत्क्रांतीमध्यें राष्ट्रीय प्रश्नांच्या बाबतींत अशी उलथापालथ होऊं शकते. काँग्रेसचें संस्थानविषयक धोरण पुढें जाणारें व माघार घेणारें असें आहे. सन १९२८ च्या कलकत्ता काँग्रेसनें प्रगतीचें धोरण स्वीकारलें, ऑक्टोबर १९३५ च्या मद्रास येथील काँग्रेस कमिटीच्या बैठकींत या धोरणांत पिछेहाट झाली. परंतु सन १९३६ च्या एप्रिलमध्यें लखनौ येथील बैठकींत पुढें पाऊल पडलें व कलकत्ता येथील १९३७ च्या ऑ. इं. काँग्रेस कमिटीच्या बैठकींत तर फारच पुरोगामी धोरणाचा अव-लंब करण्यांत आला. याच पुरोगामी धोरणामुळें वर्किंग कमिटीला आपलें धोरण निश्चित करणें भाग पडलें. याच वर्किंग कमिटीच्या ठरावांत " संस्थानांतर्गत सबंध हिंदुस्थानला संपूर्ण स्वातंत्र्य मिळावें हेंच काँग्रेसचें ध्येय आहे " असें जें म्हटलें आहे, ती फार आनंदाची गोष्ट आहे. म्हणजे संस्थानांत पूर्ण जबाबदार राज्यपद्धति स्थापन व्हावी व नाग-रिकांचे हक्क संस्थानी प्रजेला मिळावे असें काँग्रेसचें मत आहे असें दिसतें.

पण संस्थानांत असलेल्या काँग्रेसकमिट्या रद्द करण्यांत याव्या असा सल्ला वर्किंग कमिटीनें काँग्रेसला देण्यांत अत्यंत प्रतिगामी धोरणाचा अवलंब केला आहे.

" काँग्रेसची सर्वसामान्य राजकारणपद्धति ही संस्थानांना सामान्यपणें न मानवणारी असल्यानें राष्ट्राची प्रगति कदाचित् होणार नाहीं आणि संस्थानांतलि स्वातंत्र्याची चळवळ ही संस्थानी प्रजेनें चालविल्यास तिचा विकास फार लवकर व विस्तृत प्रमाणावर होईल व त्यांनीं बाह्य मदतीची अगर कांग्रेसची कास धरणें फारसें योग्य होणार नाहीं " अशी जी भावना वर्धा येथील ठरावांत नमूद करण्यांत आली आहे, ती महात्माजींच्या प्रेरणेमुळेंच समाविष्ट करण्यांत आल्यानें त्याबद्दल संस्थानी प्रजेकडून जास्त गंभीरपणें विचार होणें जरूर आहे. काँग्रेसपक्षीयांना आपल्या वैयक्तिक जबाबदारीवर संस्थानांतील लढा लढविण्यास अगर संस्थानी प्रजेला मदत करण्यास मुभा ठेवली आहे हीही गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे. काँग्रेसच्या राजकारणाशीं समरस झालेल्या व पार्लमेंटरी बोर्ड स्थापन करून व काँग्रेस तिकिटावर निवडणुकी लढवून संस्थानांतील कार्य काँग्रेसच्या नांवाखालीं करणाऱ्यांना हें खासें बाक्षिस ' संस्थानांतील काँग्रेस कमिट्या रद्द करून व काँग्रेसच्या नांवाचा उपयोग करण्यास बंदी करून ' वर्किंग कमिटीनें दिलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

संस्थानांतील सत्याग्रह लढा खालसांतील लढ्याच्या वेळींच सुरूं होणें अगर न होणें हा अगदीं निराळाच प्रश्न आहे. यावरून असें स्पष्ट दिसतें कीं प्रांतांत लढा नसतांना संस्थानांत सत्याग्रह चालू झाल्यास काँग्रेसला संस्थानांतील सत्याग्रहाला संमति देणें भाग आहे; पण या संमतीचा अर्थ प्रांतांतून संस्थानांना द्रव्यबल, मनुष्यबल, सत्याग्रही यांचा पुरवठा झाला पाहिजे असा कोणी करत नाहीं. प्रांतांतून जेव्हां सत्याग्रह सुरूं

झाला, तेव्हां शेजारच्या प्रांतांतून सत्याग्रहींची व द्रव्याची मदत मिळेल अशी निरनिराळ्या प्रांतांतील कॉंग्रेस कार्यकर्त्यांनीं अपेक्षा केली नव्हती व संस्थानांतील कार्यकर्ते सुद्धां शेजारच्या खालसा मुलुखांतून, तसा सत्याग्रहाचा प्रसंग आलाच तर, मदत मिळावी अशी अपेक्षा धरीत नाहींत.

कॉंग्रेसपासून संस्थानी प्रजेची एवढीच अपेक्षा आहे कीं, संस्थानी प्रजेनें संस्थानांतील लढा स्वतंत्रपणें आरंभल्यास व त्या लढ्याच्या युक्ततेबद्दल खात्री पटल्यास त्या लढ्याबद्दल तिनें पसंति व्यक्त करावी. यापेक्षां संस्थानी प्रजेची कॉंग्रेसपासून जास्त अपेक्षा नाहीं."

## हरिपुरा राष्ट्रीय सभेचा ठराव

हरिपुरा कॉंग्रेसमध्यें डॉ. पट्टाभि यांच्या वजनानें वरील वर्किंग कामिटीचा ठराव पुष्कळच बदलला जाऊन शेवटीं तो पुढील आशयाचा पास झाला आहे:—

"हिंदी संस्थानांत सार्वजनिक जीविताची वाढ होत असून स्वातंत्र्याची मागणीहि होऊं लागली आहे. तेथें नवे कलहहि माजूं लागले आहेत. ही गोष्ट लक्षांत घेऊन कॉंग्रेस संस्थानाविषयक धोरण नव्यानें प्रसिद्ध करीत आहे.

ब्रिटिश हिंदुस्थानांत जें राजकीय, सामाजिक व आर्थिक आहे, तसेंच स्वातंत्र्य संस्थानांतूनहि असावें. संस्थानें हीं हिंदुस्थानचा अविभाज्य भाग असून तीं पृथक् करण्यांत येऊं नयेत असेंच राष्ट्रीय सभेचें धोरण आहे. पूर्ण स्वराज्य हें राष्ट्रीय सभेचें ध्येय संस्थानांसुद्धां अखिल हिंदुस्थानचें आहे. हिंदुस्थानच्या एकीसाठीं असा अविभाज्य हिंदुस्थान असणें ही गोष्ट आवश्यक आहे. ज्या संयुक्त राज्यघटनेंत हिंदुस्थानांतील इतर प्रांतांप्रमाणेंच संस्थानेंहि स्वतंत्र घटक म्हणून भाग घेतील असें फेडरेशन कॉंग्रेसला पाहिजे. म्हणून संस्थानांतील प्रजेला पूर्ण नागरिक-स्वातंत्र्य व जबाबदारीचें स्वराज्य असावें असेंच कॉंग्रेसचें म्हणणें आहे; परंतु संस्थानांत नागरिक-स्वातंत्र्याची गळचेपी, स्वातंत्र्याचा अभाव या गोष्टी पाहून कॉंग्रेसला वाईट वाटत आहे.

" संस्थानांत हा हेतु साध्य झाला पाहिजे हें कॉंग्रेसचें ध्येय आहे. परंतु आजच्या परिस्थितींत संस्थानिकांनीं घातलेले निर्बंध वगैरे पाहतां आपला हेतु साध्य करण्याचें कार्य कॉंग्रेसला करतां येण्याजोगें नाहीं. संस्थानी प्रजेला कॉंग्रेसचें मोठें नांव ऐकून ज्या आकांक्षा उदित झाल्या असतील त्या तत्काल फलित होणें कठीण आहे. स्थानिक शाखांना योग्य रीतीनें काम करतां येत नाहीं व राष्ट्रीय निशाणाचा मानहि संरक्षिला जात नाहीं ही गोष्ट कॉंग्रेसच्या इभ्रतीला कमीपणा आणणारी आहे. संस्थानी प्रजेला कॉंग्रेसबद्दल कांहीं अपेक्षा उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. परंतु कॉंग्रेसला त्यांना योग्य तें साहाय्य देतां आलें नाहीं तर संस्थानी प्रजेंत खोट्या आशा उत्पन्न केल्यासारखें होणार आहे व त्यामुळें त्यांच्या स्वातंत्र्याच्या चळवळीलाहि व्यत्यय येणार आहे.

हिंदुस्थानची परिस्थिति वेगळी व संस्थानांची परिस्थिति वेगळी असल्यानें कॉंग्रेसचें सर्वसामान्य धोरण संस्थानांना लागूं पडणारें नसतें आणि त्यामुळें संस्थानांतील स्वातंत्र्याच्या चळवळीला मात्र धोका उत्पन्न होतो. संस्थानांत चळवळी करावयाच्या तर त्या तेथील प्रजेनें स्वावलंबनावरच केलेल्या बऱ्या. त्या तेथील परिस्थितीला झेंपतील अशाच असाव्यात व कॉंग्रेसकडून मदतीची अपेक्षा फारशी करूं नये. अशा चळवळी कॉंग्रेसला नकोत असें नाहीं. परंतु विशिष्ट परिस्थिति पाहतां संस्थानी प्रजेनेंच आपल्या चळवळीचा भार उचलावा हें बरें. संस्थानी प्रजेनें अशी चळवळ शांततेनें व न्यायपूर्ण रीतीनें चालविल्यास कॉंग्रेस तिला आशीर्वाद देईल. व्यक्तिशः कोणाहि कॉंग्रेसवाल्याला साहाय्य करतां येईल, अशा रीतीनें कॉंग्रेसवर बोजा न पडतां संस्थानी प्रजेला चळवळ करतां येईल.

म्हणून कॉंग्रेस असें आज्ञापिते कीं, संस्थानांतील कॉंग्रेस कमिट्यांनीं खास कॉंग्रेस वर्किंग कमिटीच्या नेतृत्वाखालीं काम करावें व कॉंग्रेसच्या नांवावर कसलीहि आक्रमक चळवळ करूं नये. संस्थानांतर्गत तंटे कॉंग्रे-

सच्या नांवावर भांडूं नयेत. यासाठीं स्वतंत्र संस्था काढाव्या व ज्या संस्थानांत अशा संस्था असतील त्यांनीं त्या चालू ठेवाव्या.

संस्थानी प्रजा ही आमचेंच अभेद्य अंग आहे अशी खातरजमा काँग्रेस करीत असून त्यांच्या स्वातंत्र्याच्या चळवळीकडे तिचें सावधान चित्त व पूर्ण सहानुभूतिहि आहे. त्यांच्या मुक्ततेचा दिवस कांहीं फार दूर नाहीं.

## त्रिपुरी काँग्रेस

त्रिपुरी काँग्रेसची बैठक ता. १० मार्च १९३९ रोजीं झाल्यावेळीं डॉ. पट्टाभि यांनीं मांडलेला आणि पं. जवाहरलाल नेहरू यांनीं अनुमोदन दिलेला संस्थानांसंबंधीं पुढील ठराव पास करण्यांत आलाः " हरिपुरा काँग्रेसमध्यें पास केलेल्या ठरावामुळें गेल्या वर्षांत संस्थानी मुलुखांत जागृति झाली असून ज्या संस्थानिकांनीं काल-मान ओळखून सुधारणा दिल्या, त्यांचें ही काँग्रेस अभिनंदन करते. आणि ज्या संस्थानिकांनीं तशा दिल्या नाहींत, त्यांचा ही काँग्रेस निषेध करते. विशेषतः संस्थानांतील अशांतता मोडण्यासाठीं सरकारचे पोलिस अगर लष्करी सैन्य आणणें, ही फार निषेधार्ह गोष्ट आहे. संस्थानी प्रजेच्या नागरिक हक्क स्वातंत्र्याच्या लढ्याबाबत काँग्रेसची पूर्ण सहानुभूति असून संस्थानांतर्गत हिंदुस्थानला संपूर्ण स्वातंत्र्य असावें हें काँग्रेसचें ध्येय आहे. "

याच अधिवेशनाचे अध्यक्ष बाबू सुभाषचंद्र बोस यांनीं 'हरिपुरा काँग्रेसचा संस्थानविषयक प्रतिगामी ठराव बदलला जाणें अवश्य आहे. संस्थानी प्रजेच्या नागरिकत्वाच्या हक्कासाठीं काँग्रेस वर्किंग कमिटीनें लढा सुरू करणें इष्ट आहे ' असें आपल्या भाषणांत सांगितलें. काँग्रेसचा ठराव आणि राष्ट्राध्यक्षांचें भाषण यांत किती तरी महदंतर पडत आहे !

मार्च १९४० मध्यें रामगडास काँग्रेसचें जें अधिवेशन मौलाना अबुल कलाम अझाद यांच्या अध्यक्षतेखालीं झालें, त्यांत संस्थानी प्रश्नासंबंधीं कसलाही ठराव पास झाला नाहीं.

सन १९३८ मध्यें हरिपुरा काँग्रेसनंतर निरनिराळया संस्थानांतून ज्या चळवळी झाल्या, त्यांत महात्मा गांधी, सरदार वल्लभभाई पटेल, श्री. शंकरराव देव, रंगराव दिवाकर, गंगाधरराव देशपांडे प्रभृति पुढाऱ्यांनीं जो भाग घेतला, तो वैयक्तिक नात्यानें घेतला, असें कारण तेव्हां दिलें गेलें होतें. अलिकडे महात्माजींनीं आपल्या 'हरिजन'मध्यें संस्थानी प्रजा आणि संस्थानिक यांच्या दर्जाबद्दल आणि हक्काबद्दल सारखे लेख लिहून झोड उठविली आहे. संस्थानी राज्यकारभारांत काँग्रेसनें भाग घेऊं नये असें एक वेळ म्हणणारे महात्माजी, यांनीं खालसाच्या काय, पण संस्थानी चळवळीचीं सूत्रें आपल्या हातीं ठेवलीं आहेत. म्हैसूर, त्रावणकोर, कोल्हापूर वगैरे संस्थानांतील चळवळी मागें घेण्याचा सल्ला त्यांनींच दिला, व औंधची स्वराज्य घटना त्यांनींच मंजूर केली. संस्थानांत कायदेभंग करूं नये असें महात्माजींनीं नुकतेंच प्रतिपादन केलें आहे. आपल्या नैतिक बळावर संस्थानिकांचें मतपरिवर्तन करूं अशी आशा महात्माजींना वाटत होती, पण त्यांत त्यांची निराशा झाल्यामुळें कीं काय, उलट त्यांचेंच मतपरिवर्तन होऊन त्यांनीं संस्थानी चळवळीचीं सूत्रें आपल्या हातांत ठेवलीं आहेत. कदाचित् एक दिवस असाही उगवेल कीं, स्वातंत्र्यसंपादनाच्या मार्गांत संस्थानांची असलेली अडगळ दूर करण्यासाठीं महात्माजी संस्थानांतच लोकशाहीचा लढा सुरू करतील !

---

# दक्षिणी संस्थान हितवर्धक सभा



दक्षिणी संस्थानांतील मुलुखांत प्रजापक्षीय चळवळ करण्यासाठीं पहिली दक्षिणी संस्थान परिषद ता. २४ व २५ मे स. १९२१ रोजीं होऊन त्यांत दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेची स्थापना करण्यांत आली. गेल्या २० वर्षांत दाक्षिणी संस्थानांत जी चळवळ झाली, तिचें उगमस्थान या संस्थेंत असल्यानें तिची थोडीशी माहिती देणें अवश्य आहे. या दाक्षिणी संस्थान हितवर्धक सभेनें निरनिराळया संस्थानांतून प्रत्यक्ष जरी काम केलेलें नसलें, अगर निरनिराळया संस्थानी प्रजापरिषदा ह्या या मध्यवर्ति संस्थेच्या शाखा जरी नसल्या, तरी दाक्षिणी संस्थान हितवर्धक सभेमार्फत निरनिराळया प्रसंगीं ज्या सूचना संस्थानी प्रजापरिषदांच्या चालकांना दिल्या जात, त्यांची कसोशीनें अंमलबजावणी होई असें म्हणण्यास हरकत नाहीं. या संस्थेच्या शाखा स्थापन करण्याची खटपट एकदां करण्यांत आली, त्यावेळीं शिरहट्टी येथें एक शाखा स्थापन झाली. त्याचप्रमाणें दक्षिणी संस्थान हितवर्धक सभा ही. अखिल भारतीय संस्थान लोकपरिषदेची जरी शाखा नव्हती, तरी त्या मध्यवर्ति संस्थेच्या आज्ञा द. सं. हि. सभा कसोशीनें पाळी. निरनिराळया संस्थानी संस्थांची कायदेशीर एक संघटना जरी झाली नव्हती, तरी कार्यप्रेमाप्रमाणें या सर्व संस्था संघटित झाल्या होत्या असें म्हणण्यास हरकत नाहीं.

दक्षिणी संस्थान प्रजापरिषदेचें पहिलें अधिवेशन भरविण्याबद्दल जाहीर विनंतिपत्रक श्री. न. चिं. केळकर व कै. अनंत विनायक उर्फ वामनराव पटवर्धन यांच्या सह्यांनीं निघालें. या पत्रकांत चळवळीची आवश्यकता प्रतिपादण्यांत आली होती. हें पत्रक पुढीलप्रमाणें होतें:—

संस्थानांतील राज्यव्यवस्था नवीन मन्वंतरास अनुसरून प्रजाहितपर व प्रजामतमंत्री असणें अवश्यक आहे. त्यांत खालसा मुलुखांत, अंशतः कां होईना, परंतु राज्यव्यवस्थेचें धोरण नवीन कायद्यानें प्रजाप्रतिनिधितंत्री झालें आहे व या धोरणाचें ध्येय प्रजाप्रतिनिधितंत्री स्वराज्य साध्य करण्याचें बादशहांच्या निरोपाचें द्वारें जाहिर करण्यांत आलें आहे.

हिंदुस्थानांत खालसा व संस्थानी अशा दोन राज्यपद्धती आजवर चालू आहेत. यापूर्वी या देशांत सर्वच राज्यव्यवस्था नोकरशाहीमार्फत चालू असल्यामुळें खालसा प्रदेशामध्यें ज्या गोष्टी चालू करण्यांत येत, त्या एका नाहीं दुसऱ्या तऱ्हेनें संस्थानांत अंमलांत आणण्यांत येत. आतां बदललेल्या परिस्थितींत ही स्थिति रहाणें शक्य नाहीं. संस्थानिक व नोकरशाही निरनिराळे दृष्टिकोणांनीं संस्थानांत पूर्वपीठिका चालू ठेवण्याची खटपट करतील; शेजारच्या मुलुखांत प्रागतिक राज्यपद्धति चालू असतां संस्थानी अंमलाखालीं निराळी पद्धति सुरू राहिल्यास तेथील प्रजेंत असंतोष वाढणें साहजिक आहे. या असंतोषाचा परिणाम खालसा मुलुखासही भोगावा लागेल. संस्थानिकांची वैयक्तिक राज्यपद्धति तहनामे वगैरेंनीं चालू ठेवूं देणें आपल्यास क्रमप्राप्त आहे असें सांगण्यांत येतें व त्या वेळींच वडे अधिकारी कालानुसार राज्यपद्धतींत बदल केला पाहिजे, असा उपदेश संस्थानिकांस करीत असतात.

परंतु या उपदेशाप्रमाणें, राज्यपद्धतींत बदल झाल्याचें क्वचितच दिसतें. मॅाँटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टांत संस्थानांत आपोआप फेरबदल घडून येईल असें नमूद केलें आहे. ब्रिटिश सरकारानीं निरनिराळया प्रश्नांवर संस्थानिकांचें मत कळण्याकरितां प्रिन्सेस चेंबर स्थापन केली आहे. अशा वेळीं संस्थानी प्रजेचें मत संस्थानी राज्यपद्धतीच्या सुधारणेबद्दल संघटित स्वरूपांत तयार होणें अत्यंत जरूर आहे.

यासाठीं ता. २४ व २५ मे १९२१ रोजीं एक परिषद, तूर्त कोल्हापूर, दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानें, सातारा जहागिरींतील संस्थानें, सावनूर,

जव्हार वगैरे संस्थानांतील निवडक गृहस्थ व संस्थानी प्रश्नांसंबंधानें सहानुभूति वाटणारी खालसा मुलुखांतील मंडळी यांची व्हावी अशी कल्पना आहे. या परिषदेंत कोणत्याही विविक्षित संस्थानांतील गैरव्यवस्थेच्या प्रश्नाची चर्चा व्हावयाची नसून संस्थानांच्याबद्दल सर्वसामान्य प्रश्नांसंबंधीं मत अजमावून तें सार्वत्रिक मान्य होण्याबद्दल काय खटपट करावी, हें ठरवावयाचें आहे.

या परिषदेनें, संस्थानांच्या उत्पन्नांच्या मानानें संस्थानिकांच्या खासगी खर्चाची रक्कम ठरविणें, न्यायाचे व राज्यकारभारांतील तक्रारींचे बाबतींत संस्थानिकांस सल्ला देण्याकरितां पोलिटिकल एजंट वगैरे अधिकाऱ्यांच्या ऐवजीं हायकोर्ट जज्जाच्या लायखीच्या इसमांचें उघड चौकशी करणारें बोर्ड मागणें, संस्थानांत कायदे सुरू करण्यास मंडळें असावीं किंवा काय व तीं कशीं नेमावीं याचा विचार करणें, दूर दूर पसरलेल्या संस्थानी खेड्यांचा मोबदला खालसा व संस्थानी खेड्यांशीं करून मुलूख संलग्न होईल असें करणें, खालसा मुलुखांत पास होणारे कायद्यामुळें संस्थानी प्रजेवर बसणाऱ्या अप्रत्यक्ष करांचा अंश संस्थानांस मिळण्याबद्दल मागणी करणें, प्रिन्सेस चेंबरच्या घटनेंत प्रजाप्रतिनिधींचा समावेश होईल असा घटनेंत बदल करविणें, जुनेपुराणे तहांतील जाचक कलमें काढून टाकविण्याची खटपट करणें, ब्रिटिश मुलुखांतील कायदेमंडळांनीं पास केलेल्या कायद्यांचा संस्थानी प्रजेवर परिणाम होतो, सबब असे कायदे पास होण्याचे वेळीं संस्थानी प्रजेचे प्रतिनिधी कौन्सिलांत घेणें वगैरे प्रश्न घ्यावेत अशी सूचना आहे."

या विनंतीप्रमाणें पहिली परिषद ता. २४ व २५ मे १९२१ रोजीं पुणें येथें सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत राव. शंकर भालचंद्र बापट यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. सदर परिषदेस निरानिराळ्या संस्थानांतील २५० प्रतिनिधि आले होते. या परिषदेंत परिषदेचें काम कायम चालविण्यासाठीं 'दाक्षिणी संस्थान हितवर्धक सभा' नांवाची संस्था स्थापन

करण्यांत आली. या पहिल्या परिषदेच्या वेळीं स्वागतपर भाषण करतांना श्री. न. चिं. केळकर म्हणाले :

" दक्षिणेंत अशा प्रकारची भरलेली ही पाहिलीच परिषद असेल असें मला वाटतें. काठेवाडच्या लोकांनीं आमच्या आधीं अशा प्रकारची परिषद नुकतीच भरविली हें आपणांस माहीत आहेच. आजची ही सभा पाहून मला राष्ट्रीय सभेच्या जन्माची आठवण होते. राष्ट्रीय सभेच्या उपक्रमाचा विचार या सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांतच झालेला आहे. राष्ट्रीय सभेचा उगमही प्रस्तुत परिषदेप्रमाणेंच, अल्प प्रमाणांत झाला होता. राष्ट्रीय सभा राजनिष्ठ होती तशीच आजची ही परिषदही संस्थानिकांशीं राजनिष्ठच आहे. किंबहुना राष्ट्रीयसभेपेक्षां ही अधिक राजनिष्ठ आहे. कारण ब्रिटिश सरकाराविषयीं राष्ट्रीय सभेला परकीपणा वाटत असे, पण या परिषदेला आपल्या संस्थानिकांविषयीं पूर्ण आपलेपणा वाटत आहे. संस्थानांत आपणाला सध्यांच रुपयापैकीं आठ आणे स्वराज्य आहे; म्हणजें तेथें आपल्या लोकांचे हातीं राज्यकारभाराच्या सर्व वरिष्ठ जागा आहेत व राहिलेलें आठ आणे स्वराज्य म्हणजे या राज्यकारभारावर लोकप्रतिनिधींचा ताबा तो आपणास मिळवावयाचा आहे. संस्थानिकांनीं आपला राज्यकारभार प्रजेच्या तंत्रानेंच चालवावा हें योग्य आहे. ब्रिटिश हद्दींतल्याबरोबरच देशी संस्थानांतही सुधारणा झाल्या पाहिजेत असें मॉंटेग्यू–चेम्सफर्ड रिपोर्टांत सौम्य भाषेंत पण पूर्ण निश्चयानें सांगितलेलें आहे.

"संस्थानिकांच्या अडचणीही आम्ही जाणून आहोंत. कित्येक संस्थानें अल्पप्रमाण आहेत; कांहींचे मुलूख तुटक आहेत व कांहींचें उत्पन्नही फार थोडें आहे; हें सर्व कबूल आहे. पण त्यांनीं मनांत आणल्यास त्यांना प्रजेला कांहीं सामान्य स्वातंत्र्याचे अधिकार देतां येतील. लहान संस्थानांच्या संस्थानिकांस जर फांशी देण्याचे, फौजदारी न्यायाचे अधिकार व

दिवाणांचे हायकोर्टाचे मोठाले अधिकार गाजवितां येतात तर मग त्यांनीं प्रजेला अधिकार देण्यास हरकत काय आहे ? लहान संस्थानें म्हणून थर्ड क्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार घेऊन त्यांचे संस्थानिक रहातात काय ? जुलूम होण्याची शक्यता जेथें असतें तेथेंच स्वातंत्र्य देण्याची अवश्यकताही उत्पन्न होते. संस्थानी प्रजा आजपर्यंत बहिरी मुकी असे, पण तिला आज वाचा फुटत आहे. तिचा बहिरेमुकेपणा आज जाणार या दृष्टीनें आजचा हा प्रसंग अभिनंदनीय होय. ही परिषद घडवून आणण्याचा खरा उद्योग माझे मित्र रा. वामनराव पटवर्धन यांनीं केला आहे. त्यांचा स्वतःचा संस्थानशीं अद्यापही निकट संबंध आहे. ही परिषद भरविण्यास त्यांचेच परिश्रम मुख्यतः कारणीभूत झाले आहेत व मी केवळ निमित्तमात्र आहें हें सांगणें मला अवश्य वाटतें. आपण सर्व मंडळी आमच्या दोघांच्या वैयक्तिक विनंतीस मान देऊन मोठ्या कार्याचा उपक्रम करण्यास काल व पैसा यांची झीज सोसून आलां यावरून आपणांस या कार्याचें किती महत्त्व वाटत आहे याची जाणीव पटणार आहे."

या पहिल्या परिषदेंत संस्थानिकांनीं प्रजाप्रतिनिधि संस्था स्थापून त्यांना कायदे करण्याचा अधिकार द्यावा, खासगी खर्चाव्यतिरिक्त संस्थानचें सर्व अंदाजपत्रक चर्चेसाठीं कायदेमंडळापुढें ठेवावें, जुलमी आणि नागरिक-स्वातंत्र्यावर घाला घालणारे कायदे रद्द करण्यांत यावेत असे ठराव पास करण्यांत येऊन पुढील दोन महत्त्वाचे ठराव पास करण्यांत आले.

( १ ) देशी संस्थानिकांना ब्रिटिश सरकारकडून आपले दोस्त असें मानण्यांत आलें आहे याबद्दल व 'फेडरेशन'च्या तत्त्वावर त्यांना हिंदुस्थानच्या कारभारांत अंशभागी करण्याचा ब्रिटिश सरकारचा हेतु आहे त्याबद्दल या परिषदेस आनंद वाटतो. तथापि हा हेतु अंमलांत येण्यास संस्थानिकांची एक आणि संस्थानी प्रजेच्या प्रतिनिधींची एक अशा दोन

सभा निर्माण करण्यांत याव्यात, अशी या परिषदेची ब्रिटिश सरकारास विनंति आहे.

( २ ) दक्षिणेंतील संस्थानिकांपैकीं बऱ्याच संस्थानिकांचीं संस्थानें लहान व त्यांचें उत्पन्न थोडें आहे, तथापि त्यांजकडे स्वतंत्र वहिवाटीस असणारे अधिकार महत्त्वाचे असतात. हे अधिकार चांगल्या तऱ्हेनें वजावले जाण्यास मोठ्या पगाराचे, सुशिक्षित व स्वतंत्र अधिकारी असणें इष्ट आहे. याकरितां निरनिराळ्या संस्थानांनीं गट करून समाईक खर्चानें असे अधिकारी नेमून त्यांजकडून असल्या अधिकारांचीं कामें, विशेषतः न्यायमनसुबीचीं कामें करवावींत.

द. सं. प्रजापरिषदेचें दुसरें अधिवेशन ता. १८ व १९ मे १९२२ रोजीं कै. वासुदेवराव गुप्ते यांच्या अध्यक्षतेखालीं होऊन जबाबदार राज्यपद्धति स्थापन करण्यावद्दलचा मुख्य ठराव पास झाला.

ता. ४-९-१९२१ रोजीं द. सं. हितवर्धक सभेच्या कार्यकारी मंडळाची सभा होऊन संस्थानी प्रजेच्यासाठीं एक वर्तमानपत्र काढण्याच्या योजनेचा तपशीलवार विचार करण्याकरतां श्री. छापखाने, अभ्यंकर, कोठारी, केळकर व पटवर्धन यांची कमिटी नेमण्यांत आली. पण या कमिटीचें काम विशेष फलद्रूप झालें नाहीं. तिसरें अधिवेशन बेळगांव येथें ता. २९ व ३० मे १९२३ रोजीं वडोद्याचे सुप्रसिद्ध कार्यकर्ते व भोरचे एक नागरिक श्री. दादासाहेब साने यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें होतें. या अधिवेशनाच्या वेळीं ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद निघाला होता आणि कांहीं कार्यकर्त्यांनीं परिषदेशीं सहकार्य केलें नाहीं. या अधिवेशनांत इतर नेहमींच्या ठरावांशिवाय, दिवाणी दाव्यासाठीं समाईक कोर्ट नेमण्याचा ठराव पास करण्यांत आला.

चवथें अधिवेशन ता. २८ व २९ मे १९२४ रोजीं सांगली येथें परिषद भरविण्यास परवानगी न मिळाल्यामुळें सांगलीनजीक कुपवाडच्या माळावर श्री. छापखाने यांच्या बंगल्यांत बॅ. जयकर यांचे अध्यक्षते-

खालीं भरलें होतें. या परिषदेच्या वेळीं सांगलीच्या जैन पुढाऱ्यांनीं या परिषदेंत शक्य तितका गोंधळ घालण्याचा प्रयत्न केला. बॅ. जयकर ह्यांनीं समजूत घालण्याचे प्रयत्न केले, पण जैन पुढाऱ्यांनीं ब्राह्मणेतरांच्या विरोधी ठराव पास होतील अशी कल्पना करून जी धुळवड उडविली, ती अत्यंत लाजिरवाणी गोष्ट होय. दंगेखोरांनीं परिषद मोडण्याचाच चंग बांधलेला पाहून शेवटीं ही परिषद 'खासगी' असें जाहीर करून पार पाडण्यांत आली. आणि प्रतिनिधींच्या सहकार्यानें ती यशस्वी रीतीनें पार पडली. याच सांगलींत सन १९३८ सालीं जैन पुढाऱ्यांच्या मदतीनें या प्रजापरिषदेचें १२ वें अधिवेशन सरदार वल्लभभाई पटेल यांच्या अध्यक्षतेखालीं पार पडलें. सांगली दरबारनें कुपवाडच्या दंग्याबाबत जी घाईघाईनें प्रेसनोट काढली, ती शेवटीं दरबारास माघारी घेणें भाग पडलें.

यानंतर पुढें जीं अधिवेशनें झालीं, त्यांचा सविस्तर तपशील देण्यांची आवश्यकता नाहीं. निरनिराळ्या अधिवेशनांतून स्थानिक गाऱ्हाण्यांचे ठराव, संस्थानिकांचा खासगी खर्च, फेडरेशन, बटलर कमिटी, मद्यपानबंदी, संस्थानिक संरक्षण बिल, समाईक हायकोर्ट स्थापन करणें, परस्थांचा कायदा, जमीनसारा कमी करणें, वगैरे ठराव पास झाले. दक्षिणी संस्थान हितवर्धक सभेमार्फत दाक्षिणी संस्थान प्रजापरिषदेचीं पहिलीं १० अधिवेशनें कोठें कोठें झालीं, तें पुढें दिलें आहे:—

| | तारीख | अध्यक्ष | ठिकाण |
|---|---|---|---|
| (१) | २४–२५ मे १९२१ | राव. शं. भा. बापट | पुणें |
| (२) | १८–१९ मे १९२२ | कै. वा. रा. गुप्ते | ” |
| (३) | २९–३० मे १९२३ | श्री. ग. भा. साने | बेळगांव |

| | तारीख | अध्यक्ष | ठिकाण |
|---|---|---|---|
| (८) | ३१ मे व 1 जून १९२९ | कै. ग. र. अभ्यंकर | पुणें |
| (९) | २१–२२ मार्च १९३१ | श्री. श्री. ग. वझे | ,, |
| (१०) | २३–२४ डिसेंबर १९३३ | श्री. अ. वा. लठ्ठे | ,, |

वरील कालखंडांत द. सं. हितवर्धक सभेचें काम विशिष्ट पद्धतीनें चाललें होतें. या कालखंडांत या संस्थेचें काम श्री. न चिं. केळकर व कै. वामनराव पटवर्धन यांनीं सेक्रेटरी म्हणून केलें. सन १९३१ मध्यें श्री. बा. वि. शिखरे यांची तिसरे चिटणीस म्हणून निवड झाली. या संस्थेमार्फत ता. २५ ते ३१ ऑगस्ट १९३१ या मुदतींत राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षांच्याकडे पाठविण्याच्या संस्थानी प्रजाजनांच्या किमान मागण्यांच्या अर्जावर सह्या घेणें, अ. भा. सं. लोकपरिषदेचे सभासद मिळविणें व यासाठीं सभा करणें हीं तीन कामें होतीं. दक्षिणी संस्थानांतील कार्यकर्त्यांचा हा सप्ताह यशस्वी झाला. १०२ सभा झाल्या, अर्जावर १६००२ लोकांच्या सह्या मिळविण्यांत आल्या, आणि २४२७ सभासद मिळविण्यांत आले. पुढें ता. १० ते १६ आक्टोबर १९३४ या मुदतींत दुसरा प्रजासप्ताह साजरा करण्यांत आला. राष्ट्रीय सभेतें संस्थानी प्रजाजनांच्याबाबत कोणतें धोरण स्वीकारावें, यावद्दल दिग्दर्शन करण्यासाठीं हा सप्ताह साजरा झाला. प्रजेच्या मागण्यांच्या अर्जावर ६८०६ प्रजाजनांच्या सह्या घेण्यांत आल्या व १२५ गांवीं सभा झाल्या. या सप्ताहांत मिळालेल्या सह्या मुंबई कॉंग्रेसचे अध्यक्ष बाबू राजेंद्रप्रसाद यांना सादर करण्यांत आल्या. हे दोनही सप्ताह यशस्वी करण्याचे कामीं श्री. बा. वि. शिखरे यांनीं अत्यंत मेहनत घेतली. या सप्ताहांचे स्वतंत्र अहवाल प्रसिद्ध झालेले आहेत.

१९३६ सालच्या ऑगस्ट महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत अ. भा. सं. लोकपरिषदेचे अध्यक्ष डॉ. पट्टाभि यांचा दौरा इकडील संस्थानांत होऊन तीस गांवांत ३० व्याख्यानें त्यांनीं दिलीं. दौरा यशस्वी करण्याचें कार्य श्री. बा. वि. शिखरे यांनींच केलें.

दाक्षिणी संस्थान हितवर्धक सभेचा प्रचार, 'संस्थानी स्वराज्या 'स वर्गणीदार मिळविणें, अभ्यंकर स्मारकनिधि गोळा करणें वगैरे कामासाठीं श्री. शिखरे यांनीं वेळोवेळीं संस्थानांतून दौरा काढला आहे.

गोलमेज परिषद्, काँग्रेसचे अध्यक्ष, जॉईंट पार्लमेंटरी कमिटी, इंडियन सँढर्स्ट कमिटी यांचेकडे आपल्या लेखी कैफियती पाठवून या सभेनें संस्थानी प्रजेची बाजू योग्य वेळीं मांडण्याचें कर्तव्य बजावलें होतें. १९२२ च्या इंडिअन स्टेटस ॲक्टला ब्रिटिश पार्लमेंटनें मंजुरी देऊं नये म्हणून पार्लमेंटला आणि पार्लमेंटच्या सभासदांना अर्ज पाठवून विनंति करण्यांत आली होती, पण त्याचा उपयोग झाला नाहीं हा भाग वेगळा.

या सभेमार्फत सन १९२६ पासून 'संस्थानी स्वराज्य' वर्तमानपत्र चालविलें गेलें आणि तें चालविण्याची जबाबदारी सर्वस्वी कै. वामनराव पटवर्धन यांनीं स्वीकारली होती. जंजिरा संस्थानांतील दिवे आगर येथील कै. रामचंद्र शिवराम जोशी आवळसकर यांनीं १००० रु. ची देणगी सन १९२७ मध्यें दिली होती. या वृत्तपत्रामुळें संस्थानांतील बेबंद कारभार चव्हाट्यावर येण्यास मदत झाली आहे यांत संशय नाहीं. या पत्रांतील इंग्रजी अग्रलेख कै. ग. र. अभ्यंकर हे लिहित असत. या सभेनें संस्थानी राजकारण, मुधोळ संस्थानच्या प्रजेची कहाणी, मिरज संस्थानांतील सारावाढ, Indian States Cammittee's Report and public opinion thereon, Indian States Act 1922, Important utterances on Indian states problems, ने. ना. शास्त्री यांचीं संस्थानविषयक दोन व्याख्यानें, वगैरें लहान मोठीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत.

या द. सं. हितवर्धक सभेचें विसर्जन ता. ५ व ६ जून १९३७ रोजीं श्री. नरिमन यांचे अध्यक्षतेखालीं कुडचीस भरलेल्या ११ व्या परिषदेच्या अधिवेशनांत करण्यांत आलें. आणि अशा प्रकारची संस्था द. सं. लोक-परिषद या नव्या नांवानें अस्तित्वांत आली. या परिषदेस जोडून दक्षिणी संस्थानांतील कायदेमंडळांच्या सभासदांचें संमेलन श्री. अण्णासाहेब

भोपटकर यांच्या अध्यक्षतेखालीं पार पडलें व विद्यार्थी परिषद डॉ. खैर यांच्या अध्यक्षतेखालीं झाली. या परिषदेंत काँग्रेस कार्यकर्त्यांनीं विशेष उत्साह दाखविला. या ११ व्या परिषदेंत संस्थानी कार्यकर्त्यांत काँग्रेस आणि काँग्रेसेतर कार्यकर्ते असा भेद पडला. या नव्या संस्थेची ग्रामसभांच्या पायावर आधारलेली घटना पुढें तयार करण्यांत आली.

लोकपरिषदेचें बारावें अधिवेशन ता. २२ व २३ मे १९३८ रोजीं सांगली येथें सरदार वल्लभभाई पटेल यांच्या अध्यक्षतेखालीं प्रथमच संस्थानी मुलुखांत पार पडलें. या परिषदेस ५००० प्रेक्षकांचा जमाव हजर होता. या परिषदेच्या यशस्वितेसाठीं स्वागताध्यक्ष श्री. जंबूआण्णा आरवाडे, चिटणीस श्री. शिखरे, हरिभाऊ टिळक वगैरेंनीं खूप मेहनत घेतली होती. या परिषदेस डॉ. पट्टाभिसीतारामय्या हे उपस्थित होते. या अधिवेशनास जोडून संस्थानी कायदेमंडळांच्या आजी व माजी सभासदांचें संमेलन श्री. भाऊसाहेब सोमण, सातारा यांचे अध्यक्षतेखालीं पार पडलें. संस्थानांत ही परिषद भरविण्याचे कामीं श्री. श्री. ग. वझे यांनीं केलेली कामगिरी उल्लेखनीय आहे. पूर्वी संस्थानांत प्रजापरिषदेचें अधिवेशन होण्याबाबत खटपट झाली होती, पण ती यशस्वी झाली नाहीं. या वेळीं सांगलीस मि. डे यांच्यासारखे प्रागतिक विचाराचे ॲडमिनिस्ट्रेटर असल्यानें त्यांनीं परिषदेस परवानगी दिली. या परिषदेमुळें पूर्वीच्या काँग्रेस आणि काँग्रेसेतर संस्थानी कार्यकर्त्यांतील मतभेद तीव्र झाले. ही परिस्थिति पालटणें अत्यंत अवश्य आहे, कारण संस्थानी चळवळ ही एकाच भूमिकेवरून––संस्थानी प्रजेच्या हक्कसंपादनार्थ-म्हणूनच केवळ चालविली जाणें अवश्य आहे. काँग्रेसनें संस्थानांच्या बाबतींत स्वीकारलेलें धोरण पुष्कळ काँग्रेसश्रेष्ठींनाही मान्य नाहीं. तेव्हां संस्थानी प्रजेला जें मिळणें अवश्य आहे, तें संपादण्यासाठीं आपापसांतील मतभेद विसरून जरूर तें कर्तव्य पार पाडणें अवश्यक आहे. या संस्थानी चळवळीचे प्रवर्तक केळकर-पटवर्धन हे विरोधी राजकीय पक्षांतील जरी होते, तरी त्यांना

संस्थांनी प्रश्नांच्या बाबतींतील मूलभूत तत्त्व मान्य असल्यामुळें त्या दोघांनीं एकजुटीनें कार्य केलें. व त्यांच्या कार्यास प्रथम भोरांतील कायदेभंगानें सुरवात झाली हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. हीच तडजोडीची व देवाण-घेवाणाची वृत्ति सर्व पक्षांच्या संस्थानी कार्यकर्त्यांनीं ठेवली, तर कार्यांत एकोपा राहून कार्य लवकर यशःसिद्धीस जाऊं शकेल असें वाटतें.

गेल्या वीस वर्षांतील चळवळीकडे विहंगमदृष्टीनें जरी पाहिलें, तरी इकडील संस्थानी राज्यकारभारांत प्रगति झाल्याचें दिसून येईल. किती तरी संस्थानांत आतां विधिमंडळांची स्थापना झालेली आहे. औंध संस्थांनच्या अधिपतींनीं आपल्या प्रजेला स्वराज्यदान करून आपली स्वार्थत्यागी वृत्ति जनतेच्या निदर्शनास आणली आहे.

पहिल्या द. सं. प्रजापरिषदेंत जे ठराव पास झाले आहेत, ते पाहिल्यास त्यावेळच्या प्रतिनिधींचें दूरदर्शित्व दिसून त्यांच्याबद्दलचा आदर वृद्धिंगत झाल्यास नवल नाहीं. फेडरेशन व समाईक कारभाराची आवश्यकता हे ठराव सन १९२१ मध्यें पास करण्यांत आलेले आहेत, हें लक्ष्यांत घेण्यासारखें आहे.

दक्षिणी संस्थानांतील चळवळींचें बीज केळकर-अभ्यंकर-पटवर्धन यांनीं रोवलें आणि त्या बीजाचें आतां रोपटें झालेलें सर्वत्र दिसत आहे. पण या रोपट्यांवर फळ येण्यासाठीं जास्त मशागतीची जरूर आहे आणि ती विधायक कार्याच्या रूपानें व्हावयास पाहिजे आहे. आणि ही मशागत एकोप्यानें आणि संघटनेनें होणें अवश्य आहे. पण याच वेळीं भाषावाद, प्रांतवाद आणि जातिवाद यांनीं सर्वत्र पछाडल्यासारखें दिसत आहे. या सर्व वादामुळें चळवळीचें झालें तर नुकसानच होईल आणि फळ मिळणें अवघड होईल. तेव्हां या चळवळीच्या आद्य प्रवर्तकांची आणि त्यावेळच्या निरनिराळ्या संस्थानांतील भिन्न पक्षीय कार्यकर्त्यांची जूट, एकी आणि कार्याची तळमळ यापुढें येणारे संस्थानी कार्यकर्ते दाखवितील, तर 'संस्थानी स्व-राज्या'चें मंदिर फार लांब नाहीं असें वाटतें.

दाक्षिणी संस्थान हितवर्धक सभेनें पुढील संस्थानांपुरतें आपलें कार्यक्षेत्र ठरविलेलें होतें आणि या संस्थानांसंबंधीं द. स. प्रजापरिषदांतून जरूर त्या प्रसंगीं ठराव पास झाले. या संस्थानांची आंकडेवार माहिती पुढें दिली आहे:—

| | संस्थान | क्षेत्रफळ चौ. मैल | लोकसंख्या | उत्पन्न |
|---|---|---|---|---|
| १ | अक्कलकोट | ४९८ | ९२,६०५ | ६,३७,००० |
| २ | औंध | ५०१ | ७६,५०७ | ३,७९,००० |
| ३ | भोर | ९१० | १,४१,५४६ | ६,०२,२०० |
| ४ | जमखंडी | ५२४ | १,१४,२८२ | ९,३०,००० |
| ५ | जंजिरा | ३७९ | १,१०,३८८ | ११,६६,००० |
| ६ | जत | ९८० | ९१,१०२ | ३,०८,००० |
| ७ | कुरुंदवाड ( थोरली पाती ) | १८२ | ४४,२०४ | २,४९,००० |
| ८ | कुरुंदवाड ( धाकटी पाती ) | ११६ | ३९,५८३ | १,९०,००० |
| ९ | मिरज | ३४२ | ९३,९५७ | ५,३२,००० |
| १० | मिरजमळा | १९६ | ४०,६८६ | २,८६,००० |
| ११ | मुधोळ | ३६८ | ६२,८६० | ३,३५,००० |
| १२ | फलटण | ३९७ | ५८,७६१ | ६,०८,००० |
| १३ | रामदुर्ग | १६९ | ३५,४०१ | १,८९,००० |
| १४ | सांगली | १,१३६ | २,५८,४४२ | १५,२९,००० |
| १५ | सावनूर | ७३ | २०,३२० | २,१९,००० |
| १६ | सावंतवाडी | ९३० | २,३०,५८९ | ६,५६,००० |
| १७ | वाडी ( इस्टेट ) | १२ | १,७०४ | ८,४७४ |

| | संस्थान | क्षेत्रफळ चौ. मैल | लोकसंख्या | उत्पन्न |
|---|---|---|---|---|
| १८ | सुरगणा | ३६४ | १५,२३५ | ८४,०४६ |
| १९ | डांग | १४ ठाकोरांत विभागलेलें आहे. उत्पन्न नक्की नाहीं. | | |
| २० | हैद्राबाद | ८२,६९८ | १४,४३६,१४८ | ८,६९,९७,००० |
| २१ | जव्हार | ३०८ | ५७,२६१ | ३,१२,००० |
| २२ | कोल्हापूर | ३,२१७ | ९,५७,१३७ | ५३,९२,००० |

कोल्हापूर संस्थानांतील मांडालिक जहागिरी

| | | | |
|---|---|---|---|
| ( १ ) विशाळगड | २३५ | ३३,२१७ | १,३५,००० |
| ( २ ) बावडा | २४३ | ५१,५८४ | १,०५,००० |
| ( ३ ) कागल (थोरली पाती) | ११५ | ४९,८६७ | ३,३७,००० |
| ( ४ ) कापशी | ३३ | १३,७६७ | ५०,००० |
| ( ५ ) तोरगल | १३७ | १४,७२८ | ४७,००० |
| ( ६ ) इचलकरंजी | २४१ | ६८,५६७ | ४,९३,२०० |
| ( ७ ) कागल (धाकटी पाती) | १७ | ६,७८७ | ५६,००० |
| ( ८ ) हिम्मत बहादूर | ४९ | २०,४०१ | ४०,००० |
| ( ९ ) सरलष्कर | २१ | ७,४७८ | ६६,६५९ |

